

ॐ श्री निष्कलंकी नारायण जनार्दनाय नम:

# संत समागम

संत सद्गुरू श्री इमामशाह महाराजांच्या समागमात
पावन झालेल्या सद्भक्तांच्या निर्मल कथा



सद्भक्त संत नायाकाका महाराजांचा प्रेमी शिष्य व उत्तराधिकारी
गंगासिंह गोहिल यांनी ओवीबध्द केलेले आणि सुरत येथील
सिध्दहस्त लेखक श्री माणेकलाल शंकरलाल राणा यांनी
संग्रहीत व विश्लेषण केलेले पावन कथा प्रसंग



**श्री माणेकलाल शंकरलाल राणा सुरत यांनी**
**श्री सतपंथी मंदीर फैजपूर येथील आर्चक**
**आचार्य श्री जगन्नाथ महाराज यांना**
**सादर समर्पण केले दिनांक १८-६-१९८८**

**मराठी अनुवाद:-आचार्य श्री जगन्नाथ महाराज**
श्री सतपंथी मंदीर, फैजपूर
ता. यावल जि. जळगाव

संकलक

**आचार्य श्री जगन्नाथ गुरु पुरुषोत्तम महाराज**

श्रीसंतकृपा आश्रम, श्री सतपंथी मंदीर,
फैजपूर, जि. जळगाव

प्रकाशक :-

**श्रीसतपंथ ज्ञान साहित्य प्रकाशन**
**श्री सतपंथी मंदीर, फैजपूर**
**ता. यावल, जि. जळगाव**

प्रथम आवृत्ति ) **प्रत १०००** **( सन १९९९**

**किंमत १५० रुपये**

मुद्रक -
**श्री ऑफसेट,**
फैजपूर

★ मिळण्याचे ठिकाण ★

**श्रीसतपंथी मंदिर, फैजपूर ४२५ ५०३**
**ता. यावल, जि. जळगाव**
**दूरभाष ( ०२५८४ ) २२४१७**




वैदिक सनातन सतपंथ संप्रदायाचे प्रवर्तक व
धर्मपीठ पीराणाचे संस्थापक

**सद्गुरु श्री इमामशाह महाराज**

( श्रीमददशावतार ग्रंथाचे मूळ लेखक )

# अल्प निवेदन

इ. स. १९८८ मध्ये 'सतपंथ नवनीत' पुस्तकाचे उद्घाटन (ओपनिंग) भाभाराम देवस्थानचे आचार्य प. पू. शंभुकाका महाराज यांचे हस्ते संपन्न झाले. त्यावेळेस श्री नाथुभाई अेस्. जादव, बडोदा, श्री. माणेकलाल शंकरलाल राणा सुरत वगैरे मान्यवर सत्पंथ धर्माचे तत्त्वचिंतक हजर होते. त्यावेळेस भाषण करतांना श्री. माणेकलाल राणा यांनी सांगितले की, "सद्गुरु इमामशाहांच्या चरित्राचे " खाकी साहेबांनी केवळ एकाच दृष्टीकोनातून आलेखन केलेले आहे. त्यात कोणत्याच हिंदु साधु संताविषयी थोडासाही उल्लेख नाही. त्याकाळात म्हणजे सद्गुरु इमामशाहांच्या काळात नायाकाकांचे परमशिष्य गंगासिंह गोहिल यांनी जे संशोधन करून सद्गुरु चरितावलीचे आलेखन केले. त्यांत बऱ्याच घटनावर प्रकाशं टाकलेला आहे. त्यात विशेषत: रमजुकसाई, गोजारी आहिरण, मनखाजी आहिर, जुम्मा खुरासानी, मलिक महंमद, हाजी कालू, गायीका मायावती, बन्नासिंह हाडा, जंभासिंह, तुवार मंकासेन, जुगल बनजारा, हिरजी नाविक, सेजलदे, सवदास, मलिका हिराबाई, चारसिध्द पुरुष, सत्संगाची रात्र अशा अनेकानेक घटनांचा उल्लेख आहे. इमामशाहांनी अभ्यासिलेली भगवद्गीता, वैराग्य चिंतामणी, यमगीता, अमरआत्मा यावर अर्थगर्भ पदे, चौपाईयाँ केलेल्या आहेत.

सद्गुरु श्री. इमामशाह महाराजांच्या चरित्रात अशा तर अनेक गोष्टींचा उल्लेख करायचा बाकी आहे की ज्याचा सांगोपांग अभ्यास केल्यानंतर धर्मप्रेमी बांधवांना नविन कांही जाणावयास मिळेल. मी जे लिखाण तुम्हाला देत आहे ते केवळ सेवाभावी दृष्टिकोनातून आहे त्याचा मोबदला मला नको. पण मी दिलेल्या साहित्याचा सर्वतोपरि अभ्यास तुम्हीच करू शकाल याच उद्देशाने आणले आहे. सतपंथ धर्माच्या प्रचाराची फिकीर कोणालाच नाही हे मी पाहिले आपण सजाग बनून जे कांही लिखाण करीत आहात ते सत्पंथीयांना जीवनभर उपयोगात येणारे आहे. आपण त्या कार्याकरिता स्वत:ला वाहून घेतले आहे हाच मला खूप आनंद वाटतो. आपण यापेक्षाही अधिक साहित्य निर्माण करून त्याचा प्रचार प्रसार करणार आहांत व सत्पंथधर्म जागृत व उज्वल ठेवणार आहांत ही मला खात्री आहे व हीच सद्गुरु प्रति प्रार्थना करतो."

श्री. माणेकलाल राणा यांनी दिलेले लिखाण म्हणजेच 'संत समागम' होय. हे लिखाण सुरत येथील दत्त आखाड्यात असलेल्या प. पू. दंडी स्वामीकडून त्यांनी प्राप्त केलेले आहे. दंडी स्वामींच्या आश्रमात श्री. नायाकाकांचे परमशिष्य पू. गंगासिंह गोहिल यांच्या हस्ताक्षरातील बऱ्याच ओव्या चौपाईच्या रूपाने आलेखीत केलेल्या आहेत त्यापैकी सतपंथ धर्माचे परम उपदेशक सद्गुरु इमामशाह महाराज, त्यांचा शिष्य नायाकाका महाराज, भाभाराम महाराज, संत साध्वी कीकीबाई व तत्कालिन अनेक संत पुरुष व सति साध्वींचा उल्लेख आलेला आहे. गंगासिंह गोहिल यांच्या त्या चौपाईयाँ हिंदी मिश्रीत गुजराथी भाषेत असून, समजण्यास सुलभ अशा आहेत. सिध्दहस्त लेखक श्री. माणेकलाल यांनी आणून मजजवळ दिले व सांगितले की या लिखाणाचा उपयोग तुम्हाला पाहिजे तेवढा करा व सतपंथ धर्मास जागृति द्या त्यांच्या या लिखाणातून हा संत समागम उदयास आलेला आहे.

आचार्य श्री. जगन्नाथ महाराज

# ★ प्रस्तावना ★

अनादि काळापासून आर्य लोक ज्या उज्वल संस्कृतीने वागत आले त्याच सुसंस्कृतीच्या तेजस्वी व सर्वश्रेष्ठ मार्गाचे अवलंबन सद्‌गुरु श्री इमामाशाहांनी स्वत: करून तोच मार्ग त्यांनी आपल्या परमप्रिय व परमश्रध्दाळू शिष्यांना दर्शविलेला आहे. पुराणकाळी आपले पूर्वज हृदयात विश्वप्रेमाचे अमृत ठेवून व हातात ज्ञानदीप घेऊन सर्व विश्वाला आर्यसंस्कृतीचा संदेश देण्यासाठी निघाले होते. ते साऱ्या विश्वात संचार करीत व वेद, उपनिषदे, भागवत, गीता आदि ग्रंथातील उच्च व पवित्र ज्ञानाने जनतेची मने उन्नत करीत व आध्यात्मिक धारणेचे ज्ञान देत असत.

भारतात व अन्य विभागात अनेक थोर पुरुष होऊन गेलेले होते व त्या त्या थोर पुरुषांनी आपापल्या परीने आर्यसंस्कृतीचा नीट अभ्यास करून तत्कालीन समाजानुरुप धर्म प्रचाराचे कार्य चालू केले होते. त्याच परमश्रेष्ठ आर्य संस्कृतीचा सद्‌गुरु इमामशाहांनी जनतेस उपेदश केलेला आहे. मी काही एक नविन सांगत नसून हजारो वर्षापूर्वी प्राचीन ऋषिमुनींनी जे सांगितले होते तेच सांगत आहे. जुन्यातून नवा उजाळा देत आहे एवढाच काय तो फरक. आपणास खऱ्या धर्माचा विसर पडला आहे. त्या तेजस्वी धर्मात व उज्वल संस्कृतीत अगणित अनिष्ठ रूढी निर्माण झालेल्या आहेत. त्या सर्व आपणास नष्ट करावयाच्या आहेत. खरा, तेजस्वी निर्भय अमर असा धर्म व त्यातून निर्मण होणारे तेजस्वी व सुखमय जीवन जनतेस द्यावयाचे आहे. असे ते सर्व जनतेस सांगत असत.

अशा प्रकारे वेदान्त तत्त्वज्ञानावर त्यांची दृढ श्रध्दा व निष्ठा अविचल होती. परंतु अन्य धर्मियाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन अतिशय उदार व अत्यंत व्यापक होता. त्यांनी 'ऋषिवर चेतावणी' या ग्रंथात म्हटलेले आहे की,

'सृजनहार छे साइया, तेणे किधा ते पंथ अपार॥
ते माहे सहु सहुना स्थानके, आपणा धर्ममा रहे हुशियार॥
अधुरो ओछो कोई नही, सर्वे स्थानके छे सृजनहार॥
सर्वने कारणे सृजीया, सद्‌गुरु ब्रह्मानो अवतार'॥

जगातील सर्व धर्म एकाच मूळ तत्वाचा भिन्न भिन्न मार्गांनी अवलंब करीत आहेत. अशी त्यांची श्रध्दा होती. कमळाच्या फुलास अनेक पाकळ्या असतात. पण त्या सर्व पाकळ्या एकाच मध्यबिंदूशी निगडीत झालेल्या असतात. त्याचप्रमाणे सर्व धर्म पंथ एकाच तत्त्वातून निघालेले आहेत व एकाच तत्त्वाचा अविष्कार करीत आहेत. कमल पुष्पाच्या दलात असा विरोध असत नाही. तद्वत भिन्न भिन्न धर्मात विरोध असू नये. असे ते सांगत असत. अनेकात एकत्व पाहण्याची प्राणिमात्राला सवय लागली पाहिजे अशी त्यांची शिकवणूक आहे.

मोक्षासाठी हिंसेची, यज्ञयागाची, महानकष्टप्रद योग साधनांची अथवा अवास्तव पांडित्याची काही आवश्यकता नाही. अहिंसा, सत्य, अस्तेय, अपरिग्रह समता, क्षमा, सेवा हा खरा मुक्तीचा मार्ग आहे. जाती जातीत विषमता असण्याचे कारण नाही. सर्वांची जात एकच. ती म्हणजे मानव जात. जगातील सर्व मानव एकसमान आहेत. सर्व प्राणिमात्रांचा आत्मा एकसमान आहे.

"जगदीश जगत जगमाही जगदीश। ऐवी बुध्दी राखो तमे सालस॥"

हे सर्व जगत जगदीशमय आहे. जगदीशच जगत्स्वरूपाने साकार झालेला आहे. 'हे विश्वची माझे घर' अशी भावना ठेऊन मनुष्याने त्याप्रमाणे वागले पाहिजे. मानवतेची सेवा केली पाहिजे तरच मोक्ष साधन सुलभ होईल. भक्ति केलेली कोणाचीही निर्ष्फळ जात नाही. पुण्य, दान, जप, तप, तीर्थ, व्रत आदि केलेले कोणतेच व्यर्थ जात नाही. परमार्थ मार्ग सुलभ करण्याचे ते साधन आहे. सर्वांनी ही कर्मे केली पाहिजेत. परंतु त्यात जर फलाकांक्षा असेल तर त्यायोगे आपले प्रारब्ध बांधले जाते व स्वर्गादि दिव्य सुखे भोगली जातात पण ते आपल्या मुक्तिमार्गात बंधनच असते. कारण स्वर्गादिसुखे भोगल्यानंतर जीवात्म्यास मृत्युलोकांत यावे लागते त्यावेळेस आपणास मनुष्य देह मिळेल किंवा नाही हे समजणे शक्य नसते म्हणून आपला लक्षचौर्यायशीचा फेरा सुरु होतो. याकरितां हल्लीच आपण प्राप्त परिस्थितीत परमेश्वर स्वरूपानुसंधान करून निष्कामतेने सर्व कर्मे कर्तेपणाचा अभिमान न बाळगता मुक्तिमार्गाचे सत्यमार्गाचे आचरण केले पाहिजे. असा अमुल्य उपदेश त्यांनी लोकांना केला. हा उपदेश त्यांनी अवघड भाषेत न करता गुजराथी सारख्या सोप्या भाषेत केले आहे. सर्वांना इमामशाहांची मधुर वाणी ऐकून आनंद होई. लोक त्यांचा उपदेश ऐकतांना आपल्या वैर भावना-पापवासना विसरून जात व ते त्यांच्या हृदयात अहिंसेचा सत्याचा प्रेमाचा दीपक पेटवित असत.

साधारणत: महापुरुषांच्या जीवनाभोवती अनेक चमत्कारी कथांचे जाळे पसरलेले असतात. श्रीकृष्णाने आपल्या हाताच्या एका करंगळीवर गोवर्धन पर्वत उचलला किंवा श्रीकृष्णाने तसेच श्रीरामाने लहान वयातच अनेक दैत्यांचा संहारकेला. ज्ञानेश्वरांनी भिंत चालविली, रेड्याकडून वेद वदविले, मिराबाईने विष पचविले तसेच एकनाथ, नामदेव, तुकाराम आदि महान संतासंबंधी अनेक चमत्कारी कथा आहेत. तशाच इमामशाहा संबंधीही आहेत. त्या त्यांच्या चरित्रात आलेल्या आहेत. पण असे चमत्कार हे महात्मा पुरुषांचे सारसर्वस्व नसून ती त्यांची सहजलीला असते. अशा चमत्कारी लीला कित्येक लोक ऋध्दिसिध्दिंच्या बळावर करीत असतात परंतु सत्पुरुषांचे तसे नसते. त्यांच्या आत्मिक शक्तिच्या, तप:सामर्थ्याच्या योगाने तशा चमत्कारी गोष्टी त्यांच्याकहून सहज घडत असतात. त्यांना ऋध्दिसिध्दींची जरूरी नसते. सद्गुरु इमामशाहांनी तर तशा लोकांचा तीव्र निषेध केलेला आहे. जे ऋध्दि सिध्दींच्या योगाने इतर सामान्य जनास भुलवितात त्यांना कल्पांतिही मोक्ष मिळत नाही ते आत्मघातकी जाणावेत, असे त्यांनी सांगितलेले आहे.

आज जवळजवळ ५००-५५० वर्षापासून त्यांची स्मृति जनतेत कायम राहिली ती केवळ चमत्कारामुळे नसून त्यांनी उपदेशिलेल्या अमुल्य अमर दिव्य उपदेशामृतानेच, अगम्य अशा आगम ज्ञानामुळेच व अवर्णनिय तप:सामर्थ्यामुळेच त्यांनी दर्शविलेल्या सनातन वैदिक धर्मतत्वामुळे व परम उज्वल सुसंस्कृत क्रियाचरणामुळे लाखो लोकांचे ते श्रध्दास्थान बनले. मानवजातीच्या कल्याणासाठी त्यांनी स्वत: अत्यंत उपसर्ग सहन करून आत्मज्ञानाची सत्याची, समतेची, सेवेची, क्षमाशांतीची व अहिंसेची महान शिकवण जगाला दिली हे त्यांचे थोरपण होय व म्हणूनच त्यांच्या जीवनवृत्तान्तांची माहिती असणे आवश्यक आहे म्हणून त्या दृष्टीने हा प्रयत्न करण्यात आलेला आहे.

सद्गुरु महाराजांच्या चरित्राचा संपूर्ण असा काही एखादा ग्रन्थ नसल्यामुळे त्यांच्या जीवनावरील एक एक घटना गोळा करतांना फार परिश्रम पडले. प्रस्तुतचे चरित्र मुख्यत: ज्या चरित्राच्या आधारे लिहीले आहे ते चरित्र 'भाभाराम सुबोध' या मुळ गुजराथी ग्रंथात असून ते थोडक्यात व ओविबध्द आहे. त्यातून व 'इमामशाहाना परछा' नावाच्या पुस्तिकेतून काही भाग घेतलेला आहे. संत नायाकाकांचा परमशिष्य गंगासिंह गोहिल यांनी लिहिलेल्या कांही ठळक गोष्टींचा उल्लेखहि या ग्रंथात आहे अशा प्रकारचा हा "संत समागम" ग्रंथ जनता जनार्दनाच्या हस्तकमली सुपूर्द करतांना मनाला खूप आनंद होतो.

सदर ग्रंथाच्या प्रकाशन कामात बामणोद येथील कै.झिपरू जानु झोपे यांचे स्मरणार्थ श्रीमति शेवतांबाई झिपरू झोपे यांनी उदार हस्ते देणगी देऊन उपकृत केलेले आहे. तसेच फैजपूर येथील श्री.हरिभाऊ वामन नारखेडे व सौ.शालिनीबाई हरिभाऊ नारखेडे यांनी सुध्दा उदार अंत:करणाने सदर प्रकाशनास सढळ हस्ते मदत केली आहे. त्या सर्वांचे प्रकाशन संस्था अत्यंत आभारी आहे.

फैजपूर येथील श्री ऑफसेटचे मालक श्री.परदेशी बंधु यांचे आम्ही अत्यंत आभारी आहोत. या संपूर्ण कामात तन, मन, प्राण ओतून श्री.संजय कुळकर्णी (टायपिंग सर) यांनी टाईप कंपोजिंग केले, व छापखान्यातील संपूर्ण सहकारी वर्गाचे आम्ही अत्यंत आभारी आहोत.

श्रीगुरुप्रतिपदा
१/२/१९९९

आचार्य श्री जगन्नाथ महाराज
श्रीसतपंथी मंदीर, फैजपूर



श्री सतपंथी मंदीर फैजपूरचे विद्यमान आचार्य

**प. पू. जगन्नाथजी महाराज**

श्रीमद् दशावतार ग्रंथाचे मराठी अनुवादक

# अनुक्रमणिका

# १) पू.संत इमामशाह महाराज.

## पूर्व वृत्तांत

कुलं पवित्रं जननीकृतार्था, वसुंधरा पुण्यवतीच तेन॥
अपार संवित्सुख सागरेऽस्मिन्लिनं परब्रह्मणि यस्य चित:॥

अपार ज्ञान आणि सुखसागररूप परब्रह्मात ज्याचे चित्त लीन झाले आहे असे महात्मापुरूष ज्या कुळात जन्मतात ते कुळ पवित्र होते. ज्या मातेच्या उदरी जन्माला येतात ती जननी कृतार्थ होते आणि ज्या भुमीवर ते जन्माला येतात ती भूमि भाग्यशाली होय.

दुर्लभ दर्शन चरण गहूँ, पावन जीवन करत इन्सान॥
सतपंथ सत धारण कर, सत धर्म चलत सत प्राण॥
सब हिरदे अेक है, सत सार जानी महाभाग॥
सत् तत्त्व ही परब्रह्म है, सत् रूप तत्व अनुराग॥
त्रय वेदोंका मधुसार कहै, पंचत्व लीन इमाम॥
अथर्ववेदका आश्रीत, शाहा करै ज्ञान तमाम॥
शाह इमाम नाम पढ, दुष्मन करत है पुकार॥
ना जानत सत सारको, करत भेद गँवार॥
सद्गुरू हिरदे भेद नही, भेदीके मनमें भेद॥
वही मूरख दुष्कर्म करे, जनताके हिरदे छेद॥
वचनामृत शाह इमामके, हिरदे रहेंगे खास॥
आशिष वरदहस्त पीरके, रहे हमारे पास॥

अशा या महान संताची पूर्वपिठीका व त्यांनी खऱ्या हिदुंत्वाच्या रक्षणासाठी अखंड तेवत ठेवलेल्या दीपरूप 'सत्पथ' दर्शक जीवनाचा अल्पसा परिचय करून देण्याचे धाडस त्यांच्याच कृपा प्रसादाने करीत आहे.

## पुराण काळाची मिमांसा

पुराणकाळ म्हटला म्हणजे त्याचा आदि अनादि आणि अन्त जाणण्यास मानवी शक्ति असमर्थ ठरते. तरी पण मानवबुध्दि ही श्रध्दावादी असल्याने ती तर्काद्वारेअनुमान काढून सत्साराप्रत येऊन पोहोचण्याचा अखंड अहर्निश प्रयत्न करीत आहे. असाच हा माझाही प्रयत्न आहे.

## "तमसो मा ज्योतिर्गमय"

प्राचिन अतिप्राचिन कालात मानव निसर्ग चमत्कार पाहून, अनुभवून त्यातील दिव्यत्वाला प्रभुरूप मानून त्यांची प्रार्थना, भक्ति, सेवा, पूजा करूं लागला. शनैः शनैः त्यातील अनुभव - फलादिंची प्राप्ती करून भविष्याची रचना करूं लागला हे अनुभव बुध्दिप्रगल्भांनी मुखोद्गत ठेवले. अनंत कालानंतर लिखित रूप झाले. या महानकालात मानव प्राणि भ्रमण करणारा होता. या भ्रमणातच भारत वर्षात आर्यांच्या प्रवेशाचा उल्लेख मिळतो. भारतवर्षात ही संस्कृति अधिक सदाचारी, बुध्दीमान व दिव्य शक्तिची जाण ठेवून प्रभुरूप जाणून त्यांनी तिची महति ग्रथीत करून ठेवलेली आहे. अशा प्राज्ञांचा प्रभाव भिन्न भिन्न टोळ्यावर पडून एकसंघ समाज निर्मिती केली व त्यांचे रक्षण संरक्षक (राजे महाराजे व ऋषिमुनि) तयार झाले. यानंतरचा काळ हा पुराणे निर्मित बनला. तत्कालिन मानव वंशाचा त्याच्या आचार विचारांचा आणि निती-अनितीचा विवाहादीच्या घटनांचा व संघर्षाचा इतिहास म्हणजेच पुराण होय. पुराण कालानुरूप जी नितीतत्वे मानव समाज पोषक निश्चित झाली, त्या नितीतत्त्वांनाच धर्मरूप मानून, हळूहळू संघटनात्मक व्यवस्था होऊन व्यवसायात्मक वर्ण निर्माण झाले व त्या प्रभावानेच मानवांची जीवन रचना होऊन व्यवहाराऐवजी जन्मावरून ही वर्ण व्यवस्था झाली. आजतागायत हीच वर्णव्यवस्था आढळते ह्या व्यवस्थेत ब्राह्मण वर्णियांनी अति कट्टरपणाने अन्य वर्णियावर घनाघाती अत्याचार व अन्यायी वागणूक केल्यामुळे त्यांच्या ह्या जाचास कंटाळून सुटसुटीत सहजसुलभ आचारणाचे पंथोपपंथ निर्माण झाले. सारांश हा धर्माचरणांचा क्रान्तिकाळ होता. यात आंतरिक व बाह्य अनेक धर्मांचा संघर्ष चालू होता.

सुमारे १३ व्या शतकात व नंतरच्या काळात बाह्य धर्मीयांचे अनुयायांनी तर साम, दाम,दंड, अपहरण इ. मार्गाचा अवलंब करून त्यांच्या नव्या धर्माचा, नितीतत्वांचा शस्त्रास्त्रांचा उपयोग करून भारतीय धर्मावर पगडा बसविला. अशा भयानक काळात सामान्य जनता सनातनी हिंदुत्व जतन करण्यासाठी प्राणपणाने आक्रमकाशी मुकाबला करीत तर कित्येक मरण भयाने आपसुक त्यांचे अनुयायी होत. अशा धर्मचक्रात सामान्य जनतेला जर कोणी धीर दिला असेल, त्यांचे जीवन सुरक्षित केले असेल तर ते केवळ तत्कालीन साधु संत महात्मे पीर फकीर सुफीसंत ह्यांनीच केले. स्वतः अपार कष्ट सहून त्यांनी जनता जनार्दनाला सुखी व सुरक्षित ठेवण्याचा प्रयत्न केला.

## " प्राचीन भारत वर्ष-अखंड भारत देश "

भारत देश पृथ्वीवरील मध्यवर्ती व ईश्वरीय तत्वांनी परिप्लूत असलेला विशाल भूप्रदेश आहे.आजचा भारत हा विकृत क्षयी स्वरूपाचा आहे. ह्या देशाची व्याप्ति अफगाण, मंगोलिया, पामीर ,हिमालयाची उत्तुंग शिखरे, आसाम, ब्रह्मदेश, इंडोचायना, जावा सुमात्रादि बेटे असा पूर्व पश्चिम पसरलेला आणि हिमालयातील काश्मिर, नेपाळ, भूतानादि ते सिलोन लंका लखदिव मालदिवादि बेटापर्यंत उत्तर दक्षिण पसरलेला भूखंड होता. थोडक्यात हा अरबस्तान ते इंडोचायना पर्यंतचा प्रदेश म्हणजे पूर्ण आशिया खंड होय, यालाच जंबुद्विप असे म्हणत. या प्रदेशाचे प्राचीन नाव जंबुद्विप-आर्यावर्त व नंतरचे हिंदुस्थान होय. याच्या दक्षिणेस आजही त्याच नावांचा हिंदीमहासागर असून पश्चिमेस मर्यादा दर्शक समुद्रास अरबी समुद्र व पूर्वेस बंगालचा समुद्र असा हा भूविभाग आहे.

## " प्रथम मानव उत्पत्ति "

या भूप्रदेशात प्रथम सर्वाआधी मानवाची उत्पत्ति झाली असावी. कारण, हिमालयाच्या अत्यूच्च शिखरावर कैलासादिवर आदिमानवाच्या कांही पाऊल खूणा सापडल्या व अजूनही हिममानवाशिवाय तेथे कोणीच पोहोचू शकत नाही. ते स्थान सूर्य ऊर्जा प्रथम सर्वाआधी प्राप्त होण्यास अत्यंत जवळ आहे. अर्थात ते स्थळ पवित्र व शुध्द परमेश्वर शक्तिचेच आहे यांत शंका नाही. अशा प्रदेशात यच्चयावत पदार्थ ही सोम ( जड ) असून त्यांत सूर्यऊर्जेचे म्हणजेच अग्नीचे प्रस्थापनाने समष्टिनेच गतिमय जीवन ( प्रकृति + पुरूष मिलन ) प्राप्त होते. या अदृश्य मिलनानेच अयोनी जीवन दृश्यरूप धारण करते. यावरून प्रथम जीवसृष्टी येथेच प्रगट झाली असावी व तेथून ती विचरण करीत भुप्रदेशात इतस्ततः पसरली असावी.

## " ज्ञानप्राप्ति साधना-आर्यधर्म-हिंदुधर्म. "

अत्यंत पवित्र नैसर्गिक वनस्पति, नद्या, पर्वत वनराजी, पंचमहाभूतांच्या समृध्दीने युक्त प्रदेशाच्या सान्निध्यातला मानव शनैः शनैः अनुभव-ज्ञान-प्राप्ति करीत आपल्या शिरोस्थानाच्या ब्रह्मांडी साठवून संग्रह करीत गेला. या स्मृतीच्या पिढ्यान् पिढ्या अनेकानेक व्यक्तिंनी ते ज्ञान देवाणघेवाण करून त्याच सूर्य-सोमाचे सान्निध्यात राहून आपल्या ठायी संचित झालेल्या ईश्वरीय शक्तिला देवत्वाचे रूप मानून ( विद्यादेवता-ब्रह्मकन्या ) सत् स्वरूप सोम सूर्याची जाणिव करून तत्प्रित्यर्थ देववाणीत

प्रार्थना केली. त्यात अनेकांच्या अनेक सत्शक्तिंचा समुच्चय झाला. ती वाणी तीव्रता झाली. अशा प्रकृति पुरूषाच्या मूल सत्त्वाची त्रिकालाबाधित जाण राहावी, भावीपिढीला त्याचा उपयोग व्हावा, याच सदहेतूने त्यांनी कांही स्तुतीसुमने, मानववंश निरोगी, निष्कलंक, निर्लोभ, सत्स्वरूप रहावा म्हणून ग्रथीत करून ठेवली. अशी ती तत्त्वे पुढे प्रस्थापित धर्माची नीतितत्त्वे-आचारधर्म म्हणून मान्य झाली. अशा ज्ञान साधनेनेच हा आर्यधर्म-हिंदुधर्म वास्तव्य करून आहे.

**"धर्मसंस्कार वृक्ष"**

असा हा विशाल हिंदुधर्म वेदकालापासून अधिक सुस्पष्ट झाला. हा अपौरूषेय अनादि असून तो कोणी एका व्यक्तीने निर्मित केलेला नाही. तो वेदवाणीत म्हणजेच देव वाणीत संस्कृतात राहिला. साधारण मानवासाठी त्याचा अर्थ व उपयोग दुर्बोध होत गेला. अशुध्द उच्चाराने अनर्थ होऊ लागल्याचे पाहून त्यामुळे त्यांच्या उपयोगाला बंधन आले. या बंधनाचा ज्यांना जांच वाटला त्यांनी त्यातूनच कांही निवडक तत्त्वांचा अंगिकार करून सामान्य जनतेस लोक भाषेत सांगू लागले. अशा रीतीने निर्बन्ध न होता अनेकानेक पंथ निर्माण झाले व त्यांचे निर्मातेच त्या धर्माचे प्रेषित होऊन 'आम्हास परमेश्वरानेच या भूमीवर ह्या पंथाचे प्रचारासाठी पाठविले आहे' असे प्रतिपादन करून वेदसुक्त पठनाचे चमत्कार करून आपले श्रेष्ठत्व दर्शविले आहे.

सनातन हिंदुधर्म-आर्यधर्म हा प्रेषितधर्म नाही वा पंथही नाही. तो प्राचिन ऋषिमुनींच्या अध्यात्मिक अनुभवातून प्रस्फूटीत झालेल्या,स्फूरलेल्या आंतरिक प्रेरणेने भावीजनांचे जीवन सुखी व समृध्द होण्यासाठी सुयोग्य संस्कारयुक्त साधनांची शिकवण चालू रहावी याच सत उद्देशाने हा सनातन धर्म-आर्यधर्म प्रस्थापित केला. त्या धर्मवृक्षाचे स्वरूप गीतेत सुस्पष्ट केले आहे.

उर्ध्वमूलमधः शाखमश्वत्थं प्राहूरव्ययम्।
छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ।। १५/१

तत्त्वतः हे स्पष्ट होते की वेदप्रणित हिंदुधर्माच्या वृक्षाचे मूळ (उत्पत्ति) सूर्यांतर्गत ऊर्जारूप शक्ति हेच (पुरूषः परमेश्वर) सत्तत्त्व होय. त्याच्याच दृश्यरूप फांद्या खाली पृथ्वीवर धर्माचार नितितत्त्वे कधीही नाश न पावणारी वेदीय सत्तत्त्वे हीच अनेक असंख्य पल्लव पाने होत. (धर्मपंथ प्रेषितांनी घेतलेली) त्या सुंदर पालवीचे रूप यथार्थपणे जो जाणतो तोच ह्या वेदप्रणित धर्माची जाण शान मान राखतो आणि तोच दृश्यरूप अश्वत्थ वृक्ष होय. तोच अशाश्वतही होय. त्यानेच आपले सत्

स्वरूप जाणून ह्या हिंदुधर्माची जे जे वहन करीत केले सारेच अंतिम घट केला त्याच ईशतत्त्वात विलीन झाले, होत आहेत व पुढे होतीलही. ह्या ईश तत्त्वाबद्दल गीता आवर्जून सांगते,

अनेक वक्त्र नयनमनेकाद्भूत दर्शनम् । ११/१०
अनेक बाहूदर सत्त्वां सर्वतोऽनन्त रूपमपश्यामि ॥११/१६

प्राचिन ऋषिमुनिंनी, नूतन साधू संतांनीही, अर्जुनानेही हे ईशस्वरूपतत्त्व पाहिले जाणले व ज्ञाते प्रत्यक्षात पहात व जाणत आहेत, नव्हे तर ते शोधून काढण्यात विज्ञानवेत्ते प्रयत्नशील आहेत. ते अज्ञानी प्रजेला सत् स्वरूपाचे मार्गदर्शन करीत आहेत. या सर्वांचा जन्म अनेक पंथात व धर्मात झाला आहे होत आहे व होणारही आहे. अशा सत्ज्ञानीच्या ठायी मान, जाती, धर्माधर्म, व्यक्तिहीनता नसते. कारण ह्या सर्वांनी सृष्टीचे विश्वाचे सत् स्वरूप जाणूनच तदनुरूप आपले दृश्यादृश्य जीवन व्यतीत केले आहे.

इसवी सनाच्या १३ ते १६ व्या शतकाचा काळ हा धार्मिक व राजकीय दृष्ट्या अत्यंत जुलूम जबरदस्तीच्या होता. याला आजही पुराणाप्रमाणे इतिहास साक्ष आहे. या काळात अरबस्थानात व पूर्व युरोप या प्रदेशात धर्मक्रान्तीची लाट उसळली. युरोपात पोपकडून सामान्य जनतेचा छळ व अरबस्थानात खलिफांच्या अत्याचाराने शीया-सुनी यांचा परस्परात होणारा संघर्षाचा परिणाम, अशा संघर्ष काळात इस्लाम पंथाच्या व खिस्त धर्माच्या धर्माचार्यांनी कट्टर सनातन्यांच्या विरोधात आपल्या पंथाच्या साधारण त्राहित्राहि झालेल्या जनतेला आश्रय दिला. अशाच वेळी भारतातही इस्लामधर्मी राजघराण्यांनी आक्रमक पवित्रा घेऊन धर्माच्या प्रसारास्तव सामान्य हिंदुधर्मीयांना जेरीस आणू लागले. कधी गांवे लुटून, लढाया करून, धार्मिक स्थळांना उध्वस्त करून, प्रसंगी सर्वांना बाटवून व स्त्रियांचे अपहरण करून इस्लाम धर्म स्विकारण्यास भाग पाडत होते साऱ्या भारतात अशा तऱ्हेने इस्लाम बरोबर युरोपातील इंग्रज, फ्रेंच, डच, पोर्तुगीज, हेही म्लेंछ व्यापाराचे निमित्ताने राजकीय आक्रमण करून हिंदु जनतेला बळजबरीने त्यांचा धर्म पंथ स्विकारायला लावीत. अशा धर्माचा उच्छेद जेव्हा होऊ लागतो तेव्हा प्रत्यक्ष परमेश्वर अवनीतलावर आपल्या बरोबर सत्कर्मी संतरूप देवलोक मानवी रूपात अवतीर्ण करतो, असे पुराणात तर आहेच पण भगवद्गीता देखील सांगते की धर्माचे-सद्धर्माचे रक्षण प्रभूच करतो.

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदाऽऽत्मानं सृजाम्यहम् ॥४/७

अशा अमानवीय दुर्जनाकडून राक्षसी अत्याचार धर्मपरायण समाजावर होतो तेव्हा प्रभु अनेक घरात कुटुंबात आपल्या सद्गुणी आत्म्यांनाही आपल्याबरोबर जन्मास घालतो व संत महंतांचे रूपात व शूरवीरांचे स्वरूपात त्या धर्माचे रक्षण करतो. ह्याचे ताजे उदाहरण भविष्यपूराणात असंख्य आहेत. मराठ्यांच्या शहाजी, शिवाजी, संभाजी यांच्याच काळात नामदेव, तुकाराम, रामदास, कबीर, रहिम आदि संतांनी त्यांना व सामान्य समाजाला धर्म जागृति देऊन यवनी व आंग्लम्लेछांचा नि:पात केला आहे. या धुमश्चक्राचे काळातच चक्रधर स्वामी यांनीही कृष्णपंथीय महानुभाव पंथ निर्माण केला. असाच एक संत 'सहयद' घराण्यात उदयास आला. त्याचे मूळ नांव सहयद अब्दूल रहिम होते. या संताने चारही वेदांचा अभ्यास करून अथर्ववेद साररूप घेऊन 'सत्-पंथ' दिग्दर्शित केला व हिंदुधर्मास टिकवून धरले. अशा या महात्म्यास सहयद इमामशाह याच नावाने जाणतात.

अब्दूल रहिम म्हणजे 'अब दिलमे रहिमवाला'आया.

इमामशाह म्हणजे 'माम् ईश आह' जो योगेश्वर आहे तो.

आंग्ल, गुरूंड, शिया, सुनी, पंथीय राजे यांनी भारतात अनेकदा क्रूर पणाने आक्रमण केले व शस्त्रांचा धाक दाखवून इस्लामी धर्म स्विकारण्यास भाग पाडले. सोमनाथवर स्वारी, विशेषत: हिंदुधर्म मंदिरावर धाड टाकून सारं लुटीत व प्रजा जीव घेऊन इतस्तत: पांगत. अशावेळी संपत्तीबरोबर ते स्त्रियांचेही अपहरण करीत. जे भारतात राहात ते येथील जनतेवर अत्याचार करून धर्म प्रसार करीत. सम्राट औरंगजेब, अकबर यांनी तर अनेक राजपूत वीरांच्या पत्नि, कन्या, बहिर्णींना राण्या केल्या. न मानणाऱ्यांचा अनन्वीत छळ करीत. संभाजीला तर धर्म परिवर्तनासाठी हाल हाल करून मारले. अशा समयी इराण, अफगाण, पेशावर या प्रान्तातही असाच धुमाकूळ चालू होता. अरबस्थानात ही पूर्वी सूर्यपूजा, अग्निपूजा, वरूणपूजा करणारे आर्यवंशीय प्रजा होती. तेथे ही मंदिरे होती पण त्यांचा विध्वंस केला. तत्कालिन या भंजकांना 'बूतफरामोश' म्हणत. असे म्हणतात की आजही मक्का-मदिना येथे हिंदुधर्मीय प्राचिन मंदिरांचे अवशेष आहेत.

याच काळात अनेक इराणी अग्निपूजक या जाचास कंटाळून जन्मभूमीचा त्याग करून धर्म व जीव रक्षणार्थ भारत वर्षात आले व तेथेच स्थायीक झाले तथापि त्यांनी आपल्या मूळ परंपरेला सांभाळून आचार व्यवहारात तत्कालिन इस्लामीक धर्माचरणाचा स्विकार केला व त्या मार्गाने आपल्याच संस्काराची जोपासना करून वंशवृध्दि चालविली होती. त्यातील एक सहयद घराणे पंजाबात मुलतान शहरी आले होते ते घराणे सुसंस्कृत व धार्मिक होते. सहयद म्हणजे 'सहयज्ञ' करणारे होय.

आजचे सय्यद घराणे मूळचे ब्रह्मपरायण असावे कारण गीता अ. ३ श्लोक १० प्रमाणे ह्या घराण्याला मूळ पुरूषाचे उत्पत्तिवरूनच वाटते की सहयज्ञातून प्रगट झालेल्या पुरूषास सहयज्ञी असे संबोधिले गेले व त्याचा इस्लामी उच्चार सय्यद झाला.

सहयज्ञा: प्रजा: सृष्ट्वा पुरोवाच प्रजापति ॥
अनेन प्रसदिष्यध्वमेष वोऽस्विष्टकामधुक् ॥ ३/१०

गीताधारे ह्या श्रुतिवर नितांत श्रध्दा असलेले हे घराणे उंचमुलतानी म्हणजेच तक्षशिला येथे कालक्रमणा करीत होते. या वंशातील तत्कालिन गृहस्थ सय्यद कबीरोद्दीन शाह यांनी तीन पत्न्या केलेल्या होत्या. त्यांच्यापासून बराच वंश विस्तार झाला, पण त्यांच्या तिसऱ्या पत्निपासून सर्वात लहान मुलगा झाला त्यावेळी कबीरोद्दीनशाहास आदेश मिळाला होता की तुझ्या घरात अविगत, अविनाशीची, अखंड, अमर, ज्योत प्रगट होत आहे. त्या आदेशा प्रमाणे हिजरी सन ८४४ च्या सफर महिन्याच्या २७ तारखेस, वि.सं १४९६ म्हणजेच इ.स. १४४० मध्ये त्यांना भद्ररूप तेजस्वी ब्रह्मरूप योगी शान्तमुखमंडल असा देवस्वरूप पुत्र झाला. त्याचे मुखमंडल पाहून व सुवर्णमय कान्ति पाहून मुलतान शहरात ही वार्ता पसरताच लोक त्यांच्या दर्शनास येऊ लागले. साऱ्यांनाच प्रभू प्रगट झाल्याचा आत्मिक आनंदानुभव येऊ लागला. आता आपल्यावर होत असलेल्या आक्रमक परिचक्रातून नक्कीच सुटका हा करणार असे वाटू लागले. ह्याचेनांव सय्यद अब्दूल रहिम असे होते.

कबीरोद्दीनशाहांची मोठी मुलं ह्या आक्रमक काळात शनै: शनै: वाढत होती व तत्कालिन परिस्थितीच्या परिणामामुळे इस्लामी वर्चस्वाने त्यांच्यात त्या धर्माचा परिणाम झाला होता. ती मुलं महंमद पैगंबराचा कुराण प्रणित आचार धर्म पाळीत होते. पण हे बाळ मात्र त्यांच्यापेक्षा निराळ्याच वृत्तीने वागत असे, असे म्हणण्यास प्रत्यवाय नसावा. तो आर्यधर्म वेदप्रणित सहिष्णू वृत्तीने वागत असे. बालपणापासून अखंड ॐ चे स्मरण, ज्योतचे, ध्यान, चिंतन, आसन समाधी अभ्यास वगैरे कृतीमुळे घरात सदैव ह्याच्या कृतीला विरोध होत असे. घर अशांत राही. शेवटी त्याचे वडिलांनी त्यास बालपणातच घराबाहेर प्रचारार्थ पाठवून दिले. हे दशवर्षिय स्वयंसिध्द ज्ञानी बाळ घरून भ्रमण करायला निघाले. मुलतानहून राजस्थान, मेवाड, चितोड आदि प्रदेशातून अत्यंत घनदाट अरण्ये ओलांडून लहानसान खेड्यातून लोक जागृति करीत निघाले. प्रत्येक खेड्यापाड्यातून त्यांनी स्वधर्माचा अभिमान राखण्याचे शिकवले आहे. त्यांची शिकवण होती की-

इस मिटीमे सारी दुनिया निपाई रे भाई ।
इसीमे कौन हिंदु इस्लाम ईसाई ।।

या हिदुस्थानावर यवन म्लेंच्छांचे राजप्रसार व धर्मप्रसाराचे संकट चालू असता ह्या दमनकारी प्रसंगी हिंदु-इस्लाम प्रजेला अनेक संत-सुफीसंतानी धीर दिला. वेळीच समाजाला संघटीत करून अध्यात्मिक अर्थर्ववेदीय ज्ञान शक्तिने हे परचक्र नेस्तनाबूत करण्याचे महानकार्य सय्यद अब्दूल रहिम या संताने केले. तत्कालिन प्रजेने व अनेक सत्‌धर्म प्रचारकांनी म्हटले आहे की, 'हे प्रभू परमेश्वरा तुझ्या चरणी पवित्र पूजास्वरूप हा पुत्र कबीरोद्दीनने अर्पण केला आहे त्याचा तू सांभाळ कर.' तेव्हापासून ह्या पूजेच्या इमाम अशा उच्चारानेच त्या सय्यद अब्दूल रहिमला इमाम म्हणून लागले.

पुत्रेषु ज्ञानश्रेष्ठेषु ज्ञान तेजो च सर्वदा ।
इमां मया कृतां पूजां गृहीत्वा व्रज शांतये ।। अग्निपुराण

या काळात इस्लामी राजांचे भारतात बरेच वर्चस्व होते. त्या भयानक अवस्थेत हिंदुत्वाचा प्रचार करणे म्हणजे राजधर्माचे विरूध्दच. यास्तव या महात्म्याने वरवर इस्लामी धारणा दाखवून अंतर्यामी मात्र योगेश्वरी प्रचार होता. यास्तव त्याने आपले नावही मी 'योगेश्वर' आहे, माझ्यावर विश्वास ठेवा असे प्रतिपादून स्वत:चे दुसरे नाव दुसऱ्यांचा विश्वास बसावा म्हणून संस्कृत वाक्यात बदल करून नांव सांगितले ते असे की 'माम ईश आह' इमामशाह.

शाह इमाम लहानपणा पासूनच आपल्या सर्व बंधुपेक्षा वेगळ्या प्रकारे वागत असे. खेळ, शिक्षण, प्रार्थना मग काही असो त्याचे हे वेगळेपण त्यांच्या बंधुंना नेहमी खटकत असे. त्यामुळे ते ह्यास अनेकानेक मार्गांनी त्रस्त करीत. प्रार्थना करायला आरंभ करतांना तो प्रथम दीप पेटवीत असे. दीप केवळ एकच असायचा पण त्याच्या दिव्यशक्तिने यवनीवृत्ति अन्य बांधवांना व इतरांना अनेक दिवे दिसत. त्यामुळे ते अब्दुलला (इमामला) विचारीत की तू इतके दिवे कां लावतोस?तेव्हा इमाम त्याना उत्तर देई कीं हे प्रभुनेच लावले आहेत. पण असे कां? तर माझ्या पूर्व जन्माची गोष्ट ऐका-'जंबुव्दिपातील अतिपश्चिमभागात (अरबस्तानात) मक्कामदिना येथे प्राचीन काळात जे लोक राहात होते त्यांचे बाबत ईशोवास्योपनिषदात म्हटले आहे की,

असूर्या नाम ते लोका अंधेन तमसाऽवृता ।।
तांस्ते प्रत्याभिगच्छन्ति ये के चात्महनो जनाः ।।

आत्मज्ञानाचे शत्रूत्व करणारे आत्मघातकी लोक देह पडल्यावर गाढ झोपून राहतात. ते पुन: जन्माला येत नाहीत. अशा भयानक काळात मी एका सूर्य मंदिरात सूर्य सेवक होतो. माझे नाव 'भद्र' असे होते. कार्तिक मासात मी असाच दीप प्रज्वलित करीत असतां त्या प्रदेशात माझा एकाएकी अंत:काळ झाला. देह सोडून मी सूर्यासमोर उभा राहून जणूं वडिलावर रागे भरतात त्या प्रमाणे मी त्यांच्यावर रागे भरलो माझा देह तेथेचपडून होता. मला सूर्यदेवाने परत त्याच स्थळी पाठविले. मला परत जीवन प्राप्त झाले पण देह घृणास्पद अवस्थेतला आढळला मी तेथीलच एका पूजाऱ्याजवळ आश्रीत म्हणून राहिलो. मी तशाच अवस्थेत मूर्तिपुढे अखंडदीप लावला व देहशुध्दीसाठी मूर्तिची प्रार्थना केली. कांही काळाने एकदा एका यवनी बुध्दीचाअध्यात्माचा शत्रू असलेल्या-दुष्ट प्रभाव मजवर पडला तो असा कीं सूर्यमूर्तीचे अंगावरील सुवर्ण अलंकार काढून घेऊन येथून पलायन करावे. तो दिवस अमावश्येचा होता. त्या अंधाऱ्या रात्री एकाएकी अखंड दीप विझला. सर्वत्र अंधार पुजारीही आपल्या शयनस्थानी गाढ झोपेत. अशा निस्तब्ध मध्यरात्री मी जागाच होतो. मी उठलो व आवाज न करता चोर पावलांनी मूर्ति जवळ जाऊन दीप लावून मूर्तिचे अलंकार काढण्यास वळणार तोच तेथे पूजारी हजर झाला. मी मनात घाबरलोच. तेथेच मूर्तिच्या चरणावर मी पडलो.तेवढ्यात सर्व मंदीर प्रकाशमान झाले व अनेक दिवे लागल्याचे पूजाऱ्याने व अनेकांनी पाहिले.त्यांनी मला उठवले. त्या समयी सूर्यदेवाने मला उपदेशकेला, 'तू भद्र आहेस परंतु तुझ्या मनात देवमूर्तीवर आक्रमण करण्याची पापबुध्दि जागृत झाल्यामुळे तुझ्या अशुध्द अपवित्र देहातून काढून तुला येथे आणले. नियम पाळले तर यम तुला मुक्त करील व परत मानवी देहातच तुला जावे लागेल. या अविचार-अशुध्द-अभद्र पणाचा परिणाम तुला आढळून येईल. जा अभद्रा 'भद्र' हो.' भगवान सूर्यदेवाच्या वचनाप्रमाणे मला यमराजाने पूनर्जन्म दिला तो हाच होय. तेव्हापासून मी सदैव दीप प्रज्वलित करून सेवा करीत असतो. पुढे हेच माझे प्रतिक अखंडदीपाच्या रूपाने प्रज्वलीत राहणार आहे. तो आकाशगंगेचा-स्वर्गगंगेचा व गतगंगेचा आहे. सर्वांच्या हृदयी आत्मरूपी ज्ञानदीप प्रज्वलित करण्यासाठीच मला हा जन्म प्राप्त झाला आहे. उपनिषद्‌ग्रंथात शांति मंत्र आहे की, -

भद्रं कर्णेभि: शृणुयाम देवा: भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्रा:।।
स्थिरैरंगैस्तुष्टुवाँसस्तनुभि: व्यशेम देवहितं यदायु:।।

शाह इमाम त्या सर्वांना लोकभाषेत सांगत होते की, 'काननी भद्र (पवित्र) ऐकावे, पवित्र पहावे व सत्य बोलावे, भद्रच (कल्याण) करावे या साठीच 'भद्र'

जीवांना या इहलोकी अशा अभद्र गोष्टी चा व देहाचा नाश करण्यासाठीच सूर्यदेव जन्माला घालीत असतो व असूर्यलोकात 'नवविधाभक्ति'चा अखंडदीप अथर्ववेद प्रमाण मानून ज्ञान प्रसार करून प्रज्वलित करण्यासाठीच मी आलो आहे.

श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं ॥
अर्चनं वंदनं दास्यं सख्यात्मनिवेदनम् ॥

अशाप्रकारे नवविधभक्तिची महती वर्णन करून तत्कालिन यवनांच्या अमानुषी आक्रमणांत धीर देऊन सामान्य जनतेला त्यांनी सांभाळलं. त्यांच्यात मिसळून त्यांनी आत्मियता जोपासली. बाल वयातच त्यांनी घराबाहेर पडून हे लोकजागृतीचे कार्य केले आहे. सामान्य दीन दुःखित पतित जनतेत ईश्वर भक्ति प्रेम जागृत केले व एक अनन्य साधारण भक्तिमार्ग 'सतपंथ' रूपाने दिग्दर्शीत केला.

★ ★ ★

# २. इमामशाहांच्या बालक्रिडा

धन्यभूमि मुलतानकी, प्रगटे पीर इमाम ।
दावानल संसारमें, संत आये सुखधाम ॥
अविगतसे योगीजना, आय ठाढे संसार ।
अवधूत बडे दयानिधि, पेखे परहितकार ॥

धन्य ती मुलतानची भूमी कीं जेथे पीर इमामशाहांचे प्रागट्य झाले. संसाररूपी दावानलात पोळत असलेल्या संसारी जीवात्म्यांना सुखरूपतेने पार काढण्यासाठी सुखसागर असे हे महापुरूष अविगत ब्रह्माच्या अंशामधून प्रगट होऊन या अवनी तलावर आले. या अवधूत योगी महात्म्याच्या आगमनाचा मूळ आशय जनतेच्या कल्याणाचाच असतो. परहितासाठीच हे महापुरूष मानव जन्मात येत असतात.

योगविभूति अवनीमें, प्रगटे शहर मुलतान ।
अविगतको कैसे बुझे, कहाँ हिन्दु मुसलमान ॥
बाबा कबीरदीनको, अविगतकी गम पाय ।
अमरज्योत अविनाशकी, तेरे घेर प्रगटाय ॥

पंजाबमधिल उंचमुलतान म्हणजे मुलतानशहरी वि.सं. १४९६ म्हणजे इ.स. १४४० मध्ये म्हणजेच हिजरी सन ८४४ मधिल सफर महिन्यात २७ तारखेस इमामाशाहांचा जन्म झाला. त्यांच्या पित्याचे नांव कबीरूद्दीन होते. सय्यद कुळाचे सुशिक्षीत आणि

सुसंस्कारी त्यांचे घराणे होते.पुत्राचा जन्म होताच पित्याला आदेश मिळाला कीं, 'अविनाशीची अमर ज्योत तुझ्या घरात प्रगट झालेली आहे. तुम्ही खरोखरच महान् भाग्यवान आहांत.' आश्चर्यचकित झालेल्या पित्याने आपल्या पुत्राचे मुखारविंद न्याहाळून पाहिले. जीवनात कधीच अनुभवली नाही अशी दिव्यकान्ति आणि तेजोमय मुखमुद्रा पाहताच ते खरोखर परमानंदात बुडून गेले. मुलाचे नांव इमामशाह असे ठेवण्यात आले.

जन्मत:च त्यांनी निर्मल आणि सुवर्णासमान कांतिवान दिव्य स्वरूप धारण केलेले होते. त्यांचे तेज एखाद्या महान् ब्रह्मज्ञानी महात्म्याप्रमाणे आणि तपेश्वरी योग्याप्रमाणे शांत मुखमंडल शोभत होते. कबीरूद्दीन बाबांच्या घरी असा तेजस्वी पुत्र जन्माला ही वार्ता लोकामध्ये वाऱ्याप्रमाणे पसरली. वाणी वैखरी बनली आणि दर्शनाकरिता लोक येऊ लागले. त्या तेज:पुंज मूर्तीचे दर्शन करताच सर्वांना आनंद होत होता आणि त्यांच्या मुखातून शब्द निघत,

साच मानो अविगता, आये लोगन काज ।
दुखियनके दु:ख दूर करे, इमामशाह महाराज ।।
बाबा इमामको देखके, अंतर उपजे प्रकाश ।
क्या जाने मुलतानमे, प्रगटे श्री अविनाश ।।

'खरे म्हणाल तर अविगत पुरूष लोककल्याणकरिता आलेला असावा असे वाटते. तो दु:खीतांचे दु:ख जरूर दूर करील.' त्या बालक इमामला पाहताच अनेकांच्या हृदयात प्रेम प्रकाश उदीत होत होता. आश्चर्याने ते म्हणत, 'काय मुलतान सारख्या गांवात अविनाशी ईश्वराचे प्रागटय़ होऊ शकते.'

काळवहनाबरोबर लोकांच्या हृदयातली भावना दृढ झाली आणि त्यांनी इमामविषयी मनात जे धारले होते, त्यापेक्षाहि विशेष प्रभाव दैदिप्यमान झाला. चार वर्षाच्या वयातच त्या दिव्यज्योतीचा प्रकाश झगमगू लागला. त्या समयी त्यांना अभ्यास करण्यासाठी शाळेत पाठविले. पण त्यांच्यासाठी शिकण्यासारखे काय होते? ते तर सर्व विद्या संपन्न होते. शाळेत जाऊन त्यांनी गरीब बालकांचे दु:ख दूर करण्याचा उद्योग सुरू केला.

बालापनमें इमामको, बहुरी पीर मिटाय ।
जित देखे तित दुखिया, शहर मुलतान उठ धाय ।।
अंधेको लोचन दियो, बहिरे श्रवण सुनाय ।
निर्धनीयाको धन दिये, वंझा घर पलना झुलाय ।।

अंधास दृष्टी, बहिऱ्यास श्रवणशक्ति, निर्धनास धन आणि अद्भूत प्रभावाने मुलतान शहरातील लोक त्यांच्या पाठीमागे दिवाण्याप्रमाणे फिरू लागले. इमामशाहांना चौदा विद्यांचे ज्ञान आणि आत्मज्ञान उपजतच होते. चारही वेदांचे पण संपूर्ण ज्ञान त्यांना होते. परंतु लोकाचाराप्रमाणे त्यांच्या पित्याने त्यांना शाळेत पाठविले संपूर्ण जगताला ज्ञान देणारा जो त्यास कोण शिकविणार? पण पित्यांच्या आज्ञेनुसार इमाम शाळेत गेला. तेथे त्याने आश्चर्यकारक उद्योग सुरू केला. गरीब बालकांना कपडा दिला. मंद बुध्दीच्या बालकांना हुशार बनविले, बहिऱ्यांना ऐकू येईल असे सुश्रुत केले. लंगड्या लुल्यांना तगडे बनवले. हे सारे चमत्कार त्याने दैवीशक्तिच्या बळावर केले त्यामुळे सर्व मुले त्यांच्याकडे आकर्षिले जाऊन आदरभावाने पाहू लागले.

हळू हळू ही हकिकत साऱ्या शहरात पसरली. लोक त्यांच्या अलौकिक गुणांनी आश्चर्यचकित झाले. केवळ मुलतान शहरच नव्हे तर आजूबाजूंच्या गावांमधून लोक आपापली बिमारी दूर करण्यासाठी बालक इमामजवळ येऊ लागले. केवळ बालइमामच्या दर्शनानेच त्या लोकांची पीडा दूर होई. या त्याच्या दिव्यशक्तिची कीर्ति फुलांच्या सुगंधाप्रमाणे सर्वत्र पसरू लागली. ते आठच दिवस फक्त शाळेत गेले तेही परोपकारासाठीच. ते कोणाशीही भेदभाव न ठेवता समान भावाने व आत्मभावाने सर्वांशी वागत असत. त्यांच्या या गुणाने व वर्तनाने सर्व लोक त्याना धन्यवाद देऊन जयजयकार करीत असत.

लोहा पारस परसते, कांचन होत कथीर ।
कल्पतरू की छायमें, बैठ मिटे सब पीर ॥
दुर्लभ संत समागमा, धन्य ताहिको पाय ।
को मुकसे बरनी शके, सत्संगको महिमाय ॥

पारस मण्याचा स्पर्श होताच लोखंडाचे सोने होते, कल्पतरूच्या छायेत बसल्याने मनवांछित प्राप्त होते, तद्वत महापुरूषांच्या समागमाने केवढाही अभागी मनुष्य महाभाग्यवान होत असतो. अशा संत समागमाचे महात्म्याचे वर्णन तर कधीही होऊ शकत नाही. इमामशाह असे संत पुरूष होते की ज्यांच्या यशोगीताचे कधीही वर्णन करता येत नाही.

मुलतान शहरात एक धनाढ्य व्यापारी होता. त्याचे नांव विरचंद. तो जसा श्रीमंत तसाच उदार अंत:करणाचा भक्त पण होता. प्रत्येकाबरोबर तो नम्रता आणि

मित्रभावाने राहात असे. लोक त्याला देव माणूस वा भगत असे म्हणत. त्याला रेवणदास नावाचा एक गुणी आणि अत्यंत हुशार असा एकुलता एक पुत्र होता. पण जन्मत:च तो बहिरा व मुका होता. त्यामुळे त्याचे मातापिता फार दु:खी होते.

एके दिवशी इमामशाहांच्या चमत्कारांची हकिकत त्या वणिकाच्या कानावर गेली. त्याने आपल्या बहिऱ्या-मुक्या मुलाला बरोबर घेतले व तो शाळेत इमामशाहाजवळ आला व म्हणाला की, 'हे बालरूप महात्मा पुरूषा! तुम्हाला माझा दंडवत प्रणाम आहे मी तुम्हाला शरण आलो आहे. कृपा करून माझ्या या बहिऱ्या मुलास ऐकू येईल अशी श्रवण शक्ति द्या आणि ज्या योगाने त्याचे मुकेपण जाऊन तो बोलू लागले अशा प्रकारची कृपादृष्टी या बालकावर करा. आपला महिमा अगाध आहे. कृपा करून माझे हे दु:ख करा.'

विरचंद शेठचे विनयाचे बोलणे ऐकताच बालक इमामशाह म्हणाले, 'शेठजी! आपले व आपल्या मुलाचे भगवान कल्याण करील' असे म्हणून त्या मुलास म्हणाले, 'हे बालमित्रा मी सांगतो तो मंत्र निट ऐक व म्हण. ॐ नमो निष्कलंकी नारायण जनार्दनाय भस्मायुधाय विद्महे दिव्यनेत्राय धीमहि तन्नोज्वरहर: प्रचोदयात् ॐ शांति: शांति: शांति:!' रेवणदास एकटक इमामशाहांच्या मुखारविंदाकडे पाहू लागला व त्यांनी सांगितलेला निष्कलंकी नारायण गायत्रीमंत्र म्हणूं लागला. बहिरा ऐकू लागला व मूका बोलू लागला हा दैवीचमत्कार पाहून त्यांच्या मुलाचे कायमचे दु:ख दूर झाले आणि ते घरी गेले. त्यानी बालक इमामशाहांचा मोठा सन्मान करून नगरवासियांना अन्नदान केले.

करामत किरतारकी, लिखे लोग तमाम ।
बाबा कबीरका बालका, धन्य पीर इमाम ।।
ऐसी कभी सुनी नही, कोऊ न दिखे नैन ।
होनी अन होनी बने, इमाम उचरे बेन ।।

भगवंताच्या कर्तुम् अकर्तुम् अद्भूत शक्तिचे दर्शन लोकांनी आपल्या उघड्या डोळ्यांनी पाहिले आणि ते कबीरदीनच्या बालकाचे पीर इमामशाहांचे धन्यवाद गाऊ लागले. कारण की, त्यांच्या सारखी कहाणी कोणी कधीही ऐकली नाही अथवा डोळ्यांनी पाहिली नाही. जी न होणारी गोष्ट कधी घडून येणार नाही अशी इमामशाहांच्या मुखातून शब्द निघताबरोबर घडून येते हे सत्य आहे.

एके दिवशी पितापुत्र नगरशोभा पाहात मुलतान शहरात फिरत होते. तेव्हा एक स्त्री त्यांच्याजवळ आली आणि बाबा कबीरदिनला विनवून म्हणाली- 'बाबा मी तुम्हाला नमस्कार करते, माझ्या या आंधळ्या मुलाला दृष्टी द्या. या सेविकेवर दया करा. कृपादृष्टी करा.' असे म्हणून तिने आपल्या आंधळ्या मुलास त्यांच्या चरणावर टाकला.

कबीरदिन बाबा म्हणाले, 'हा जन्मत:च आंधळा असल्याने कांही पण इलाजाचा उपयोग होणार नाही.' ती स्त्री अत्यंत कळवळून अजीजीपूर्वक म्हणाली की, 'महाराज मी खूप इलाज करून पाहिले पण कांही उपयोग झाला नाही. मी आपल्याला शरण आली आहे. माझा हा एकुलता एक मुलगा आंधळा आहे माझ्या वृध्देचीही काठी आहे. माझा आधार आहे. हा जर डोळस झाला तर त्याचेही व माझे ही जन्माचे कल्याण होईल! म्हणून बाबा! या दासीवर दया करून माझे दु:ख दूर करावे

त्या स्त्रीचे बोलणे ऐकून कबीरदिन बाबा अवाक् होऊन बसून राहिले. ते पाहून बालक इमाम म्हणाला, 'पिताजी, ही स्त्री एवढा विलाप कां करीत आहे? तीची काय इच्छा आहे ते मला सांगा.' बाल इमामचे हे शब्द ऐकताच ती स्त्री म्हणाली, 'मी मुलतानची रहिवाशी आहे. माझे नाव केशर आहे. मी क्षत्रिय कुळाची आहे. माझा हा मुलगा धनु , जन्मापासून आंधळा असल्याने मी फार दु:खी आहे माझ्यावर दया करा.' असे म्हणत अधिक विलाप करू लागली.

इमामशाहांनी तिला धीर देऊन आश्वासन दिले त्यांनी तिला सांगितले 'माताजी! या जगात जो तो जीवात्मा आपापले सुकृत व प्रारब्ध घेऊन जन्माला येतो. जसे ज्या, जीवात्म्याने कर्म केलेले असेल तसा कर्मभोग प्राप्त असते. हा निसर्गाचाच नियम आहे. त्यात कोणीही ढवळाढवळ करू शकत नाही. पण माते! कीतीही दु:खकारक स्थिती असली तरी भगवंताच्या भक्तीने व आराधनेने प्रारब्ध योग सुध्दा बदलू शकतात. महापुरूषांच्या वचनावर दृढ श्रध्दा ठेवून भगवंताची आराधना कर. हा मुलगा रात्री झोपून सकाळी जागा होईल तेव्हा त्याला दृष्टी आलेली आहे असे तू पाहशील.' असे म्हणून इमामशाहांनी सहज प्रेम भावाने त्याला कुरवाळले. बाळ इमामचे ते दृढवचन ऐकताच केशरबाई विनयाने झुकून निघून गेली.

घरी गेली पण तिचे व्यांकुळ हृदय रात्रीची प्रतिक्षा करू लागले. शेवटी रात्रीचे साम्राज्य पसरले. बाल इमामच्या वचनावर दृढश्रध्दा ठेवून अधिर झालेली माता भगवंताचे नामस्मरण करण्यात एकाग्र होऊन गेली. तन मन भान विसरून ती भगवत्स्वरूपाशी

एकरूप होऊन गेली. रात्र सरली सूर्योदय झाला. मुलगा धनु झोपेतून जागा होताच त्याला सर्वत्र प्रकाशच प्रकाश दिसू लागला. त्याला दृष्टी आली हे जाणून मातेच्या हृदयात जणू प्रेमाब्धि उचंबळला ती मुक्तकंठाने इमामशाहांचे गुणगान गाऊ लागली. तिचे कायमचे दुःख दूर झाल्याने आनंद विभोर होऊन तिने याचकांना मुक्त हाताने दान केले. बाल इमामशाहांचे यशोगीत गाऊन तिने सनमान केला.

या प्रसंगामुळेच पुढे कसोटीचे प्रसंग उद्‌भवत गेले. बाबा कबीरदिनांनी साफ इन्कार केला पण त्या अंध बालकाच्या मातेला दृढ आश्वासन देऊन बालक इमामशाहाने घरी पाठविले व दुसऱ्या दिवशी खरोखरच तो अंध बालक डोळस झाला ही हकीकत जेव्हा नगरजनांनी जाणली तेव्हा ते सर्व बोलू लागले.

सज्जन कोऊ अेक हे, दुर्जन दिखे अनेक ।
कबीरासे कुछ ना बने, बालको लिखे बेक ।।
सय्यद कुळ इमामको, मानो दिप जलाय ।
बहुरी पूत कबीरके, इमाम जल्वा दिखाय ।।

ठिकठिकाणी टोळी टोळीने जमून मुलतानचे लोक बोलू लागले. त्यांच्यात सज्जन तर फार विरळचे पण दुर्जनच अधिक होते. ते म्हणू लागले, 'कबीरदिनने जे होऊ शकले नाही ते त्यांचा लाल इमामने करून दाखविले. सय्यद कुळात एक इमामशाह रूपी दिपक प्रकाशित झाला आहे. असे तर कबीरदिनांना बरीच मुले आहेत परंतु त्या सर्वामध्ये सर्वोपरिश्रेष्ठ तर इमामशाहच आहे. त्याने तर प्रगट परछा (दैवी चमत्कार) दाखवून लोकांच्या दुःखाचे निवारण केले. आता तर लोकांना एवढ्यापर्यंत खात्री झाली कीं इमामशाहांचे नाम जपल्याने सुध्दा दुःखाचा शेवट होतो म्हणून तुम्ही सुख प्राप्तीसाठी त्यांचे नामाचे आराधन करा.'

जल्वा यही इमामका, नाम जपो निराधार ।
साच कहूं संसारमें, बेडा होयगे पार ।।
बडो महिमा नामका, लोगनके ऊर भाय ।
बानी लोगनकी सुनी, पिदर रहे अकुळाय ।।

'तुम्हाला जर प्रत्यक्ष चमत्कार प्राप्त करायचा असेल तर इमामशाहांच्या नामाचे रटण करा. या भवसागरातून तुमचा बेडा पार होऊन जाईल.' लोकांच्या मुखातून इमामचा हा असा महिमा ऐकून पिता कबीरदिन खरोखरच संकोचित झाले. आणि ते अंतर्मुख होऊन गहन विचारात गढून गेले.

सुफीयन तेरे लालपे, मै जावु बलिहार ।
जलती जहापे आइया, प्रगट उबारनहार ॥
सुफीयनके घर आइया, मानवके हितकार ।
दुःखियनके दुःख दूर करे, परमार्थसे प्यार ॥

बालक इमामच्या बाबतीत विचार करता करता पिता कबीरदिन दिङ्मूढ बनून गेले आणि लोक त्यांच्या विषयी जो प्रगट अभिप्राय बोलत होते तो ऐकून जागृत झाले व निर्णय शोधण्यासाठी विचार मंथन करूं लागले. पित्याने विचार केला की, 'अशा रीतीने जनता जर बाळकाच्या मागे लागली तर भावीगति फार गहन आहे. थोड्याच दिवसांनी आपल्याला तर इहलोकाची यात्रा संपवून परलोकांत जायचे आहे. त्या समयी जर इमाम आपल्याजवळ असला तर जरूर कांही तरी अनर्थ होईल. आपल्या पित्याचे अंतिम प्रयाण तो आपल्या डोळ्यांनी पाहू शकणार नाही व अंतिम क्रियापण करू शकणार नाही म्हणून त्याला आपल्या नजरेसमोरून दूर केला पाहिजे.' असा विचार करून आठवर्षाच्या इमामला पित्याने आदेश देतांना म्हटले कीं,-

अविनाशीके अंशकी, पिदरको गम पाय ।
मानवको परबोधके, पियूसे दियो मिलाय ।
बाली उमरीया चलबसे, हाजरबेग निजसंग ।
जनताके दुःख दूर करे, रखे भक्तिको रंग ॥

'बाळा इमाम! आपले प्रागट्य तर मानवकल्याणासाठीच झालेले आहे. आणि तू जर घरीच बसून राहशिल तर लोककल्याण व जनजागृति केव्हा व कशी होईल? म्हणून तू येथून पावनपर्यटन कर आणि लोकांना उपदेश कर. ईश्वरनामाची त्यांना ओळख करून दे. दुःखितांचे दुःख दूर कर.' पित्याचा आदेश मिळताच बाळ इमाम प्रयाणास सज्ज झाला. स्वतः एका रथवजा बैलगाडीत बसून, सारथी म्हणून हाजरबेग नावांच्या सेवकाला बरोबर घेऊन पित्याला वंदन केले इमामशाहांनी मुल्तानमधून प्रयाण केले.

हाजरबेगकी संगमें, ज्ञानी बैठे गुलतान ।
अपने पिवको वंदके, छांडे शहर मुलतान ॥



# ३. पावन पर्यटन.

पावन पंथे साईया, चलने लगे प्रबिन ।
सूरसरिता उपदेशकी, पाप कटे छीन छीन ॥
बानी सद्गुरू देवकी, हियरामें बसजाय ।
ज्ञानी रांचे रंगमे, अज्ञानी जना गम पाय ॥

पिताजी कबीरदिनचा आदेश मान्य करून बालक इमामशाहांनी वयाच्या आठव्या वर्षीच म्हणजे वि. स. १५०४ इ. स. १४४८ मध्येच मुलतानहून हाजरबेगसह प्रयाण केले. उपदेशाची ज्ञानगंगा वाहिली त्यांत स्नान करून अनेक मानव पापमुक्त झाले. सद्गुरू इमामशाहांच्या मुखातून अमृततुल्य उपदेश श्रवण करून ज्ञानीपुरूष भक्तिच्या रंगात रंगून गेले. अज्ञानी लोकांच्या हृदयातील अंध:कार पण दूर होऊन त्यांना आत्मज्ञानाचा उपदेश करण्याचा आग्रह केला होता, यावरून त्यांचा आदेश गुजराथमध्ये जाण्याचा होता.

ज्या समयाची कथा आलेखन केली जात आहे त्या समयी प्रवासाकरितां आजसारखी यांत्रिक साधने नव्हती. रथासारखी एक बैलगाडी आणि सेवेकरिता हाजरबेग नावाचा एक परमशिष्य कबीरदिन बाबांनी दिला. मजल दरमजल मुक्काम करीत करीत ते गुजराथकडे प्रयाण करूं लागले. त्या समयी त्यांचे वय केवळ आठ वर्षाचे होते. पावन पर्यटन करीत असता जिथे भाविक भक्तांचा मेळावा जमत असे तिथे ते थांबत आणि भक्तांच्या समुदायात ते आपल्या विमल विशुध्द वाणीद्वारा उपदेश करीत.

क्यों भुले हो बावरे, पियुसे लगन लगाय ।
बेमूल अवशर जात हे, फिर नही अेशो दाव ॥
बडी रहेम हे साईकी, दियो मनुज अवतार ।
वे साहिबके नामको, कैसे भुले गवार ॥

तुम्ही बावऱ्यासारखे कां झालात? अविनाशी ईश्वराशी प्रेम लागणी लावा, बहुमुल्य असा वेळ व्यर्थ वाया निघून जात आहे. तुम्हास त्याचे भान नाही. परंतु खरी गोष्ट अशी आहे कीं आता मिळणाऱ्या समयाप्रमाणे फिरून ईश्वर स्मरणाकरितां वेळ मिळणार नाही.

बेर बेर चेताइया, कियले साईसे चेत ।
अंत पछतै हो बावरे चिडीयाँ चुँग गई खेत ॥

राम कहो रहिमाँ कहो, करीमाँ कृष्ण बखान ।
बहुरी नाम साहिबके, दिलचाहो दिलजान ॥

तुम्हाला वारंवार चेतावणी देऊन जागृत करतो व सांगतो की त्या भगवंताला ओळखा. त्याच्या नावावर प्रेम राखा. आत्यंतीक प्रेमभावाने त्याचे नामस्मरण करा. जर तुम्ही हे जाणले नाही मानले नाही तर पाखरांनी शेतातील पीक चोखून टाकल्या प्रमाणे शेवटी तुम्हाला पश्चात्ताप करावा लागेल. माझा तुम्हाला हट्टाग्रह नाही की तुम्ही अमुक या नावानेच भगवंतास ओळखा, तर त्या बहुनामी ईश्वराची अनेक नामे आहेत. तुम्ही त्याला राम-रहिम, कृष्ण-करीम वगैरे कोणत्याही नावाने ओळखा आणि त्या नामाचे आराधन करा तो भगवान जरूर तुमच्या भक्तीने तुम्हाला वश होईल.

अबकी बेर चेताव हूँ, नामसे कियले नेह ।
काल अचानक आयगे, छूट जायगी देह ॥
तरूवर नीचे फल गीरो, फिर नही लागे डाळ ।
यह मनूष तन बावरे, कर लिजो प्रतिपाळ ॥

'प्रेमी सद्भक्तांनो तुम्हाला आणखी एकदा अंतिम चेतावणी देतो की, तुम्ही समज धरा. आणि ईश्वर नावावर आत्यंतिक प्रेम करा. त्या अविनाशीच्या नावाशी अमूट स्नेह बंधनाने प्रीत जोडा. काळाचा भरोसा नाही. अचानक येऊन जीवाला बांधून घेऊन जाईल आणि तुमचा सुंदर देह जमिनीत ढळून पडेल. झाडावरून गळून पडलेले फळ फिरून परत झाडाला लागू शकत नाही. तद्वत हे मानवांनो! या मानव जन्माचा सांभाळ करा. वारंवार तुम्हाला हा महामुल्यवान मानवजन्म लाभणे शक्य नाही म्हणून जीकीर फिकीर करून ईश्वराचे स्मरणचिंतन करा.' अशा प्रकारचा उपदेश केवळ एकमेव परमानंद प्रभुस ओळखण्याचा व त्याची भक्ति करण्याचा, स्मरण करण्याचा उपदेश सद्गुरू बाल इमामशाह देत असत.

एकदा गुजरातमधील कश्मोरा शहराजवळील कोटडी या गांवी त्यानी मुक्काम केला होता. तेथील भाविक भक्तांना दिव्य ज्ञानोपदेश चाललेला असतांनाच इकडे मुलतानला कांही वेगळीच घटना घडून आली.

इमाम मेरी संगमे रहे, आखिर होत उत्पात ।
ताथे उनको दूर करे, उरमें विचारे तात ॥
पिदरको बडी खंतसे, लालको दूर पठाय ।
बुलवा पठाया साईको, छीनमें हुवे विदाय ॥

ज्ञानी पिता कबीरदिन समजत होते कीं थोड्याच दिवसानंतर या नश्वर जगताचा त्याग करण्याचा समय आपल्यावर येईल त्या समयी इमाम आपल्याजवळ असला तर जरूर उत्पात करील म्हणून कांहीही उपाय करून त्याला येथून दूर केले पाहिजे. असा दृढ विचार केल्यानंतर पित्याने उपदेशाचा बहाणा करून बालक इमामला आपल्या दृष्टीसमोरून दूर केले. गुजराथ सारख्या लांब प्रदेशात विचरण करण्याचा आदेश देऊन मुलतानपासून दूर पाठविले.

असाच प्रसंग सुरतच्या संतधारेत आलेखीत झालेला आहे. यासमयी त्या घटनेचा थोडक्यात उल्लेख करीत आहे. महान प्रभावी संत माधवदासजींच्या समयाची ही गोष्ट आहे. बाबालोचन स्वामीचा शिष्य समर्थदास आणि त्यांचा शिष्य माधवदास होता. सुरतच्या संत धामामधून मानवकल्याणाकरिता त्यांनी तीन वेळ तीर्थयात्रा केल्या. या पावन पर्यटनात अनेकानेक भाग्यशाली जिवात्म्यावर त्यांचा अनुग्रह झाला.

तिसऱ्यांदा तिर्थाटनाच्या वेळेस त्यांनी सौराष्ट्र आणि कच्छमधून भ्रमण करून दिल्लीकडे प्रस्थान केले. तेथे त्यांनी रोशन आरा नावांच्या एका वारांगनेवर अनुग्रह केला नंतर तेथून ते थेट मोक्षधाम काशीला गेले.

बनिया प्यारेदास थे, लंपट चोर लबार ।
माधव सद्गुरू भेटिया, पलमे लिये उबार ॥

विरमणी नावांच्या एका रूपराणी गणिकेच्या फंदातून सोडवून संत माधवदासांनी प्यारेदास नावाच्या एका वणिक् पुत्राला बरोबर घेऊन ते सुरत येथील संतधामावर परत आले. प्यारेदासावर अनुग्रह करून त्यांनी त्यांच्या हृदयात अमर प्रेमाची ज्योत प्रगट केली. त्या दोघांचे गुरू आश्रमात आगमन झाले. संत माधवदासांनी आपले सारे जीवन मानवमात्राच्या कल्याणासाठीच वेचून अनेक उग्रभावि जीवात्म्यांना आत्मोध्दाराच्या विराट्पंथाला लावले. आश्रमात आल्यानंतर ते केवळ एकाच आसनावर बसून राहिले नाही. सतत प्रयत्न करून जन संपर्क साधून त्यांच्या उन्नतिसाठी त्यांनी अपार परिश्रम घेतले. आपले जीवनकार्ये आटोपलेले जाणून एक वर्षापासून त्यांनी जीवंत समाधी घेण्याची तयारी केली आणि सहा महिने आधीपासून त्यांनी जनतेला सांगितले की आषाढ वद्य अमावश्येच्या दिवशी मला समाधी घेऊन इहलोकातून प्रयाण करायचे आहे. गुरूजींच्या महाप्रयाणाची गोष्ट ऐकताच प्यारेदासाचे हृदय अत्यंत व्याकुळ झाले. सद्गुरूंच्या चरणाजवळ साश्रुनयनाने बसून तो अत्यंत कळवळ्याने म्हणाला-

सद्गुरू बिन संसारमें, दु:खको न आवत अंत ।
प्यारे बहूत पछतावही, चल गये माधव संत ॥
गुरू बीन मेरी कोन गत, बीते न अबके दिन ।
प्यारे झुरमर जायेंगे, ज्यो जळ बिछरो मीन ॥

'बाबा! तुम्ही समाधीस्त झालात तर माझी काय दशा होईल मी कोणाच्या आधाराने जगू शकेन.' असे म्हणत प्यारेदास बालकाप्रमाणे अधिर बनून स्फूंदत स्फूंदत रडू लागला.

प्यारे क्युं झुरत भला, आज हुं अवशर हाथ ।
दिल चाहे सो पायले, निकट तिहारो नाथ ॥
प्यारे प्रभुसे प्रीत कर, वोही गरीब नवाज ।
उनकी दया बिन बावरे, तेतर ग्रहे ज्युं बाज ॥

प्यारेदास, तुला हवे असेल ते मागून घे. अजून कीतितरी वेळ आहे. अरे तू एवढा कशाकरिता आटापिटा करीत आहेस? एकाग्रतेने ईश्वराचे भजन कर. यामुळेच तुझ्या आत्म्याला खरी शांति लाभेल.' असे सांगून सद्गुरूंनी सुगमतेने त्याच्या मनाचे सांत्वन करून ती गोष्ट मोडून टाकली. भोळ्या हृदयाचा प्यारेदाससुध्दा ती गोष्ट विसरून जाऊन श्रीहरीच्या ध्यान चिंतनात लागून राहिला.

संत माधवदासांना वाटले आपल्या महाप्रयाणाच्या दिवशी जर प्यारेदास इथे हजर असला तर जरूर प्राणत्याग करील. सद्गुरूंनी आपल्या लाडक्या शिष्याच्या हृदयाची गति जाणली होती. प्यारेदासचा सद्गुरूमध्ये अनन्य अनुराग होता म्हणूनत्याला सद्गुरूंचा वियोग सहन होऊ शकणार नव्हता. त्यासाठी सद्गुरूंनी त्यास सूरतपासून शक्य तेवढ्या दूर दूर पाठविण्याचा विचार करून निर्णय घेतला.

एके दिवशी त्यांनी प्यारेदासला म्हटले, 'बेटा, तू एकदा तुझी पवित्र जन्मभूमि मोक्षधाम काशीची यात्रा करून ये. गंगामातेत स्नान करून तुझे जीवन कृतार्थ करून ये.' असे सांगून तीर्थाटनास जाण्याचा आदेश दिला. भोळ्या हृदयाचा प्यारेदास सद्गुरूंच्या हृदयातला आशय समजू शकला नाही. त्याचे हृदय मानत नव्हते पण सद्गुरूंची आज्ञा शिरसावंद्य मानून त्यांच्या चरणावर मस्तक नमवून तो काशीच्या मार्गाला लागला.

ग्रीष्माचे तापदायक दिवस गेले. वर्षाऋतुची मांडणी सुरू झाली. आषाढ महिना पूर्ण होत आला. आणि अमावश्येची प्रभात उगवली. प्यारेदास मार्ग आक्रमत होता.

त्या समयी त्याच्या डोक्यावर कावळ्यांच्या टोळ्यांच्या टोळ्या कलकलाट करू लागल्या. काळा कभिन्न नाग मार्गात आडवा येऊ लागला. हे सर्व अपशकून कां होताहेत, प्यारेदास समजू शकत नव्हता. परंतु एकाएकी आषाढी अमावश्येची आठवण त्याला झाली व त्याबरोबर तो समजून गेला 'सद्‌गुरू समाधिस्थ झाले! सद्‌गुरू समाधिस्थ झाले! आपण अंतसमयी सद्‌गुरूंचे दर्शन करू शकलो नाही. त्याच्या हृदयात दारूण आघात झाला. संत माधवदासांनी आपल्या अंतसमयी कशाकरिता काशीयात्रेला पाठविले याचे रहस्य त्याला यथार्थतेने समजून आले. सद्‌गुरूंनी महाप्रयाण केले आणि आपण काशीला जात आहोत, काय उपयोग?' असा विचार करूनं तावडतोब माघारी फिरला आणि थोड्याच दिवसात सुरतला परत आला.

संत माधवदासजींच्या समाधिवर दुर्भेद्य बांधकाम झालेले होते. साधुंनी संकेताने समाधी दाखविली ती पाहताच व्याकूळ झालेला प्यारेदास समाधिकडे पळत गेला आणि मोठ्याने विलाप करून म्हणाला, 'प्रभू! शेवटी मला एकटा टाकून निघून गेलात ना!...' असे म्हणत समाधिवर त्याने डोके आपटले दु:खाच्या असह्य भाराने मूर्च्छित होऊन तो जमिनीवर निश्चेष्ठ पडला. बेहोश झालेल्या प्यारेदासला उठवून सर्वांनी आश्रमात आणले. अनेक उपचार करून त्याला शुध्दिवर आणण्याचा प्रयत्न केला परंतु शुध्दिवर येऊन तो परत बेहोश होई शेवटी सद्‌गुरू वियोगाने त्याचे शरीर जीर्ण होऊन गेले. रात्रीच्या वेळी आश्रमात सर्वजण निद्राधिन झाले म्हणजे प्यारेदास गुरूंच्या समाधीजवळ जाई रात्रभर तो तेथे रडत बसे. त्याने अन्नजलाचा त्याग केला रडून रडून त्याचे डोळे सुजून आले व शेवटी आंधळा बनला.

प्यारे नैन अंधे हुवे, यह जग दिसे अंध:कार ।
अब तो मोहे वहा ले चलो, जहाँ माधव संत हमार ।।

संत माधवदासांची समाधी आश्रमापासून थोड्या दूर अंतरावर होती. डोळे गेल्यानंतर त्याला रस्त्याने चालता येत नव्हते. म्हणून समाधीवर घेऊन जाण्याकरिता तो कोणालाही कळवळून विनंती करी पण त्या वेड्याची गोष्ट कोणी कानावरच घेत नव्हते. एके दिवशी चांदण्यारात्री प्यारेदास गुरू वियोगाने अत्यंत अस्वस्थ झाला आणि अडथळत पडत झडत एकटाच समाधीजवळ जाऊन पोहोचला. त्याचा आत्महंस उडून जाण्यास व्याकूळ झाला होता.

बाबा मैं बिलखत फिरू, तुम सोया दिन रेन ।
तुम्हरे दरशकी प्यारमें, अंधे भये दो नैन ।।

'प्रभु! आता मला जीवंत राहायचे नाही. मला तर तुमच्याजवळ यायचे आहे!' असे म्हणत प्यारेदासने जोराने हिसका दिला. त्याबरोबर तो जोराने समाधीवर आदळला. नारळाप्रमाणे त्याच्या मस्तकाचा चूरा झाला. त्याच क्षणी संताचा आवाज ऐकू आला. 'बेटा प्यारेदास' तू कशाकरिता एवढा आक्रंदत आहेस, ज्याच्या दर्शनाकरिता तू एवढा वेडा झालास तो मी तर तुझ्या हृदयातच आहे.' असे म्हणत संताने त्याला आपल्या हातांनी उठविले.

'प्रभु! आपण आलात!' असे म्हणत प्यारेदास आपल्या सद्‌गुरूला कडकडून भेटला व म्हणाला, 'बाबा! मी आंधळा आहे म्हणून आपले दर्शन करूं शकत नाही.' समदर्शी संताने शुभाशिर्वाद देऊन त्याला म्हटले-

प्यारे नैन खोलिये, परखो पिव दिदार।
सुपनो साच भयो सखी, जागे भाग हमार ॥

संतांनी शेवटी त्याला दृढ आश्वासन देऊन म्हटले-

प्यारे क्यों बिलखत फिरे, हिरदे रखो विश्वास।
मै तुमसे न्यारा नहि, सच कहूं प्यारेदास॥
माधव और महेश्वरा, वो जानो अेक प्रकाश।
कबहु अलग न पेखीयो, गाफिल प्यारेदास॥

प्यारेदास! गुरु आणि गोविंदाला वेगळे मानू नकोस. तसे करशिल तर अशान्तिच्या अग्नीत जळून जाशिल म्हणून त्यांच्या वेगळे पणाची गोष्टच करूं नको. गुरु तत्त्वआणि ईशतत्त्व एकच आहे.

प्यारे हम तुम अेक है, देखन चहे दिदार।
अपने दिलमे खोजिये, मिलही खेवनहार॥

सद्‌गुरुंच्या संगतीत बसून प्यारेदासाने संपूर्ण रात्रभर अमृतमय उपदेश ऐकला. प्रात:काळ होताच सद्‌गुरु अंतर्धान झाले. आणि प्यारेदास आनन्दमग्न बनून आश्रमात परत आला.

एके समयीचा अंध प्यारेदास आत्महत्या करू पहात होता तोच प्यारेदास आनंद मग्न बनून संत माधवदासांच्या गादीवर विराजमान झाला आणि एकशे एकवीस वर्षेपर्यंत त्याने सेवा केली.

संत माधवदासांनी ज्या प्रमाणे प्यारेदासला आपल्या डोळ्यासमोरून दूर केले होते. त्याच रीतीने संत इमामशाहाला त्यांच्या वडिलांनी हृदय अत्यंत कठोर करून आपल्यापासून दूर केले. इमामशाह दूर होताच त्यांच्या हृदयाला थोडी शांति वाटली. कांही दिवसांनीच त्यांनी अंतिम प्रयाणाची तयारी केली.

आधी रेन इमामशाहा, बिलखत भये बेचैन।
पिदर मेरा चल बसे। बरखा टपके नैन॥
अब तो मै जावन चहु। दोसो कोस मुलतान।
आवन खडे हो जाइये, आखिर किये अेलान॥

सद्गुरु श्रोत्यांना ज्ञानामृत पान करवीत होते. मध्य रात्रीचा वेळ होता. त्या समयी उपदेशाची अमृतधारा वाहात असता सद्गुरु अचानक थांबले. ते अवाक् झाले. त्यांचे मुख म्लान झाले. ते म्हणाले, 'माझ्या वडिलांनी शेवटचा निश्वास टाकून महाप्रयाण केले आहे. मी त्यांच्या पासून अतिदूर येऊन पडलो म्हणून अंतीम समयी त्यांच्याजवळ राहू शकलो नाही.' असे म्हणत त्यांच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागल्या. साश्रुनयनाने त्यांनी लोकांना म्हटले 'मला आताच मुलतानला गेले पाहिजे. ज्यांना माझ्यासोबत यायचे असेल त्यांनी तयार व्हावे.' सद्गुरुंनी तेथे उपस्थित असलेल्या भक्त समुदायाला पाचारण केले.

त्या समयी चाळीस भक्त गण तयार झाले. इमामशाहांच्या रथाला त्यांनी घट्ट पकडले. सद्गुरुंनी त्याना डोळे गच्च मिटण्यास सांगितले. क्षणात रथ चालू झाला व जणू अंतरिक्षातून वायुगतीने उडू लागला. प्रात:काल होण्याच्या आधी दोन अडीचशे कोस दूर असलेल्या मुलतानला ते सर्व जण येऊन पोहोचले हे जाणून त्यांच्या आश्चर्यास पारावार राहिला नाही.

रथ उडे अंतरिक्षमें, चालीस जना ले संग।
आय खडे मुलतानमें, भोरही सबे उमंग॥

★ ★ ★

# ४ मुलतानमधील प्रतिज्ञा

बाबा कबीरके लाडले, छोटे पूत इमाम।
आखिर जमानी पिदरकी, इमाम नही यह ठाम॥
पगले इमाम चल बसे, पिदरसे मुख फिराय।
जरूरत नही इमामकी, अवल मंझल पहूँचाय॥

कबीरदिनबाबांनी महाप्रयाण केले त्या समयी त्यांची सर्व मुले हजर होती. परंतु सर्वात लहान पुत्र इमाम त्यावेळेस तिथे नव्हता, कारण कीं जाणून बुजून त्याला डोळ्यासमोरून दूर करण्यात आले होते. म्हणून अशा बिकटसमयी तो कसा बरे हजर राहू शकेल? ही गहन गोष्ट फक्त कबीरदिन बाबाच जाणत होते. त्यांच्याशिवाय कोणालाहि या गोष्टीचा गंध वारा नव्हता. या समयी सर्व प्रकारचे-सर्व स्वभावाचे व सर्व जातीजमातीचे लोक मुलतानला जमले होते. इमामशाहांचे इतर भाऊ, ज्यांना इमामचे वर्चस्व सहन झाले नव्हते ते त्यांच्याविषयी हवे तसे बोलत होते. कित्त्येक तर असे होते कीं, कोणी इमामबद्दल गोष्ट काढली तर म्हणत 'जाऊ द्या हो त्या इमामला! तो एक वेडा पीर आहे. आपल्या पित्याशी मुख फिरवून दूर गेला. आता त्याची परत येण्याची शक्यता नाही व त्याचे इथे काहीही काम नाही. आतां पित्याची अंत संस्काराची तयारी करा.' निर्णय जाहिर झाला आणि सर्वजण बाबा कबीरदिनाची प्रेत यात्रा काढण्यास तत्पर झाले.

सकाळचा मंगलमय वेळ पण सर्वत्र वातावरणात उदासीनता पसरलेली. कबीरदिनच्या महाप्रयाणाने सर्व मुलतानवासी दुःखीत झालेले. स्वजन व गावातील त्यांचा चाहक वर्ग, प्रेमी शिष्य व प्रमुख लोक त्यांच्या अंत्ययात्रेत सहभागी झाले. सर्वात धाकटा मुलगा इमामशाह अंत्यसंस्कारास हजर नाही हे पाहून कित्त्येक लोक नाराज झाले व बाकीच्या लोकांना ते दोष देऊ लागले. पण त्यांचे कांहीही चालले नाही. महालयातून प्रेतयात्रा निघाली आणि सन्मानपूर्वक लोक त्यांच्या सोबत चालू लागले. बरोबर भर बाजारात प्रेत यात्रा येऊन थडकली. तेवढ्यात इमामशाहा आपल्या सोबत आलेल्या लोकाबरोबर तेथे येऊन पोहोचले आणि त्यांनी आदेश केला.

इमाम आये देखके, लोगन आये धाय।
प्रेमी जना पाये लागे, दुर्जन दूर ठहराय॥
अबतक इमाम कहा गये, आखिर जमानी आय।
पिदर सो गये निंदमे, ताको कोन जगाय॥

लोकांमध्ये आरडाओरडा झाला. 'इमाम आला, इमाम आला,' असे मोठमोठ्याने ओरडत, लोक त्यांच्या दर्शनाकरिता धावून आले. कित्येक त्यांचे अनुरागी होते, त्यांनी मार्ग काढीत पुढे जाऊन त्यांच्या चरणावर झुकले आणि जे दुर्जन निंदाखोर होते ते तर दूर उभे राहून त्यांना न्याहाळू लागले.

निकसे जनाजा पिदरका, इमाम ठाढे आय॥
ठहरो मेरे पिदरसे, मेरा हक मंगवाय॥
जनाजा ठाढे रहे, पागल दिखे इमाम।
बाबा मेरा हिस्सा दियो, मत कियो बदनाम॥

पित्याचा जनाजा पुढच्या मार्गाला लागत आहे असे जाणून त्याला अडविण्याकरितां इमामने जोराने ओरडून म्हटले, 'थांबवा! जनाजा थांबवा! उभे रहा' जनाजा येथून पुढे जाऊ शकणार नाही. म्हणून खाली उतरवा. पिताजीजवळ माझा हिस्सा-हक्क मागायचा आहे. त्यांचे शब्द ऐकून लोक अट्टाहासाने हसू लागले आणि म्हणाले, 'इमाम तू अजून लहान आहेस. तुला समजू शकत नाही. तू वेड्यासारखे करू नकोस. तुझ्या पित्याने या लोकातून आता कायमचा निरोप घेतला आहे आणि त्यांच्या प्रेताजवळ आता तू तुझा हक्क-हिस्सा मागत आहेस! वेडा रे वेडा. चला हो, याची काय गोष्ट ऐकता. चला पुढे. थांबू नका.' असे म्हणत ते पुढे सरकू लागले. पण इमाम जिथे उभा होता तेथून तो जनाजा एक पाऊलही पुढे होत नव्हता. शेवटी नाईलाजाने त्यांना जनाजा खाली उतरावा लागला. इमाम जनाजाजवळ बसला आणि पित्याला संबोधून विनयाने म्हणाला, -

बाबा ऐसा क्यों किया, मोहे दूर पठाय॥
धोखा देके पुतको, आपे हुवे विदाय॥
बहाना किये उपदेशका, जै हो बेटा गुजरात।
आदेश मेरे सर धरे, कैसे जग उत्पात॥

'बाबा! हे काय घडले. आपण स्वतः मला दूर पाठविले. माझ्याशी कपट करून स्वतःच्या मुलास फसविले आणि एवढा प्रेमाचा लळा लावून मला दूर लोटून आपण स्वतः या जगातून निघून गेलात. गुजराथमध्ये जाऊन लोकांना उपदेश कर असा बहाणा करून मला टाकून गेलात. आपली आज्ञा मी शिरोधार्य मानली आणि त्या प्रमाणे प्रयाण केले, तो तुम्ही इकडे हा उत्पात कां केला? असे कांही होईल ही कल्पना मला असती तर मी आपणास सोडून गेलोच नसतो. पण हे तर अजाणता झाले. तुम्ही तुमच्या मनाचे करून बसला पण माझा विचार केलाच नाही.'

सबको हिस्सा बाटके, आपही हुये निरांत।
मेरा हक्क कहा गयो, उर विचारीये तात॥
अपनो छोटे पुतका, कुछ भी न कियो विचार।
साया अैसे क्यो बने, तुमी बडे हितकार॥

'बाबा! तुम्ही सर्वांचा आपआपला हिस्सा देऊन टाकला आणि जणूं निरांत झाला, पण मला माझा हिस्सा मिळायला पाहिजे तो कां दिला नाही. तुम्ही आपल्या सर्वात छोट्या मुलाचा कांही विचारच केला नाही. असे तर कधीही होण्यासारखे नव्हते. कारण तुम्ही तर सर्व लोकांचे हित करणारे पुरुष होता, मग माझ्याच बाबतीत हा अन्याय कां केला.'

मुखसे क्यों बोले नही, कवन किये बिचार।
बाबा छोटे अनुजको, कैसे बिसर गये प्यार॥
सचमुख तुमी जानके, मोहे रखे नही पास।
हाजीर होत इमाम तो, जाने न देवत खास।

'बाबा, तुम्ही जाणत होता तरीपण मुखातून बोलू शकला नाही येथून निघून जाण्याचे मनसुबे रचले असतील. परंतु या लहानपुत्राचे प्रेम आणि ममता कसे विसरून गेलात. तुम्ही जाणत होताच म्हणून तर मला जवळ ठेवले नाही. जर असे झाले नसते आणि मी हजर असतो तर तुम्हाला या दुनियेतून जाऊच दिले नसते. पण तसे झाले नाही आणि भगवंताच्या मर्जीप्रमाणेच सारे कांही घडून आले आहे.'

मेरा हिस्सा मुजको दियो, तुमी हो गरीबनवाज।
देखो दुनिया हस रही, रखो छोटे पुतकी लाज।
देखो तमासा हो गया, दिखे शहर मुलतान।
बाबा मेरी सुनलो, हिस्सा दियो दिलजान॥

'बाबा, तुम्ही मला माझा हिस्सा द्या. तुम्ही गरीबदाता आहांत म्हणून माझी ही विनंती ऐका. आपला संवाद ऐकण्यासाठी सारे मुलतान शहर येथे जमा झाले आहे. सर्व लोक हसून मस्करी करीत आहेत. आणि माझी टर उडवित आहेत. म्हणत आहेत की अहा रे अहा! हा कसा हिस्सा मागणारा आला आहे. पहा, बाबा, भर चौकात अशा गोष्टी व्हायला नको म्हणून आपण सुधारून घ्या आणि मला माझा हिस्सा देऊन टाकण्याची कृपा करा. माझ्या दुसऱ्या भावांना त्यांच्या लायकीप्रमाणे हिस्से वाटून दिले. तसा मला माझा हिस्सा द्या. समय चुकला तरी पण उशिरा कां होईना आपल्याचरणाजवळ आलो आहे आणि आपल्या जवळ मागणी

करीत आहे. पण हे दुसरे लोक मात्र माझ्या या वर्तनाने माझी बेअदबी करून थट्टा करीत आहे. पिताजी! तुमच्या या लाडक्या मुलाची बदनामी होत आहे. म्हणून मला माझा हिस्सा देऊन टाका आणि हा प्रसंग मिटवा.' याप्रमाणे इमाम पित्याच्या मृत देहाजवळ बसून विनवीत होता. शेवटी हा तमाशा पाहणाऱ्या लोकांचा धीर सुटला व आवेशाने ते बोलू लागले.

बडे उपदेशक हो गये, लोगोंको ज्ञान बताय।
घरमें अंधियारा रहा, पर घर दिया जलाय॥
छोटेंमें बडी बात है, उपदेशककी रीत।
ज्ञानीसे हिस्सा कहा? यही मुलतानीकी रीत॥

मोठा उपदेशक बनून राहिला आहे. लोकांना बोध देण्यास निघाला आहे, बाप मरण पथारीवर पडला आणि ज्ञान सांगण्यास आपण बाहेर फिरायला गेला. घरात अंधार आणि बाहेर उजेड पाडायला गेला दुसऱ्यांच्या घरी दिवा लावावयास गेला. लहानतोंडी मोठा घास होत आहे, पण कोण सांगणार? दुसऱ्यांना उपदेश करणारे हे असेच असतात. अरे! ज्ञानी पुरुष ना तुम्ही! तुम्हाला लागभाग-हिस्सा कशाला हवा? हीच काय मुलतानीची रीत? मेल्यानंतर मागायला आला. जेव्हा बाप हयात होता-जिवंत होता तेव्हा त्यांच्या पासून दूर पळाला आणि मेल्यानंतर भेटायला आला. तुला जे कांही हवे होते, जिवंतपणीच ते मागून घ्यायला हवे होते. ते केले नाही आणि आता त्या प्रेताला नाहक सतावीत आहे. पाहा याचे नाव उपदेशक.' मुलतानींचे हे शब्द इमामशाहांचे काळीज चिरून गेले. तिक्ष्ण तिराप्रमाणे अथवा विषारी सुरीप्रमाणे हे शब्द प्रहार इमामशाहांच्या हृदयात जाऊन भिडले आणि त्यांच्या हृदयात दारूण व्यथा जागृत झाली. ते म्हणाले. -

झाझी जखम उरमें लगी, घायल हुवे इमाम।
मुखसे बानी उचरे, सुनियो लोग तमाम॥
मोमीन तुमरे मुखसे, बानी नही विखधार।
ताथे निश्चय कर लिये, इमामको निरधार॥

मुलतानच्या मोमीन लोकांच्या या कडव्या वाणीतून निघालेल्या विषारी शब्दांनी इमाम खरोखर घायाळ झाले. क्रोधाने त्यांचे रोम-रोम रोमांचित झाले. अतिशय वेदनांनी त्यांचे हृदय जळू लागले. कधीही क्रोधाधिन न होणारा असा गंभीर महापुरुष शेवटी खवळून सर्वांना ऐकू जाईल अशा आवाजाने गरजला -

'हे मुलतानवासीयांनो, आता तुम्ही सर्वचजण कान चांगले उघडे ठेवून ऐका! तुमच्या मुखात विषारी वाणी आहे. आज तुमच्या या विषाक्त वाणीने हा इमाम खरोखरच विषमय झाला आहे. मी निश्चय करून सांगतो ते नीट लक्षपूर्वक ऐका -

मुलतानीके बेनका, जख्म लगे ता दिन।
हिंदवाको उपदेश दूँ, मुरीद न मेरा मोमीन॥
हिंदवा मेरा बनी रहे, मैं हिंदवाका होई।
मुलतानी तुम सुन लों, हिंदवा हम संगी होई॥

'तुम्ही माझा उपदेशक म्हणून उपहास करीत आहांत, परंतु आजपासून मी कोण्याही मोमीनला उपदेश देणार नाही. केवळ हिंदूच माझे शिष्य होतील आणि त्यांच्या आत्मकल्याणासांठी मी झटेन एकही मुसलमानाला मी माझा शिष्य बनविणार नाही. हिंदूच केवळ माझे शिष्य होतील व मी हिंदुंचाच होऊन राहिल. हे मुलतानवासीयांनो! नीट लक्षपूर्वक ऐका. हिंदुच माझे मित्र-साथीदार राहतील आणि मी माझ्या परमप्रेमी शिष्यांच्या उध्दाराकरिता जीवनविकासाकरितां झटेन.' अशा रीतीने इमामशाहांनी साफ शब्दात मुलतानवासीयांना प्रतिज्ञा करून सांगितले. अज्ञानी-मूर्ख लोकांनी सद्‌गुरुंना अभद्रवाणी ऐकविल्याने सद्‌गुरुंच्या हृदयात आवेश प्रगटला व त्यांनी अशी प्रतिज्ञा केली. त्यांची ती प्रतिज्ञा ऐकताच मुलतानीयांच्या हृदयाला मोठा धक्काच लागला पण करणार काय? शब्द मुखातून निघून गेले होते, बाण धनुष्यावरून निघून गेला होता त्याचा परिणाम भोगण्याशिवाय गत्यंतरच नव्हते. नंतर पश्चात्ताप करण्यात काय अर्थ -

प्रहर बीते परचा मिले, जनाजा उठत न उठाय।
अपनी माला पिदरये, इमाम को पहनाय॥
कफन फाडके निकसे, बाबा कबीरके हाथ।
मुलतानी देखत रहे, साचा हुवे सनाथ॥

बाल इमाम हट्ट धरून बसला. तेव्हा प्रेत संस्काराला आलेले यात्री अधिर झाले आणि आवेशाने जनाजा उचलू लागले. परंतु तो त्यांच्याने उचलत नव्हता म्हणून निराश बनून तेही खाली बसले. आता पुढे काय होते ते उत्सुकतेने व शांतीने पाहू लागले. एक प्रहर उलटल्यानंतर पुत्राच्या विनवण्याने बाबा कबीरदिनला जणूं करूणा आली. त्यांचा हात कफनामधून बाहेर आला. त्यांनी त्यांच्या गळ्यात असलेली माळ काढून इमामशाहांच्या गळ्यात घातली. हे अलौकिक दृश्य पाहून लोक आश्चर्यचकित झाले आणि आपापसात बोलू लागले की 'काय हो हे आश्चर्य!



बाल इमामशाहांची मृत पित्याकडून दिव्यशक्तीची मागणी
व मृतपित्याकडून झालेला शक्तिपात.



सद्गुरु इमामशाहांची नाया लुटारूकडून अडवणूक
व इमामशाहांचे त्यास दिव्यज्ञानदर्शन.

भगवंताचे आज आपली लाज राखून सनाथ बनविले हा चमत्कार नव्हे तर काय? आज खरोखर इमामचा महिमा वाखाणणीय आहे.' एका बाजूला अशा गोष्टी चालल्या होत्या तर दुसरी कडे पित्याने फक्त माळा देऊन समजावले. एवढ्याने काय होणार म्हणून इमामशाहांचे मन मानत नव्हते. ते म्हणाले, 'बाबा एवढ्याने काय होईल अजून तर मला बरंचस घ्यायचं बाकी आहे. ज्याची गरज आहे ते तर मला दिलेच नाही.' असे म्हणत विनयाने त्यांनी हात जोडले.

फिर इमाम ठाढे रहे, पिदर मुख मिलाय।
सक्कर अपने मुखकी, दिनी इमामके मुखमाय॥
धन्य गुरु इमामशाह, पिदर लिये मनाय।
अकळ कळा इमामकी, शहर मुलतान पिछनाय॥

शेवटी पित्याने आपले मुखकमल उघडले. त्यातून साखर (एक प्रकारची दैवी कळा) काढून इमामशाहांच्या मुखात घालून त्याच्या मस्तकावर हात ठेवला. हा अशा प्रकारचा दिव्य व अलौकिक शक्तिपात पाहून लोक आणखीच आश्चर्यचकित झाले आणि जयजयकार करू लागले. धन्य आहे इमामशाहांची कीं ज्यांनी मृत पित्याची करूणा भाकून त्यांच्याकडून आपला दैवी शक्तीचा हक्क प्राप्त करवून घेतला. त्यांची ही अकल्पित गति मुलतानवासीयांनी ओळखली पण इमाम आता त्यांचा राहिला नव्हता. एक समय असा होता कीं बाल इमामच्या पाठीमागे मुलतान वेड्यासारखे फिरत होते पण इमामचेच भाऊ इमामला हवे ते बोलत होते. त्यांनी मेलेल्या पित्याकडून मनोवांछित दैवीकळा प्राप्त करताच ते पितापुत्राचे मंगलमिलन स्वतःच्या डोळ्यांनी ज्यांनी पाहिले त्या मुलतानवासीयांनी सद्‌गुरूंना पुन्हा मानण्याचे ठरविले पण ते सद्‌गुरु आता त्यांच्यावर जणू अभावित झाले होते. लोक प्रार्थना करून म्हणू लागले -

बडे करामती देखीया, इमामशाह गुरु पीर।
अवगुणबक्षो नाथजी, तुमी हो गुण गंभीर॥
बहुरी बेन सुनाइया, भूले मुलतानके लोग।
बाबा मुख मत मोडीये, सदा रहियो संजोग॥

'बाबा आम्ही तुम्हाला ओळखू शकलो नाही. आमचे अवगुण विसरून जा आणि येथेच रहा. आमच्यापासून वेगळे राहू नका. तुम्ही तर गुणाचे सागर आहात!' असे मुलतानीयांनी विनयाने विनविले पण ते समय हारलेले होते. समय त्यांच्या हातातून सटकून गेला होता! 'समय चूकी पुनि कहा पछताना' होणारी गोष्ट घडून गेली. इमामशाहांच्या मुखातून जी गोष्ट निघून गेली होती ती कधीही पालटणार नव्हती.

पीर इमामके मुखसे, बानी हुई प्रकाश।
मुलतानीके हियरा, सुनतही हुवा उदास॥

# ५. इमामशाहांचे धर्मप्रचारार्थ प्रयाण

पिताजी कबीरदिनच्या महाप्रयाणानंतर कांही दिवस इमामशाहा मुलतान येथेच राहिले. त्यांचे प्रेमी अनुरागी लोक त्यांच्या दर्शनास व उपदेश घेण्यास येत असत. त्यांत गरीब, श्रीमंत, धार्मिक, नास्तिक, समाजातील सर्व थरातील स्त्री पुरुष असत. कोणी कोणत्या हेतूने तर कोणी काही उद्देशाने येत व आपली व्यथा सद्गुरुंना सांगून त्यांचे मार्गदर्शन घेत व आशिर्वाद घेऊन सुखी होत.

एकदा मुलतान शहरात कांही योगी लोक आले. त्यांच्या कानावर बाल इमामशाहांची कीर्ति गेली आणि ते या दिव्यशक्तिधारी बालकाला भेटायला आले. त्यांना मनात वाटत होते की आपण योगी लोक, आपण जीवनभर योगसाधना करून अजून जे साध्य करू शकलो नाही ते या लहान मुलाला घर बसल्या कसे साध्य होईल बरे ?

अेक समे जोगी आवीयारे, करवाने संवाद।
बाळवयमां बळनिधी, बोल्या तेनी रे साथ॥
जोगे ते योग देखाडीयारे, टाळ्यो तेमनो अहंकार।
मुद्रिकाओ उतराविनेरे, कर्या सेवक ते वार॥
संसार व्यवहार जाणवारे, कह्यो करीने विस्तार।
योगीये सद्गुरु ओळख्यारे, नम्या चरण मोझार॥

हे योगी लोक संघाने चालले होते. त्यांत कानपूर, काश्मिर, कर्नाटक, कोकण, कलोल वगैरे भागातील लोक होते. त्यांना लहान वयाच्या इमामशाहाने सर्व प्रकारच्या योगक्रियांचे दर्शन घडविले आणि संसार-जगत् जगदीश त्याची माया यांचे अन्योन्य संबंध हे सर्व सविस्तर समजाविले. योगी लोकांचा अहंकार समूळ नष्ट झाला. त्यांच्या ठायी सदसद्विवेकबुध्दि जागृत झाली. त्यांनी आपल्या मुद्रिका काढून त्यांना अर्पण केल्या. असे प्रसंग वारंवार येऊ लागले. पण त्यामुळे त्यांच्या भावांच्या मनात विषवृक्ष वाढू लागला.

एकदा तीन मुखी मुलतान शहरी कबीरदिन यांना दसवंत अर्पण करण्यास आले. पण संत कबीरदिन बाबांचा मृत्यू झालेला ऐकून ते पेचात पडले कारण त्यांना संत कबीरदिन बावांनी सांगितले होते की माझ्या पश्चात ज्याच्याजवळ ब्रह्मकळांचे-दैवीशक्तिचे बळ असेल त्यासच दसवंत अर्पण करा, मुखी पेचात पडले. हाजरबेगने त्यांना सांगितले कीं ब्रह्मकळा कबीरदिन बाबांच्या पश्चात फक्त इमामशाहात आहे. याची तुम्ही खात्री करून घ्या. इमामशाहांनी मुखी लोकांना जवळ बोलाविले व म्हटले -

पीर इमामशाह बोलीया, बोल्या जोगी साथ।
जोऊ होय तो जोई लो, मुको बीजी वात।।

सद्गुरु इमामशाहांनी तोंड उघडताच मुर्खींना चौदा भुवन चंद्र तारे सारे ब्रह्मांड दिसू लागले व अनेक दैवीशक्तिचे-ब्रह्मकळांचे दर्शन त्यांना होऊ लागले. हे दिव्यदर्शन अनुभवून ते अत्यंत हर्षभरीत झाले. सन्मानाने दसवंत तेथे अर्पण करून ते समाधानाने परत फिरले. सद्गुरुंनी घटपाट पूजाविधी द्वारे सर्व दसवंतची रकम ब्रह्मार्पण करून गोरगरीबांच्या सेवेकरितां विभागून वाटून दिली.

या घटनेमुळे त्यांच्या घरातच त्यांच्या विषयी जास्त द्वेषभाव मत्सर वाढला. इमामशाहांना आता मुलतानला राहणे योग्य वाटेना त्यांच्या पित्याने सुध्दां गुजराथमध्ये जाऊन धर्मप्रचार कर अशी आज्ञा केली होती. शिवाय स्वत: त्यांना सुध्दा वाटत होते की आपण जी मौलिक धर्मतत्त्वे उराशी बाळगून आहोत त्याचा प्रसार व प्रचार करण्यांकरिता योग्यभूमी गुजराथच आहे म्हणून त्यांनी लगेच प्रवासास सुरुवात केली. ते सिंधुनदीच्या तीराने गुजराथकडे जायला निघाले. रस्त्यात जीवन नावाड्याची नौका तुफानातून सुलभतेने कोणत्याही प्रकारचा धोका न होता पाण्यातून बाहेर काढून दिली.

पुढे ते प्रवास करीत करीत 'जुणबदिना' गांवी जाऊन पोहोचले. त्यांच्या कीर्तिचा डंका आता सर्वत्र वाजत होता. त्यामुळे त्यांना शत्रु पण बरेच निर्माण झाले होते. त्या गावात खोजा लोकांची मोठी धर्मशाळा होती. पण ते लोक सत्तांध आणि उर्मट असल्याने इमामशाहांनी गरीबवेष धारण करून म्हणजे नम्रतेने खोजा धर्मस्थानात प्रवेश केला. कांही खोजांनी इमामशाहांना तुच्छ समजून त्यांचा अपमान केला. इमामशाह म्हणाले, 'मी बाबा कबीरदिनचा मुलगा आहे म्हणून नव्हे पण बाह्य सर्व गोष्टीकडे दुर्लक्ष करून तुम्ही एकमेव सत्यज्ञानाकडे पाहण्याची दृष्टी ठेवा. तुम्ही अभिमान करून रीतभात सोडून आडव्या मार्गाने जाऊ नका.' मदांध खोजा लोक यातले कांहीच समजू शकले नाही. त्यांना असे वाटले कीं हा कदाचित आपली येथील गादी बळकावून बसेल म्हणून त्यांनी त्यास बाहेर घालविण्याचा प्रयत्न केला. इमामशाहांना तर गुजराथमध्ये जायचे होते आणि हिंदुमध्येच त्यांचाच बनून राहण्याची त्यांनी शपथ घेतलेली असल्याने तिथे थांबण्याचा त्यांचा प्रश्नच नव्हता पण हे लोक भाविकभोळ्या हिंदुना भुलवून आपल्या मार्गात ओढण्याचा प्रयत्न करीत होते व राजदरबारात आपले वर्चस्व वाढविण्याच्या प्रयत्नात होते म्हणून इमामशाहांनी तिकडे आपला मोर्चा वळविला होता. पण त्या लोकांनी इमामशाहांचे कांही एक न ऐकता त्यांना जेवणही दिले नाही. उलट एका असंस्कारी माणसाने

त्यांना तीन लाठ्या मारल्या. इमामशाहांना त्याचा यत्किंचीतही क्रोध आला नाही. शांत चित्ताने त्या लोकांचा नाद सोडून ते निघून गेले.

विकाररहित छे नाथजी रे, सत् ब्रह्म स्वरूप।
दोष ते दिलमा नही धरे रे, सुखसागर अनुपम।।

सद्गुरु इमामशाह हे विकाररहित ब्रह्मरूप असल्याने त्यांनी कोणास ही दोष दिला नाही. ते पुढे जाऊ लागले. तेवढ्यात प्रेमजी खोजा नांवाच्या मनुष्याने पुढे येऊन इमामशाहांना आदरपूर्वक विनवून घरी आणले. त्यांना भोजन देऊन त्यांची कृपा संपादन केली.

तेथून त्यांनी पुढचा मार्ग आक्रमण करायला सुरुवात केली. चितोडगडला आल्यानंतर त्यांनी गांवाबाहेरच एक झाडाखाली बैलगाडी सोडून आराम केला. 'वेलर' नांवाचा एक रबारी तेथे आला. गुरुजींना पाहून प्रणाम करून त्यांच्या चरणाशी बसला. इमामशाहांनी त्याला क्षेमकुशल विचारले व मुलाबाळाविषयी विचारताच तो ढसढसा रडू लागला, म्हणाला, स्वामी मी तीन बायका करूनही निपुत्रीकच राहिलो. रडता रडता त्याचा कंठ सुकला. गुरुजींनी त्याला समजावून सांगितले -

गोरजी मुखथी बोलीया, सांभळ वेलर वात।
दु:खनी वारे दया करे रे, अेवो जगतनो तात।।
संकल्प विकल्प टाळजो, राखजे मनमा धीर।
पुत्र सुख तू पामशे, बोल्या इमामशाह पीर।।

वेलर गवळ्याला कांही दिवसांनी पुत्रप्राप्ति झाली आणि गुरुजींच्या सांगण्यावरून त्याचे संबंध कुळ आणि कुटुंब अेसावर गांवी स्थाईक झाले व परंपरागत ते सद्गुरुचे अनुग्रही बनले.

पुढे सद्गुरु महाराज शिरोई मार्गे मारवाड देशातून प्रवास करीत दिल्लीला जाऊन पोहोचले. तेथे त्यांनी शाहदुल्ला मशिदीत मुक्काम केला. नमाज पढण्याकरितां अनेक लोक येऊ लागले. इमामशाह मात्र ध्यानस्थ बसून ईशचिंतन करीत होते. कुतुहलाने लोक त्यांच्याजवळ जाऊन म्हणाले, 'छोटे मिया, आपण मुसलमान दिसता आणि नमाज कां पढत नाही?' इमामशाह नम्रतेने म्हणाले, 'माझी नमाज खुदाने मंजूर करून टाकली आहे. तुमचा आग्रहच असेल तर माझ्या ऐवजी हे मशिदीचे मनोरे नमाज पढतील.' तेव्हा खरोखरच मशिदीचे मनोरे खाली वाकले. इमामशाह म्हणाले, 'जरी मी मुसलमान कुळात जन्मलो असलो तरी सर्वांचा एकच अशा परमेश्वराचे ठायी मी लीन आहे. माझ्यात धर्मभेद अथवा जातीभेद नाही. कर्मधर्म संयोगाने मी इथे येऊन उतरलो आहे.'

इसी मिट्टीमें सारी दुनिया निपाई।
इसीमे कौन हिंदु इस्लाम ईसाई॥

ही बातमी दिल्ली शहरात वाऱ्याप्रमाणे पसरली व त्यावेळचे दिल्लीचे बादशाह 'बहलोल लोदी' या अफगाण राजाच्या कानावर ही बातमी गेली. बादशाह उत्सुकतेने त्या बालयोग्याच्या दर्शनास आले. त्यांनी इमामशाहास विचारले -

शहर दिल्लीमें आइया, बडे करामती शाह।
पाक दिदार पेखने, आय खडे पातशाह॥
बहलोल खान आयके, साइको किन्ही सलाम।
साई नमाज पढते नही, बुझो पाक कलाम॥

यावर इमामशाह आपल्या अमृततुल्य वाणीने म्हणाले, -

पाच नमाज हृदयमें रहे, बेहद नमाज सोय।
पंच इंद्रिय वशजो करो, साचा नमाज सोय॥
हरदम लगे नमाज में, ताको नमाज कहाँ होय ?।
नमाजसे बहाना करे, वे नही मुसलमान होय॥
रोज नमाज बखानते, आपे बडे मोमीन।
कहा हिंदु कहा इस्लाम, पीव खोजे सोही प्रवीण॥

बादशाह बहलोल खान शांत चित्ताने ऐकत असलेला पाहून पुन: इमामशाह त्यांना म्हणाले, -

'सायाको खोजत फिरे, पियरा तिहारी पास।
बिलखत मृग फिरे बावरे, बन बन सुंघे घास॥
सायाजीकी गम नही, भूले हिंदवा दीन।
व्रत आचारमे हिंदवा, रोझा नमाज मोमीन॥
रेन दिन लागी रहे, साहिबसे इकतार।
अैसे साधु फकीरको, बहुरी मेरा जुहार॥
बहलोल बुझी साइकों, झंझट छोड दो आन।
नेक बाते इमामकी, बेरही कबहु बखान॥

असा हा उच्च कोटीतला साध्या भाषेतील उपदेश ऐकून बहलोलखान बादशाहाचे मन प्रसन्न झाले. ते आदराने गुरुजींना म्हणाले, ' महाराज, आपण आपल्या स्वखुशीने माझ्याकडची कांहीतरी भेट स्विकारावी,

वळता ते बादशाह बोलीयारे, मांगो मांगो दयाळ।
जे रे वस्तु तमने खपेरे, खपे गाम गराश॥

सदगुरु इमामशाह म्हणाले,

वळता गुरुजी बोलीयारे, शुं करूं गाम गराश।
मुजने काई नव खपे, अेक साहेबनी आश।

हे बादशाह! मला गांव वगैरे कांहीच भेट नको. त्याला मी काय करूं? मला फक्त परब्रह्म परमात्म्याच्याच दर्शनाची गोडी आहे. इतर गोष्टीची आशा नाही. परंतु बादशाहाने त्यांना प्रवासाकरितां रथासारखी बैलगाडी नविन करून दिली.

दिल्लीहून निघाल्यानंतर गुरुजी मध्यप्रदेशमधून मजल दर मजल प्रवास करीत करीत भोपाल, इंदूर, निमाडमधून थेट बऱ्हाणपूर येथे आले. तेथून खान्देशमधून प्रवास करीत असता ठिकठिकाणी मुक्काम करून त्यांनी धर्मोपदेश केला. पूर्व व पश्चिम खानदेशमधून जात असता त्यांनी बराच शिष्य संप्रदाय वाढविला. सद्गुरुंची दिव्यशक्ति आणि ज्ञानोपदेश ऐकून बरेच लोक प्रभावित होत व यांच्याकडून अनुग्रह घेत. कित्येक दर्शनाकरीता तर कित्येक केवळ कुतुहल म्हणून त्यांच्या सान्निध्यात येत. त्यांचे दर्शन घेऊन ज्ञानोपदेश ऐकून आपल्या जीवनाचे साफल्य मानीत.

इमामशाहांच्या सान्निध्यांत बरेच लोक आले. प्रत्येकाचे विचार वेगवेगळे आचारधर्म वेगवेगळा. त्यांत बऱ्याच संतांचा समागम झाला. बऱ्याच मौलवी पीर फकिरांचा सुध्दां समागम झाला. बरीच ज्ञानचर्चा झाली. सर्वांना आश्चर्य वाटत असे एवढासा बालक हा वेद उपनिषद गीता भागवतातील दृष्टान्त देऊन सत्तत्त्व पटवून देण्याचा प्रयत्न करीत आहे. निरनिराळे कर्मकांड करून वैदिक सनातन धर्माचा प्रसार करीत आहे. त्याच्या हृदयात आत्मज्ञानाचा अखंड दिप प्रज्वलित झालेला आहे. अनेक दीपकांच्या उज्वल प्रकाशाचा चमत्कार पाहून सारे त्याला देवदूतच समजू लागले व त्या दिव्य प्रकाशाने त्याचे तन, मन, प्राण, पवित्र व शुध्द झाले. इतकेच नव्हे तर 'तमसो मा ज्योतिर्गमय' या तत्त्वाचा प्रादुर्भाव जमलेल्या जनतेच्या मनावर सुध्दा होऊन सर्वांचे हृददीप अखंड तेजस्वी होत. असूर्य लोकांना सुध्दा ज्ञान होई. सत्ज्ञानाच्या प्रचारास्तव कोण्यातरी महापुरुषाचा हा पुनर्जन्म आहे असे लोक मानीत. त्याचा मार्ग हा सर्व वेदांचा सार आहे. कारण पुन: या जंबुद्विपात पश्चिम पूर्व प्रदेशात (अरबस्तान ते भारत वर्षात) सर्वत्र पुन: त्या असूर्या लोकांचा - आत्मघातक्यांचा दुष्ट प्रभाव वाढत आहे. तो त्यांचा अविद्या-अंध:कार मिटावा व त्यांच्याठिकाणी सत्ज्ञान सत्य अहिंसा, समानभाव या तत्त्वांचा उद्भव व्हावा यासाठी भगवंतानेच

हा अवतार घेतलेला आहे. बरेच मौलवी पीर फकिर मात्र इमामच्या या कार्याचा द्वेष मत्सर व विरोध करीत व त्यांचा काटा काढण्याचाच प्रयत्न करीत पण ते मात्र यशस्वी होऊ शकले नाही.

बालपणापासूनच शाह इमाम सुसंस्कृत वेदशास्त्र पारंगत होते. त्यांच्यात मानव धर्माची जागृति व शुध्द सदाचार शिकविण्याची पात्रता होती. ते यासाठी गांवोगांव जाऊन धर्मोपदेश करीत. त्यांच्या त्या दैनिक नित्य कार्याचा परिणाम लोकावर होत होता. बालपणीच त्याचे ठिकाणी ब्रह्मज्ञानाचे तेज झळकले. बालपणातच चौदाविद्या, प्राप्त ज्ञानाचा आगमनिगमचे प्रात्यक्षिक चमत्कार दाखवू लागला. त्याचे ठायी कोणत्याही प्रकारचा भेद नव्हता. सर्वावर सारखेच प्रेम करीत. समभावाने परोपकार करीत व ज्ञान प्रसारास्तव जीवनाचा सतमार्गाचा अवलंब करून सतपंथ प्रचारातून दुष्ट क्रूर प्रवृत्तीचा नाश करीत, धन्य तो इमाम की त्याने सतपंथ (हिंदुधर्माची) हिंदुत्वाची धूरा अखंड धारण केली. यवनी जुलमी वृत्तींचा नायनाट घडवून आणला.

चतुर्वेदात अध्यात्मज्ञानाचा सखोल वृत्तांत असून शाह इमामने सर्वसाधारण जनतेला ज्ञान व अज्ञान, अविद्याअंधकाराची नीट समजूत देऊन जागृति केली, ती अशी की, प्रथम अंधार असतो. (नेत्र बंद केल्यानंतर वा मातेच्या उदरात असतांना असतो तो.) त्यात बुध्दीचा संचार होतो व आनंद प्राप्त होतो. म्हणजे ऋग्पणा-लालप्रकाश याची जाणीव येते हीच प्रथम अवस्था. हिलाच ऋग्वेद म्हटले आहे आणि ही बुध्दीगम्य ज्ञानाची वाढ झाल्यावर ती विस्तृत झाली. प्रसरण पावताच तिचा तो रक्तवर्ण यजु:ता-पिवळसर दिसू लागला. म्हणजेच ऋग् पासूनच यजु: प्राप्त झाला. यालाच यजुर्वेद म्हटले. अशा विस्तृत ज्ञानाचे पुढे प्रगल्भरूप तयार झाले. स्वत:ची जाणिव होताच ती बुध्दि दूरवर जाऊन पहाते तर मुळचा काळसर अंधाराची जाणिव शामरूपाची म्हणजे सामरूप तत्वाची जाणिव झाली. हाच सामवेद होय. या तीनही तत्वांचे एकरूप होताच जो सर्वत्र प्रकाशमय रंग दिसला तोच बुध्दीगम्य आत्मा होय. त्याचेच हे अनेकानेक रंग व रंगछाया हयाची जाणिव बुध्दीस होते. याच सत् प्राप्तीला अथर्ववेद म्हटले आहे. ऋग्वेदातून त्यांनी साररूप सत् सांगितले ते हे की बुध्दीस ज्ञान होताच आनंद मिळतो त्यालाच परमानंद वा ब्रह्मानंद म्हटले आहे. यजुरवेद सत्सार 'अहं ब्रह्माऽस्मि' हा होय आणि सामवेदाचा तत्त्वरूप सार 'तत्त्वमसि'! इतके कळल्यावर त्यांना पूर्णरूप ज्ञानबुध्दिं म्हणजेच गुरुत्व प्राप्त झाले. ते 'अयमात्माब्रह्म' होय. हया रंगाचा प्रकर्षानेअनुभव सूर्योदय व सूर्यास्ताचे वेळी दृष्टीगोचर होतो. असे अखंड नश्वर रूप दर्शित करणाऱ्या सूर्याचे प्रतिक अंधाऱ्या रात्रीही आपल्या दृष्टीपुढे असावे म्हणूनच इमामाशाहाने अखंड दीप लावला आहे. आजही पीराणास्थानी हा

दीप आहे. अथर्ववेदात सामान्य लोकांना आपले जीवन उत्तमरीतीने जावे म्हणून सर्व बंधने व नियमांचा विचार केलेला आहे. तसेच अभिचारादिंची सुध्दा माहिती व मंत्रोपचारही दिलेले आहेत. इमामशाह म्हणतात, -

उग्या तेणे वंदीये, मानो तेणी आण।
आज स्वामीने ओळखी, तेणी करो वखाण॥

जो सूर्य विश्वातील यच्चयावत् सजीव निर्जीवांच्यासाठी उगवतो त्याला अहर्निश वंदन करायला हवे. त्याचे प्रकाशरूप ज्ञान प्राप्त करा. त्याने दिलेली वचने आपण पाळायला हवीत. तोच आपल्या भल्याकरीताच अवतार घेतो व संकटातून मुक्त करतो. अवताराचे बाह्यरूप जरी भिन्न असले तरी अंतरीचे रूप एकच, तेच सत् असते. यातून साररूप हेच की जो हे जाणेल तो यमाच्या पाशातून मुक्त होऊन त्या विशाल सूर्यस्थानी मोक्षप्राप्त करील. इमामशाह म्हणतात.

प्रीत किजे सुरजथी, जो अपने घटमाही।
गुरु घटना दीपथी, प्रज्वलित हो ताही॥

धर्म संकटाच्या अत्यंत भयानक काळात हिंदुंना दिलासा देणारा असा हा एकच संत इमामशाहा जो 'हिंदवा होई हिंदवा रहिया' वृत्ती धारण करून सत कार्य करीत होता. तो केवळ संतच नव्हे तर महान सत्तत्वदर्शक महामुनीच होता यांत संशय नव्हे. त्यांनी म्हटले आहे -

सत् नूर माहेथी नूर प्रगट्या, तेनो वासो छे नूरज माहे।
तेमणेआ सतपंथ पेदा किया, अलेख निरंजन स्वामी राये॥
- ऋषिवर चेतावणी

अशा त्या सत्स्वरूपाचे तीन गुणधर्म जाणून म्हटले आहे की -

सतपंथ धरम सो कहिये, जेणे ओळख्या सतगुरु नुरे।
परिब्रह्म विष्णुने ओळख्या, ते तो अमर हुआ ततखेवरे॥
- गुरुवाणी

ही जाणिव करून प्रजेला जागृत केले की जो त्या परमात्मा सत्चित् स्वरूपाचे ध्यान करील तो ह्या जीवनांतून मुक्त होतो याची खात्री पटवून दिली.

सत्यमेव जयति नानृतं, सत्येन पन्था विततो देवयानः।
येनाक्रमन्त्यृषयो ह्याप्तकामा यत्र तत्सत्यस्य परमं निधानम्॥
- मुंडकोपनिषद् ३।१।६

ज्याची भोगवासना नष्ट झाली म्हणजे पूर्णकाम वितरागी ऋषिमुनीगण जो मार्ग अवलंबून पूर्णब्रह्म परमात्म्यास प्राप्त करून घेतात तो देवयान मार्ग हाच खरा अच्यूत सत्पथ, सत्पंथ जाणणाऱ्या त्या शाह इमामने दिग्दर्शित केलाआहे. त्या काळच्या इस्लामी (इस्त्रायली) धर्म प्रचारकांच्या जुलूम जबरदस्ती व अनिबंध वागणूकीस कंटाळून जाचास कंटाळून स्वत:चा हा स्वतंत्र पंथ चालू केला. ते एक अलौकिक सिध्द पुरुष होते. त्यांनी हिंदुधर्मातील अन्योन्य धर्मरूढींना कोणताही दोष न देता व जनतेस न दुखविता अथर्ववेदाधारे हा पंथ चालविला. हाच सतपंथ पुढे इमामशाही पंथ म्हणून रूढ झाला. कारण, सत्पंथ म्हणून आणखीही कांहीं पंथ चालू होते. असा हा पंथ इमामशाहांचे प्रावरणाखाली अथर्ववेदप्रणित पंथ अद्ययावत् भारतातील गुजरात प्रांतात पीराणा या स्थानी त्यांचे पीठ आहे. या पंथाचे अनुयायी सर्व हिंदुच आहेत व आचार संहिता पण हिंदू सनातन धर्म प्रमाणित आहे.

ह्याच धर्माचा पायीक सद्गुरु इमामशाह यांचा जन्म भारतातच झालाअसून येथीलच वेदवेदांताचा अभ्यास करून त्याच तत्त्वांचा पुरस्कार करीत ह्याच भारतात परमेश्वराचे सत् स्वरूपाचे आकलन तत्कालीन लोकभाषेत जनतेला करून दिल्याचे तत्कालिन हस्तलिखीतावरून निराकरण होते. आज भारतात असंख्य संप्रदाय व धर्म प्रचलित आहेत. सर्व धर्म पंथीय गोपालकाला फक्त आपल्या भारतातच आढळतो. कारण, ह्याच भूमीवर श्री अवधूतांच्या उक्तिप्रमाणे सत् सहिष्णुता आढळते. अनेकात अेक व एकातच अनेक याची अनुभूति संत महात्म्यांना येथे प्राप्त होते. येथील धर्मग्रंथ तत्त्वे अपौरूषेय आहेत. अन्य सर्व धर्मसंप्रदाय पौरूषेय आहेत, तेही याच धर्मातून निवडून घेऊन परिवर्तनीय शब्दातून प्रसृत केलेले वाङ्मय प्रेषितांच्या नावाने प्रसृत केले गेलेले आहे.

या अनादि आर्य धर्मा अगोदरही जे सत् तत्व ह्या विश्वात सामावले आहे. तेच तत्व सतपंथ संप्रदायाचे प्रवर्तक यांनी सांगितलेले आहे. ते म्हणतात की, हा सतपंथ नवा नसून अनादि आहे. मी नविन कांहीच सांगत वा निर्माणकरीत नसून मूळ सनातन युगधर्माला उजाळा देत आहे.

सतपंथ युगा युगे आविया, की भाईजुगा जुगे आवीया।
तो सत् मार्ग दिखलाया, लोभी रे तमे मायामो रह्यो।।

- गुरूवाणी भजन संग्रह

तीस पहिले एक ज्योत जो होती, तीस आगळ चंद्रसूर्य नही होता।
तीस पहिले सतपंथ निपाया, आप शरीर सद्गुरुये किया।।

- गुरुवाणी भजन संग्रह

अशा प्रकारे मूळ सनातन देवयान मार्गाची शिकवण देत देत व सतपंथ सनातन तत्त्वांचा उपदेश करीत करीत बाल इमामशाह व हाजरबेग महाराज महाराष्ट्रातून-खान्देशातून प्रवास करीत असतांनाचे वर्णन सद्भक्त नायाकाकामहाराजांचा परमशिष्य गंगासिंह गोहिल यांनी काव्यरूपाने केलेले आहे. त्यातील कांही वेचे -

दक्षिण देशमे विचरते, सोनगढ आये साई।
आये पीराना जानके, सेवक आये धाई॥
लोगनके दुख दूर करे, साई कृपा वरसाय।
रोग मिटाये जीवोंका, छीनमें किये सुखदाय॥

सोनगढला मुक्कामी असतांना त्यांचा कीर्तिरूपी सुगंध सर्वत्र पसरला. लोक दर्शनाकरितां व आपापल्या लौकिक आशा आकांक्षा त्यांच्या कृपाशिर्वादाने पूर्ण करून घेण्याकरितां आले. महापुरुषांच्या सान्निध्यांत आल्यानंतर त्यांच्या सर्व इच्छा तर पूर्ण होतच पण त्याचबरोबर त्यांच्या पारलौकिक पारमार्थिक आकांक्षा सुध्दा पूर्ण होत असत.

सुखानन्दको सोनगढ, नैन दिखे गुरुदेव।
धाम लाछोरा चल बसे, आये अवधू भेव॥

**लाछोरा**

लाछोरा पहूँचे गुरु, हो गये आनन्दकन्द।
दरश पीराणा पायके, मिट गये दुःख द्वन्द्व॥
रक्तकोढी गजेश्वरी, ता घर पहूँचे जाय।
कृपा बडी इमामकी, महारोग मिटाय॥

**भक्त वमरस -**

समरस भक्तजना, उरमेछाय उमंग।
सद्गुरुके चरणमें, लगे सवाया रंग॥
वमरस घरकी दुविधा, छीनमें मिटाय सांई।
आनंद वाधे अति, सबही जीये सुखदाई॥

**भक्त सूरभाण -**

सुरभाणको सद्गुरुकी, मानो लागी लगन।
निशतनप गुरुचरणमें, ठाढे रहे मगन॥
सुरभाणकी गति, कैसे बुजे अजाण।
गुरु चरणमें लग रहे, आठो जाम सुजान॥
सतगुरु बानी उचरे, धन्य सुरभाण अनुराग।
आवागवन ताको नही, भव उबरे ही सुभाग॥
खटमास गुरुदेवजी, ठाढे लाछोरा ग्राम।
परहितकारी साईया, चलने लगे बहुनाम॥

महाराष्ट्राच्या परिसरात व विशेषतः सोनगढ, लाछोरा भागात सद्‌गुरु इमामशाह बरेच दिवस राहिल्याचा उल्लेख वरील दोहऱ्यावरून आढळतो. तेथील बऱ्याच रंजल्यागांजलेल्यांना दिलासा देऊन परमार्थ करीत करीत गुरुजी आणखी दक्षिणेकडे वळले. कोचरब विभागात त्यांचा निजामाशी नदीतीरावर प्रसंग घडून आला व निजामसुध्दा त्यांचा तप:प्रभाव व तेज:पूंज व्यक्तिमत्त्व पाहून दिङ्मूढ झाला.

कोचरब जाने के लिये, सरितातट आये गुरु पीर।
निजाम कहे ठाढे रहो, किसविध होत अधिर॥
रथ सहित गुरु देवजी, जलपर चले प्रबिन।
लोगन सब देखत रहे, निजाम हुवे मतिहिन॥
कोचरबमे गुरुदेवको, इक साल किये निवास।
सुभागी कई जीवकी, पूरन किये गुरुआश॥

कोचरब विभागात गुरुजींचा जवळ जवळ एक वर्षभराचा मुक्काम होता. त्या अवधीत त्यांनी बऱ्याच भक्तांचा उध्दार केलेला आहे. महात्मा पुरुषांचा कीर्तिरूपी सुगंध सर्वत्र वाऱ्याप्रमाणे संचार करीत असतो. वस्तुतः महापुरुष प्रसिध्दीपराङ्मुख असतात, पण गांजलेली जनता आपला भवताप मिटविण्याकरितां अनन्य श्रध्देने महापुरुशांच्या संपर्कात येतात व बंधमुक्त होतात. अशा अनेक पीडीतांचे दुःख इमामशाहावरील श्रध्देने मिटल्याचे खालील दोहऱ्यांत वर्णिलेले आहे.

**मोहनभक्त -**

मोहनको सद्‌बोधसे, जगे हियामे हेत।
ताही की गति को लिखे, उबरे कुळसमेत॥

**लासाजी चमार -**

लासाजी चमार के पूरण हुअे सब काज।
कृपा बडी गुरु पीरकी, भव उबरे सुख साज॥

**उदाजी पढियार -**

साया मेरी कोन गत, शरण राखो गुरु पीर।
उदाजी पढियार को, गुरु दिखे गुण गंभीर॥

**गायीका जयश्री -**

तवायफको अकर्मसे, साहिब कियेरी नेक।
बडी सुभागीन हो गई, जयश्री जुगमे नेक॥

प्रवास करीत असतांनाच सद्भक्तांना मार्गदर्शन करीत दुःखितांचे दुःख दूर करीत मजल दरमजल मुक्काम करीत ते दक्षिणेतून पश्चिम सागर किनाऱ्याकडे वळले. नवसारी, सुरत, कानम, खंबायत, भावनगर, जुनागड, राजकोट, बडोदा व तेथून पेटलाद, देवा या भागात ते गेले. दरम्यान संवत १५१२ च्या सुमारास त्यांचे लग्न खदिजाबेगम नावाच्या सुंदर मुलीशी झाले. ती भडीयादवाला सैय्यद महंमदबुखारीची कन्या होती असे सांगतात. वैवाहिक जीवनात ते अत्यंत सुखी व समाधानी होते. त्यांना एकूण तीन मुले व एक मुलगी झाली. बाकरशाह, बालाशाह व नूर महंमदशाह आणि शम्सखातून नांवाची कन्या अशाप्रकारे चार अपत्ये त्यांना झाली पण त्यातील नूरमहंमद सोडून बाकीची दोन मुले व मुलगी ही लहानपणीच स्वर्गवासी झाली. तेव्हा इमामशाहांचा मुक्काम खंबात परिसरात होता. त्या परिसरात त्यांनी दहावर्षांचा काळ व्यतीत केला.

अशी आख्यायिका आहे की खंबात येथील जहागिरदाराचा मुलगा व इमामशाहांचा मुलगा बालेशाह हे दोघे जीवलग मित्र होते. बालेशाह आठ वर्षाचा असतांना दैव योगाने त्याच्या मित्राचे प्राणोत्क्रमण झाले. जहागिरदाराचा तो एकुलता एक मुलगा असल्याने सर्वांना फारच दुःख झाले. बालेशाहाला तर आपलाच जीवप्राण गेला असे वाटले. त्याने सहजगत्या चिरनिद्रेत पहुडलेल्या आपल्या मित्राच्या अंगावरून विभूति फिरवून हाक मारली व त्याच्या अंगावरील चादर बाजूस केली तो आश्चर्य म्हणजे तो मुलगा जीवंत होऊन उठून बसला. सर्वांना आनंदीआनंद झाला. सर्व जण बालेशाहाची वाहवा करू लागले.

इमामशाहांना जेव्हा ही हकीकत समजली तेव्हा त्यांनी बालेशाहला बोलावून विचारले कीं, 'बाळा! मोहवश होऊन तू हे जे कृत्य केले, कोणाच्या हुकुमावरून तू मृतक मुलास जीवंत केलेस.' बालेशाह म्हणाला, 'मी स्वतःच हे काम केले. तुम्ही म्हणत असलेल्या मंत्राचा जप करून मी माझ्या मित्राला जिवंत केले.' इमामशाह म्हणाले, 'बाळा, यांत तू शास्त्रनियमांचा भंग केला. एक तर तुला अजून व्रतबंध संस्कार झालेला नाही आणि तुला अजून शास्त्रोक्त पध्दतीने दीक्षा दिलेली नाही. जो पर्यंत दीक्षा घेतली जात नाही तोपर्यंत कोणताही मंत्र जप करण्याचा वा असे कांहीतरी प्रयोग करण्याचा अधिकार नसतो आणि दुसरे असे कीं असले कृत्य जाहिर रीतीने करायचे नसतात. बडेजावाने तू हे कृत्य अज्ञानपणाने जरी केले असले तरी अग्नीस अज्ञानपणाने जरी स्पर्श केला गेला तरी दाह हा होतोच त्याप्रमाणे निसर्गनियमांचे उल्लंघन तुझ्या हातून घडल्याने त्याचे प्रायश्चित तुला घ्यावे लागेल. बाळा अंतःकरण खूप जड होते पण नियमांचे उल्लंघन पुढे कोणाकडून घडून येऊ नये म्हणून नाइलाजाने तुला प्रायश्चित घ्यावे लागेल.'

बालेशाह म्हणाले, 'पिताजी! मी अज्ञानपणानेच व मोहवश होऊनच हे कृत्य केलेले आहे पण आपण जे प्रायश्चित मला द्याल ते अगदी आनंदाने भोगायला मी तत्पर आहे आपण आज्ञा द्यावी.

इमामशाहांचे अंत:करण गलबलले पण कर्तव्यकठोरतेने ते म्हणाले, 'बाळा, प्रायश्चित एकच ते म्हणजे जीवाच्या मोबदल्यात जीव. याशिवाय योग्य प्रायश्चित नाही.'

बालेशाह म्हणाले, 'पिताजी, आपली आज्ञा मलाशिरसावंद्य आहे. ती पालन करण्यात मला आनंद व आत्मिक समाधान आहे. आपण आपला दिव्य आशिर्वाद मला द्या व जन्ममरणाच्या फेऱ्यातून मला सोडवा. आज माझे जीवन धन्य झाले.' पित्याची आज्ञा शिरसावंद्य मानून त्याने तेथेच समाधी लावली व तो ब्रह्माशी एकरूप होऊन गेला.त्याचा पंचप्राण सुध्दा ब्रह्मात विलीन झाला. हे दृश्य पाहून लहान बहिण शम्सखातून उर्फ बालीबेन अतिशय शोक मग्न झाली. आपल्या प्रेमळ भावाचा विरह तिला असह्य झाला. तिने सुध्दां आपली आत्मज्योति प्राणप्रिय भावाच्या शोधात ब्रह्मात विलीन केली.

अत्यंत दारूण असा तो प्रसंग. हे सर्वअनाकलनीय विपरीत दृश्य पाहून सर्वांची अंत:करणे शोकाकूल झाली. सर्वजण शोकमग्न झाले. आत्यंतिक दु:खाने इमामशाहांनी आपल्या दोनहीअपत्यास नारंगसर तलावाच्या तीरावर अंत्यविधी केला व त्यांच्या स्मरणार्थ तेथेएक भव्य दर्गा स्मृतिमंदीर उभारले. इमामशाहांनी लवकरच तेथून आपला मुक्काम हलविला.

तेथून पुढे इमामशाह कानमच्या घनदाट अरण्यातून जात असता विख्यात लुटारू 'नाया' चा समागम त्यांना झाला. आपल्या तप:प्रभावाने त्यांनी त्याच्यात परिवर्तन घडवून आणले व सन्मार्गावर आणले. ही सर्व कथा 'नाया' च्या चरित्रात ऐकायला मिळते. मार्गात त्यांना अनेक प्रसंगांना तोंड द्यावे लागले. अनेक जातीच्या, अनेक स्वभावाच्या लोकांशी त्यांचा संबंध आला. रमजू कसाई, गोजारी अहिरण, मनखाजीअहिर, एका ब्रह्मराक्षस-खविसचा त्यांनी उध्दार केला. जुम्मा खुरासानी या विख्यात फकिराशी धर्मचर्चा संबंध घडून आला. मलिक महंमद, हाजी कालू, मलिक शअबान, याकुतशाह बाकरभिस्ती, गायिका मायावती, बन्नासिंह हाडा, जंभासिंह, तुंवार मंकासेन, जुगल बनजारा, हिरजी नाविक, सेजलदे, सवदास, मौलाजादा अलकीखान, मलिका हिराबाई वगैरे अनेक लोकांचा समागम झाला. अनेकांशी धर्मनीति बाबतीत चर्चावादविवाद

संवाद झाले. कित्येकांचे अज्ञान दूरकरून त्यांना ज्ञानी बनविले. जशाप्रकारची व्यक्ति असेल तशा प्रकारचे वर्तन त्याच्याशी करून व सर्वांना सुनीति सत्पंथाचे मार्गदर्शन करून त्यांना सन्मार्गावर आणले. या सर्व प्रसंगांचे वर्णन नायाकाकांचा परमशिष्य गंगासिंह गोहिल यांनी सुंदर सहजस्फूर्त काव्यपंक्तित केलेले आहे. विशेषत: नायाकाका, भाभाराम, कीकीबाई, शाणाकाका या पूर्वजन्मातील तपश्चर्यावान योगी लोकांशी ज्ञानचर्चा करून त्यांना जागृत केले व त्यांनी सुप्त, केवळ सांसारीक जीवनकर्मात व्यग्र असलेल्या सनातन सतपंथ धर्म नीतिशास्त्राची जाण लोकांना दिली व त्यांचे ऐहिक, पारलौकिक कल्याण केले. अनेकानेक संत महात्मा पुरुषांशी सुध्दां इमामशाहांनी संपर्क साधून आपल्या कर्तव्याची जाण त्यांना दिली. गोस्वामी तुलसीदास, चैतन्यमहाप्रभू, गुरु नानकशाह, महात्मा दादूदयाळ, संत सूरदास, संत कबीर, संत साध्वी मीराबाई तसेच योगी निरंजननाथ, सिध्द पुरुष योगी अडभंगनाथ, योगी जान्हवीदास, योगी सतानंद, योगी रसिकनाथ आदि तत्कालिन सिध्द ज्ञानी महापुरुषांशी सुध्दां इमामशाहांचा संत समागम घडून आला.

सद्गुरु इमामशाहांचा प्रवास जरी बराच घडला तरीपण त्यांचे उपदेशाचे क्षेत्र बहुश: गुजराथ मध्येच आहे. म्हणून त्यांचे वाङ्मय जे उपलब्ध आहे ते विशेषत: गुजराथी भाषेतूनच आहे. क्वचित हिंदी, मराठी, मिश्रीत असेही कांही वेचे आहेत. त्यांचे मुख्य शिष्य म्हटले म्हणजे संत नायाजी, संत भाभाराम, संत साध्वी कीकीबाई आणि संत शाणाजी हे होत. इमामशाहांच्या संपर्कात येऊन त्यांचा समागम कसकसा घडला याचे सविस्तर वर्णन 'सदगुरु इमामशाह महाराज जीवनवृत्तान्त' या मराठी व गुजराथी भाषेत प्रसिध्द झालेल्या पुस्तकांत आलेले आहे. गीरमथाला आल्यानंतर बहुतेक त्यांनी आपला प्रवास थांबवला व तेथेच जवळ 'पीराणा' या स्थानी वास्तव्य करून सतपंथ धर्मपीठ स्थापन केले.

**गीरमथा -**

गीरमथामे देखिया, सप्तसाल अकाल।
रहम किये गुरुदेवजी, सचमुच हुवे सुकाल॥
मेहा आये धायके, हो गये जयजयकार।
मेदनी आयी दोडके, पावे गुरु दीदार॥

**पटेल पुत्र सजीवन -**

ग्राम्य मुखीके पुत्रको, सद्गुरु दिये जीवाय।
ताथे मेरा साईको, घर घर लिखे महिमाय॥

**कुंवारीका क्षेत्र -**

तीर फेके गुरु पीरको, कुवारीका क्षेत्र माय।
कर्ण भेदाये केसरी, झुक कर हुअे बिदाय॥

**सद्गुरु स्थान -**

स्थान बनाये साइको, पीरजी कीये निवास।
ताथे लोगन उचरे, यहाँ पीराणा खास॥

**पीराणाधाम -**

पीर इमामकी रहमसे, बसे पीराना धाम।
पीरोंका पीराना हुअे, लिखे पीराणा ग्राम॥

**वि. संवत १५२४ मध्ये रोजाचे ( स्मृतिमंदीराचे ) स्थान बनविले**

पंद्रहसे चोवीसमे, रोजा स्थान स्थपाय।
समाधी अपने हाथसे, साया को बनवाय॥
परचा बहूत गुरु पीरका, कैसे लिखे अजान।
जाको गुरुगम पाईया, ताको मिल गई शान॥

**वि. संवत १५५७ मध्ये गुरु इमामशाह पूर्ण विराम पावले.**

नारायणके अंशसे, प्रगटे पीर इमाम।
पंद्रहसो सतावनमें, पाया पूर्ण विराम॥

**अभिलाषा -**

ज्योति जगी अविनाशकी, मानो पूर्ण प्रकाश।
'गंगा' सदगुरु इमामकी, अहर्निश कर हूं आश॥

**गंगासिंहाचा विनय -**

बैठे रहु गुरु चरणमें, चाहूं दिदार साई।
गंगाकी यह आरजु, मानो पाक पीराई।
साया तुमेरा बनी रहु, सुनो सद्गुरु इमाम।
गंगाको अपनो लीखो, बिरद बडो बहुनाम॥

सद्गुरु इमामशाहांनी पीराण्यास स्थान प्रगट केल्यानंतर ते तेथूनच धर्मप्रचार व इतर कार्ये करूं लागले. बरेच योगी, मुनी, संत, विचारवंत, समाज प्रवर्तक लोक तेथे येऊन अनेक वार्तालाप, धार्मिकचर्चा, विचार विनिमय करीत. सर्वांचा आदर सत्कार मान मरातब त्याच्या त्यांच्या योग्यतेने करून इमामशाह अत्यंत लोकप्रिय झाले. त्यांच्या जीवनातले ठळक ठळक प्रसंग गंगासिंह गोहिल यांनी आलेखित केलेले आहेत. त्यांतील कांही प्रसंग येथे देत आहोत.

★ ★ ★

## ६. इमामशहांचे गीरमथास प्रयाण सात वर्षांच्या दुष्काळाचे निवारण.

त्या खंडी वनामधून निघून सद्गुरु महाराज आपल्या सेवकासह बैलगाडीने पुढे मार्ग आक्रमूं लागले. वनप्रदेश ओलांडल्यावर थोड्याच अंतरापासून त्यांना अतिशुष्क रखरखीत प्रदेश लागला. रस्त्याने त्यांना पुष्कळसे तलाव लागले. परंतु सर्वांमधील पाणी आटून ते कोरडे झालेलें होते. बहुतेक झाडे पर्णहीन झालेली कोरडी होती. फारच क्वचित ठिकाणी हिरवा वृक्ष दिसत असे. सर्व प्रदेश वाळवंटासारखा उदास व कंटाळवाणा वाटत होता. सूर्यांच्या उष्णतेने सर्व जमिन रखरखित झालेली होती. पशु पक्षी वगैरे जनावरांची तर चाहूल सुध्दां येत नव्हती. सर्वदूर नैराश्याचे साम्राज्य पसरलेले होते.

एकंदर परिस्थितीवरून त्या ठिकाणी दुष्काळ पडलेला असावा असे वाटत होते. अशा त्या भकास कंटाळवाण्या व निरूत्साही प्रदेशांतून सद्गुरु इमामशहा हाजरबेगसह बैलगाडीने मार्ग आक्रमीत असतां संध्याकाळच्या सुमारास गीरमथा गांवात जाऊन पाहोचले.

गिरमथा गांवी आल्यावर त्यांनी गांवच्या बाहेर आपला पडाव केला. तेथे पाणी आटून कोरडे झालेल्या एका मोठ्या तळ्यांत त्यांनी आपला तंबु ठोकला. गुरुजींनी त्यास त्या गावच्या पाटलांकडे बैलाकरितां चारा मागण्यास पाठविले.

गुरुजींची आज्ञा होताच हाजरबेग मोठ्या उल्हसित अंत:करणाने उठून गीरमथा गांवच्या पाटलाकडे गेला व म्हणाला, 'आमचे गुरुजीजवळ दोन बैल आहेत. त्यांच्याकरितां आम्हास चारा पाहिजे आहे. त्याकरिता मला गुरुजींनी आपणाकडे पाठविले आहे, तर आपण चारा दिल्यास फार उत्तम होईल.'

हारजबेगचे म्हणणे ऐकतांच पाटील खिन्न झाले. ते म्हणाले, 'मला सांगावयास सुध्दां लाज वाटते. सात वर्षापासून या भागांत पावसाचा थेंबही पडला नाही. आपणास दिसतच आहे की चौफेर वातावरण किती भकास झालेले आहे. कोठेच गवत दिसत नाही, एवढेंच काय एखादें झाड झुडूप सुध्दां दृष्टिस पडत नाही. नद्या, विहीरी, तलावाचें पाणी सारे आटत चालले आहे. चारा नसल्यामुळें बैल गाय आदि पशु भुके मरत आहेत, चारा स्वप्नात सुध्दां दिसत नाही. चाऱ्याचे स्वप्न झालेले आहे. पाणीच नसल्यामुळे पीकेहि नाहीत व त्यामुळे लोकहि भुकेकंगाल झालेले आहेत. अवर्षण तर एखाद्या भुताचे रूप घेऊन या भागांत थैमान घालीत आहे. माझ्याजवळ माझ्या गुरांनाही पुरेसा चारा नाही. तर आपणास काय द्यावे हेच मला सुचत नाही. पावसाचा थोडासा जरी वर्षाव झाला असता तरी आपणास चारा देण्याचा माझा मानस होता. गुरु महाराजांचा हुकूम मला शिरसावंद्य आहे, चारा मिळूं शकत नाही असे त्यांना जाऊन सांगावे.' असे दु:खीत अंत:करणाने सांगून पाटलांनी हाजरबेगचे पाय धरले.

ही सत्य गोष्ट सांगावयास पाटलांची जीभ सुध्दां वळत नव्हती, ते म्हणाले, 'गुरुजीजवळ जाऊन आपण माझ्या वतीने सांगावे कीं, आज जर आपण वर्षाव करवाल तर तुमचा कार्यभाग होईल. त्यायोगे मी आपणास चारा अर्पण करेन. काया वाचा मने करून मी आपली सेवा करेन. हें मी आपणास अगदी सत्य सांगत आहे. यांत कोणत्याही प्रकारे खोटे सांगत नाही. आपण गुरुजीजवळ परत जाऊन ही सर्व हकीकत त्यांना समजावून सांगावी. पाऊस जर पडला तर आपणास चारा मिळेल.

तेव्हा हाजरबेग म्हणाला, 'परमात्मा आपली विनंती कबुल करील व आपणास आनंद होईल.'

नंतर तेथून हाजरबेग गुरुजीजवळ येवून त्यांच्या चरणावर त्याने आपले मस्तक ठेवले. व मोठ्या प्रेमाने समोर कांही एक न बोलता जाऊन बसला. तेव्हा अंतर्यामी सद्गुरु महाराज मनांत सर्वसमजून गेले. पण मुद्दामच त्यांनी त्यास विचारले. 'तू असा विचारमग्न कां झालेला आहेस? पाटलाकडून चारा वगैरे मिळाला किंवा नाही? तेथें काय झाले ते मला सांग.'

हाजरबेग म्हणाला, 'पाटलांनी मला विन्मूख पाठविले म्हणून मला वाईट वाटले असे नाही; परंतु या भागांत सात वर्षापासून पावसाचा एक थेंबही नाही. त्यामुळे वैरण चारा कोणाजवळच नाही. पाटील म्हणाले होते की या समयास जर गुरुजी पाऊस आणतील तर आपणास चारा मिळेल.'

तेव्हा सद्‌गुरु महाराज त्यास म्हणाले, 'मी तुला जी हकीकत सांगत आहे ती तूं पाटलास जाऊन सांग. आज मध्यरात्रीच्या सुमारास भयंकर जोराचा मुसळधार पाऊस पडणार आहे. तरी सर्वांना हुशारीने राहण्यास सांगावे भ्रांतीमध्ये राहू नये.'

हाजरबेग पाटलाजवळ परत जाऊन त्यांस सद्‌गुरुंनी सांगितलेली सर्व हकीकत कळविली व त्यांना चारा मागू लागला. तेव्हा पाटलांनी त्यास आपल्या सोबत येण्यास सांगितले. गांवाच्या अगदी शेजारीच असलेल्या एका मळ्यांत पाटलांनी एक छोटेसे परंतु उत्तम घर बांधले होते. रात्री ते तेथे झोपण्यांस जात असत. तेथेंच त्यांनी गुरे बांधण्याची व्यवस्था केलेली होती. त्यामुळे सर्व वैरण चारा त्यांनी तेथेच भरलेला होता. तेथून त्यांनी त्याला थोडासा चारा दिला.

चारा घेऊन हाजरबेग परतल्यावर पाटील दिलगीर होऊन त्यांचे चित्त बेचैन झाले. ते मनांत म्हणू लागले. 'आकाशांत तर ढग येण्याची कांहीहि चिन्हे दिसून येत नाहीत, तर पाऊस कोठून येणार?' असा विचार करीत असतांनाच दिड प्रहर रात्र निघून गेली. पाटलांची पाऊस येण्यांची आशा खुंटली. आता पाऊस कांही येणार नाही म्हणून निराश होऊन निश्वास टाकून पाटील झोपून राहिले झोपतांना ते मनात विचार करूं लागले की गुरुजींचा सेवक तर चारा घेऊन गेला. परंतु पावसाची चिन्हे तर दिसतच नाही. असा विचार करीत असतांनाच त्यांना झोप लागली.

परमेश्वर सर्व समर्थ आहे. तो काय करूं शकत नाही? सद्‌गुरुंनी जे सांगितले होते, अखेर तेंच व्हावयाचे होते. त्यांचे म्हणणे मिथ्या कधीच होणार नव्हते, पाटलांना धीर नव्हता. ते अगदी अधिर झालेले होते व त्यांचा सतगुरु वचनावर पूर्ण विश्वास नव्हता. ते समजत होते की असल्या अनेक प्रकारांनी आपणांस कितीतरी ढोंगी साधूंनी फसविले आहे! हा तशांतलाच प्रकार नसेल कशावरून? अशा प्रकारे ते विचार करू लागले; म्हणूनच पाटील मध्यरात्री पर्यंत सुध्दां जागू शकले नाहीत. त्याचप्रमाणे त्यांना पावसाची चिन्हे दिसेनांत म्हणून ते अंगणात झोपले होते. पाटलांना जरी सद्‌गुरुकडून पावसाचे समजले होते. तरी ते अंगणांत झोपले होते. त्याचप्रमाणे गांवातील इतर लोकही बाहेर अंगणांत झोपले होते.

मध्यरात्र झाली, इतक्यांत हवा पालटली. आकाशांत चहुकडे क्षणार्धात काळेकुट्ट ढग जमले आकाश मेघांनी अगदी दाटले. त्यामुळे जणु कांही आपआपसात ते जागा मिळविण्यांकरिता भांडतच असावे त्याप्रमाणे त्यांचा आवाज सुरु झाला. इतक्यांत अगदी लख्ख उजेड पडून एका क्षणांत एक वीज भयंकर कडकडाटासकट पाटलांच्या राहात्या घरावर कोसळली, आणि दुसऱ्यांच क्षणांत भयंकर जोराचा मुसळधार पाऊस सुरु झाला.

वीजेचा जोराचा कडकडाट लोकांच्या कानावर येताच सर्व लोक झोपेत असल्यामुळे भांबावून उठले आणि लगेच मुसळधार पावसास सुरवात झाल्यामुळे सर्वांची घाबरगुंडी उडाली. कोणासच शुध्द राहिली नाही. सर्व जण घाबरघाईने उठून आसरा मिळेल तेथे पळत सुटले. तोच जोरांचे वादळ सुरु झाले.

विजांचा लखलखाट व कडकडाट मुसळधार पाऊस व जोराचे वादळ हा सर्व प्रकार एकदम सुरु झालेला बघून सर्वांची अक्कल गुंग होऊन गेली. एका प्रहराभरांत सर्व दिशास नदी, मोठ मोठे नाले तुडूंब भरून वाहूं लागले. अवर्षणाने कोरडे झालेले तलाव पुन: पाण्याने भरून वाहू लागले. जिकडे तिकडे पाणीच पाणी पसरू लागल्यामुळे तो भाग एखाद्या सागराप्रमाणे जलमय दिसू लागला. चहुदिशेस आणि गांवात पाणी इतके पसरले की लोकांना खाली उभे राहाण्यास सुध्दां जागा राहिली नाही.

हळू हळू प्रभा खुलु लागली; तसतसा पावसाचा वेगही कमी कमी होऊ लागला; आणि सूर्य नारायण निघत असतानाच पाणी पडणे सर्वस्वी थांबले. आकाश निरभ्र झाले. मात्र अजूनही गावात पाणी वाहातच होते. सर्व लोकास पाऊस पडल्यामुळे आनंद झाला. सात वर्षापर्यंत पडलेल्या दुष्काळाचे दु:ख नाहिसे झाले. सात वर्षांनी आज पाण्याची धार डोळ्यांना पाहावयास मिळाली, सर्वांना लागलेली पाण्याची तहान शमन झाली. सर्वांना अत्यानंद होऊन सर्वांची हृदये प्रफुल्ल झाली.

पाटील मनांत समजून गेले की हा सर्व प्रताप त्या गुरु इमामशहांचाच आहे. हा कोणीतरी पूर्ण प्रतापी पुरुष असावा. त्यांनी सात वर्षापासून जात असलेली आपली लाज राखली म्हणून सर्व जण आता त्यांच्या भेटीकरिता जाऊ, असा ते प्रसन्न चित्ताने विचार करीत करीतच आपल्या राहात्या घराकडे येऊ लागले.

पाटील घरी येऊन बघतात तो घरांत एकच गर्दी व गोंधळ माजलेला त्यांच्या दृष्टीस पडला. ते विचार करूं लागले 'हा काय गोंधळ आहे!' ते जरा पुढे येताच त्यांना त्यांच्या पत्नीचा करूण विलापाने रडण्याचा आवाज ऐकू आला. ते ऐकताच

पाटलाच्या मनाची त्रेधा उडाली. त्यांच्या पोटात धस्स झाले. त्यांचे हृदय धडधडू लागले. समोरील दृश्य बघून ते पार थिजून गेले, कारण, घरांत जाताच त्यांना आपल्या एकुलत्या एक गुणवान मुलाचें प्रेत त्यांच्या दृष्टीस पडले.

ते दृश्य बघताच पाटील हुंदके देऊन रडू लागले. त्यामुळे जमलेल्या लोकांपैकी काहींना रडू कोसळले. अखेर काहींनीं सर्वांना रडण्याचे थांबविण्यास विनंती केली. सर्व जण पाटलांना समजाऊ लागले. 'अहो पाटील रडूं नका, शांत व्हा. आता रडून काय उपयोग? विधात्याकडून जें व्हायचे होते ते झाले. आपल्या मुलाचा व आपला ऋणानुबंध आता तुटलेला आहे. म्हणून तर तो आपणांस सोडून गेला आता शोक करू नका.' असें पुष्कळ प्रकारे सांगूनही पाटील ऐकेनात. अखेर त्यांना सर्वांनी आणखी एकदा विनवणी केली तेव्हा ते थांबले व विचारपूस करूं लागले कीं, 'हा कशाने मरण पावला? त्याचे सारे अंग तर काळसर झालेले आहे!'

त्यांची पत्नी म्हणाली, मध्यरात्री पाऊस येण्याचे थोडचाच वेळा आधी एकाक्षणातच वीज आपल्या घरावर पडून ती आपल्या मुलाच्या अंगावर कोसळली त्यामुळे हा आपला मुलगा वारला आहे.' हे सांगत असतांनाच त्या दोघांचेही हृदय भरून आले व दोघे कळवळचाने रडू लागले. बाहेर माणसे पुष्कळच जमलेले होते. पाटलास दुःख फार अनावर झाल्यामुळे बाहेर जमलेली सर्व मंडळी शोकाकुल झाली. त्यामुळे सर्वांस उदासीनता वाटू लागली व सर्वजण चिंतेत पडले. कोणासही कांही एक सुचत नव्हते.

थोडचा वेळाने एक इसम सर्वांना उद्देशून म्हणू लागला, 'हे माझ्या प्रीय बंधुंनो, तुम्ही व्यर्थ शोकसागरांत बुडून जाऊ नका, थोडा तरी धीर धरा. सारखा असा शोक करीत बसल्याने का कांही कार्य पार पडेल? नाहीच, हा शोक सोडून देऊन आपण आता पुढच्या तयारीस लागले पाहीजे.' असे सर्वांस सांगून तो पाटलांस म्हणाला, 'पाटीलबुवा, तुम्ही मुळीच दुःख मानू नका. मी तुम्हाला एक सुखाची व हिताची गोष्ट सांगतो, तुम्ही अव्हेर तर करणार नाही नां? जर अव्हेर करणार नाहींत तर मी तुम्हास एक उपाय सुचवितो. आज फार उत्तम तऱ्हेचा योग घडून आला आहे. कारण ज्यांनी पाऊस पाडण्याचा योग घडवून आणला असा तो महात्मा आपले हे दुःख निवारण करूं शकेन असें मला वाटते, तर आपण तसा प्रयत्न करू, तुम्ही शोक सोडून द्या. धीर धरा तो कोणीतरी अवतारी पुरुष असावा. त्यास आपण सर्वजण मिळून शरण जाऊया?'

असे त्या इसमाचे वरील म्हणणे ऐकून पाटलास थोडा धीर आला. त्यांच्या मनांतील चिंता दूर झाली. सर्वजण त्यांना भेटण्यास जाण्याचा विचार करूं लागले. परंतु अचानक ते सर्वजण अडचणीत पडले. त्यांना शंका आली की ते जेव्हा आले होते तेव्हा त्यांनी कोरडचा असलेल्या त्या भव्य तलावात आपला तंबू उभारला होता; पण रात्रीतर भयंकर पाऊस येऊन जिकडे तिकडे पाणी साचून वाहू लागले आहे. तलाव तर पाण्याने तुडूंब भरून वाहू लागला असेल. तेव्हा त्याची हल्ली काय स्थिती झाली असेल? बरे, रात्रीसुध्दां आपण त्यांचा तपास केला नाही? आता त्यांचे काय झाले असेल ते कोठे गेले असतील? कदाचित ते रात्रीच कोठेतरी निघून गेले असतील!' काय करावे अशी सर्वांना फार चिंता वाटू लागली. सर्वजण विचारमग्न होऊन चिंतीत अंत:करणाने त्यांचा शोध (तपास) करण्यास ते निघाले.

गांवाबाहेरील तलावाजवळ ते सर्वजण येऊन बघतात तों त्यांना एक अति आश्चर्यजनक दृश्य दिसले. सद्‌गुरु इमामशहांचा तंबु व त्यांची बैलगाडी पाण्याने काठोकाठ भरलेल्या तलावाच्या अगदी मध्यभागी त्यांना तरंगतांना दिसून आली. आणि गुरुजी व त्यांचे सोबत आलेला त्यांचा परमसेवक हाजरबेग हें तंबूत मोठ्या आनंदाने बसलेले दिसले. त्यामुळे लोकांना फार हर्ष झाला. पाटील आणि त्यांचे बरोबर आलेली सर्व मंडळी गुरुजींना भेटण्याकरितां तलावाच्या काठांवर येऊन उभी राहिली व त्यांची नक्की खात्री झाली की, हे कोणीतरी महात्मा अवतारी पुरूष असावे, तर त्यांना भेटण्याकरितां कोणत्या उपायाने त्यांचे जवळ जावे असा सर्व जण मनांत विचार करूं लागले. कारण गुरुजींचा तंबु तलावाच्या अगदी मध्यभागी होता व तो खोल तलाव पाण्याने भरलेला होता. गुरुजींची ते सर्व जण अनेक प्रकारांनी विनंती करूं लागले.

परमेश्वर प्राप्तीस ज्याप्रमाणे मायारूप भवसागर आड येत असतो त्या प्रमाणे सद्गुरूंची भेट होण्यास त्यांच्यावर ही महदापत्तीच येऊन ठेपली होती, सर्वांनी एकमिळून सद्गुरुंची विनंती केली, ते म्हणाले,

'हे परमकरूणामय, कृपानिधान गुरु माऊली, आम्हां सर्वांस आपणाजवळ यावयाचे आहे परंतु हा तलाव तर पाण्याने पूर्ण भरलेला आहे व तो पुष्कळ खोल असल्यामुळे कशारीतीने आपणाजवळ येता येईल? हे पतितपावन गुरु मायबाप आम्हांस दर्शन देऊन या पतितावर कृपादृष्टि करून पावन करा, गुरु महाराज, आम्हां रंकावर आलेला हा दु:खाचा डोंगर दूर करण्यास आपणाशिवाय कोण बरें समर्थ असू शकेन?'

अंतर्यामि गुरुजींनी त्यांचे शुध्द अंत:करण जाणले. त्यांच्या हाकेस उत्तर देण्यासाठी ते तात्काळ उठले व तंबूच्या बाहेर येऊन बघताच त्यांना आपल्या शिष्यांचा फार

कळवळा आला. उल्हसीत अंतःकरणाने त्यांनी तलावांतील पाण्यावर आपल्या अंगावरील उपरणे पसरले व पाटील आणि त्यांच्या बरोबर आलेल्या इतर मंडळींना त्यांनी तंबूत येण्यास सांगितले. हीच खऱ्या प्रेमाची व दृढनिश्चयांची कसोटी होती. या कसोटीत पाटील आणि त्यांच्या सोबत आलेली सर्व मंडळी अगदी पूर्णपणे उतरले, कारण त्यांनी आपल्या मनाचा दृढनिश्चय करून ते दृढश्रद्धेने पाण्यावर अंथरलेल्या रूमालावरून चालत जाऊं लागले. त्यांच्या चालण्यामुळें पाणी जोराने हलूं लागले. परंतु सर्वांच्या मनाचा अगदी दृढनिश्चय झालेला असल्यामुळें कोणासही त्रास न होता सर्वजण अगदी सुखरूप पणे गुरुजीपर्यंत जाऊन पोहोचले.

वेलजी पाटील तंबूत पोहोंचताच त्यांनी सद्गुरुंचे चरण घट्ट धरले व त्यांच्या नेत्रांतून घळघळा अश्रु वाहू लागले. त्यायोगे सद्गुरुंचे दोनहि चरण ओलेचिंब झाले. सद्गुरुंनी त्यास आपल्या दोनही हातांनी वर उचलले व त्यास रडत असलेले पाहून त्यास रडण्याचे कारण विचारले. तेव्हा पाटलांनी सद्गुरुस अथ पासून इतिपर्यंत झालेली सर्व दुःखद हकीकत सांगितली व म्हणाला, 'हे गुरुनाथ या रंकावर दया करावी पुष्कळांचे दुःख दूर करतांना आपणास कांही एक वेळ लागला नाही, थोड्यावेळाने पाऊस येईल असे वदताच त्यांप्रमाणे अगदी निश्चितवेळी पाऊस आला. सात वर्षापासून पाऊस नसल्यामुळे पडलेला दुष्काळ दूर करून लोकांना जीवदानच दिले. या प्रमाणे या दासाचे दुःख दूर करावे व या दासास जीवदान द्यावे. मी आपला अपराधी बालक असून आपण संत महात्मा माझे मायबापच आहांत. हे दयाळू दातार या कृपणावर कृपादृष्टि करून माझ्या मुलास जीवदान द्या.' अशाप्रकारे अत्यंत कळकळीची विनंती करून पाटील व त्यांच्या सोबत आलेली सर्वमंडळी गुरुजींना व हाजरबेग यास पाटलांच्या घरी घेऊन गेली.

गुरुजी तेथें जाऊन बघतात तो, वेलजी पाटलांचा श्वासोच्छवास बंद पडलेला मुलगा त्यांना दिसला. सद्गुरुंनी त्याच्याकडे थोडावेळ बघितले. तों आता अगदी काळसर झालेला होता.

वेलजी पाटील म्हणाले, 'गुरुनाथ! या मुलाशिवाय दुसरा मुलगा मला नाही. हेंच माझे तन, मन, धन आहे. करूणाघना आपण माझेवर कृपा करावी. हे संतशिरोमणी या बालकावर दया करावी. मला आपणाशिवाय दुसऱ्या कोणाचाही आश्रय नाही. या मुलास आपण शुध्दीवर आणावे. हे भवसिंधुतारका मजवर दया करून माझी विनंती मान्य करावी.'

त्यांची विनंती ऐकून गुरुजी त्यास म्हणाले, 'असा आकांत करू नका. रडून कांहीहि उपयोग होणार नाही. तुमचा व तुमच्या मुलाचा ऋणानुबंध तुटल्यामुळेच तो मरण पावलेला आहे. तुम्ही ज्याला 'माझा पुत्र' म्हणून म्हणत होते तो खरोखरच तुमचा नसून काळाचाच होता. म्हणून तोच त्यास घेऊन गेला केवळ पूर्व जन्मींच्या ऋणानुबंधनानेच तो जिवात्मा तुझ्या घरी पुत्ररूपाने जन्मला होता. तो तुझा पुत्र काळाच्या भक्षस्थानी पडला या वरून तो तुझा नसून काळाचाच होता, तद्वतच मी, तुम्ही, हे सर्व लोक, अखिलविश्व हे सुध्दा त्या काळाचेच भक्ष्य आहे; म्हणून 'मी, माझे' असे ममत्व बाळगण्यांत काय हंशील? तुझ्या मनाने मानलेल्या तुझ्या मुलाचा ऋणानुबंधरूप संकेत नाहीसा झाल्यामुळे तो ज्यांचा होता तो काळ त्यावर झडप घालून घेऊन गेला आता व्यर्थ शोक करण्यांत काय उपयोग? या काळापासून जर आपला बचाव करावयाचा असेल तर त्याचाहि काळ जो आद्यपुरुष नारायण परब्रह्म परमेश्वर त्यालाच आपण शरण गेलें पाहिजे. अन्य उपाधी सर्व सोडून देऊन केवळ या जगन्नीयंत्या परमात्म्याच्याच पवित्र चरण कमलांचा आश्रय करावयास हवे आहे. तेच आपले कर्तव्य कर्म होय. ते सोडून आपण व्यर्थ शोक सागरांत कां बरे बुडून जात आहांत?'

सद्‌गुरुंनी अशाप्रकारे पुष्कळ रीतीनें पाटलाची समजूत घातली. परंतु त्याचा कांही एक उपयोग झाला नाही, तेव्हा परत ते त्यांना उपदेश करू लागले ते म्हणाले,

बाबारे! प्रत्येक जीव कित्येक जन्माच्या ऋणानुबंधनाच्या योगाने या जगांत लहानमोठ्यांच्या घरी जन्मास येतो व देणे घेणे देऊन टाकून एका खाड्यातून निघून दुसऱ्या खाड्यांत पडत असतो. ऋणानुबंधनापासून कोणीही मुक्त नाही. ज्या द्वारानें ऋणानुबंध बांधला गेला असेल त्या द्वाराने तो द्यावा घ्यावा लागतो. ह्या जगताची रचना ऋणानुबंधानेच झालेली आहे, ह्यास प्रारब्ध म्हणा - कर्म म्हणा, देव घेव म्हणा, पण तो हाच आहे की, जो एकमेकास संबंधाच्या योगाने सोडलेला ठेवतो. कर्माच्या ऋणानुबंधनाच्या योगानेच स्त्री, पुत्र, सहोदर, पैसा, टक्का रिध्दीसिध्दी सर्व सोयरे येऊन मिळतात. हा ऋणानुबंध पूर्ण जाला कीं, कोणाची स्त्री व कोणाचा पति आणि कोणाचा पुत्र व कोणाचा पैसा! सर्व आपापल्या मार्गास लागतात, केलेली कर्मे तर भोगल्याशिवाय सुटकाच नाही. ही कर्मे पूर्ण झाली नाहीत तो पर्यंत जीव मात्राची हीच गती होय. ज्याच्या पुण्याचा लेश कमी तो एका खाड्यांतून निघून दुसऱ्या खाड्यांत तत्काळ पडत असतो, हीच यमयातना होय. दोनशे ऐंशी दिवस अंध:कारगारांत जेथे वाऱ्याचाहि संचार नाही, प्रकाशास प्रवेश करण्यास जागा

नाही अशा घोर अंध:कारमय कारागृहांत पडावे लागते. तेथे नरकागारांत वेष्टित होऊन खाली डोके लटकत ठेऊन अपरिमित यातना भोगीत असतो. त्याठिकाणी परमेश्वराची अनेकविध स्तुति करून, वचन देऊन यातनेंतून मुक्त होण्याकरीता परमेश्वराजवळ याचना करतो तेव्हा परमेश्वरी कृपेने तेथून त्याची सुटका होते. घटका दोन घटका अथवा दिवस दोन दिवस या संसाराचा वारा खातो. त्यांत तर तो जीव परमेश्वरास पूर्णत: विसरूनच जातो. अशा प्रकारे परमेश्वरांस व त्यास दिलेल्या वचनास विसरला की पुन: तो जीव त्यापेक्षा विशेष कष्टदायक अंध:कारागारांत पुरला जातो.'

'जो जीव परमात्म्यास शोधण्याचे परिश्रम करीत नाही, परमात्म्याच्या मायेस ओळखून तिचा त्याग करण्याचा प्रयत्न करीत नाही, राजसी तामसी मायेत बध्द होऊन राहातो; आवरण शक्तीने घेरलेला राहतो व विक्षेप शक्तीच्या भोगाने वासनांचा त्याग करूं शकत नाही, त्या अज्ञानी पामर जीवांची हीच गति होय. जगताचा स्नेह हा खरा स्नेह नसून मिथ्या, नाशवंत, विकारी, स्वार्थपरायणतामय होय. तो एकमेकांच्या स्वार्थासाठीच आहे. हा संसार महादु:खदायक आहे. ह्यांतील आशा तृषा-भोगवासना ह्यांचा त्याग करून ज्ञान प्राप्त करा. त्यायोगेच ह्या संसारातून तरून जाता येईल. अन्य उपायाने तरून जाता येणार नाही. जो पर्यंत हा मनुष्य देह आहे तो पर्यंत तुम्ही हे ज्ञान प्राप्त करून घ्या. ही संधी निघून गेल्यावर परत कधीच येणार नाही. मिळालेली संधी निघून गेल्यावर मागाहून पश्चात्ताप करण्यांत काय अर्थ? शास्त्रांत सांगितलेले आहे कीं,

"अनित्यानि शरीराणि विभवो नैव शाश्वत:।
नित्यं सन्निहितो मृत्यु: कर्तव्यो धर्मसंग्रह:॥"

'बाबारे' शरीरे ही नाशवंत आहेत. त्याच प्रमाणे वैभवे ही शाश्वत नाहीत आणि मृत्यु नित्य जवळ राहिलेला आहे, तर धर्मसंग्रह करीत राहावे, हें जन्म घेण्याचे कर्तव्य होय. हें शरीर अनित्य आहे व आयुष्याचा भरवसा नाही. ज्या प्रमाणे आकाशांत वीज चमकून क्षणात नाहिशी होऊन जाते, समुद्रांत क्षणात बुडबुडे उत्पन्न होऊन, दृश्यमान होऊन क्षणांतच नाहिसे होतात, तसेंच आयुष्याचे आहे, जगांत कोणीहि चिरंजीव नाही व स्थिरही नाही. तेवढ्यासाठी प्राप्त झालेल्या क्षणांत पुरुषाने आत्मकल्याण करून घ्यावे. ज्यांनी आत्म्याचा धर्म, नित्यधर्म समजून परमात्म्यास ओळखले आहे तेच जन्म व मृत्युच्या फेऱ्यांतून बाहेर निघून जातात, बाकी तर मातींतून निर्माण होतात. मातीत मोह पावून मातीतच पडून मातीतून पुनर्जन्म धारण करून पुन: मातीत समाविष्ट होऊन जातात. या जगन्नगरांतील जीव आपल्या कामना पूर्ण करण्याकरितां

दररोज नव्या नव्या उपाधींत मायेत आनन्दपूर्ण अंत:करणाने गुरफटत असतात आणि शेवटी लक्षचौर्यायशींच्या रहाट गाडग्यांत पडून जन्ममरणाच्या फेऱ्यांत भटकत राहतात. मनुष्य अल्पायुषी असल्यामुळें थोडचा काळांत मरण पावतो. ज्याप्रमाणे वृक्षांवर पडलेले पावसाचे पाणी क्षणभर स्थिर राहूं शकत नाही, थोडचा क्षणांतच ते जमिनीवर कोसळून पडते; सुकून जाते व होते नव्हते असे होऊन जाते तशीच ह्या शरीराचीही गति आहे. जीव जन्म पावतो, बाल्यावस्था भोगतो, यौवनाचा अनुभव घेतो. वृध्द होतो व मरण पावतो; हाच ह्या देहाचा नित्याचा धर्म होय. ह्यांतून तरून जाण्यासाठी अनित्य पदार्थांचा त्याग व नित्य पदार्थांवर अनुरक्तता होणें हें निरंतरचे कर्तव्य होय!

'एकदा निघून गेलेला वेळ पुन्हा परत कधीच येऊं शकत नाही. हा मनुष्य देह नित्य प्राप्त होत नाही तो तर पुष्कळ काळाच्या पुण्याच्या संचयाचा परिणाम होय. अनेक जन्मांतील शुभ वासनांचे फळ आहे, जन्मजन्मांतरांच्या भावनांचा प्रताप आहे. त्यांत परम पुरुषाशी दृढ स्नेह करणे व त्याच्या प्रेमांत लीन होणे हेंच सकल तत्वांचे तत्व, साराचे सार व धर्माचा धर्म आहे, पिता, माता, पुत्र, धन, सुख ही तर चार घटकांची चटक आहेत; त्यांत मोह कसला? तुझा मोह सोड. सर्व कर्ता हर्ता सर्वस्वी जगज्जीवन तरण तारण करणारा तारक असा परमपावन कृपानिधि तो परमेश्वरच आहे. त्याचीच तूं खऱ्या प्रेमाने व भावाने सेवा कर व त्याने जर मनावर घेतले तर तुझा कार्यभाग आपोआप घडून येईल. परमेश्वराचे नामस्मरण कर. जी गोष्ट घडून यावयाची तीच घडून येते. मेलेला कसा बरें जीवंत होईल याचा तूंच विचार कर. हट्ट करून काय उपयोग? ज्याने त्यास उत्पन्न केले त्यानेच त्यास मारले आणि तोच त्यास जीवंत करूं शकेल. ह्या इतर उपाधी तूं कां करतोस? हे सर्व त्याचेच सेवक आहेत; त्याच प्रमाणे मीहि त्यांचा सेवक आहे. सर्वकर्ते पण त्या प्रभूचेंच आहे.'

पाटलांनी गुरुजींचे पाय धरून सांगितले, 'मी तुमच्या चरणी शरण येऊन पडलों आहे. आता मी कोठेच जाणार नाही. सातवर्षापासून पाऊस नव्हता तो आपण मनावर घेतांच एका प्रहरामध्ये वर्षाव केला त्याच प्रमाणे आम्हां सर्वास पाण्यावर रूमाल टाकून त्यावरून तरंगत आपणापर्यंत आणले, हे सर्व आम्ही प्रत्यक्ष पाहिले. यांत विशेष असे की गाडी व बैल सुध्दां पाण्यावर तरंगविले व स्वत:चा बिछाना पाण्यावर करून तोही कोरडा राहिला पूर्णपणे तुमची प्रचीती आल्यावर कसें बरें आम्ही सोडून जांऊ? तुमचाच केवळ आम्हास आधारआहे. तरी या गरीबावर दया करा. गुरू महाराज असा अव्हेर करूं नका! कसेही झाले तरी मी आपला दास अपराधी बालकच ना! मला या महदसंकटातून सोडवा!

सद्‌गुरु इमामशहांनी ही त्याची अत्यंत करूणाजनक, अनन्य भावाने केलेली विनंती ऐकून पाटलास जवळ बोलावून बसविले व सांगितलें की, 'तू कांहीएक दुःखाची भावना धरूं नकोस. आपण सर्वजण मिळून त्या दयाघन प्रभुंची आराधना करू. त्याच्या मनांत जर दया उत्पन्न झाली व त्याचे प्रारब्ध कर्म भोगावयाचे अजून शिल्लक असेल तर तो करूणानिधी आपणावर कृपा करेन.' असे सांगून त्या शवावर सर्वासमक्ष चादर टाकली व ते सर्व जण मिळून परमेश्वराची विनंती करूं लागले. जस जशी सर्व जण करूणाकराची करूणा भाकूं लागले तस तसा त्यांना एक चमत्कार दिसूं लागला. त्या वेलजी पाटलांच्या मृत मुलाचा हळू हळू श्वासोच्छवास चालूं होऊन तो हालचाल करूं लागला. थोड्या वेळाने तर हाजरबेगने त्यास त्याचे दोनही हात धरून उठवून बसविले. तो मुलगा आळस देऊन एकदम भांबावून उठल्याप्रमाणे करूं लागला. नंतर सद्‌गुरु इमामशहांना नमस्कार करून त्यांचें त्यांने चरणामृतपान केले. ही सारी घटना बघून, आपला वीजेने मरून पडलेला एकुलता एक मुलगा जीवंत झालेला बघून व जीवंत होताक्षणीच सद्‌गुरुंचे चरणामृतपान करीत असलेल्या आपल्या मुलास बघून वेलजी पाटलांची काय स्थिती झाली असेल हे सुज्ञ वाचकहो माझी लेखणी ते लिहिण्यास समर्थ नाही. तें आपणच जाणून घ्या.

★ ★ ★

## ७. मायवी सिंहाचे गुप्तरहस्यकथन कुंवारिका क्षेत्राचे प्रगटीकरण व पीराण्यास धर्मपीठाची स्थापना.

वेलजी पाटलांचा एकुलता एक सुगुणी पुत्र जिवंत झालेला पाहून सर्वांना अत्यानंद झाला. गुरुजींनी सर्वांना ब्रह्मानंदाचा व आत्मोन्नतीचा उपदेश केला. तो उपदेश ऐकून ती सर्व मंडळी गुरुजींचे गुण गाऊ लागली. त्यांनी त्यांचा अनुग्रह घेतला. पाटील त्यांचे चरणी शीर नमवून म्हणाले, 'आपले कांही कामकाज असल्यास आज्ञा करावी. आपणास याठिकाणी सुंदर मंदीर अथवा भव्य महाल वगैरे कांही बांधावयाचे असेल तर तशी या दासास आज्ञा द्यावी. हा दास नेहमी हात जोडून उभा आहे माझी विनंती ऐकावी. याठिकाणी आपण रहिवास करावा ?'

वेलजी पाटलांच्या विनंतीस मान देऊन सद्‌गुरु म्हणाले, 'तुझ्या सदिच्छेस मान देऊन मी येथे एक सुंदरसें मंदिर बांधण्याचे ठरविले आहे. त्याकरितां मला जागा हवी आहे. याशिवाय मला दुसरें तिसरे कांहीही नको.'

पाटील म्हणाले, 'तुम्हास वाटेल त्या बाजूस वाटेल तेवढी जागा घेण्यास तुम्हास आडकाठी नाही. कारण तुमची इच्छा असेल तेवढी जागा देण्यास मी तयार आहे.' असे सांगून त्याने सद्‌गुरुंना किती जागा पाहिजे म्हणून विचारले.

सद्‌गुरुंनी पाटलास सांगितले की, 'मी माझ्या हाताने ज्या बाजूकडे तीर सोडेल त्या बाजूस तो तीर जेथे पडेल तेथील जागा मला मंदिर बांधण्याकरिता हवी आहे. बाकी काहीही नको.'

सद्‌गुरुंचे म्हणणे ऐकताच पाटलांनी धनुष्यबाण आणून सद्‌गुरुसमोर धरला. सद्‌गुरुंनी तो धनुष्यबाण घेऊन सर्व मंडळी समवेत ते आपल्या तंबू ठोकलेल्या तळाजवळ आले. नंतर सद्‌गुरुंनी कमान हाती घेऊन त्यावर तीर चढविला व पश्चिमेकडे तोंड करून पूर्वेस पाठ वळवली.

इतक्यात पाटील एकदम पुढे सरसावले व त्यांनी सद्‌गुरुंना तीर न सोडण्याविषयी विनविले. पाटील म्हणाले, 'महाराज, या दासाची थोडी विनंती ऐकावी. या दिशेकडे आपण तीर फेकूं नका. कारण तो जंगल भयंकर दाट झाडीने भरलेला असून त्यांतील झाडी सुध्दां अत्यंत जुनी आहे. त्या झाडीत फार पूर्वीपासून एक भयंकर अक्राळ विक्राळ सिंह राहात असल्यामुळे याबाजूस कांही काम करण्यास कोणाचीही हिंमत होत नाही. त्याला मारण्याकरिता मोठ मोठे पराक्रमी राजे लोक थकून गेले. त्यांची सुध्दां हिंमत खचून जात आहे. या भागांत लपून छपून लाकुड आणण्याकरितां कोणी जात असे परंतु त्यांना तो वनराज नजरेस पडत असल्यामुळे कोणाचीही हिंमत चालत नसें. आजपर्यंत या आजुबाजूच्या भागात त्या सिंहास पकडणारा अगर मारणारा असा कोणीहि शिकारी मिळाला नाही म्हणून आपण माझी विनंती मानावी. दुसऱ्या दिशेस तीर फेकावा. त्या सिंहाच्या गर्जनेने मोठ मोठ्या लढवय्यांची घाबरगुंडी उडून जाते. फार वर्षापासून त्याने हें ठिकाण रोखून धरले आहे. त्यांतले त्यांत आश्चर्य असे की त्यास मरण सुध्दां आले नाही. तो अतिशय वृध्द असून देखिल पकडला किंवा मारला जात नाही. मोठमोठ्या शिकाऱ्यास योध्दच्यांस सुध्दा माघार घेऊन जावे लागले.'

सद्‌गुरु इमामशहा पाटलास म्हणाले, 'अशी जर परिस्थिती असेल तर मग खास हेंच माझें ठिकाण. अगदी याच ठिकाणी माझी जागा आहे. या तलावाजवळून मी तीर मारेन तो ज्या ठिकाणी पडेल ते ठिकाण आपण बघण्यास जाऊं माझा तीर पडल्यावर तो वनराज त्या वनांत न राहाता तेथे गुप्त होऊन जाईल. त्या बद्दल चिंता करण्याचें कांही एक कारण नाही. बनराज वचनात अडकल्यामुळे कुणीही या वनात येऊ नये व जागा घेऊ नये म्हणून तो राखण करीत आहे.'

येवढी हकीकत सांगून सद्‌गुरुंनी बाण सोडला नंतर त्यांनी आपल्या सोबत आलेल्या सर्व मंडळीस चालण्यास सांगितले. तेव्हा सर्व जण त्यांना विनवून म्हणाले

कीं, 'हे अकळकळानिधी या वनांत तो सिंह काय कारणाकरिता राखण करीत आहे त्याची हकीकत आपण आम्हांस सांगावी तेव्हा सद्गुरु इमामशहा महाराज त्या वनराजाची हकीकत त्यांना सांगू लागले, --

फार वर्षापूर्वी म्हणजे ज्यावेळी पांडव आणि कौरव द्यूत खेळले होते त्यावेळी पांडव द्युतांत हरल्यामुळे त्यांना वनवास पत्करावा लागला होता. वनवासांत असतांना भटकत भटकत पांडव द्रौपदीसह या घोर वनांत आले. या वनात राहात असतांना त्यांनी कृष्णास कोणाकडूनही उपद्रव न होईल अशी योजना करण्याकरितां विनंती केली. तेव्हा श्रीकृष्णांनी त्यांची विनंती कानी धरून त्यांनी ध्यान धरून योगमायेच्या साहाय्याने एक वनराज सिंह निर्माण केला. त्यांनी त्यांच्या कानांत सांगितले की, 'माझ्या आज्ञेप्रमाणे तू या ठिकाणी पांडवांचे सर्वतोपरी रक्षण कर कांही काळानंतर ते या ठिकाणाहूनच विराट नगरीस जातील. तो पर्यंत तूं त्यांचे रक्षण कर व त्यानंतरही तू येथेंच राहून येथील जागेचे म्हणजे 'कुवारिकाक्षेत्राचे' रक्षण कर, कारण दहाव्या अवतारी श्री विष्णूभगवान 'निकलंकी नारायण' नांवाने जेव्हा अवतार घेतील त्याच्या आधी लोकांना त्यांच्या ज्ञानाचा मार्ग दर्शविण्याकरिता सद्गुरु ब्रह्मा अवतरतील व ते गिरमथा भागात येतील, तेथून ते तीर फेकून तुझा उजवा कान छेदतील आणि तो तीर जमिनीत जाईल तेव्हा तुझी सुटका होईल तीर पडलेल्या ठिकाणास कुवारिकाक्षेत्र असें नाव राहील या कुवारीका क्षेत्रावर सद्गुरु ब्रह्मा आपले मुख्य ठिकाण बांधतील. तेव्हा ज्यांच्या हातून तुझा उजवा कान छेदला जाईल तोच सद्गुरुब्रह्माचा अवतार समजावा. त्या शिवाय दुसऱ्या कोणाच्याहि हातून कोणत्याही प्रकारे तुला तीर, तलवार, भाला अथवा कोणतेहि शस्त्र बाधा करू शकणार नाही त्यापासून तूं अवध राहशील, कारण तू जरी त्यांचा घात करणार नाहीस तरी पण ते तुझ्या उग्रस्वरूपास बघताच घाबरतील.'

अशाप्रकारे त्या सिंहास सांगून श्रीकृष्णपरमात्मा पांडवांची रजा घेऊन तेथून निघून गेले. श्रीकृष्णाचा उपदेश व आपणावर सोपविलेली कामगिरी बरोबर लक्षात घेऊन तो वनराज त्या प्रमाणे वागू लागला. थोड्या कालावधीनंतर पांडवांचा वनवास संपला, आतां त्याना एक वर्ष अज्ञातवासांत काढावयाचे असल्यामुळे ते त्या सिंहाचा निरोप घेऊन त्यास वंदन करून तेथून विराट नगरीच्या राजाकडे निघून गेले. इकडे त्या सिंहास पांडव निघून गेल्यामुळे फार वाईट वाटले. परंतु आपल्या शिरावर आलेली जबाबदारी पार पाडण्याकरिता त्यास तेथेच राहावे लागले. तेव्हा पासून तो त्या जागेचे रक्षण करूं लागला. तोच अक्राळविक्राळ सिंह होय.' ही एवढी हकिकत सांगूनहोताच सद्गुरु व त्यांच्या सोबत आलेली पाटलासह सर्व मंडळी हळू हळू त्या बाजूस जाऊ लागली.

इकडे सद्गुरुंनी जेव्हा बाण सोडला तेव्हा तो सिंह डाव्या कुशीवर झोपलेला असल्यामुळे त्याचा उजवा कान वर होता. सद्गुरुंनी सोडलेला बाण सूं सूं करीत आला आणि एकदम त्या सिंहाचा वरील (उजवा) कान छेदून थोड्याच अंतरावर जमिनीत शिरला. सिंहास इजा झाल्यामुळे तो एकदम चवताळून उभा राहिला. परंतु त्याचा उजवा कान छेदला गेल्यामुळे त्यास श्रीकृष्णांनी सांगितलेल्या वचनाचे एकदम स्मरण झाले व तो समजून गेला की सद्गुरु ब्रह्मा प्रगट झाले आहेत. तो सिंह नीट सावध होऊन उभा राहीला व आजूबाजूला बघू लागला, त्याला आजुबाजूस कोणीही दिसेना तेव्हा तो अधीर झाला व केव्हा सद्गुरु आपणाजवळ येतील व आपणास पावन करतील, अशी त्यास सारखी आतुरता वाटूं लागली. तो मनांत अगदी प्रफुल्लीत झाला व म्हणाला, 'धन्य धन्य आजचा दिवस व धन्य आजची घडी कीं मला आज प्रत्यक्ष सद्गुरु ब्रह्माचे दर्शन होऊन माझा पूर्ण भाग्योदय होईल!!! म्हणून तो गुरुजींच्या दर्शनाकरिता वाट रोखून उभा राहिला.

गुरुजींनी फेकलेला तीर कोठे पडला ते पाहण्याकरितां ते सर्व जणांच्या पुढे जाऊं लागले. तेव्हा तेथे आलेल्या लोकांचा सर्व संघ सद्गुरु नामाचा जयघोष करीत करीत त्यांच्या पाठोपाठ चालू लागला. तोंच त्या सर्वांना वाट रोखून उभा असलेला सिंह दिसला. त्यावेळचे त्यांचे अप्रतिम दिव्य स्वरूप अवर्णनीय होते. सद्गुरु जवळ येत आहेसे बघून सिंह नमून उभा राहिला.

गुरुजी त्या सिंहाजवळ जाऊन त्याचें पाठीवरून ते अति प्रेमाने हात फिरवू लागले. सद्गुरुंचा हात त्याच्या पाठीवरून फिरताच वात्सल्य प्रेमाने दाटलेले अश्रुबिंदू वनराजाच्या डोळ्यांतून घळघळा वाहू लागले. सिंह सद्गुरु चरणी पडून उठून उभा राहिला तेव्हां सद्गुरु महाराजांनी त्याच्यावर कृपादृष्टि करून परमपदास-नीजधामास जाण्याची मोकळिक दिली. त्यावेळी सर्व संघाने त्या वनराजास वंदन केले. सर्वजण त्याच्याकडे करूणार्द्र दृष्टिने बघत होते.

त्यानंतर सद्गुरुस परत नमन करून व सर्व संघास प्रेम भावाने निरखून जणूं कांही उत्कट प्रेम भावनेने सर्वांचा निरोप घेत असावा असा तो वनराज सिंह तेथल्या तेथेंच एका क्षणांत गुप्त होऊन गेला. तो अपार प्रेममय प्रभूच्या दिव्य प्रेमधामांत पूर्ण विलीन होऊन गेला. क्षणांत त्याठिकाणी एक दिव्य तेजोमय वलंय झळकून दुसऱ्याच क्षणांत त्याचासुध्दा लय झाला.

गुरुजी बरोबर आलेली सर्व मंडळी आश्चर्यानें गुंग होऊन गेली. सर्व जण सद्गुरु इमामशहांचा प्रत्यक्ष ब्रह्माच्या प्रगट अवताराचा मोठ्या प्रेमाने जयघोष करूं

करूं लागले. नंतर गुरुजी व ते इतर सर्वजण तीर जेथे पडलेला होता तेथे गेले. वेलजी पाटलांनी त्या बाण पडलेल्या ठिकाणाच्या आजुबाजूस असलेली सर्व झाडी तोडून टाकण्याचा सर्वांना हुकूम दिला. तेव्हा सर्वांना मोठ्या प्रेमाने त्यांचा शब्द मानून तेवढ्या जागेतील सर्व झाडी तोडून टाकली व सर्व जमिन साफ केली. नंतर सद्गुरुंनी त्या ठिकाणी मंदिर ( रोझा ) बांधण्यास सुरवात केली.

★ ★ ★

## ८. सुलतान महेमूद बेगडयाकडून सद्गुरुंची झालेली छळवणूक व सद्गुरुंची उदार बुध्दि.

'खंडी वनातील म्हणजे खांडव नावाच्या वनांतील भयंकर विक्राळ सिंह इमामशहाचे दर्शन होऊन अत्यंत मवाळ बनून त्या अरण्यांतून नाहीसा झाला. व शिवाय 'सात वर्षापासून अवर्षणाने रखरखलेला टापू त्यांनी एका प्रहराभरात जलमय करून टाकला.' ही हकीकत हळूहळू सर्वदूर पसरू लागली. हळूहळू ही वार्ता अहमदाबाद शहरापर्यंत येऊन पोहोचली. त्यावेळेस म्हणजे सुमारे इ. स. १४६६ च्या आसपास अहमदाबाद शहराचा राज्य कारभार 'महंमद बेगडा' नांवाचा सुलतान चालवीत होता. त्याच्या कानावर प्रधानाकरवी ती वार्ता पडली.

महंमद बेगडा विचार करूं लागला, 'आजपर्यंत कितीतरी शिकारी तेथून निघून आले. आपले शूर योध्देही परत आले. एवढेच नाही तर आपण सुध्दा त्या सिंहाची शिकार करण्याकरिता गेलों होतो. परंतु आपल्यासुध्दां हाती तो आला नाही, पण एखाद्या नि:शस्त्र असलेल्या संतास शरण जाऊन त्याला तो नमला व तेथून नाहीसा झाला. हे असें कसें बरें होऊं शकेल? शिवाय सात वर्षापासून अवर्षणाने दुष्काळ पडलेल्या भागांत स्वत: जाऊन 'आज पाऊस येईल' असे सांगितले व त्याप्रमाणे खरोखरच भरपूर पाऊस पाडून ज्याने दुष्काळाचे निवारण केले असा तो अद्वितीय साधुपुरुष कोण बरे असावा? सत्य परिस्थिती काय असेल ती आपण प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय समजणार नाही.' असा विचार करून सुलतानाने आपल्या प्रधानास बोलाविले व वरील गोष्ट त्यास सांगितली. प्रधानाससुध्दा तसेच वाटत होते. म्हणून थोड्या निवडक नोकराचाकरा समवेत प्रधान व राजा गीरमथा गांवास आले. तेथून इमामशहांच्या मुक्कामाच्या आसपास येऊन त्यांनी मुक्काम ठोकला.

नंतर सुलतान महंमद बेगड्याने इमामशहास एका जासुदाकरवी बादशहाचा नमस्कार सांगून त्यांना जेवणाचें आमंत्रण दिले. इमामशहांनी ते स्वीकार करून त्याच जासुदाकरवी

बादशहास प्रति नमस्कार सांगितला. सद्गुरु इमामशहांनी बादशहाचे हृदय अंतर्ज्ञानाने जाणले. ते समजून गेले की केवळ आपली परीक्षा पाहण्याकरिताच राजाने आपणांस भोजनाचे आमंत्रण दिलेलें आहे. असो.

इकडे सुलतानने आपल्या खास नोकरास एक मांजर मारून त्या मांसाची पाकनिष्पत्ति (स्वयंपाक) करण्यास सांगितले. अशा प्रकारे कपट जाल करून सुलतानने इमामशहांना बोलाविण्याकरिता जासुदास पाठविले. गुरुजी जासुदाबरोबर सुलतानाच्या मुक्कामाच्या ठिकाणी गेले त्यावेळी बादशहाने मोठ्या आदरभावाने उत्तम आसन करून गुरुजीस आपल्याजवळ बसविले. बादशहाने नोकरास जेवणाचे ताट भरून आणण्यास सांगितले. त्याप्रमाणे एका नोकराने जेवणाचे ताट आणून सद्गुरुपुढे ठेवले तेव्हा बादशहा म्हणाला, 'आपणाकरिता मी सुंदर स्वयंपाक करविला आहे. कोणत्याहिप्रकारे संकोच करण्याचे कारण नाही या दासावर कृपा करावी.' असें अति नम्रतेने विनवून त्यांना जेवण करण्यास सांगितले.

सद्गुरुंनी परमेश्वराचे नामस्मरण करून ताटावरून हात फिरविला व म्हणाले, 'हे बिल्ली तूं मुळीच भिऊ नकोस. तूं दुःखी होऊ नकोस येथून उठून तूं खुशाल दुसरीकडे कोठेहि निघून जा.' असे शब्द इमामशहाचे मुखांतून निघताच ते मांजर जिवंत झाले व त्याने ताटामधून एकदम बाहेर उडी घेतली व जोराने पळत जाऊन बाहेर निघून गेले. या गोष्टीस थोडासुध्दां विलंब लागला नाही.

मांजर जिवंत झालेले बघून सर्वांना अति आश्चर्य वाटले. परंतु बादशहाच्या मनाचा चडफडाट झाला. आपला कपटजाल उघडकीस आलेला बघून त्याला फार राग आला. तो अत्यंत क्रोधाविष्ट झाला. परंतु तो क्रोध दाबून त्याने पुन्हा गुरुजींची कळा पाहण्याकरिता निरनिराळ्या प्रकारचे मांस तबकात नोकराकरवी भरून आणले आणि त्या तबकावर रुमाल टाकून ते तबक त्यांनी सद्गुरुपुढे ठेविले. सद्गुरुंनी रुमाल उचलला, तो काय आश्चर्य! तबकांत तर पान, सुपारी, काथ वगैरे पदार्थ दिसूं लागले. सर्व जण ते पदार्थ बघून आश्चर्यचकित झाले. इमामशहांनी सुलतानाच्या सर्व नोकरचाकरास जवळ बोलाविले व राजासह त्यांना पान सुपारी दिली.

सुलतान महंमद बेगडा मनात फारच फार शरमला. आपण केलेले दोनहि प्रयत्न फसले म्हणून त्याचा क्रोध भयंकर प्रदीप्त झाला. एखाद्या वैऱ्यावर ज्याप्रमाणे सूड काढावा त्याप्रमाणे गुरुजीवर क्रोध करून त्यांचा छळ करण्याकरिता दुधांत विष कालवून पिण्याकरीता सर्वासमक्ष दिले. ते गुरुजींनी मोठ्या आनंदाने सर्वासमक्ष पिऊन पचविले.

जे ब्रह्मस्वरूपी लीन झालेले असतात त्यांना कोणत्याहि पदार्थांची कोणत्याहि प्रकारे बाधा होऊ शकत नाही कारण ते विष-अमृत, सुख-दुख, मित्र-स्वजन-अन्यजन

तीर्थ-चांडाळाचे घर वगैरे सर्व एकच समजतात. तसेंच ते कोणतीही स्थिती समान-एकरूप समजतात. त्यांच्या मनांत त्या विषयी द्वैतविकार मुळीच नसतो. ते सर्वस्वी अद्वैतच असतात. ज्ञानसाहित्यांत सद्‌गुरुंनी एके ठिकाणी म्हटलेले आहे की,

"अच्छी अच्छी करणी कमाओ मोरा भाई। अगनी तमने ना बाले॥
पवन ना डोले पाणी ना बुडे। राजाभी दंड ना किजीये॥"

सत्करणीच्या योगाने अग्नि मनुष्यास जाळू शकत नाही. वारा हलवू शकत नाही. पाणी बुडवू शकत नाही. राजासुध्दां दंड करवू शकत नाही. येवढेच काय परंतु जे ब्रह्मस्वरूपांत तद्रूप झालेले असतात त्यांना पंचमहाभुतें देखील कोणत्याही प्रकारे बाधा करूं शकत नाही. अशा सिध्द पुरुषाचे सर्व भेदभाव गळून त्यांच्या हृदयांत एकात्मकतेचे प्रेम नांदत असते. षड्‌विकारांचा कोश फाडून त्यांचा पवित्र आत्मा परमानंदात पूर्ण विलीन झालेला असतो. चैतन्य स्पर्शमण्यांशी एकरूप झालेला असतो. त्यामुळे संपूर्ण जगतांतील 'चित्' अथवा 'जड' वस्तुतील चैतन्याशी ते एकरूप होऊन जातात. चैतन्य प्रवाहाच्या ओघाने ते त्या अखंड अद्वैत आनंदरस सागरांत नित्य विलीन झालेले असतात.

याच तत्वामुळे सुलतानने दिलेले हलाहल विष मिश्रीत दूध सद्‌गुरुंनी पचवून टाकले. तेथें कसले विष व कसले दूध. त्यांतील चैतन्य व ते प्राशन करणाऱ्याचे चैतन्य एकरूपच होऊन गेले. 'चैतन्या चैतन्य मिळे। तेथे विष कैसे उरे॥' अशी स्थिती त्याठिकाणी झाली म्हणा अगर त्या सिध्द पुरुषाच्या अमृतमय हस्तस्पर्शाने म्हणा ते विषयुक्त दूध अमृतासमानच होऊन गेले.

बादशहाने गुरुजींना अतिशय त्रास दिल्यावर देखील त्यांना यत्किंचीत सुध्दां क्रोध आला नाही. उलट अति आनंदाने ते बादशहाशी गोष्टी करूं लागले. गुणवंत हे कधीहि आपला गुण सोडत नाहीत आणि जे हीन वृत्तीचे असतात ते सदैव नीच वर्तणूक करीत असतात.

वरील हकीकतीवरून सुलतानच्या सर्व लोकांना पूर्ण जाणिव झाली की, हा कोणीतरी सत्पुरुष असावा. सुलतान महंमद बेगड्यास सुध्दां ही जाणीव होऊन तो सद्‌गुरुंच्या चरणी लोंटांगण घालून अनन्य तऱ्हेने विनवू लागला व सद्‌गुरुस म्हणाला, 'महाराज, आपली मला जाणीव नसल्यामुळे माझ्या हातून हा प्रमाद घडला. त्याची मला क्षमा करून त्याबद्दल या दासावर कृपा करावी हे तन मन धन आपल्या चरणी सर्वस्वी समर्पण आहे.

गुरुनाथ, मी मदांध होऊन अहंकारात चढून गेल्यामुळे आपले सत्यस्वरूप न ओळखतां आपण आपल्या कार्यामध्ये निरनिराळ्या प्रकारे अडथळा आणला. सद्गुरुनाथ माझ्या हातून इतकी अनन्वित कृत्ये घडून देखील आपण यत्किंचितहि रागावला नव्हता. खरोखर धन्य होय सद्गुरुनाथ आपल्या योग बलाची!!

अशा प्रकारे माफी मागितल्यावर सुलतानाने गुरुजीस आपल्या घरी येण्याबद्दल विनंती केली. त्याच्या विनंतीस मान देऊन ते सुलतानाबरोबर त्याच्या घरी गेले. घरी गेल्यावर सुलतानानें त्यांचा फार मोठा मान-सन्मान केला व मोठा नजराणा भेट म्हणून सद्गुरु महाराजास प्रेमभावाने अर्पण केला. परंतु गुरुजींनीं त्याचा स्विकार न करता तो नजराणा साभार परत केला.

जे संत महात्मा पुरुष भगवत्स्वरूपी लीन झालेलें असतात ते ही असल्या प्रकारची उपाधि जवळ बाळगीत नसतात. पैसा ही मुक्तीमार्गापासून मन परावृत्त करणारी वस्तु होय. अशा सत्पुरुषांना ऐहिक सुखाची मुळीच जरूरी नसते. कारण सुख म्हटले म्हणजे जे कायमचे टिकतें आणि ज्यांत दुःखाचा किंचित लवलेश नसतो ते खरें सुख होय. मोक्षपदच सर्व सुखाचे परमधाम होय. आपणास जे दृश्य जगांत सुख म्हणून दिसतें तें खरें सुख नसून सुखाचा किंचिन्मात्र आभासरूप व दुःखाचे मुळ होय म्हणून सद्गुरु इमामशहांनी तो नजराणा न स्विकारता साभार परत केला. पूर्वी येऊनच गेले आहे की ज्यावेळेस त्यांचे वडिल वारलें तेव्हा त्यांनी ऐहिक जगांतील हिस्सा न मागता पारमार्थीक हिस्सा मागितला. यावरून त्यांच्या निस्पृहतेची जाणीव वाचकांना होईल.

सद्गुरु इमामशहा महाराजांच्या चमत्कृतींनी सुलतान महंमद बेगडा थक्क होऊन गेलेला होता. त्याने पुष्कळ वस्तु देऊं केल्या, परंतु सद्गुरुंनी एकहि वस्तूचा स्विकार केला नाही. सद्गुरुंची ही निस्पृहता बघून बादशहास फार आश्चर्य वाटले. या महत्तम पुरुषांचे पावित्र्य, ऐहिक वैभवाची निरिच्छता व उदात्त धर्मतत्वें पाहून बादशहाने त्यांची अनेकविध स्तुति करून मोठ्या प्रेमाने त्यांना निरोप दिला.

★ ★ ★

# ९. मजुर-चोरांच्या कष्टांचें चिज

अहमदाबाद शहरांहून महंमद बेगडयाचा मोठ्या प्रेमाने निरोप घेऊन सद्‌गुरु इमामशहा आपल्या मुक्कामाच्या ठिकाणी परतले. नंतर त्यांनी मंदिर बांधण्यांचे काम जोरांत सुरु केले. इ. स. १४६७ च्या सुमारास म्हणजे संवत १५२४ मध्ये त्यांनी बांधकामास सुरुवात केली. बांधकाम चालू असतांना सद्‌गुरु इमामशहा एके ठिकाणी बसून दररोज काम संपल्यावर कामगार लोकांची मजुरी चुकवित असत. ते ज्या ठिकाणी बसत त्यास 'नगिना गोमटी' असें नांव आहे. त्या ठिकाणी त्यांनी एक गादी टाकलेली होती. गादीवर बसून ते नेहमी गादी खाली हात घालून पैसे काढीत असत व मजुरांना देत असत.

असेच एके दिवशी गादी खालून पैसे काढून मजुरी दिली असता एका मजुराने पाहिले. त्याला वाटले कीं, "बाबाजींनी गादी खाली पुष्कळसे पैसे ठेवलेले आहे. ते दररोज तेथून काढतात व प्रत्येकास ज्यांची त्यांची मजुरी देतात. त्या अर्थी तेथे पुष्कळसे पैसे ठेवलेले असतील."

त्याने दुसऱ्या दिवशी परत निरीक्षण केले तो त्यास नेहमीचाच प्रकार दिसून आला. त्याच्या मनांत ते पैसे चोरण्याचा मोह अनावर झाला. त्याप्रमाणे त्याने तसा २/३ वेळेस प्रयत्नहि केला पण त्यास सद्‌गुरुंची फार भीती वाटत असल्यामुळे त्याची हिंमत होत नसे. अखेरीस त्याने आपला सोबती असलेल्या एका कामगारास हाताशी धरले व ते दोघे तसा प्रयत्न करूं लागले. त्या दोघांनी आपापसांत कांही हिस्सा ठरवून एकेदिवशी रात्री ते दोघे जण सद्‌गुरु ज्या ठिकाणी बसून पैसे काढीत असत त्याठिकाणी आले त्यांनी तेथे अंथरलेली गादी उचलली व गुरुजी जेथे हात घालीत असत तेथे त्यांनी खूप निरिक्षण करून पाहिले परंतु त्यांस तेथे कांहीच नसल्याचे आढळून आले. तेथील थोडी माती दूर करून त्यांनी पाहिले. परंतु त्यांच्या दृष्टीस कांहीही आले नाही. अखेरीस त्यांनी ते खोदण्याचा विचार केला. त्याप्रमाणे ते कुदळीने तेथील जमीन खोदू लागले. खोदता खोदता त्यांना मध्यरात्र झाली. त्यांनी तो खड्डा ५/६ फूट खोल खोदला परंतु त्यास मातीशिवाय दुसरे कांहीही आढळून आले नाही. अखेरीस ते दोघे निराश झाले. त्यांचा नाईलाज झाला. त्यांनी तो खोदलेला खड्डा परत बुजून टाकला व सर्व साफसुफ करून पहिल्याप्रमाणे जेथें गादी होती तेथे ती पसरून दिली व उजाडण्याचा सुमार झाल्यामुळे निराशेने ते घरी परतले.

दुसऱ्या दिवशी सकाळी ते दोघे परत कामावर हजर झाले. काम करीत असतांनाच वेळ संपल्यामुळे गुरुजींनी सर्वांना मजुरी घेण्याकरिता बोलाविले व प्रत्येकास ते मजुरी देऊ लागले. प्रत्येकास मजुरी देत असता त्या दोघांची पाळी आली तेव्हा सद्गुरुंनी गादी खाली हात घालून पैसे मोजून त्या दोघास मजुरी दिली. त्यांनी ते पैसे मोजूनपाहिले तो त्या दोघांना ते नेहमी पेक्षा जास्त असलेले आढळून आले. त्यांनी परत एकदा मोजले तो त्यांना ती दुप्पट मजुरी असल्याचे समजले. ते गुरुजीस म्हणाले,

'बाबाजी, हे पैसे तर जास्त आहेत आम्ही तर काल आमची मजुरी घेऊन गेलों होतो. आमची आजचीच फक्त मजुरी हवी आहे. ही तर दुप्पट आहे. यातील जास्त दिलेले पैसे काढून घ्या.'

सद्गुरु म्हणाले, 'बाळांनो, ही मजुरी मी जास्त दिलेली नाही, योग्य तीच दिली आहे म्हणजे रात्रीची व दिवसाची अशी मिळून दिली आहे. मी जाणतो की रात्री तुम्हांस किती कष्ट उचलावे लागले. तुमची रात्रीची मेहनत जास्त झाली म्हणून मी त्याबद्दल ही रोजी तुम्हास दुप्पट दिलेली आहे. ती तुमची मजूरी तुम्ही घेऊन जा.'

आपण रात्री केलेला चोरीचा प्रयत्न सद्गुरुंनी अंतर्ज्ञानाने जाणल्यामुळें ते दोघे मजूर मनांत फार खजील झाले व त्यांनी सद्गुरुचरणी लोटांगण घातले.

★ ★ ★

## १०. मानसिंगजी महिडाच्या शंकेचे समाधान

महिकाठासे मानसंग आये, महिडा मुखसे बेन सुनाये।
साया लोग कहे सुखबानी, इमामसे मत मिली हो ज्ञानी।।
मोमिनको नही मुरीद बनावे, हिंदवाको वे दीनमें लाये।
अैसी तरकीब कीयेरी साई, तामे आपनी बडी ठकुराई।।

महीकाठाहून मानसिंगजी महिडा नावाचा राजपूत सद्गुरुंच्या दर्शनास आला. विनयाने शिर झुकवून चरणाजवळ बसला. नंतर हळूच अंत:करणातील वेदना व्यक्त करीत म्हणाला 'स्वामीजी, आपल्या विषयी लोकामध्यें अशी वदंता ऐकू येत की पीर इमामशाह मोमीनला शिष्य बनवत नाही. फक्त हिंदुनाच शिष्य बनवून त्यांना 'दीन' चा बंदा बनवतात. जर तुम्ही खरोखर अशा गोष्टींना प्राधान्य देऊन स्वत:स मोठे समजत असाल तर त्यात काहीच भलेपणा नाही.'

कोन हिंदु कोन मुसलमान, साहिब घर आये मेहेमाना।
साच पेखो ओर हक बखानो, सोही साईके बने दीलजानो॥
हिंदवा सोही इमान बखानो, हिंदवा रहे सोही गुणखाने॥
जात पात साया घर नही, भेद अभेद दिखे कबु नाही॥

'मानसंगजी, तुम्ही जी गोष्ट सांगतात, ती कदाचित बरोबर असेल पण मला हे नाही समजत कीं, हिंदू कोण आणि मुसलमान कोण? भगवंताने बनविलेल्या या दुनियेत आपण सर्वच मेहेमान आहोत. येथे राहून सत्याला ओळखा. ईश्वरनामाचे स्मरण करा. अशीच माणसे ईश्वराचे अत्यंत आवडते दीलजान बनतात. बाकी जे हिंदु आहेत ते आपल्या स्वधर्माचे आचरण करून आपले हिंदुत्व कायम राखतात. माझ्या उपदेशाने ते काही मुसलमान होत नाहीत. मी उपदेश करीत असलेल्या वैदिक सनातन धर्माला मुसलमान बांधव स्विकारीत असतील तर त्यांना उपदेश द्यायला मी तत्पर आहे. जाती जातीचा भेद तर लोकांनी निर्माण केला आहे पण ईश्वराच्या दरबारात तर असा कोणताच भेद नाही.'

हम तो नामसे नाता बखाने, चाहे कोऊ माने नही माने।
पीर इमामको साच बखाना, मानसंग बुझे गुणवाना॥
योगामृत गुरुकी बानी, समझ लहे कोई विरला ज्ञानी।
नाया गुरुके यही उपदेशा, नाम सुमीरे कटे भवक्लेशा॥

'आम्ही तर नामाशी स्नेह जोडणारे आहोत. आम्ही हाच उपदेश देतो की तुम्ही या भगवंताच्या नावाशी आपले नाते जोडा. आमचा हा उपदेश ज्यांना पसंत नसेल त्यांनी वाटले तर मानूं नये परंतु जे खरे सत्य आहे तेच आम्ही उपदेशिले आहे. मानसंगजी जो गुणवंत असतो तो समजू शकतो. योगीयांची अमृतवाणी ज्ञानीजनच समजतात. दुसऱ्यास त्याची गोडी नसते.

नायाजी सांगतात कीं, गुरुचा उपदेश हाच आहे की तुम्ही उठता, बसता, निजता, खातापिता, काम करतांना भगवंताचे नामस्मरण कधीही विसरू नका. भगवंताशी नामस्मरणाने नाते जोडा तो या भवसागरातील दारूण क्लेशातून तुम्हाला सोडवील. सदगुरुंचा उपदेश श्रवण करून मानसिंगजी शांतचित्ताने आपल्या मनातील शंकेचे समाधान करून घेऊन माघारी परत फिरला.



# ११. सद्गुरु समागमाने लुटारूचा सत्पुरुष बनला 'नाया' ची हकिकत

"अंतकाले कोण माता पिता। अने कोण बांधव भाई।।
ताहा सगा नही सागवा। नहीं पुत्र कलत्र बेहेण भाई।।
जो आही सांभलो स्वामीजीने। तो काया खोशाली तू थाये।।
आ काया खोशाली तो रहे। जो धरम सखाई तूं थाये।।
मारू तारू करीने धन साचवू। प्राणी चालता न आव्यु साथ।।
तेना दोरा दशी छोडी लेसे। प्राणी चाल्या ठाले हाथ।।
तेनो जनम अलंगो गयो। खेपचुको जुग चार।।
गुरु वचने जेणेआप न शोधा। ते जीव पड्यो घोर अंधार।।
जेने सद्गुरु ब्रह्मानी खबर न जाणी। खाई पीई सुतो जुगचार।।
जेणे जीवनी चिंता न करी। तेणे पड्या लखचौर्यायशीनो मार।।

"हे जीवात्म्या, कोण कोणाचा पिता, कोण कोणाची माता आणि कोण कोणाचे भाऊबंद आहेत? कोण पुत्र? कोण स्त्री? सर्व कांही आपापल्या स्वार्थाचे मतलबाचे चाहते आहेत माया ममत्वाच्या दृढबंधनाने बध्द झालेले जीव मूढ होत, आपला फायदा ज्या योगे होईल त्या करिता केवळ वरपांगी-विकारी प्रेम करणारे हे जग आहे; आणि हा व्यवहार सुध्दां जो पर्यंत ऋणानुबंध आहे तोपर्यंतच घडत असतो. परंतु ऋणानुबंध तुटल्यावर ते तुला अगर तू त्यांना सोडून जात असतोस, त्यावेळेस तुझ्या सोबत कोणी येतात काय? कोणीही नाही, तर मग त्यांच्या करिता तू जो येवढा माया मोह जंजाळांत रात्रंदिवस धडपडत आहेस. अत्यंत हाल अपेष्टा भोगून, बरी वाईट कर्मे करून धन जमवीत आहेस, निरूपयोगी-विनासशिल धन गोळा करीत आहेस ते लोक अंत:कालसमयी तुझ्या बरोबर देणार आहेत की काय? किंवा तू ते धन सोबत घेऊन जाणार आहेस? अरे बापड्या जीवा, तुझ्या बरोबर ते एक वस्त्रच काय परंतु एक तंतु सुध्दां देणार नाहीत आणि तू सुध्दां घेऊन जाऊ शकणार नाहीस तू जसा रित्याहाताने आला होतास तशाच रिक्त हातांने तुला परत जावे लागेलं यांचे तू स्मरण ठेव. केवळ मायीक जनाकरिता मायीक व्यवहाराने मिळविलेल्या धनसंपत्तीचा तुला कांही एक उपयोग होणार नाही. त्या योगे तुला जन्म व्यर्थ गेला असे होईल. त्यातही तू केवळ हा एकच नरजन्म निरर्थक घालविला असे नसून चारयुगापासून वारंवार मृत्यु लोकांच्या केलेल्या सर्व वाऱ्या-फेऱ्या व्यर्थ घालविल्या आहेत. याकरीतां हे माझ्या सुहृदमित्रा, वेळीच जागृत हो. गुरुपासून

(आपण कोण आहोंत व कशाकरीतां या जगांत आलेलों आहोंत यांचे ज्ञान) आत्मज्ञान प्राप्त करून घे व सदैव परोपकाररत राहून धर्मसंग्रह कर. ह्या मानवजन्मांत जर कांही सत्कृत्ये धर्मकृत्ये केलेली असतील तर तेच फक्त तुला वेळोवेळी मदत करतील. धर्म हाच जीवात्म्याचा अंत:कालचा साथीदार आहे याचा तूं विचार कर. त्या करितां सदैव सदाचाराने वाग व वेळोवेळी परमेश्वराचे स्मरण चिंतन कर. परंतु असे न करता जो केवळ पंचेंद्रीयांच्या विषयांचे पोषण करतो - खाऊन पिऊन झोपून राहातो मजामौज चैनबाजींत खुशाल लोळत पडतो - सदैव अज्ञानांध:कारांतच राहातो, तो मनुष्य व्यर्थ जन्मला असे समजावे. तो पशुहूनहि हलकट असा नरपशु होय. ज्याने आपल्या जीवांची चिंता केली नाही. आत्मचिंतन केले नाही, परमेश्वरीकृपेने प्राप्त झालेल्या सद्सद्विवेक बुध्दिचा सदुपयोग केला नाही तो नर व्यर्थ भूमीभार रूप होय. तो वारंवार लक्षचौऱ्यांयशीचे फेरे खात असतो तो जीव घोर अंध:कारांत धडपडत असतो या करितां हे मुनिवर्या तू सद्गुरुचे वचन पालन कर व त्यायोगे मोक्ष तत्वाचा अधिकारी हो.'

इ. स. १४५८ च्या सुमारास म्हणजे संवत १५१५ कार्तिक वा॥ १ च्या दिवशी सद्गुरु श्री इमामशहा महाराज आपला परम सेवक जो हाजरबेग त्या सहवर्तमान आपल्या बैल गाडीने नवतर कानम जिल्ह्यांतील चांदोद गांवी जाण्यास निघाले. कानममध्ये फार मोठें निबिड अरण्य होते आणि मोठमोठ्या दऱ्या खोऱ्या असल्यामुळे अशा मार्गाने एकटे जाणे फार भीतिदायक वाटत असे. कारण अशा घनदाट जंगलांत सहसा लूटमारीचा प्रकार भयंकर होत असे. मधून मधून हिंस्त्र पशुसुध्दां अतिशय त्रास देत. त्यामुळे सहसा तिकडे कोणी जाण्यास धजत नसत. असा अतिशय भयानक बिकट रस्ता लागल्यामुळे सद्गुरुंनी हाजरबेग यास आपली गाडी हळू हळू हांकण्यास सांगितली.

हळू हळू गाडी एका खोल दरीत उतरू लागली पुढें तर रस्ता भयंकर कठिण होता. पुढे जाण्यास मार्गही सापडत नव्हता. त्यामुळे हाजरबेग इकडे तिकडे रस्ता शोधू लागला तोंच त्यास एक लुटारू त्यांच्याकडे येत असलेला दिसला. त्यास पाहून हाजरबेगला थोडी भीतीच वाटली. परंतु सद्गुरुंनी त्यास धीर देऊन भीतिमुक्त केले.

तो लुटारू जवळ येऊन त्यांना अतिशय कठोर शब्द बोलून त्यांचा तिरस्कार करूं लागला. सद्गुरुंचे कपडेलत्ते, माल, गाडी वगैरे सर्व पाहून त्याच्या मनांत ती मालमत्ता लुटण्याची लालसा निर्माण झाली. आणि सद्गुरुंना ठार मारण्याचा दृढनिश्चय करून धनुष्यबाण घेऊन तो पुढे सरसावला.

धनुष्यावर बाण चढवून त्याने धनुष्याची दोरी ताणली परंतु दयाळु सद्‌गुरुनाथ जरासुध्दां क्रोधायमान झाले नाही अथवा घाबरले नाही. तो बाण सोडणार तोच सद्‌गुरुंनी त्याचे हात पाय चतुराईने अदृश्य बंधनाने अडकाविले.

आपले हातपाय अगदी दृढ बंधनाने बांधलेल्या - प्रमाणे त्या लुटारूस भासूं लागले. इतकेच काय परंतु सद्‌गुरुना मारण्याकरिता धनुष्यांची दोरी ताणून सरसावलेला बाण सुध्दां तेथल्या तेथेंच राहीला. त्याचे हात जरासुध्दा पुढे मागे अथवा वर खाली हलत नव्हते. ही परिस्थिती बघून तो लुटारू मनांत खूपच घाबरला व विचार करूं लागला.

'जर माझी अशी स्थिती मरेपर्यंत कायम राहिली तर माझेकडून खाणेपिणें कसे बरे होऊ शकेल. काय ही माझी विपरित गती! यापुढे माझ्या कुटुंब परिवाराचे उदर पोषण कोण बरे करू शकेल?' असा विचार त्याच्या मनांत आल्यामुळे तो फार लाचार झाला. त्याचें शरीर थर थर कापू लागले व हृदय धडधडूं लागलें.

मनुष्यावर जेव्हा एखादे अत्यंत जबरदस्त भय एकदम येऊन पडते तेव्हां त्याच्या मनात दडपण निर्माण होते. त्याच्या साऱ्या बऱ्यावाईट प्रवृत्ति एकदम दाबल्या जातात, नाहिशा होतात, आणि अशा प्रवृत्ति नाहिशा झाल्या म्हणजे त्यास सुविचार सुचण्याचा संभव असतो. तो नीति मार्गाप्रमाणे सद्‌बुध्दिनुसार वागूं लागतो.

त्या नाया लुटारूंची स्थिति सुध्दा अशीच झाली तो विचार करूं लागला, 'थोड्यावेळाच्या आधी माझी अशी अचल स्थिती नव्हती. मी हालू चालू शकत होतों. ही चलस्थित या संत महात्म्यास लुटण्यास गेल्यामुळेच अचल झालेली आहे, तर या सत्पुरुषासच अनन्य प्रकारे शरण जाऊन यांचीच आपण माफी मागावी.

असल्याप्रकारचे सद्विचार त्याच्या मनांत येत आहेत तोंच त्याचे ते शुध्द विचार सद्‌गुरुंनी अंतर्ज्ञानाने जाणले. तेव्हां त्यानी त्याच्यावर दया केली. त्यामुळे त्याच्या शरिराचे गुप्तबंध आपोआप सैल झाले व त्याच्या हातापायांची हालचाल होऊं लागली. परंतु हे आता पुढे काय करतील अशी त्यास अत्यंत भीति वाटू लागली. तो भीत भीत सद्‌गुरुंच्या जवळ गेला व त्यांच्या चरणारविंदी साष्टांग नमस्कार घालून हात जोडून उभा राहिला. सद्‌गुरु महाराज त्यास म्हणाले,

'अरे नाया! हे तू काय करीत आहेस?'

'महाराज! उदरपोषणाकरीतां मला हे करावें लागते.'

'परंतु हे पापकर्म आहें हें तूं कां जाणीत नाहीस.' सद्‌गुरुंनी विचारले,

'महाराज! मी हे माझ्या सर्व कुटुंबाकरिता करीत आहे. यांत माझा काय दोष.' लुटारू म्हणाला.

'होय, यातं दोष तुझाच. कारण तुझ्या कुटूंबाने कांही सागितले नाही की तूं चोरी, लुटमार करून आमचे पोषण कर! तर कुटूंबाचा पालक या नात्याने कोणतेही दुसरे काबाड कष्ट करून कुटुंबाचे पोषण करणे हे तुझे कर्तव्य आहे. परंतु चोरी, लुटमार करून त्यांचे पोट भरणें हा दोष तुझाच आहे. हे महत् पातक आहे. त्या पापांत तुझे कुटूंब सहभागी होणार नाही. कारण सामान्य जगाचा हा नियमच आहे की चांगल्याचे महभागी सर्व जण होतात परंतु वाईटाचे कोणीहि होत नाही. अरे! 'केना छोरू केना वाछरू। केना माय ने बाप॥ अंत:काले जावो प्राणी येकलो। साथे पुण्यने पाप॥' या जगांत कोण कोणाचा मुलगा? कोण कोणाचा पिता? कोण कोणाची माता आहे? कोणीही कोणाचे नाहीत. कारण आपण मेल्यावर आपल्या बरोबर कोणीही येत नाही. सोबतीस येते फक्त आपापले पुण्य व पापकर्म दुसरे कांहिही येत नाही. मेल्यानंतर जो तो जीवात्मा आपल्या कर्मरूप गाठोडयानिशी आपापल्या मार्गाने निघून जातो. म्हणून तू जरी तुझ्या कुटुंबाकरितां हे पाप करीत आहेस तरी तुझ्या कुटुंबातील कोणीही या तुझ्या पापात सहभागी होणार नाही.

लुटारू म्हणाला, 'महाराज, असे कसे होईल! त्याच्या करितांच तर मी एवढे करीत आहे!'

सद्‌गुरु म्हणाले, 'होय, बरोबर आहे. पण तूं अगोदर घरी जाऊन तुझ्या आई वडिलांना व बायको मुलांना विचारून ये की, 'मी हे जे पाप कर्म करीत आहे त्यांत तुमचा सुध्दां हिस्सा आहे नां? आम्ही येथेच उभे आहोंत. विचारून ताबडतोब परत ये विलंब लावू नकोस.''

सद्‌गुरुंनी आश्वासन दिल्यावर नाया ताबडतोब घरी गेला व आपल्या वडिलाजवळ जाऊन म्हणाला, बाबा तुम्हास एक प्रश्न विचारावयाचा आहे, मी दररोज जी लुटमार अगर चोरी करून आणतो त्यायोगे आपले पोट भरते, म्हणजे त्यांत तुमचा हिस्सा आहे. परंतु एका महात्म्याने मला सांगितले की यांत दोष कोणाचा? असा घरून खुलासा करून ये तुम्ही माझ्या पापांत सहभागी आहांत ना?'

त्यावर त्याचे वडिल म्हणाले, 'नाही, मी त्यात सहभागी नाही. ते पाप तूंच भोग, परंतु आमचे पोट भर. तू तिकडे कांहीहि कर. त्यांत आम्हीं सहभागी मूळीच नाहीत.'

वडिलांचे उत्तर ऐकून त्यास त्याची चीड आली. नंतर त्याने त्याच्या वृध्द आईस आणि मुलांस हाच प्रश्न विचारला परंतु त्याच्या पापांत सहभागी होण्यास कोणीहि तयार होत नव्हते.

त्यास पक्की खात्री होती की, आपली पत्नि आपल्या या पापांत सहभागी होईल. असा विचार करून त्याने तिला वरील प्रश्न विचारला. तेव्हां त्याची स्त्री मोठा आकांत करून त्यास म्हणाली,

'महाराज, थोडच्या वेळा आधीच मला एका विंचवाने दंश केला. त्याच्या भयंकर वेदना माझ्याने सहन करवत नाही. तुम्ही अगोदर मला होत असलेल्या वेदना थोडावेळ सहन करा. मग तुमच्या प्रश्नाचे उत्तर देईन.'

नाया म्हणाला, 'त्या मला कशा बरे सहन करता येईल?'

त्याची स्त्री लगेच उद्वेगाने म्हणाली, 'तर मग तुमचे पातक मला कशा रीतीने भोगता येईल.'

पत्निचे उत्तर ऐकून तर त्याचे डोळे खाडकन् उघडले. तो विचार करू लागला. 'अरे! ज्यांच्याकरिता मी ऐवढे पापकर्म करण्यास उद्युक्त झालो ते जर माझ्या पापांत सहभागी नाहींत तर मलाहि हें पापकर्म करण्याची काय जरूर? आजपर्यंत याची जाणीव मला कोणीहि करून दिली नाही, म्हणून इतकी पातके माझ्या हातून झालेली आहेत. परंतु आज खरोखर या महात्म्याने मला ही जाणीव करून दिली की, 'केना छोरू केना वाछरू। केना मायने बाप॥ अंत:काले जावो प्राणी एकलो। साथे पुण्यने पाप॥' अहाहा......! खरोखर धन्य होय या महात्म्याची!! धन्य, धन्य आज माझे नशीब उदयास आले!!!

असा विचार करून सर्वस्वाचा त्याग करून तो सद्‌गुरु जेथे उभे होते त्या ठिकाणी परत गेला, त्यास आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याची तिव्र जिज्ञासा (तळमळ) लागली.

सद्‌गुरुंच्या केवळ दर्शनाने त्यास 'सत्' चे पूर्ण ज्ञान प्राप्त झाले. सद्‌गुरु जवळ येऊन त्याने त्यांचे चरण धरले व त्यांना तो अनन्य भावाने शरण येऊन अत्यंत कळवळून विनवू लागला, तो म्हणाला,

'हे दीनवत्सल, भक्त उध्दारण, कृपाळु, दातार अंतर्यामी श्री सद्‌गुरुनाथ, धन्य होय आपल्या सत्समागमाची की ज्यायोगे अधम, नीच, पापी अशा या नराक्षसासारख्या मला आपण सज्ञानाचा मार्ग एका क्षणांत दाखववा! केवढी ही परोपकार बुध्दि!!

हे जगतत्पावन, वत्सउध्दारण, कृपाळु गुरुमहाराज, मी कोळीजातीत जन्मलो असल्यामुळे माझे प्रत्येक कर्म दोषयुक्त होते. माझे खाणे, पिणे, हिंडणे, फिरणे वगैरे रोजचे सारे व्यवहार पापयुक्त होते. कारण माझा जन्म अशा नीच कुळांत झालेला असल्यामुळे व वंशपरंपरानुसार सर्व कुटुंबियांचा चोरी व लुटमार करून त्यावरच उदर पोषण करण्याचा धंदा असल्यामुळे माझ्या हातून सुध्दां रस्ता लूट व चोरी अशीच कर्मे झालेली आहेत. कित्येक हत्या आणि कित्येक अघोर पापकर्म माझ्या हातून झालेले आहेत. थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे जेवढी वेदनिषिध्द कर्मे आहेत ती सर्व कर्मे माझ्या जीवनात पदोपदी घडत होती. त्या अतिघोर पापकर्माची परिसीमा येथ पर्यंत येऊन पाहोचली की, तरणतारण, जगत्पावन असे आपण साक्षात सृष्टिगुरु या मार्गाने जात असतांना आपणास लुटण्याची व ठार मारण्याची दुष्ट बुध्दि माझ्या मनांत निर्माण झाली. आणि ते कर्म करण्यास सुध्दां मी उद्युक्त झालो, परंतु त्रिगुणातीत गुरो! आपण किंचित् सुध्दा या नराधमावर रागावला नाहीत; उलट त्याच्यावर दया करून त्याच्या गुणावगुणाकडे न बघता त्यात एकदम आत्मजाणीव करून द्यावी, धन्य होय आपल्या सहनशीलतेची व परोपकारी दृष्टीची!!!'

असे म्हणून त्याने सद्गुरुचरणारविंदी परत साष्टांग प्रणाम करून, अति आदर भावाने अनन्य प्रकारे त्यांना विनवूं लागला. तेव्हां सद्गुरु इमामशहा महाराज त्यास म्हणाले की,--

'नाया, हा मनस्ताप आतां पुरें कर आणि तुला हे वाईट कर्म कशामुळे भोगावे लागले याचा नीट विचार कर.'

असे सांगून सद्गुरुंनी त्याच्या शिरावर आपला हात ठेवला तोच त्यास अंतर्ज्ञान प्राप्त झाले. त्यायोगे त्यास पूर्वजन्माच्या संकेताची एकदम स्मृति होऊन तो दचकला व म्हणाला,

'गुरु महाराज, खरोखर, पूर्वजन्मी केलेल्या एका अत्यंत अक्षम्य अपराधाचेच फळ मला भोगावे लागले. सद्गुरुनाथा, दया करा, मला क्षमा करा व आतां या घोर कृत्यापासून मला दूर करा!'

सद्गुरु म्हणाले, 'आता तुला मिळालेल्या अंतर्ज्ञानाने व आत्मज्ञानाने समजूं शकत नाहीस कां की तुझा जन्म कशासाठी झालेला आहे म्हणून?'

सद्गुरुंनी असे विचारताबरोबर नाया एकदम भानावर आला. कारण त्याचे सारे लक्ष सद्गुरुकडे स्थिर झालेले होते. त्याच्या सर्व वृत्ती परमेश्वराच्या ठायी लीन

झालेल्या होत्या. तो वृत्तिशून्य बनलेला होता सम्पूर्ण परतत्व जाणण्याचे ज्ञान त्याला प्राप्त झालेले होते. सद्‌गुरुंच्या कृपाप्रसादाने तो सकल वेदशास्त्र संपन्न झालेला होता. तो सद्‌गुरुकडून प्राप्त झालेल्या व पूर्वजन्मींच्या तपश्चर्येच्या फलस्वरूप संकेतानुसार मिळालेल्या ब्रह्मविद्येच्या योगाने निर्गुण, निरव्यव, सर्वातीत अशा सत्‌तत्वाचे म्हणजे परमब्रह्म पूर्ण पुरुषोत्तमाच्या अपार व अनिर्वाच्य परमलीलेचा साक्षात्कार रूपाने अनुभव घेत होता. त्याची चित्स्वरूपी समाधी लागलेली होती. त्याचे सर्वचित्त पूर्ण ब्रह्माचे ठायी विलीन पावले होते. सद्‌गुरु इमामशहांनी वरील प्रश्न विचारता बरोबर तो भानावर आला. व म्हणाला कीं,

'मी आतां काय करावे हे आपणच मला सांगा.'

तेव्हा सद्‌गुरुंनी त्यास सांगितले कीं, 'हे परतत्वाच्या साक्षात्काराने परम विशुध्द झालेल्या नाया! मी तुला एक गोष्ट सांगतो ती तूं ऐक, जगतात संत महात्म्याच्या जन्म आत्मोन्नति करितांच होत नसून अन्य जनास उन्नतीचा मार्ग दर्शविण्याकरितांच होत असतो. जगांतील सर्व अधिकारी जीवांच्या कल्याणासाठी होत असतो. विश्वाच्या कल्याणार्थच संतांच्या विभूति होत असतात. निरहंकार, निर्व्याज बुध्दिने परोपकार करणे हे संतांचे आद्य कर्तव्य होय. म्हणून प्रत्येक संत महात्म्याने आपलें शरीर परोपकाराकरितांच झिजवीले पाहिजे; सदा सर्वकाळ परोपकाररत राहिले पाहिजे, नाहीतर त्यांना जन्म घेण्यांचे कारण तरी काय? अज्ञलोकांत परमेश्वर भक्तिकडे लावणे-मार्गदर्शन करविणे हे ज्ञान्याचे सर्वप्रथम श्रेष्ठ कर्तव्य होय. या करितां तुला प्राप्त झालेल्या या सत्-ज्ञानाचा तूं देशोदेशी व गावोगांवी फिरून इतरास उपदेश कर.'

अशाप्रकारे सद्‌गुरु इमामशहांनी नायास सर्व हकीकत समजावून सांगितली व त्याचा मोठ्या प्रेमाने निरोप घेतला. नायांचे हृदय एकदम दिव्य प्रेमाने भरून आले. सद्‌गुरुचरणी त्याने परमविशुध्द भावाने लोटांगण घातले. सद्‌गुरुंनी त्यास अनेक शुभाशिर्वाद दिले व तेथून ते पुढील मार्गास लागले.



# १२. सदगुरु इमामशहांचा गुजराथमधील प्रवास.

अति दिव्य प्रेमाने आपला परमशिष्य नाया याचा मोठ्या हर्षोत्फुल्ल अंत:करणाने निरोप घेऊन मुक्तिदातार सद्गुरुमहाराज पुढे जाऊं लागले. सत्पंथ, सध्दर्माचा मार्ग लोकास दर्शविण्याकरितां ते स्वत: कष्ट सहन करून मजल दरमजल मुक्काम करीत करीत रात्रंदिवस त्रास सहन करून उपदेश करीत असत व अधोगतीप्रत जात असलेल्या मानवांत धर्म जागृति निर्माण करण्याकरितां ते देशोदेशी व गावोगावी फिरत असत. सद्भक्तांवर सुख सागर शिरोमणी असे सद्गुरु महाराज, कृपा करून त्यांचा लक्षचौर्यायशीचा फेरा चुकविण्याचा ज्ञानोपदेश सांगत असत. सत्साधकावर कृपा करून क्षणांत त्यांस संपूर्ण वेदशास्त्र ज्ञान संपन्न करीत असत. व त्यांस भक्तिमार्गास लावीत असत. शिवाय सद्गुणांचा सर्वांमध्ये फैलाव करून सर्वांना आनंदित करीत, अनेक दीन दुबळ्यांचे दु:ख सर्वस्वी हरण करून त्यांना परमसुखी करीत असत व कित्येक रोग्यांचे रोग नाहीसे करीत असत.

अशाप्रकारे अपार दयानिधी, कृपासागर, दीनवत्सल दातार, सद्गुरु महाराज या जगात अनेक चमत्कार करीत, अनेक लीला करीत करीत रमत गमत, सर्व लोकांना आनंदित करीत करीत सध्दर्माचा सर्व दूर प्रसार करीत करीत या अवनीतलावर भटकूं लागले. सर्व लोक त्यांचा अति आदर भावाने जयजयकार करूं लागले.

सद्गुरुचा किती अपार महिमा शास्त्रांत वर्णिलेला आहे! कित्येक कविंनी गुरुंचे गुणगान करतांना कित्येक पदे रचून मोठ मोठी पुराणे करून ठेवली, पुस्तकांचा पर्वतासारखा मोठा ढीग पडला परंतु सद्गुरुंचे गुण गाण पूर्ण होऊं शकले नाही. संपूर्णवेद ज्याच्या गुणरुपास 'नेति नेति' म्हणत असतात त्याचे प्रत्यक्ष दर्शन करवून देणाऱ्या, अपारगुणसागर अशा सद्गुरुंची कृपादृष्टि ग्रहण केलेल्या शुध्दसात्त्विक जीवात्म्यांची खरोखर धन्यता होय. प्रत्येक जीवात्म्याने या गुरु कृपेचा आश्रय करून आत्मोन्नति करून घ्यावी.

चांदोद गांवाहून पुढें सद्गुरु महाराज आवाखल मुक्कामी आले. त्या ठिकाणी कांही लोकांस सद्धर्माची शिकवण देऊन व उपदेश करून गुरुजी पाटण गांवी आले. तेथील कंदोई जातीत सतपंथाचा उपदेश करून पुष्कळच शिष्य संप्रदाय केला. त्यांनी गुरुजींची सद्भावनेनें सेवा चाकरी केल्यामुळे त्यांच्यावर कृपा करून सद्गुरुंनी त्यांना अनेक आशिर्वाद दिले, त्यानंतर ते 'अेसावर' या गांवी आले.

पूर्वी सद्‌गुरु इमामशहा महाराज मारवाड देशांतील चितोडगड गांवी मुक्कामी असतांना त्यांना वेलर नांवाचा वाणी भेटला होता; त्यास सद्‌गुरुंनी चितोडगडची भूमि सोडून अेसावर गांवी वस्ति करण्यास सांगितले होते. सद्‌गुरुंच्या आज्ञेप्रमाणे त्याने त्या सुंदरशा गांवी वस्ती केली व तेथे तो त्याच्या कुटुंब परिवारासह मोठ्या आनंदाने राहात होता.

सद्‌गुरुंना बघतांच प्रेमाने त्याचे हृदय दाटून आले. तो त्यांना घरी आणण्याकरितां त्वरित तेथे त्यांच्या जवळ गेला व आदरसत्कार करून त्यांना घरी आणले. तेथे त्याच्या सर्व कुटुंबियांनी मोठ्या हर्षोत्फुल्ल अंत:करणाने सद्‌गुरुचरणी नमस्कार केला. वेलरने आपल्या तीनही मुलास सद्‌गुरुचरणीं घातले. त्या सर्वांस आशिर्वाद देऊन त्यांना हर्षित केले.

गुरूजींची कीर्ति ऐकून पुष्कळशी मंडळी उपदेश ऐकण्याकरितां जमली. त्यांना सद्‌गुरुंनी सुलभ भाषेंत ब्रह्मज्ञानाचा उपदेश केल्यामुळे पुष्कळच त्यांचे सेवक बनले त्यांनी गुरुजीस त्या ठिकाणी राहाण्यास फारच आग्रह केल्यामुळे गुरुजींनी तेथें कांही दिवस मुक्काम केला.

★ ★ ★

## १३. सद्‌गुरु आशिर्वादाने निपुत्रिकास पुत्रप्राप्ति

इ. स. १४५२ च्या सुमारापासून म्हणजे त्यांच्या वयाच्या बाराव्या वर्षापासून सद्‌गुरु इमामशहा महाराज सत्पंथाचा उपदेश करण्याकरितां देशोदेशी व गांवोगांवी फिरुं लागले. सोबत त्यांनी हाजरबेग या परमशिष्यास बैलगाडी हाकण्याकरिता घेतलेले होते. पंजाब मधून फिरत फिरत ते माखाड देशात आले.

मारवाड देशांतील चितोडगड येथे आल्यावर गांवाबाहेरील एका मंदिरांत त्यांनी मुक्काम केला. त्या गांवाच्या अगदी शेजारील एका नयनरम्य उपवनांत एक गर्भश्रीमंत वाणी रहात होता. त्याच्या शहरांत लक्ष्मी सदैव वास करीत असे. तो जितका श्रीमंत होता तेवढाच परमेश्वराचा परमभक्त होता. दररोज गोरगरीब लोकांस तो अन्नदान करीत असे, अपंगाकरितां अन्न सत्र घालीत असे. उघड्यास कपडे देत असें. अनेक लोकोपयोगी कामे तो करीत असे. साधु संतांची मोठ्या प्रेमाने व भक्तिभावाने सेवा चाकरी करीत असे व त्यांच्याकडून ज्ञान ग्रहण करीत असे. सर्व लोक ही त्याची उदार बुध्दि व सत्वशीलवृत्ति बघून त्यास दुवा देत असत. गांवाच्या बाहेर असलेल्या सुगंधीत पुष्पवाटिकेत त्यानेच सुंदरसे मंदीर बांधलेले होते. त्याठिकाणी तो महापुण्यवान शेठ दररोज सकाळ संध्याकाळ प्रभु आराधनेकरितां जात असे.

असाच एकेदिवशी सकाळी मंदिरात गेल्यानंतर त्यास सद्गुरु इमामशहांचे दर्शन झाले. गुरुजींनी त्यास जवळ बोलाऊन शेजारी बसण्यास सांगितले. त्याबरोबर तो वाणी गुरुजीस नमस्कार करून त्यांनी सांगितलेल्या ठिकाणी बसला. नंतर सद्गुरु त्यास म्हणूं लागले, 'आपण कोणत्या ठिकाणी राहतात? तुझे आई, वडिल, भाऊ, पुत्र परिवार वगैरे सर्व कुशल आहेत ना?

तेव्हा तो वाणी आपली सारी हकीकत सांगू लागला. तो म्हणाला, 'महाराज' येथून अगदी नजीकच असलेल्या या समोरील उद्यानांत माझा एक महाल आहे. तेथे मी माझ्या तीनही भार्यासह वर्तमान राहात असतो. माझे नांव 'वेलर' असून मी रबारी जातीचा आहे. माझे आई, वडील स्वर्गवासी झालेले आहेत. गुरु महाराज, आपल्या सारख्या साधुसंत महात्म्यांच्या कृपेने आणि आशिर्वादाने मला धन संपत्ति अगदी विपूल आहे; परंतु त्या संपत्तीचा वारसदार कोणीही नाही. मी अतिशय कर्महीन आहे. कारण माझा निर्वंश झालेला आहे.'

अशी पुत्र हीनतेची हकीकत गुरुजीस सांगत असतांनाच त्याच्या डोळ्यांत अश्रु तरारले. पुढें त्याच्याने धीर धरवला गेला नाही व तो गहिवरून रडू लागला. रडून रडून त्याचा कंठ कोरडा झाला अखेर त्याच्या मुखांतून आवाज निघेनासा झाला. हा एवढा मोठा आकांत बघून सद्गुरु इमामशहांना त्याची दया आली. ते त्यास सांगू लागले, 'वेलरा! जरा थांब! धीर धर! एकदम इतका अधीर होऊं नकोस!' तूं मनांतील संकल्प विकल्प सर्व सोडून दे आणि मी तुला जें सांगतो ते तूं ऐक वेलरा, तु पुत्र दुःखाने, संतति अभावाने एवढा दुःखीत झालेला आहेस; परंतु तूं नीट विचार कर कीं, एखाद्या मनुष्यास पुत्र परिवार असूनहि तो पुत्र सुख उपभोगतोच असे कोठे आहे? त्यांना अनंत क्लेशही सोसावे लागतात. मग तूं एवढे दुःख कां म्हणून करीत आहेस? हा तर आपल्या पूर्व जन्मीच्या सदसत् कृत्याचा लाभ आहे. प्रत्येक प्राणिमात्र ऋणानुबंधाने बांधले गेलेले आहेत. संसारांत जन्म घेतलेल्या प्राण्यास आपल्या संबंध आयुष्यास निर्वाहादिक व्यवहाराकरितां दुसऱ्या अनेक प्राण्यांच्या प्रसंगांत तसा परस्परांचा ऋणानुबंध घडतो. ऋण म्हणजे देणें घेणें व त्याच्या योगाने झालेले जे बंधन तो ऋणानुबंध तो तसा आजपर्यंत तुझा कोणाशी पुत्र रूपाने ऋणानुबंध नव्हता म्हणून तुझ्या घरी पुत्रजन्म झाला नाही, परंतु आतां पुढे तुझ्या येथे पुत्रयोग संभवतो आहे. तूं तुझे कुटुंब, वगैरे बरोबर घेऊन ही चितोडगडची भूमि सोडून 'एसावर' या नवीन गांवी वस्ती करावी. तेथे तू थोड्याच कालावधीत पुत्राचे मुख पाहशील.'

सद्गुरुंनी त्यास असा आशिर्वाद वगैरे दिल्यावर वेलरास फार आनंद झाला. त्यांचे त्याने चांगल्याप्रकारे आदरातिथ्य केले. नंतर सद्गुरु इमामशहा त्याचा निरोप घेऊन उत्तरेकडे प्रवासास निघून गेले.

इकडे सद्गुरुंच्या आज्ञेप्रमाणे वेलर वाण्याने त्या नविनगांवी वस्ती केली. त्याठिकाणी गुरुजींनी सांगितलेल्या प्रमाणे त्याच्या कुटुंबातील काकांची मेथो, मेवो, मुलजी, व रत्ना अशी चार मुले व तो स्वत: असें एकंदर पांच जण त्या नविन 'येसावर' नांवाच्या गांवी राहूं लागले. तेथे कांही कालांतराने त्या वेलर वाण्याचे घरी सद्गुरुंच्या कृपाशिर्वादाच्या योगाने तीन पुत्र रत्न जन्मास आले. तेव्हा त्या वाण्यास अतिशय हर्ष होऊन सद्गुरुवर त्याचा दृढ विश्वास बसला.

★ ★ ★

## १४. यात्रेकरूस कफनीच्या बाहीत काशिक्षेत्र दर्शन.

"अडसठ तीरथ अमेगया। पूजा देव अनंत॥
आपे देवल देवता। मुनिवर हिरदे वसंत॥
तीरथ सारा अमे देखीया। कहीं पाणी कहीं पाषाण।
उज्जड घरका परोणला। कैसे पावे मान।
घरमा तीरथ मोक्षना। घरमा धरमद्वार॥
साचा धोना माहेका। फोकट धोना बार॥

'जगांत मुख्य मुख्य आणि श्रेष्ठ प्रतिच्या गणल्या गेलेल्या सर्व तिर्थांच्या ठायी पाणी आणि पाषाण याशिवाय दुसरे कांहीहि दृष्टोत्पत्तिस येत नाही. त्यांचीच पूजा अर्चा करून आपण जसे जातो तसेंच परत येतो. त्यायोगे कांही पाप क्षालन अथवा पुण्य संचय होत नाही. कारण त्या पाणी किंवा पाषाणाचे पूजन केल्याने आपणास ज्ञान किंवा आत्मशांति प्राप्त होईल काय? त्यायोगे आपला उध्दार होईल काय? मुळीच नाही. जसे एखाद्या उजाड घरी (ज्याठिकाणी कोणाचेहि वास्तव्य नाही अशा ठिकाणी) कोणी एक इसम अतिथी म्हणून गेला तर तेथे त्याचा मानसन्मान अगर आदरातिथ्य कोण बरे करणार, अथवा त्यास एखादे काम असल्यास ते कोण बरे करून देणार? अहो! असें जाणा की, तीर्थादिकांच्या ठायी असलेल्या पाणी पाषाणास ज्याने निर्माण केलें आहे. त्याच परमेश्वराने जर हे आपले शरीर घडविले, तर तेसुध्दां एक प्रकारचे तिर्थच कीं नाही. आणि त्यांतल्या त्यांत तिर्थांच्या ठिकाणी परमेश्वराचे अस्तित्व आहे असें कल्पावे लागते परंतु प्राणीमात्रांच्या देहांत तर तो चैतन्य रूपाने सदैव स्थित आहे कल्पावे लागत नाही, कारण देहामध्ये परमेश्वराचें

आत्मारामाचे आस्थित्व आहे म्हणूनच जिवात्म्याच्या सर्व क्रिया यथार्थतेने पार पडतात. अशा प्रकारचे हे धर्मद्वार, मोक्षद्वार महदतीर्थ जर आपल्या हृदयातच आहे. तर तीर्थोतीर्थी भटक्या मारण्यांत काय अर्थ? शिवाय तिर्थस्नानाने बाह्यांग शुध्दि फक्त होत असते; परंतु हृदयस्थ नारायणास ओळखल्याने जाणल्याने अंतरंगशुध्दि होत असते व त्यायोगे चित्तशुध्दियोगे आत्मसूर्य प्रगट होऊन ज्ञान किरण सर्वत्र पसरतात. त्यामुळें अज्ञान पापविकाररूप तिमीर कायमचा हरपून जाऊन जीवात्म्यास परमावधीची शांति प्राप्त होते.

दिल्ली शहरांत कित्त्येक दिवस राहून गुरुजींनी लोकांस धर्मोपदेश केला. नंतर तेथून ते थेट दक्षिणेकडे वळले. मजल दरमजल मुक्काम करीत करीत ते बऱ्हाणपुरला येऊन ठेपले व नंतर तेथून 'लाछोरा'या गांवी येत असतांना गांवाबाहेर रस्त्याशीच असलेल्या आम्रवृक्षांच्या गर्द छायेत कांही पांथस्थ विश्रांती घेत असलेले त्यांना दिसले. सद्‌गुरु इमामशहा देखील त्यांच्या जवळ जाऊन बसले. त्यांना बघून ते पांथस्थ त्यांचा द्वेष तिरस्कार करूं लागले. परंतु तिकडे न बघता सद्‌गुरुंनी त्यांना विचारले की,

'आपण कोठून आला आहांत? आपणांस कोठे जावयाचे आहे ?'

पांथस्थांनी सांगितले, 'आम्ही यात्रेकरू असून आम्हांस काशियात्रेस जावयाचे आहे.'

सद्‌गुरुंनी आपला उजवा हात समोर केला व ते यात्रेकरूस म्हणूं लागले, 'पांथस्थांनो! तुम्हांस काशीस जावयाचे आहे काय? तर मग हे बघा काशीक्षेत्र! असें म्हणून त्यांनी आपल्या कफनीची बाही मोकळी करून आंत बघण्यास सांगितले.

सर्वजणांनी आंत बघीतले, तो काय आश्चर्य! त्यांना सर्वदूर देऊळेच देऊळे दिसूं लागले. आपण आम्रवृक्षांच्या छायेत आहोत व आपणासमोर कोणी एक व्यक्ती उभी आहे याचीसुध्दां जाणीव त्यांना राहीली नाही. तेथील झाडे, जमिन, खुद्द इमामशहा महाराज देखील त्यांना दिसू शकत नव्हते. ते देहभान सुध्दां हरपले. सर्वदूर त्यांना यात्रेकरूंच्या भयंकर गर्दीने गजबजलेले काशीक्षेत्र दिसूं लागले. प्रत्येक देवळात जाऊन त्यांनी काशीविश्र्वेश्र्वराचे महादेवाचे दर्शन घेतले. गंगास्नान वगैरे करून श्राध्दतर्पणसुद्दां त्यांनी केले व ते फारच उल्हासीत झाले. दोन प्रहरभर त्यांना काशीशिवाय दुसरे कांहीच दिसत नव्हते. आपण काशीतच आहोत याची त्यांना पूर्ण खात्री झाली. त्यांना त्यांचे सोयरे संबंधी, इष्टमित्र देखील (जे त्यांच्या अगोदर तेथे गेलेले होते ते) भेटले. त्यांनी त्यांच्याशी कुशलक्षेम वगैरेची विचारपूस केली. ते सर्व एकमेकांना आपापल्या हकीकती सांगू लागले. त्यांनी तेथे पुष्कळ दानधर्मसुध्दां केला आणि

आपणांस काशीक्षेत्राचे दर्शन घडले म्हणून धन्य मानू लागले. सद्गुरु समोर जागृतावस्थेत असतांनासुध्दां जणूं त्यांना भावसमाधीच लागली. ही त्यांची स्थिती पुष्कळ वेळ पर्यंत राहीली.

अखेर सद्गुरुंनी आपला हात जेव्हा त्यांच्या समोरून काढून घेतला तेव्हा ते अवलोकन करीत असलेले काशीशहर त्यांच्या दृष्टीपुढून पूर्ण विलीन झाले व त्यांना पूर्व जागृति झाली. ते सर्वजण फार संभ्रमांत पडले. आपण काशीमध्येंच आहोंत कां कोठे आहोंत असा त्यांच्या मनांत भ्रम निर्माण झाला. ते आपापसांत म्हणू लागले, 'अरे, आपण कोठे आहोंत? येथे तर एकहि देऊळ दिसत नाही.' दुसरा म्हणाला, 'अरे हे तर आपण विश्रांती घेत असलेले आपले पूर्वीचे ठिकाण आहे!'

तिसरा पांथस्थ म्हणाला, 'ते सर्व खरे, पण आपण तर काशीला गेलों होतो, आणि परत कसे या ठिकाणी आलो, अरे, येथे कांही तरी भुताटकीचा प्रकार घडला असावा!'

अशाप्रकारे- गोंधळात पडलेल्या त्या लोकांना पाहून त्यांतील एका सूज्ञ इसमाने त्या सर्वांचा भ्रमनिरास केला. तो म्हणाला, 'तुम्ही विनाकारण भ्रमात कां पडत आहांत. येथें भुताटकी वगैरे कांही नाही. आपल्या समोर ही जी विभूति उभी आहे त्याच विभूतीने खरोखर हा चमत्कार आपणास दाखविला आहे. खरोखर त्यांनीच आपणास काशी दर्शन घडविले आहे.'

ते सर्वजण परम आश्चर्याने दिङ्मूढ झाले त्यांच्या बाह्यमनोवृत्ति आपोआप मावळल्या गेल्या. पूर्णश्रध्देने व पूज्य भावाने ते त्या मूर्तिचे अवलोकन करूं लागले. तो त्यांना त्या परम विलक्षण दिव्य मूर्तिच्या सभोवार योगबळाचे व परमज्ञानानंदाचे आगळेच तेजोवलय झळकत असल्याचे दिसले. त्यायोगे त्यांची मने त्या विलक्षण विभूतीकडे आकर्षिली गेली. त्यांचे हृदय परिवर्तन झाले. थोडया वेळाआधी ते ज्यांचा द्वेष करीत होते त्यांच्या जवळ जाऊन त्यांनी साष्टांग नमन केले. व आपल्याकडून झालेल्या अपराधाची क्षमा मागून सद्गुरुस शरण येऊन धर्मोपदेश देण्यास विनवू लागले. तेव्हां सद्गुरुंनी त्यांना आशिर्वाद देऊन ज्ञानोपदेश केला व त्यांना सत्धर्माची सत्पंथाची दीक्षा देऊन कृतार्थ केले.

घटमो तीरथ घटमो वन। निर्मळ थाये अपनो मन॥
जहालगी मनसु फरता फरीये। तीरथ वनमे अर्थ न सरीये॥
काया क्लेश मत करसो जन। स्थिर करी राखो चंचल मन॥
ब्रह्मज्ञाने मन स्थिर थाये। मुनिवर बीजो कोई नथी उपाये॥
काया काशीने मन छेरे गंगा। गुरुने चरणे जो लागेरे रंगा॥

रंग रंगावो दिलमा। काहे फिरो वनवास॥
घटमो तीरथ शोधिये। तो प्रभुजी तारे पास॥

"हे मनुष्या! आपले शरीर हेंच एक प्रकारचे तीर्थ आहे. या शरीरांत पींडातच सर्व ब्रह्मांडातील पवित्र तीर्थे, वने भरलेली आहेत. आपली काया हेंच काशीक्षेत्र असून मन हीच गंगा होय. त्या तीर्थास न जाणता तू व्यर्थ तीर्थोतीर्थी व वनोवनी कां भटकत आहेस. जोपर्यंत तूं आपल्या मनास निर्मल करीत नाही, शुध्द व स्थिर करीत नाहीस; मलीन वासनांचा मनापासून त्याग करीत नाहीस, तो पर्यंत तू असाच भटकत राहशील, मन शुध्द झाले म्हणजे आपल्याच घटांत सर्वकांही भरलेले आहें असें तुला समजून येईल. हे चंचल मन कोणत्या उपायाने स्थिर होईल? तर ब्रह्मज्ञान प्राप्तीशिवाय ते स्थिर होणार नाही. ब्रह्मज्ञानाशिवाय या मनरूपी मदोन्मत्त हत्तीस अन्य अंकुश नाही. आणि हे ब्रह्मज्ञान गुरुशिवाय प्राप्त होत नाही. गुरुचरणांचा अखंड रंग ध्यास ज्यास लागला तोच केवळ ब्रह्मज्ञान प्राप्त करू शकतो. त्याकरितां हे मुनिवरा! तू आपल्या सर्वेन्द्रियांचे दमन कर हृदय निर्मल कर, चित्त शांत ठेव, मन स्थिर कर व मनोवृत्तीचा निरोध करून शुभाशुभ कामनांचा त्याग कर आणि गुरुकडून ज्ञान ग्रहण करून त्यांची कृपा संपादन कर म्हणजे त्यांनी केलेल्या उपदेशाचा सतत निदीध्यास करून आत्मानुभव साध्य कर. तसें झाले म्हणजे परमेश्वर आपल्या जवळच आपल्या हृदयात भरलेला आहे याची जाणीवच काय प्रत्यक्ष ओळख तुला होईल; नव्हे तू आणि परमेश्वर यांत अभेदत्व निर्माण होईल व तूं तिर्थरूप होशील.



# १५. त्रिभुवनदासावर सद्गुरुंची कृपा.

"काया वाडी कारमी। कशमळ छे अपार॥
पुत्र कलत्र सऊ कारमु। कारमु अरथ भंडार॥
जीहा जोऊ ताहा कारमु। कारमु सकळ संसार॥
नारायण नही कारमु। बीजु सपनु विचार॥
चेंतोरे प्राणी बापडा। चेतो हइडा माहेरे॥
संसार सपनु जाणीये। भुला भरमे अपारसे॥"

"हे मुनिवर्या! आपले शरीर नाशिवंत आहे. त्या शरीराचा अभिमान तू कधीही करूं नकोस.! बाहेरून उत्तम दिसणारे हे शरीर आंत बघशील तर सदैव घाण पदार्थांनी भरलेली दुर्गंधाची खाण आहे. अशा या दुषित देहाचा अभिमान तू धरूं नकोस. काळाच्या योगाने या देहाचा विनाश होत असतो. आपले पूत्र, स्त्री, अर्थभंडार - धनसंपत्ती सर्व विनाशी असल्याने त्यांच्या विषयी सुध्दां ममत्व लोभ बाळगू नकोस त्याच प्रमाणे हे जगत्सुध्दां विनाशी असल्याने त्याच्या विषयीसुध्दा मनाचे ठायी प्रिती करूं नकोस एकमेव परब्रह्म परमात्माच केवळ अविनाशी आहे. त्याशिवाय जे कांही आहे, जगांत जे जे कांही दिसत आहे ते सर्व विनाशशिल आहे. जगत् स्वप्नवत आहे. ज्याप्रमाणे झोपेंत पडलेले स्वप्न जागृत होताच नाहीसे होते. झोपेंत आपण त्या स्वप्नाचा प्रत्यक्ष अनुभव घेत आहे असे दिसत असून सुध्दां जागृत होताच ते सर्व विलय पावतें; तद्वतच हे जगत्-हा संसार सुध्दां अज्ञानपणामुळे आहे असे भासतो. परंतु, तोच संसार, नामरूपरहित जागृतावस्था पूर्ण ज्ञानावस्था प्राप्त होताच नाश पावून जातो. मन:सृष्टीतूनही नाश पावतो. काळ त्यास खाऊन टाकतो. तर हे माझ्या प्रिय सुहृद! मायेच्या मोहजालांत व्यर्थ भ्रमण न करता ह्या विश्वाविषयीही विराग धारण कर, मनांतून कामनांचा त्याग कर व तुझ्या आत्म्याचें कल्याण करून घे. कारण आत्मकल्याणासाठीच तुला हा मानवजन्म लाभला आहे; त्यांतही हे आयुष्य आकाशांत चमकणाऱ्या विजेसारखे अस्थिर व क्षणभंगुर आहे. त्यांत जीवाने तत्वोपदेश ग्रहण करून अविनाशी परात्पर नारायणाचे स्मरण चिंतन करून, परमकल्याण पावण्यासाठी सतत प्रयत्न केला पाहिजे.

पुढे सद्गुरु इमामशहा महाराज गुजराथेकडील डांग मुलुखामध्ये आले. त्याठिकाणी धर्मोपदेश करून फिरता फिरता कानम जिल्ह्यांत आल्यावर तेथून नवसारी व नंतर सुरत शहरांत आले. सुरतमध्ये एक धनाढ्य असा त्रीभुवनदास नांवाचा मोठा व्यापारी राहात होता. अरबस्तानातील 'बसरा' नावाच्या बंदराशी त्याचा मोठ्यांत मोठा व्यापारी

संबंध होता. तेथून तो माल आणीत असे. बसरा ते सुरत भूमार्ग नसल्यामुळे जलमार्गाने मालाची वाहातूक चालत असे. त्यामुळे मालवाहतुकीकरीता त्याच्याजवळ त्याच्या स्वत:च्या सात होड्या होत्या.

एकदा माल आणण्याकरीता त्याने सातही होड्या बसऱ्यास पाठविल्या व त्यावर देखरेखीकरीतां स्वत:च्या मुलास पाठविले. त्याने 'बसरा' गावातून माल खरेदी करून बंदरात आणला व आपल्या सातही होड्यांत तो माल भरला आणि स्वदेशी परत येण्याकरीता होड्या इराणच्या आखातांत वल्हविल्या. त्या ओमानच्या आखातांत व नंतर अरबी समुद्रात आल्या.

दैवयोगाने त्या होड्यां ज्यावेळेस अरबी समुद्रांत उतरल्या अगदी त्याच सुमारास त्या भागांत जोराचे वादळ सुरु झाले. त्यामुळे सागरांत मोठमोठ्या लाटा उत्पन्न होऊन होड्यास अडथळा होऊ लागला. जसजसा वेळ जाऊ लागला तसतसे सागराचें पाणी सुध्दां जोरजोराने उसळू लागले, आणि त्या होड्या सुध्दा हेलकावे घेऊ लागल्या. आता काय करावे यांची कोणांसही शुध्द राहिली नाही. सर्व खलाशी लोक मोठमोठ्याने आक्रोश करूं लागले. परंतु निर्जन अशा सागरात त्यांना कोण साहच्य करणार? अखेर जिवंत राहाण्याची सर्वांच्या मनाची आशा सुटली आणि खरोखरच त्या निर्दयी प्रक्षुब्ध सागराने सुध्दां एक क्षणात एका भव्य लाटेसरशी सातहि होड्यांना गडप करून टाकलें.

इकडे त्रिभुवनदास होड्या पाठविण्यास महिना दिड महिना झाल्यामुळे त्या परत येण्याची दिवस न दिवस एकसारखा वाट बघू लागला. वाट पाहाता पाहाता अखेर दोन महिने निघून गेले. आता मात्र त्यास राहावले नाही. तो सारखा तळमळू लागला त्याच्या सातही होड्या परत मिळण्याची त्याची आशा खुंटली. त्यास कांही एक सुचेनासे झाले. त्यास समजून आले की आपल्या होड्यांना कांहीतरी अपघात झाला असावा म्हणून तो अतिशय चिंता करूं लागला. अखेर होड्यांचा तपास करण्याकरीतां तो समुद्रकाठी असलेल्या डुंमस या गांवी आला. दैव योगाने समुद्रांत दूर अंतरावर काही होड्या येत असतांना त्यास दिसल्या. त्या पाहून त्यास हर्ष झाला परंतु जसजशा त्या होड्या जवळ येऊन लागल्या तसतशी त्याची निराशा होत गेली. अधिकच जवळ आल्यावर त्यास समजून आले कीं या त्याच्या स्वत:च्या नसून दुसऱ्या व्यापाऱ्याच्या होत्या.

त्या होड्या सुध्दां बसऱ्याहून आलेल्या असल्यामुळे त्रिभुवनदासाने होडीवरून माल उतरविणाऱ्या एका 'रणछोड' नांवाच्या कामगारास त्याच्या होड्याविषयी विचारले. तेव्हा रणछोड म्हणाला,

'तुमच्या होड्या एक महिन्यापूर्वी बसऱ्याहून मोरथीकडे येत असतांना आम्ही पाहिल्या होत्या. त्यावेळेस आम्ही आमच्या होड्यामध्ये माल चढवित होतो. त्या नंतर तुमच्या होड्या आम्हांस मार्गांतही मिळाल्या नाहीत व कोठे गेल्यां ते हि समजले नाही. मात्र त्यावेळेस सागरात वादळ निर्माण झाल्याची वार्ता आम्हांस मागाहून समजली होती.'

ही हकीकत ऐकून त्रिभुवनदासास दु:खाचा जबरदस्त धक्का बसला. तो भ्रमिष्ठासारखा होऊन रडू लागला. जड अंत:करणाने पश्चात्ताप करीत करीत तो घराकडे वळला.

परमेश्वराची तळमळीने आठवण संकटातच येत असते. त्रिभुवनदासाचे सुध्दा असेंच झाले. अतिदु:खाने पीडित होऊन त्यास सत्‌गुरु इमामशहा महाराजांची तळमळीने आठवण झाली. सत्‌गुरुंचा ज्ञानोपदेश ऐकण्याकरीतां तो नेहमी त्यांच्याजवळ जात असे. आठवण झाल्याबरोबर लगेच तो इमामशहा महाराज जेथे मुक्कामी होते तेथे जाऊन त्यांना आपली दु:खद हकीकत सांगून विनवू लागला. तो म्हणाला,

"सद्‌गुरु महाराज, या दीनावर दया करावी. महाराज, मी आपणास शरण आलो आहे. जर तुम्ही कृपादृष्टी न कराल तर मी आता जीवंत राहाणे शक्य नाही. सद्‌गुरुनाथ, या पामराचा उध्दार करावा.' अशा प्रकारे काकुळतीस येऊन तो शोक करू लागला, 'माझा जन्म मी व्यर्थ गमावला. मिळविलेले धन कांही सदुपयोगी न जाता विनाकारण खलास झाले. माझे तन-मन असलेला माझा एकुलता एक मुलगा माझ्यासमोर नाहिसा व्हावा काय ही दैवाची विपरीत गती! होय! मी जिवंत राहून तरी काय करूं? ज्याच्याकरिता मी अतिकष्ट सहन करून येवढी संपत्ति मिळविली ती सर्व माझ्या समक्ष लयास गेली. धिक्कार ह्या माझ्या जीवितास की मी निपुत्रिक झालो! पारमार्थिक सुखाची यत्किंचितहि काळजी न करता ऐहिक सुखाकरिता राबलो, धिक्कार माझ्या जीण्यास!! आणि धिक्कार या धंद्यास की ज्या योगे माझें घरदार बुडाले!!! "

सद्‌गुरु इमामशहा महाराज हा त्याचा आकांत बघून-ऐकून त्यास म्हणाले, 'शान्त हो त्रिभुवनदास शान्त हो! एवढा आकांत करण्याचे कारण तरी काय? जें व्हावयाचें असतें ते अवश्य घडतच असतें. शास्त्रांत सांगितले आहे की,

"लिखा लेख सो नही मिटनेका। क्या मरता झुरझुर॥
खबर बीना नर केते खप गये। मायाके हो मजुर॥"
"नहि भवति यन्न भाव्यं भवति च भाव्यं विनापि यत्नेन।
करतलगतमपि नश्यति यस्य हि भवितव्यता नास्ति॥"

जे व्हावयाचे नसेल ते कधीहि होत नाही होणारे कदापि टळावयाचें नाही, जे प्राप्त होणे नसेल तें हातात येऊन सुध्दा नाहीसे होतें.. विधात्याचा विधीलेख कोण बरे खोटा करूं शकेल ? 'लख्या लेख टळे नहीरे। कोट करे उपाय॥' विधिलिखित बदलविण्यास कोणीहि समर्थ नाही, अवश्य घडणाऱ्या गोष्टी कोण्याहि माणसास कोटीउपायांनी सुध्दा टाळता येत नाहीत. राम, युधिष्ठिर, प्रल्हाद, हरिश्चन्द्र आदि अवतारी पुरुषासहि त्या टाळता आल्या नाहीत. त्या आपणासारख्या क्षुल्लक मानवास कशाबरे टाळता येतील ? जें घडायचें आहे ते घडतेच ते कोणालाही टाळता येत नाही, मग जे टाळणे आपल्या हातांत नाही त्याविषयी उगीच चिंता अथवा दु:ख कां म्हणून करायचे ? जे नाशिवंत आहे त्याचा केव्हां ना केव्हां तरी नाश हा होणारच. त्याप्रमाणे माया ममतेंत बध्द होऊन तूं जें म्हणत आहेस की माझे घरदार बुडालें, एकुलता एक मुलगा वारला, सर्व संपत्ति नष्ट झाली, हें सारे तुझे म्हणणे व्यर्थ होय कारण त्यांचा कधी ना कधी नाश होणारच होता; म्हणून व्यर्थ शोक करण्यांत काय उपयोग शिवाय तूं जें म्हणत आहेस 'माझा पुत्र, माझे धन, माझें घर,' हे सर्व तुझे स्वत:चे आहे. काय ? तें जर तुझे आहे, होते तर तुझ्याशिवाय तें एकदम कसें बरे निघून गेले ? ही तर सर्व माया होय. ममता होय. हा सर्व मिथ्या मोह आहे. त्याचा त्याग करून जगात तुझें स्वत:च्या मालकीचे असे काय आहे याचा निट विचार कर.

गुरुजींनी येवढे सांगितल्यावर सुध्दा त्रिभुवनदासावर त्याचा किंचितही परिणाम झाला नाही. तो म्हणाला, 'सद्गुरुनाथ, आपली कृपादृष्टी झाली म्हणजे मुका बोलू शकतो, आंधळा बघू शकतो, लंगडा पर्वताचे अत्युच्च शिखर चढू शकतो, तर या संकटाची काय कथा ? महाराज कृपा करा या पामरावर दया करा व अपराध्यास पदरांत घ्या.' असे म्हणून त्याने सद्गुरुचरणी शिर ठेऊन तो अनन्य प्रकारे विनवू लागला.

अखेर सद्गुरुंनी त्यास सांगितले - 'असे कोणते संकट तुझ्यावर ओढवले आहे. जरी कोणतेहि दु:ख तुझ्यावर अगर अन्य कोणावरहि येऊन कोसळले तरी त्या सर्वावरील औषध त्या जगन्नियंत्या प्रेमदीनदयाळ प्रभूजवळच आहे. हा भवसागर दु:खानेच भरलेला आहे. परंतु संतोष क्षमा, दया अथवा शांती वगैरे सद्गुण जो अंगी बाणवून घेतो त्यास दु:ख काय असतें याची कल्पनांसुध्दां नसते. आणि जो मनुष्य काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर वगैरे प्रकारच्या अवगुणांत-मायेंत गुरफटून जातो, त्यास सुख काय असतें याची जाणीवसुध्दां नसते. तो या मायेंतच सुख मानून घेतो. परंतु तत्वत: तो सदैव दु:खीच असतो. शिवाय जो सन्मार्गाने आणि नीतिने वागतो

त्यास अनंत अडचणी आणि दुःख सोसावे लागते. बरे. असो तू मनांत कोणत्याही प्रकारचें दुःख करू नकोस. उद्या तू समुद्रकिनारी असलेल्या 'डुंमस' गावी जा. त्याठिकाणी तुझी सातहि वाहाने तुला निश्चयाने परत मिळतील.'

सद्गुरुंचे हे वचन ऐकताच त्याच्या मनाला फारच आनंद झालां आणि तो उल्हासित अंतःकरणाने व मोठ्या आतुरतेने डुंमसला गेला.

इकडे सद्गुरुंनी वायुदेवाची विनंती करून त्रिभुवनदासाची सातहि वाहाने जशींच्या तशी सागरांतून वर काढण्यास व डुंमस गांवास पोहचविण्यास सांगितले. त्याप्रमाणे वायुदेवाने आपली कामगिरी योग्य प्रकारे बजावून त्रिभुवनदासाच्या सातहि होड्या डुंमसला आणल्या.

त्रिभुवनदास गुर्वाज्ञेप्रमाणे आपली वाहाने पाहण्यास तेथे आला तोच त्यास आपल्या सातहि होड्या समोरून येत असतांना दिसल्या. तेव्हा त्यास अत्यानंद झाला सद्गुरुंचे गुणगान व नामस्मरण करूं लागला. त्या होड्या जेव्हा तो निरखून पाहूं लागला तेव्हा त्यास आपला पुत्र बसलेला दिसला त्या वेळेस त्याचें हृदय आनंदाने भरून गेले, पुत्राचे मुख अवलोकन करताच त्याचें पुत्रप्रेम उचंबळून आले. त्याच्या डोळ्यातून आनंदाश्रु खळखळा वाहू लागले. त्याचा मुलगा व होड्यावरील इतर सर्व खलाशी लोक खाली उतरून त्रिभुवनदासाकडे आले. तेव्हा पिता पुत्र मोठ्या कळकळीने एकमेकास भेटले.

त्रिभुवनदास आपल्या मुलाचे मस्तक हुंगून त्यास म्हणाला, 'बाळ चल मजबरोबर! ज्यांच्या कृपाप्रसादाने मला माझे पुत्ररत्न प्रत्यक्ष यमराजाच्या दरबारातून सुध्दां परत मिळाले, अशा त्या कृपाधन, परमपूज्य सद्गुरुमहाराजांचे दर्शनास आपणास गेलेच पाहिजे.' असें आपल्या पुत्रास सांगून तो खलाशास म्हणाला, 'हे माझ्या प्राणप्रिय खलाशी बांधवांनो आपण सुध्दां आमच्याबरोबर सद्गुरुंचे दर्शनार्थ चलावे.' अशा रीतीने ते दोघे पितापूत्र व सर्व खलाशी लोक सद्गुरुच्या दर्शनाकरिता सुरतला येण्यास निघाले. वाटेत खलाशांनी घडलेली सर्व हकीकत त्रिभुवनदासास सांगितली व त्रिभुवनदासाने सुध्दां आपली झालेली सारी हकीकत त्यांना निवेदन केली.

अशाप्रकारें वार्तालाप करीत करीत ते सद्गुरुंचे मुक्कामाचें ठायी जाऊन पोहोंचले. सर्वांनी गुरुजीस नमस्कार केला. त्रिभुवनदास गुरुचरणी लोटांगण घालून वर उठण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु त्यास सद्गुरुचरण सोडवेना. तो गहिवरून आला. त्याच्या

मुखातून एकहि शब्द बाहेर निघेना. त्याच्या अश्रुबिंदूनी सद्गुरुंचे चरण ओलेचिंब झाले. तेव्हा सद्गुरुंनी त्याच्या शिरावर हात ठेऊन आशिर्वाद देऊन स्वहस्तांनी त्यास उठविले. त्रिभुवनदास गुर्वाधीन होऊन सद्गुरूंस विनवूं लागला, 'सद्गुरु महाराज, आपले आगमन कशा करीता झाले हे आता मी पूर्णपणे समजलो. आपल्या तपाच्या बळाने आपण दिनांची दुःखे निवारण्याकरिताच म्हणजे परोपकाराकरीताच या जगात अवतरलेले आहांत, आपल्या केवळ कृपादृष्टिने माझा भवबंधनशूळ कायमचा नष्ट झाला. आपण त्रिलोकांहून सन्मार्गाचा बोध करण्यांकरीता आला आहांत असें आम्हास पूर्णपणे समजले आहे. तरी हें सुखदातार गुरुनाथ, पामरावर दया करून सत्चा अमर मार्ग आम्हास दाखवा. आम्हास सतपंथाचे ज्ञान द्या.'

त्याची विनंती ऐकून सद्गुरुंनी सर्वांना सत्पंथाची दीक्षा दिली व सर्वांच्या मस्तकावर हस्तकमल ठेऊन आशिर्वाद दिले. नंतर सर्व मंडळींनीं सद्गुरुचरणी परत नमन करून घरी जाण्यास सानंदाश्रुनयनांनी सद्गुरुस आज्ञा मागितली.

पुढे त्रिभुवनदासाने सर्व व्यवहार आपल्या मुलाच्या स्वाधिन करून सद्गुरुकडून आत्मज्ञान ग्रहण केले. सदैव तत्वचिंतनाच्या योगाने त्यास परात्पर ब्रह्माचा साक्षात्कार घडला. व सदैव प्रभुभजनात व चिंतनांत तत्पर राहून सायुज्ज मुक्तिचा अधिकारी झाला.

★ ★ ★

## १६. श्रध्देची पराकाष्टा सद्गुरूंचा प्रेमी शिष्य 'जीवन'

"प्रेमप्यास अदक है, जो खेले प्रेमज खेल।
गुरुये कसणीज देखीया, उन सर वही कैसी हेल॥
उठी झाल स्नेहकी, सब तन करे अंगार।
सही सो जाले आपकु, सो पीहुके प्रेमेधार॥
प्रेम पीहासु मन वसे, जो मनमा कीजे नेह।
दुरिजन दुनिया दाखवे, सो जलबल होवे खेह॥
प्रीत पिहाकी दोहेली, चलना खांडाधार।
शीस उतारी खेलीये, कोई खेले खेलनहार॥"

प्रेमाची तहान कांही आगळीच असते. ज्या प्रमाणे तृषार्तास पाण्याची अत्यंत जरूरी असते पाण्यावाचून तो जीव तडफडत असतो. त्याप्रमाणे किंबहुना त्यापेक्षा हजारो पटीने अधिक ही प्रेमाची तृषा असते. हे फक्त जो त्यांतला खेळणारा असतो तोच जाणू शकतो. ह्या प्रेमाची परिक्षा गुरूंच्या कसोटीतूनच होत असते. अग्नीच्या

योगाने ज्या प्रमाणे शरिराचा दाह होत असतो. सर्व शरीर त्या योगे तीळतीळ तुटत असतें, त्याच्या संवेदना सर्व शरीरभर पसरतात त्या प्रमाणे ही प्रेमाची अंगार सर्व शरीरभर पसरावयास हवी आहे. रोम रोमी प्रेम दाटावयास हवें आहे. प्रेमाच्या अंगाऱ्याने सर्व शरीराचा दाह झाला तरी हरकत नाही. पण परमेश्वराच्या प्रेमांत गुंतलेले मन किंचितसुध्दां ढळू देणार नाही अशी वृत्ति सद्भक्तांची व्हावयास हवी आहे. अशा प्रकारे परमेश्वराविषयी प्रेम मनापासून असेल तरच उपयोग, नाही तर दुर्जन दुनिया (दुष्ट लोक) वर वर भक्ति करून लोकांना फसवितात ते जळून खाक होत असतात. वरपांगी केलेली भक्ति अथवा कामापुरतें केलेले प्रेम नाशिवंत असते. त्याचा जीवात्म्यास कांहीएक उपयोग नसतो. शिवाय या प्रेमभक्तिचा मार्ग तलवारीच्या धारेवर चालण्यासारखा अति बिकट व महत्प्रयासाचा आहे. परंतु याप्रमाणे वागणारा जो सद्भक्त असतो त्याची परमेश्वरावर निष्ठा जबर असल्यामुळे तो म्हणत असतो. 'शिर गेले अथवा शरिराचे तुकडे तुकडे झाले तरी हरकत नाही, पण हा मार्ग मी मुळीच सोडणार नाही.' अशा प्रकारे खेळणारा, वागणारा सद्भक्त अगदीच क्वचित असतो. परंतु प्रत्येकाने निश्चय करून याप्रमाणे वागण्याचा सतत प्रयत्न करावयास हवा आहे.

पंजाबमधील सिंधु नदी तीरावरील एक नावाडी सद्गुरु इमामशहांचा परमशिष्य व सद्भक्त होता. त्याचें नाव 'जीवन' असें होते. तो सिंधु नदीवर नेहमी खलाशाचा म्हणजे नावेने लोकांना पार उतरविण्याचा उद्योग करीत असें. उद्योग करीत असतांना सतत तो परमेश्वराचे व सद्गुरुंचे स्मरण करीत असे.

एकदां कांही व्यापाऱ्यांचा एक तांडा पार जाण्याकरितां त्याच्या नांवेंत बसला. नावाडी नाव वल्हवू लागला निम्मे अंतर जात असतांनाच सिंधु नदीस भराभर पाणी चढूं लागले. पाण्याच्या लाटा जोरजोराने उसळूं लागल्या क्षणार्धात सिंधु नदीने भंकर उग्र स्वरूप धारण केले. तो एक प्रकारें भव्य सागरच भासूं लागला. भयंकर लाटामुळें ती नाव इकडून तिकडे खूप हेलकावे घेऊं लागली. त्या नावेंतील व्यापाऱ्यांची तर पाचावर धारण बसली. ते नावाड्यास म्हणाले कीं, 'तूं आम्हास बुडविण्याकरीतां आणलेस काय?'

आधिदैविक तापापुढे म्हणजे अचानक ओढवलेल्या दुःसह प्रसंगापुढे तो जीवन नावाडी तरी अथवा कोणताही मनुष्यसुध्दा काय बरे करू शकणार? त्याला साहच्य करण्यास तेथे परमेश्वराशिवाय अथवा गुरुशिवाय कोण बरें येऊं शकणार होते. म्हणून तो त्यांना साहच्यास येण्याकरितां विनवूं लागला व म्हणाला, 'हे मुलतानवासी गुरो! सद्गुरु इमामशहा महाराज, हे पाणी आम्हास भयंकर ओढीत आहे. ही नाव माझ्याने

पैलतीरावर आता पोहोचू शकत नाही. आमच्यावर हे जे मोठे संकट येऊन ठेपले आहे त्याचे आपण निवारण करावें.' अशा रीतीने त्याने विनंती केल्यानंतर तो नावेतील व्यापारी लोकांस धीर देऊन म्हणू लागला, 'तुम्ही हिंमत सोडू नका, ते माझ्या विनंतीस मान देऊन आपणास तारण्याकरिता आल्याशिवाय राहणार नाहीत.'

अशा प्रकारे व्यापाऱ्यांना धीर देऊन तो परत एकचित्ताने सद्गुरुस विनवूं लागला. अशा स्थितीत ती नांव जोरजोराने हेलकावे घेऊ लागला व बुडण्याच्या बेतात आली त्यामुळें नावेंत हाहा:कार होऊ लागला. ते व्यापारी नावाड्याचा धीक्कार करून म्हणूं लागले. 'आम्हांस मारण्याचा तूं हा चांगलाच योग साधून काढलास. कांहीतरी ताबडतोब उपाय केला पाहिजे तरच आपण जीवंत राहू.' नावाड्याने नाव स्थिरावण्याची पराकाष्ठा केली, परंतु प्रचंड लाटामुळे त्याचा कांही एक टिकाव लागू शकला नाही.

अखेर हताश होऊन तो खलाशी सद्गुरुंना परत विनवू लागला, 'गुरु महाराज, आता जर तुम्ही आलांच नाहींत तर माझें जीवन तर मी या सिंधु नदीस अर्पण करीनच परंतु त्यांत माझे कांही एक न जाता आपले नाव मात्र जाईल. कारण 'शरणागतांवर कृपा करणारा' अशी तुमची ख्याती आहे.' तो अशी विनंती करीत आहे तोच नावेंत पाणी शिरूं लागले.

हा अतिशय भयानक प्रकार 'जीवन' नावाड्यास पाहवला गेला नाही. प्रयत्नाची शर्थ जाली. त्याचा धीर खचला व्यापारी लोक हाहा:कार करूं लागले व मदतीकरिता ओरडू लागला. हताश होऊन अखेर 'जीवन' आपले जीवन सिंधु नदीस अर्पण करण्यास सज्ज झाला. सद्गुरु चरणी त्याचे लक्ष स्थिर होऊन केंद्रित झाले. सद्गुरुंचे नामस्मरण करून त्याने नदीत उडी टाकली.

त्याची अशी अत्यंत करूणाजनक स्थिती बघून आणि त्याच्या निश्चयाची पराकाष्ठा पाहून, प्रेमाची परिसिमा पाहून, त्याची विनंती मनांत घेऊन, त्याची लाज राखण्याकरितां म्हणजे त्यावर आलेले परम संकट निवारण करण्याकरितां सर्वांसमक्ष सद्गुरु इमामशहा महाराज त्याच्यापुढें एकदम उभे राहिले व त्यांनी जीवनास वरचेवर उचलले. त्याबरोबर पाण्यातील नाव एकदम स्थिर झाली.

एकंदर हा सर्व प्रकार बघून सर्व व्यापाऱ्यांना महदाश्चर्य वाटले. सद्गुरु इमामशहांनी त्या नावाड्याचा हात धरून त्याला नदीतून काढून नावेवर बसविले व ते स्वत: ती नाव वल्हवू लागले. त्याबरोबर ती नाव झरझर चालूं लागली व क्षणार्धांत पैलतिरावर लागून ते सर्व नावेंतून खाली उतरले. सर्वांनी सद्गुरु चरणी नमस्कार केला.

सद्‌गुरुजींची ती किशोर मूर्ति बघून जीवन त्यांना म्हणू लागला, 'हे भवतारण कृपाळू सद्‌गुरुनाथ, हा आपला बालक अपराधी असतांनासुध्दां त्याच्यावर दया करून त्याच्या हातून झालेल्या सर्व अपराधांची क्षमा करावी. अहाहा! धन्य होय आपली कृपादृष्टी! हे परमानंद स्वरूप दयाघन, कृपानिधे, मी आपणास नमस्कार करतो!' असे गद्गदित स्वराने म्हणून सर्वासमक्ष त्याने गुरु चरणी लोटांगण घातले, व अनन्य भावाने तो त्यांची स्तुती करू लागला.

हें सारें दृश्य बघून व्यापाऱ्यांच्या हृदयास सुध्दां पाझर फुटून, त्यांनी सुध्दां वारंवार सद्‌गुरुना नमन करून अतिप्रेमानें विनवूं लागले, 'कृपाळू गुरु महाराज! आम्ही फार मोठें अपराधी आहोत. कारण आपला अनन्य भक्त असलेल्या या जीवनास आम्ही वाटेल तसें बोललो, छळलें, खरोखर आमच्यासारखे अपराधी कोणीही नाहीत. परंतु, सद्‌गुरुनाथ! आमचा एकही अपराध मनात न धरता उलट आमच्यावर कृपा करावी! धन्य धन्य गुरु महाराज!! अनंत जन्म जन्मांतरात आपली मनोभावाने सेवा करूनही न फिटणारे असे अनंत उपकार आपलें आमच्यावर घडलेले आहेत! धन्य होय आपल्या परम सद्भक्तांची की ज्याच्या सत्समागमाने आज आम्ही कृतार्थ झालों आहोंत. हे परमगुरुभक्त जीवना! झालेल्या अपराधाबद्दल आम्हाला क्षमा कर! असल्या अनेक प्रकारे विनवून वारंवार ते सद्‌गुरु चरणी नमस्कार घालू लागले.

सद्‌गुरु महाराजांनी सर्वांना क्षेमालिंगन दिले व शुभ आशिर्वाद देऊन संतुष्ट केले. तदनंतर त्यांनी जीवनास अध्यात्मिक ज्ञानाचा उपदेश करून त्यास कृतार्थ केले. त्या योगे तो परमज्ञानी झाला. तो आपल्या कर्तव्य कर्मा बरोबरच आत्मचिंतनसुध्दां करू लागला व आत्मोध्दाराबरोबरच इतरांनासुध्दां त्याने परमार्थाकडे वळविले.



# १७. नायाकाका व भाभाराम यांची अद्भुतपूर्व भेट व सद्गुरुंचा समागम.

इकडे नायाकाकाने सद्गुरु इमामशहा महाराजांच्या कृपेने ब्रह्मज्ञान संपादन केल्यानंतर घरदार व मुळेबाळें कुटुंबपरिवार सर्व सोडून ते स्वत: एकटे सद्गुरुंच्या आज्ञेप्रमाणे ब्रह्मज्ञानाचा उपदेश करण्याकरिता गांवोगांवी फिरू लागले. अशाप्रकारे ब्रह्मज्ञानाचा उपदेश करीत करीत ते चिलोत्तर जिल्हयांतील पेटलाद तालुक्यांतील वसु या गांवी जाण्यास निघाले.

'वसु' या गांवी महाकुळवान्, धनाढ्य व नीतिवान असे, केशवदास नांवाचे पाटील रहात होते. पुत्र नसल्यामुळे ते फार चिंताग्रस्त होते. पण योगायोगाने दीर्घकालानंतर त्यांना महादिव्यकांतिमान् स्वरूपवान् व परम सत्वशील मुलगा झाला, म्हणून माता-पिता फारच आनंदीत झाले. त्यांनी त्या प्रित्यर्थ मंगल उत्सव करून गोरगरीब जनतेस खूपच दान दिले व कुलीन ब्राह्मणांना आमंत्रण देऊन त्यांचे यथायोग्य पूजन करून त्यांना इच्छा भोजन दिले. त्यांनी मुलाचे 'भाभाराम' असे नांव ठेविले.

भाभारामचे योग्य वय झाल्यानंतर तो शाळेंत जाऊ लागला. थोड्याच काळात तो सर्व विद्येत पारंगत झाला. पण थोडक्यांच कालावधीत त्याचे आईवडिल निवर्तल्यामुळे त्याच्यावर मोठे दुर्दैव ओढवले. वडिलांच्या कामगिरीची सर्व जबाबदारी भाभारामवर पडली.

तो वडिलाप्रमाणे तल्लखबुध्दिचा व धार्मिक वृत्तीचा होता. त्याने 'काशी' या पवित्रक्षेत्री धर्मशाळा बांधून त्या ठिकाणी अन्नसत्र सुरु केले. त्याचें निशाण आजपर्यंत काशीक्षेत्रांत झळकत आहे. भाभाराम दररोज स्नान, संध्या, गायत्रीमंत्र वगैरे नित्यकर्म आटोपल्यानंतर मंदिरांत जाऊन तेथे 'निष्कुळानंदस्वामी' कडून ब्रह्मविद्या ग्रहण करीत होता.

एकेदिवशी स्वत: भाभाराम कांही बादशाही कामांकरिता देवा गावी गेलेला होता. नंतर देवा गांवाहून वसु गावास परत येत असतांनाच मार्गात एकेठिकाणी नायाकाकाचा व भाभारामचा मिलाप झाला.

संत महात्मा लोक वाटेल त्या स्वरूपात, वाटेल त्या स्थितीत आणि वाटेल त्या ठिकाणी जरी असले तरी त्यांचा तपोबल रूपी सुगंध लोपून राहात नाही. जसा सूर्य प्रकाश प्रत्येक छिद्राछिद्रामधून बाहेर पडून सर्वदूर पसरतो. तो ज्या प्रमाणे



बाल भाभारामची मंदीर व देवभक्तीविषयी बालक्रिडा पाहून मातापित्यास वाटणारा विस्मय



१. भाभारामच्या पित्याचे व मातेचे निर्गमन.
२. भाभारामची सांसारिक उदासिनता.
३. रोहिणीदेवीचे निर्गमन.
४. भाभारामचा गृहत्याग व वैराग्य धारण.

झाकला जात नाही. त्याप्रमाणे सत्पुरुषाची ख्याति सर्वदूर पसरते. त्यास कोणत्याही प्रकारे विलंब लागू शकत नाही व ती झाकली जात नाही. ज्याप्रमाणे कोणी कस्तुरी वाटेल तेथे व वाटेल तशी लपविली तरी तिचा सुगंध लोपू शकत नाही. तो लपविता येत नाही, तद्वतच सत्पुरुषाचा तपोबलरूपी सुगंध लोपू शकत नाही. तो अनायासेच प्रगट होत असतो.

नायाकाका तर प्रत्यक्ष सृष्टिगुरुंच्या-सतगुरुंच्या संयोगाने केवळ परमपदास पावलेला एक महान पवित्र प्रेमी पुरुष बनलेला असल्यामुळे व भाभाराम यास रस्त्यांत एकाएकी अशा अजाण्या परंतु महा प्रेमळ मूर्तिचे अचानक दर्शन झाल्यामुळे त्याचे अंत:करण एकदम भरून आले आणि तो एकदम चमकला; आणि ज्यांच्याशी आपला फारच फार गाढ संबंध असावा, असा एखादा आपला सहवासी मित्र आपणास सोडून दूरदेशी निघून गेल्यामुळे त्याचा वियोग अगदी असह्य झालेला असून तो वियोग आपल्या हृदयांत सारखा सलत असावा, अशा आपल्या परम मित्राची अचानक-मनी मानशी कल्पना नसतांना एकदम अशी रस्त्यांत भेट व्हावी, तेव्हां जसें आपले प्रेम उमाळून येतें अगदी त्याचप्रमाणे भाभारामचे हृदय अपार प्रेम भावनेने भरून आलें.

भाभारामने एकदम आपली स्वारी उभी करून वाहानाखाली तो उतरला, आणि नायाकाकाशीं हस्तांदोलन करून कुशलक्षेम विचारले. त्यांनी नायाकाकास विचारलें की, 'आपण कोण आहांत? कोठे राहातात? कोठे जावयाचे आहे? आपले आगमन येथे कशासाठी झालेले आहे? हे सारे सांगण्याची आपण कृपा करावी.'

नायाकाका तर स्वत: एक अवधूतां प्रमाणे अति निर्मलचित्त, शान्तवदन, हास्यवदन, धीरवान आणि पूर्णज्ञानी होते. त्यांनी हळू हळू आपली हकीकत भाभाराम यांस सुगम रीतीने सांगण्यास सुरवात केली. ते म्हणाले, -

'हे राजन्! मी एक परदेशांतील पांथस्थ आहे. प्रथम तर मी मार्ग चुकून अतिक्रूर व अघोर अशा भयंकर मार्गाने चालत होतो. परंतु आज कलीयुगांत श्री सद्गुरु महाब्रह्माचा प्रत्यक्ष प्रगट अवतार; त्यांचे दर्शन झाल्यामुळे आणि त्यांचा समागम झाल्यांमुळे आज मला माझ्या पूर्व जन्माची सर्वतोपरी संपूर्ण माहिती झाल्यामुळे मी शुध्द व सरळ मार्गावर येऊन थडकलो आहे. त्याचप्रमाणे आपणांस पण कित्येक गोष्टी सांगण्यास व कित्येक गोष्टीचा खुलासा करण्यास मी आलेलो आहे.

त्यावेळी भाभारामने नायाकाकांची विनंती करून व त्यांचा हात धरून आपल्या स्वत:च्या वाहानावर बसविले व घरी आणून एका महालांत त्यांची राहाण्याची व्यवस्था केली.

पुष्कळ दिवस पर्यंत ज्ञानचर्चा झाल्यानंतर हळुहळु नाथाकाकांनी भाभाराम यास सद्गुरु इमामशहाकडून प्राप्त झालेल्या ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला. नायाकाकाने भाभारामच्या मनांत आलेल्या सर्व शंका कुशंकांचे निरसन केले व त्यास परमज्ञानी केले. त्यास आत्मतत्वाची जाणीव करून दिली व आत्मानुभवाचा परब्रह्माच्या दर्शनाचा परम अधिकारी बनविले.

भाभारामच्या मनात एकसारखी जिज्ञासा निर्माण होऊं लागली कीं, आपण पूर्व जन्मी कोण असावे? कोणत्या महद्भाग्यें करून आपणास अशा अपरिमीत सद्भक्ताचा समागम घडला? अशाप्रकारची तिव्र जिज्ञासा निर्माण झाल्यामुळे त्यांनी नायाकाकांस एक प्रश्न विचारला.

भाभाराम म्हणाले, 'हे महात्मन् पूर्वजन्मी मी कोण असेन? माझी अशी पुण्यें ती काय असतील की महानपुण्यवान् अशा सद्भक्तांची सेवा करण्याचें भाग्य मला प्राप्त झाले आहे.

नायाकाका म्हणालें, 'राजन् मनुष्याच्या एखाद्या जन्माचा कर्मविपाक बाकी राहिला असतो तो भोगण्या करितांच परमात्मा त्या जीवास इहलोकी उत्तमस्थानी जन्म देतो, श्रध्दावान असूनही आत्मा व ब्रह्म यांचे ऐक्य प्राप्त करण्याच्या कार्यास जे अपूर्ण राहातात, ज्याच्या वैराग्य वासना तीव्र झालेल्या नाहीत व ज्यांच्या भोगवासनांचा सर्वांशी लय झाला नाही असे जीव योगभ्रष्ट होऊनही दुर्गतीस न पावता आपल्या पुण्याच्या योगाने प्राप्त केलेल्या लोकांत जाऊन, ज्या भोगवासनांचे बीज त्यांच्या अंगात राहिले असतें. त्या भोगवासना भोगण्यास ते इहलोकी जन्म धारण करतात. त्या भोगवासनांचे फळ भोगता भोगताच त्यास अकस्मात् वैराग्य उत्पन्न होते. सत् असत्‌ची भिन्नता कळून येते. तेव्हां ते संसारास तुच्छ समजून त्याचा त्याग करतात अथवा त्यात निर्लेप राहून वागतात आणि अंति आपल्या जन्मांचे सार्थक करून घेतात. भ्रष्ट योगी एखाद्या धर्मशील विद्वानाच्या घरी, प्रवित्र श्रीमानाच्या घरी किंवा योगसंपन्न पुरुषाच्या घरी जन्म घेतो. प्रथम तर तो भोग भोगण्यांतच लीन राहातो पण आकस्मित त्याच्या भोगेच्छेची तृप्ती होऊन जाते आणि ज्ञान संपादन करून तो ज्ञान-योग साधून जीवन्मुक्त होऊन विदेह मुक्त होतो. अशा पैकीच आपण एक भ्रष्टयोगी आहांत व आपली योगसाधना पूर्ण करण्याकरिता या लोकी जन्मलेले आहांत.'

भाभाराम - 'महाराज! जीवन्मुक्त व विदेहमुक्त यांत भेद काय आहे? कृपा करून ते मला सांगा.'

नायाकाका - 'हे मोक्षपदाच्या परम अधिकारी गुरुबंधु! जीवन्मुक्त मनुष्याचें लक्षण आहे की, तो जीवन तर यथास्थीत नीतीनियम युक्त जगतो. परंतु त्यांतून अलिप्तासारखा असतो. बाहेरून वृत्तीसहित असतो परंतु आंतून निवृत्त असतो. जीवन्मुक्त असेच समजतो कीं, जग भ्रांतीच्या योगाने विलक्षण भासत आहे पण ते माझेच स्वरूप आहे. मी व जगत् कांही भिन्न नाही. तो जेथे पाहातो तेथे त्यास परमात्मत्वच दिसते तो स्वस्वरूपच पाहातो. त्यामुळे तो जगताची मौज भोगतो पण ज्ञानाच्या योगाने जीवन्मुक्त आपलें मानलेले जगताचे सुख मौज क्षुल्लक मानतो कल्पित मानतो. ते कल्पित सुख भोगण्यांत तो निस्पृह राहतो पण स्वस्वरूपात तर तो दृढच राहातो. विदेहमुक्तांचे तसे नसते त्यास भेद दृष्टीच्या योगानें भय व्यापून टाकते व जगतांतील सुख दु:खस्वरूप भासल्यामुळे तो त्या पासून दूरच राहतो. तो दु:खरूप जगतास ओळखून त्याकडे दृष्टीच करीत नाही. तो आंतून व बाहेरून निवृत्त असतो. विदेहमुक्ताचे साधन गमावून साध्यच सिध्द केले असते. अर्थात् दहा इंद्रिये व अंत:करण यांच्या समुदाययुक्त नाशवंत शरीररूप साधनांच्या योगाने स्वरूपानुसंधान करण्यास समर्थ होता येते. ती कल्पित साधने विदेहमुक्तास नसल्यासारखी आहेत व जीवन्मुक्तांची ती साधने अप्रत्यक्ष कायम राहून ती स्वस्वरुपानुसंधान करवितात, त्यामुळे तो कल्पित सुखाचा अप्रत्यक्ष उपभोग घेतो. विदेहयुक्त हठबळाने व जीवन्मुक्त युक्तिने परम पदाची प्राप्ति करून घेतो.

हा विषय स्पष्टपणे तुझ्या हृदयांत ठसविण्यासाठी एक दृष्टांत देतो. आंधळा व डोळस दोघे एका ठिकाणी बसले आहेत त्यांच्या जवळ चालत असलेले गायन ते दोघे ऐकत आहेत. परंतु डोळस डोळ्यांनी पाहून आनंद भोगतो. आंधळा तो आनंद भोगीत नाही पण अंतर्वृत्तीने अनुभवच घेतो सुख तर दोघांस समान असते पण आंधळा गाणाराच्या मोहकपणापासून किंवा नजिक होत असलेल्या गडबडीपासून निर्भय असतो. त्यास चोरादिकांचे भय नसते, मारणारांचे भय नसते, सौंदर्यांच्या मोहकपणाचे भय नसते, कारण की तो कांही डोळस नसतो. त्यामुळें निर्भय असतो. पण डोळसास सौंदर्य, चोर व मारणारा पाहून तत्काळ भय वाटते. जरी भय अप्रत्यक्ष असलें तरी ते वाटतेच. या प्रमाणे डोळसास जसा अप्रत्यक्ष आनंद असतो तसाच साधनाच्या योगाने भयाचाही संभव असतो. आंधळ्यात अप्रत्यक्ष सुखाचाही व भयाचाही संभव नाही. हा डोळस म्हणजे जीवन्मुक्त व आंधळा म्हणजे विदेहमुक्त. जीवन्मुक्त साधन सिध्दीत ढिला पडला तर त्यास जन्म भोगावा लागतो. विदेह मुक्ताची साधना हठमय असल्यामुळे त्यास ढांसळून पडण्याचें भयच उत्पन्न होत नाही.'

भाभाराम - 'हे महात्मन्! माझ्या अनंत जन्मांच्या पुण्यराशी खरोखर आज फळास आलेल्या दिसतात. आपणासारख्या भवतारक गुरुतुल्यबंधुच्या समागमाचा अलभ्यलाभ मला माझ्या महद्भाग्येकरूनच लाभलेला आहे. आपण महत्पदाचें अधिकारी आहां, न समजण्यासारख्याही गोष्टी समजत आहांत, त्यामुळे माझ्या मनांत जी शंका आहे तीचे समाधान करा. 'परम मोक्ष कसे प्राप्त होईल मोक्षाचे लक्षण काय? मुक्तात्मा कोणत्या गतीस पावतो? हे तुम्ही मला सांगा.'

नायाकाका - 'अहो मुमुक्षु गुरुबंधू! मी महात्मा नाही, ज्ञानी नाही. पण कर्माची फळे भोगणारा क्षुल्लक प्राणी होतो. महात्मा तर आपण आहांत! पण ज्याप्रमाणें चिखलांत पडलेले रत्न स्वच्छ पाण्याने धुतल्यावाचून त्याचा प्रकाश प्रकट होत नाही. त्याप्रमाणेच तुम्हीही उपाधीरूपी चिखलात पडलेले असल्यामुळे तुमचे चिदानंद स्वरूप पाहू शकत नाही. आपले प्रारब्ध व पुरुषार्थ सफळ आहेत असे मला वाटते. तुम्ही जो प्रश्न विचारला तो अति गुढ, गूढातही गुढतत्वाच्या तत्वासारखा आहे व त्याचे उत्तर देणे हे माझ्या ज्ञानाच्या बाहेर आहे. जेथे ऋषीमुनींचीही गति पोहचू शकली नाही तेथे माझ्यासारख्या तत्वज्ञानरहित क्षुल्लकाची काय कथा? तथापि अपरिमीत कृपासागर अशा सद्गुरु महाराज्यांच्या कृपाप्रसादाने तुमचा थोडा संशय छेदन करतो.

जो सूक्ष्म, अविज्ञेय, अव्यक्त, अचल ध्रुव, इंद्रियांचा समुह विषयमात्र व भूतापासून रहित आहे तोच सर्व प्राण्यांचा अंतरात्मा-परमपुरुष परमात्मापुराणपुरुष परमेश होय. त्यास क्षेत्रज्ञ म्हणतात, त्यासच त्रिगुणापासून मुक्त पुरुषही म्हणतात. व तो कांही कारणरूप कल्पिलेला निष्क्रियात्मा सदसदात्मक होय. तोच पूजनास, वंदनास, उपासनेस, ओळखण्यास, पाहाण्यांस योग आहे. तद्रूपापेक्षा कोणी श्रेष्ठ नाही. त्याच्या रूपात विलीन होणे हे मोक्ष होय. पंचप्राण दशेंद्रिये मन व बुध्दिपासून जो मुक्त आहे, सत्वादि तीन गुणापासून जो मुक्त आहे, पापकर्म किंवा पुण्यकर्मापासून जो मुक्त आहे त्याच पुरुषास मोक्ष प्राप्ती होते. तोच मुक्त होय. चिदात्माच मुक्ताची गति होय. आद्यमूर्तीत मुक्तात्म्याचा प्रवेश होऊन भेदाचा सर्वांशी लय होऊन जाणे हीच मुक्तात्म्याची गती होय. ज्या पुरुषाने हात, पाय, उदर व उपस्थ इंद्रीयांचे संरक्षण केले आहे. निषिध्द कर्मांचे आचरण केले नाही, जे आचरण केले नाही त्याचा अभिमान धरला नाही जो समान दृष्टीवान् आहे. अंत:करणातील सात्विक वृत्ती जीस चरमावृत्ति म्हणतात तीत मग्न आहे निर्मळ बुध्दीचा आहे व सदैव त्या परमात्मा-अंतरात्मा-नारायण परमपुरुषास शरण आहे. तोच या गतीस पावतो हे स्वरूप श्वेतद्विपात वास करते तेथील मुक्तात्मा स्थुलदेहरहित असतात, इंद्रियभोग रहित असतात, चेष्टारहित असतात, शुद्र सत्वशील असतात, तेजस्वी असतात, त्यामुळे ते यत्किंचीतही



१. पद्मरेखा अप्सरेवर मोहित होऊन योगी करूणानंदाचा तपोभंग.
२. योगी अडभंगनाथांचा करूणानंदास उपदेश.
३. भाभाराम रोहिणीचा विवाह.
४. भाभाराम रोहिणीचे सुखी गृहस्थजीवन.



सद्भक्त युवक हरिरायची उज्जैन येथील महाकाळेश्वराच्या मंदीरात तपश्चर्या व करूणामूर्ति बहिणीकडून त्याची सेवा.

द्वैतभाव युक्त जीवांच्या दृष्टीस पडत नाहीत. ह्या पेक्षाही श्रेष्ठ ती परम घन:श्याममूर्ती परम तेज:पुंज होय. ती ह्या मुक्तात्म्यांनीच वेष्टित असते व ती मुक्तात्म्याशिवाय दुसऱ्या कोणास तीचे दर्शन करता येइल अशी नाही. श्वेतद्विपांत राहिलेल्या (राहिलेल्या असे म्हटले आहे ते असत्यवचन आहे. कारण की ती तर सर्वांच्या ठायी आहे, पण श्वेतद्विपात ती साक्षात आहे. याच श्वेतद्विपांतून परब्रह्माचा दहावा अवतार श्री निकलंकी नारायण स्वत:स्वयंसिध्द प्रगट होऊन श्वेत घोड्यावर स्वार होऊन हाती तीन धारेचे दिव्य खड्ग-तलवार-शस्त्र घेऊन, मानवांतून निर्माण झालेल्या दानवांचा आणि कालिंगाराक्षसाचा संहार करणार आहे. अशी आगमवाणी सद्‌गुरु इमामशहांनी कथन केलेली असल्यामुळे परमेश्वर साक्षात् स्वरूपाने श्वेतद्विपात आहे असे म्हटलेले आहे. तद्वत श्वेतद्विप हे महाविष्णू नारायणाचे निवासस्थान आहे अशी अनंत शास्त्रे ग्वाही देतात) त्या दिव्यमूर्तीच्या प्रकाशाचे तेज कोट्यान कोटी सूर्यांच्या तेजापेक्षाही विशेष असल्यामुळे ती उत्कट ब्रह्ममूर्ती कशा स्वरूपाची आहे हे वर्णन करता येण्यासारखे नाही. पण तुमच्या कल्पनेत येईल त्यापेक्षा ती पर आहे. त्या ब्रह्माचे दर्शन करून घ्यावयाचे असेल तर आपणास प्रत्यक्ष सद्‌गुरु महाराजांचाच समागम व्हावयास हवा.'

नायाकाकांची अमृततुल्य वाणी ऐकून भाभारामचे मन उचंबळून आले. भावनावश होऊन त्यांनी नाया महाराजांचे पाय घट्ट धरले व दृढतेने म्हणाले, 'महाराज! ज्यांच्या कृपाप्रसादे करून आपणास हे दिव्यज्ञान प्राप्त झाले त्या महात्मापुरुषाचें अपार चरित्र मला सांगावे. ज्या सत्पुरुषांचे अपार वचनामृत प्राशन केल्याने अज्ञ मानव परमपदाचे अधिकारी होतात अशा सद्‌गुणखाणी परमयोगी महात्म्यांचेआपण मला दर्शन करून द्यावे.'

नायाकाकांनी सद्‌गुरुंचा भाभाराम यास थोडक्यात परिचय करून दिला व इमामशहा महाराजाकडून प्राप्त झालेल्या अंतर्ज्ञानाच्या योगे जाणून भाभाराम यास त्याच्या पूर्व जन्माची जाणीव करून दिली. तेव्हा भाभारामने अतिप्रेमानें त्यांच्या चरणी नमस्कार केला. नायाकाकांनी सद्‌गुरुंचे स्मरण करून त्याच्या शिरावर आपला हात ठेवला. त्याबरोबर भाभारामलाआपल्या पूर्व जन्माची स्मृति झाली व त्याने सर्व रहस्य जाणून घेतले. त्यास सद्‌गुरुदर्शनाची तीव्र इच्छा निर्माण झाली. त्याचे हृदय एकदम धडपडू लागले. शरीरांत कंप निर्माण झाला. तो नायाकाकांस अत्यन्त कळवळून सांगू लागला.

'महाराज! पूज्य गुरुजीसमोर या अपराध्याला घेऊन चला. परंतु त्याच्या समोर जाण्यास मला लाज वाटत आहे, कारण कीं, ज्यांच्या कृपाप्रसादेकरून मी स्वर्गादि लोकांची दिव्यसुखे उपभोगली व ज्यांच्या कृपाशिर्वादाने मी हल्ली उत्तम प्रकारच्या मनुष्य जातीत जन्मलो आहे; त्यांची पूजा अथवा सेवा माझ्या हातून आजपर्यंत

किंचित् सुध्दां घडली नाही, मी माझ्या दुष्ट कार्यातच रत राहीलों आणि त्यांच्या नामाची किंचित् सुध्दां भावना माझ्या मनांत शिरकाव करू शकली नाही. मी या मिथ्या मायेंत फसून सत्यमार्गाला अगर्दीच सोडून दिले आहे. खरोखर त्यांचे माझ्यावर किती-किती उपकार झाले आहेत म्हणून वर्णू.! परंतु या त्यांच्या महदुपकाराची परतफेड म्हणजे त्यांची सेवा सुध्दां माझ्या हातून घडली नाही, किती मी कृतघ्न बनलो।। म्हणून त्यांच्या समोर जाऊन त्यांना कसे बरें हें तोंड दाखवू? मला अत्यंत शरम वाटत आहे कीं मी कशाकरितां जन्मास आलेलो आहे आणि कोणत्या कार्यांत मग्न झालेलों आहे. सद्‌गुरुंना दिलेल्या वचनाचे यत्किंचितहि मला भान राहिले नाही. खरोखरच माझ्या सारखा अभागी पुरुष दुसरा कोणीही नाही. हे माझ्या प्रियबंधु, हे सुमित्र! मी तुला शरण आलेलो आहे. माझा उध्दार कर! माझ्यावर कृपा कर! मला आपल्या चरणी ठाव दे. मला हे दु:ख अगर्दी असह्य होत आहे. त्याच्या ज्वाला मला फार ताप देत आहेत. त्यापासून मला वाचवा!! मला वाचवा!!

भाभारामची ही मनस्थिती बघून नायाकाका त्यास म्हणाले, ‘हे राजन्। शान्त व्हा. इतके अधीर होऊ नका. अधीरवान होण्याचे कारणच नाही, माऊली, प्रेमळ धीरवान आहेत, किंचित सुध्दां रागवत नाहीत. हे राजन् तुम्ही तरी पवित्र व धर्मकार्य आहांत, मी किती तरीअधर्मकर्म करणारा, दोषयुक्त, पापी, नीच होतो; परंतु केवळ त्यांच्या दर्शनाने पवित्र झालो तर आपण सुध्दां सर्व प्रकारची शंका कुशंका सोडून त्यांच्याजवळ चला, ते आपलाच काय परंतु कोणाचाच अव्हेर करीत नाहीत.’

इकडे सद्‌गुरु इमामशहा महाराज अेसवार गांवी १५ दिवसपर्यंत राहून तेथील लोकांना सत्-ज्ञानाचा उपदेश करून ते जुनागड शहरी आले. पुढे घोघा मुक्कामी येऊन त्यांनतर मही नदी पार उतरून त्यांनी खंबायत येथे प्रयाण केले. बराच काळ खंबायत येथे राहिल्यानंतर ते बडोदे मुक्कामी राहून धर्मोपदेश करून देवा गांवी आलेले होते. ही हकीकत नायाकाकाने अंतर्ज्ञानाने जाणलेली होती. गुरुजी देवा गांवी मुक्कामी असतांना नायाकाका, भाभाराम यास म्हणाले, ‘हे राजन् तुम्हास जर गुरुजींची भेट घ्यावयाची असेल तर या जवळच असलेल्या देवा गांवी त्यांचा मुक्काम आहे.’ ही आश्चर्यकारक हकीकत ऐकून भाभाराम विस्मित झाले व आनंदीत होऊन गुरुजींच्या दर्शनास उत्सुक झाले. नंतर ते दोघे देवास जावयास निघाले.

गुरुजींच्या मुक्कामाच्या ठिकाणी जाऊन बघतात तो त्रिकाळदर्शी, महाकृपाळु अंतर्यामी सद्‌गुरु महाराज त्यांना घेण्याकरितां समोरून येत असतांना त्यांना दिसले. हे बघताच नायाकाका अति हर्षित होऊन प्रसन्न चित्ताने सद्‌गुरुंच्या चरणीं लागले.

नंतर भाभारामने सुध्दां पूर्ण नम्रतेने त्यांच्या चरणी शिर नमवून अत्यादरभावाने त्यांना प्रणाम केला. सद्गुरुंनी त्यांना त्यांचे हात धरून अतिशय प्रेमाने हृदयाशी लावलें.

सद्गुरु महाराजांनी भाभाराम यास मोक्षपदाचें ज्ञान सविस्तर रीतीने निवेदन केले व त्यास परम ज्ञानी बनविले. त्यायोगे भाभारामचे मन स्थिर होऊन ते अतिप्रेमाने परमात्म स्वरूपी लीन झले. त्या नंतर ते सद्गुरुंची आज्ञा घेऊन तपश्चर्या करण्याकरिता वनात निघून गेले. इकडे नायाकाकासुध्दां सद्गुरुंची आज्ञा घेऊन सत्-ज्ञानाचा अन्य जनास उपदेश करण्या करिता निघून गेले.

★ ★ ★

# १८. सत्समागमाचा अपार महिमा.

अघौघं प्राचीनं विघटति पुण्यं प्रथयति।
प्रसूते सद्बुध्दिं नवनवकला पल्लवयति॥
हरत्यज्ञानान्ध्यं दिशति परमानंदपदवी
सतां संगः कल्पद्रुम इव न किंकिं वितनुते॥

सत्पुरूषांचा संग कल्पवृक्षाप्रमाणे होय. तो काय करीत नाही? तो पापांच्या पुरातन राशीचा नाश करतो, सद्बुध्दि देतो, नव्यानव्या कलांचा विस्तार करतो, अज्ञानरूपी अंधःकाराचा नाश करतो आणि परमानंदाची पदवी देतो.

देवा गांवाहून सद्गुरू इमामशहा महाराज गांवो गांवी सत्पंथाचा उपदेश करीत, अज्ञ जनास परमार्थाचा मार्ग दाखवित असह्य कष्ट सहन करीत, दुःखितांचे दुःख निवारण करीत करीत अमदाबाद शहरात येऊन पोहोचले व एका ठिकाणी त्यांनी आपला तंबु ठोकला.

त्या सुमारास अमदाबाद शहरांत पुष्कळच सत्वगुण संपन्न व ज्ञानी पीर म्हणजे फकीर राहात होते त्या सर्वांच्या कानी ही वार्ता गेली की सर्वांची मनीषा पूर्ण करणारे असे गुरू इमामशहा या ठिकाणी आलेलें आहेत.

पूर्वी त्यांच्या ऐकण्यात होतें की इमामशहा हे, 'जागतीज्योत' आहेत अशा सत्पुरूषापुढें आपला टिकाव लागणे शक्य नाही. हे या ठिकाणी वास्तव्य करू शकणार नाहींत असा काहीतरी उपाय करावा. असा त्या सर्व पीरानी फकीरांनी मनसुबा करून ते एकत्रीत गोळा झाले व एकमेक निरनिराळे उपाय सुचवूं लागले.

त्यांनी विचार केला कीं, त्यांना आपणाविषयी संशय येणार नाही असा काही तरी बुध्दिबळ चालवून उपाय करावा. कारण, इमामशहा हे त्रिकाळदर्शी व ब्रह्मस्वरूप

असल्यामुळे, तसेच त्याची बुध्दि अनुपम असल्यामुळे आपण गुप्तरीतीने केलेली सर्व हकीकत युक्ति ते आपोआप कोणी न सांगता जाणू शकतील.' म्हणून त्या सर्व फकिरांनी सर्वतोपरी विचार करून एक युक्ति शोधून काढली.

त्यांनी एक काचेचा पेला घेऊन त्यांत थोडासाही धक्का लागल्यास किंवा थोडीसुध्दां हालचाल झाल्यास त्यांतील दूध खाली सांडले जाईल, अशा रीतीने तो दुधाने भरलेला प्याला त्यांनी एका इसमाजवळ देऊन त्यास इमामशहाजवळ घेऊन जाण्यास सांगितले. तो मनुष्य अगदी जपून हळू हळू चालून तो प्याला सद्गुरुजवळ घेऊन आला.

त्या मनुष्याच्या हातांतील पेल्याकडे बघून अंतदर्शि मनांत समजून गेले की आपण या ठिकाणी राहू नये. म्हणून ह्या सर्वांचा एक विचार झालेला आहे. आणि या कारणाकरितांच त्यांनी हा उपाय योजलेला दिसत आहे. तेव्हा गुरुजी हाजरबेग यास म्हणालें की, -

'यात आपणास भाग घ्यावयाचा नाही. त्यांच्या या युक्तिस उत्तर असेच पाठवावें कीं ज्या योगे कोणाच्याही मनास दुःख होणार नाही. कोणत्याही प्रकारे त्यांचा द्वेष अथवा त्यांची अडवणूक आपणास करावयाची नाही. ज्यायोगे ते आनंदीत होतील असेच त्यांना उत्तर द्यावे.

खरा सत्व गुणी, तत्वज्ञानी किंवा ब्रह्मज्ञानी जो असेल तो कधीही आपल्या गुणाबद्दल गर्व करीत नाही. गर्वरहित पणाने तो जर वागेल तर त्याचेच गुण जगतांत गायिले जातात. तोच उच्च पदास - उर्ध्वगतीस पोहोचतो.

गुरुजींची आज्ञा होताच गुणी हाजरबेग अतिहर्षभरित चित्ताने उठून उभा राहिला. गुरुजींनी त्यास काहीं फुलें आणण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्याने पांढरीशुभ्र अशी ५/६ मोठी व सुगंधित फुले तोडून आणली. ती फुले गुरुजींनी त्या कांठोकाठ दुधाने भरलेल्या पेल्यांत टाकली. तेव्हा पेल्यातील दुध अगदी स्थिरच्या स्थिरच राहिले, एक बुंद सुध्दां खाली सांडला गेला नाही. तेव्हा सद्गुरु म्हणाले की आपल्या प्रश्नाचे उत्तर तयार झाले.

नंतर ज्या मनुष्याने तो दुधाचा पेला आणलेला होता त्याच्या जवळ तो पेला परत देऊन इमामशहा महाराजांनी त्यास सांगितले की 'त्या एकत्रीत जमलेल्या पीराजवळ हा पेला घेऊन जा व त्या सर्वांना माझा दोनहि हात जोडून नमस्कार सांगावा.' सद्गुरुंची आज्ञा शिरसावंद्य मानून तो मनुष्य पेला घेऊन ज्या ठिकाणी ते सर्व पीर बसले होते त्या ठिकाणी आला.

उत्तर ऐकण्याकरीता सर्व पीर अगदी उत्सुक झालेले होते. त्याने तो पेला सर्व पीरासमक्ष खाली ठेवला व सांगितले की इमामशहा महाराजांनी दोनहि हात जोऊन सर्वांना नमस्कार सांगितलेला आहे.'

दुधाने भरलेला पेला पाहिल्यावर त्यांना असे आढळून आले की पेला दुधाने कांठोकाठ तर भरलेला आहेच पण शिवाय त्यांत ५/६ फुले सुध्दां टाकलेली आहेत. ती फुले कांठाकांठाने लागलेली असूनही त्यांच्यायोगाने दुधाचा एक थेंबसुध्दां खाली सांडला गेलेला दिसत नाही. हा चमत्कार पाहून सारे जण आश्चर्याने थक्क होऊन गेले.

ते सर्व पीर जाणते असल्यामुळे समजून गेले की, 'ज्या प्रमाणे फुलांमुळे या कांठोकांठ भरलेल्या पेल्यातील दूध थोडे सुध्दां सांडले गेले नाही; म्हणजे त्यात कोणत्याही प्रकारचा विकार झाला नाही. त्याचप्रमाणे मी तुमच्यात राहिल्याने तुम्हास कोणत्याही प्रकारे दुःख त्रास किंवा विकार उत्पन्न होणार नाही तर मिळून मिसळूनच मी तुमच्यामध्ये राहिल असे इमामशहांचे मत आहे.

जेव्हां तो दुधाचा प्याला त्या सर्व पीरांनी आपल्या दृष्टीने पाहिला तेव्हा ते सर्व अगदी हर्षोत्फुल्ल झाले. त्यामुळे त्यांचे सारे कष्ट नाहिसे झाले. त्यांना वाटावयास लागले की 'हे कोणी तरी अवतारी पुरुष असून कांही तरी विशेष कामाकरितांच अवतरलेले आहेत असे वाटते. तर आपण सर्वांनी त्यांना भेटण्याकरितां जावे.' असा त्यांनी विचार केला आणि ते सर्व मिळून गुरुजी ज्या ठिकाणी मुक्कामास होते त्या ठिकाणी येऊन सद्गुरुंना वारंवार नमस्कार करूं लागले. त्यांचे कुशलक्षेम विचारून कूळ वगैरेचा तपास केला तेव्हा सद्गुरुंनी आपला सर्व वृत्तांन्त मोठ्या नम्रतेने व आनंदाने सांगितला. गुरुजींची ती अमृततुल्य वाणी ऐकून ते सर्व आनंदित होऊन शांतचित्ताने उठून आपापल्या घरी जाण्यास निघाले. गुरुजींनी त्या सर्वांस एक दिवस राहण्याचा आग्रह केला व भोजन केल्यानंतरच घरी जावे असें सर्वास सांगितले. त्या सर्वांनीसुध्दां अतिप्रेमाने त्यांचे आमंत्रण स्विकारलें.

गुरुजींनी अमदाबाद येथून निघून जावें कारण त्यांच्यापुढे आपला कांही एक टिकाव लागणार नाही म्हणून इमामशहांचा ते द्वेष करूं लागले होते, परंतु सद्गुरुंचे असे दिव्य प्रेम दिसून आल्यामुळे त्या सर्व पीरांच्या मनांतील द्वेष भावना सर्वस्वी निर्मूलन झाल्या. कारण गुरुजींच्या ठिकाणी त्यांना ब्रह्मस्वरूपाची सर्व लक्षणे दिसून आल्याने कोणतीहि उणीव ते काढू शकले नाहीत. त्यांना ते पूर्णत्वांस पावलेल्या ज्ञानाच्या बत्तीस लक्षणांनी युक्त व विकाररहित म्हणजे निर्लेप निर्विकार एवंगुणविशिष्ट दिसून आले तसेच गुरुजींनी त्या सर्व पीरांची भोजनांची अपूर्व तयारी करून आदरभावाने

जेवण झाल्यावर त्यांनी गुरुजींचे मन:पूर्वक आभार मानले. अशा तऱ्हेने गुरुजींनी त्यांची व्यवस्था केल्यामुळे त्यांच्या मनांतील गुरुजीविषयीचा वैरभाव कायमचा नाहिसा झाला. इमामशहांनी त्यांना पान सुपारी वगैरे देऊन ते निरोप देण्याकरितां उठले व एकमेकास प्रेमाने भेटून सर्व पीर घरी जाण्यास निघाले.

हा वर वर्णिलेला निर्वैरतेचा प्रकार कशामुळे घडून आला तर सत्समागमामुळेंच कारण, संतमहात्म्यांच्या समागमामुळेच काय, पण केवळ त्यांच्या अवलोकनाने सुध्दा मोठ मोठे क्रूर प्राणी आपला क्रूरपणा पार विसरून जातात! अशा प्रकारच्या पुष्कळशा गोष्टी आपण शास्त्रांतून ऐकतो कीं, मोठमोठे क्रूर हिंसक प्राणी आणि लहानसहान निरूपद्रवी प्राणी म्हणजे मोर-सर्प, उंदीर-मांजर, हत्ती-सिंह, हरिण-वाघ, पोपट-श्येन (बाज-ससाणा), कावळा-घुबड वगैरे वगैरे सर्व पशुपक्षी प्राणी एकत्रित संतमहात्म्यांच्या समोर बसलेले असतात. त्यांचा सर्व आश्रम प्रगाढ शांततेने व निर्वैरतेने भरलेला असतो तेथे सर्व दूर शांतीचे व प्रेमाचे साम्राज्य पसरलेले असते. हा सर्व सत्समागमाचाच परिणाम होय. सत्समागमामुळे सुख उपजते व त्यापासून दूर राहिल्याने दु:ख निपजते. सत्समागमाच्या अभावी मनुष्य आंधळा बनतो म्हणजे अज्ञानी राहून कुकर्मास कुमार्गास लागून आपले अमोल जीवन गमावून आवागमनाच्या लक्षचौर्यायशींच्या फेऱ्यांत पडून भयंकर यातना भोगतो. महाभारतांत सांगितले आहे की,-

**'यदि सन्तं सेवति यद्यसन्तं तपस्विनं यदि वा स्तेनमेव।**
**वासो यथा रंगवशं प्रयाति तथा स तेषां वशमभ्युपैति॥'**

ज्याप्रमाणे वस्त्र रंगाच्या संगाने रंगाच्या आधीन होत असते. त्याप्रमाणे मनुष्य जर सत्पुरुषांची सेवा करील तर तो सत्पुरुषासारखा होतो. जर दुर्जनाची सेवा करील तर त्याचा सारखा होतो. तपस्व्याची सेवा करील तर तपस्व्यासारखा होतो. किंवा चोराची सेवा करील तर चोरासारखा होतो. यावरून मनुष्य ज्या गुणाच्या माणसाची संगत करील तसल्याप्रकारचे त्यास वळण लागते म्हणून दुर्लभ अशा या मनुष्य जन्माचे साफल्य जर करून घ्यावयाचे असेल तर सत्संगासारखे दुसरे सुलभ साधन नाही.

सत्समागमाचे माहात्म्य फार मोठे असून सत्पुरुषांच्या सहवासाने जीवाची सर्व पापे समूळ नाश पावतात, सर्व दु:खांचा नायनाट होतो, जन्ममरणाचा फेरा चुकतो आणि जीवात्म्यास चिरशांति, चिरकाल शाश्वत सुखाची प्राप्ति होते; हे सत्संग झाल्याशिवाय समजून येत नाही. सत्संगाच्या माहात्म्याविषयी पुराणांत एक कथा प्रसिध्द आहे ती थोडक्यांत अशी कीं,-

पूर्वी एकदा सर्व ब्रह्मर्षि, देवर्षि, संतमहात्मा पुरुष व सर्वदेवादिकांनी एकत्र जमून एक ताजवा म्हणजे तराजु उभा केला व त्यांत सत्संगादिकांच्या सुखाची तुलना करूं लागले. एका पारड्यांत एक क्षणभरच्या सत्संगाचे सुख म्हणजे सत्संगाचे फलरूपी सुख घातले आणि दुसऱ्या पारड्यात मृत्युलोकांतील सर्व सुखे ठेवली, परंतु सत्संगाचें पारडे यत्किंचितहि वर उचलले गेले नाही. तेव्हा स्वर्गलोकांतील सर्व सुखे त्या समोरच्या पारड्यांतील मृत्युलोकांच्या सुखांत मिसळली तरीही सत्संगांचे पारडें थोडेसुध्दां वर उचलले गेले नाही. त्या नंतर सर्वांनी पाताळ लोकांतील सर्व सुखे त्या पारड्यात घातली पण व्यर्थ. तेव्हा दुर्लभ असे मोक्षाचे सुख देखील त्यांनी त्या सर्व सुखाबरोबर मिसळले तरी देखील ती सर्व सुखे सत्संगाच्या सुखाबरोबर झाली नाहीत. हे बघून सर्व मंडळी सत्संगाची प्रशंसा करू लागली. यावरून सत्संगाचा महिमा किती अगाध आहे हे समजून आले.

परंतु ही घटना प्रत्यक्ष पाहूनसुध्दां नारदमुनीचे मन साशंक झाले ते विष्णु लोकाप्रत जाऊन भगवंतास साष्टांग नमस्कार पूर्वक प्रार्थना करून सत्संग सुखाच्या तुळेसंबंधी सर्व हकीकत निवेदन करून म्हणाले, 'हे जगनियंत्या, सत् संगाचे एवढे माहात्म्य कसे असेल?

भगवान नारदास म्हणाले, 'हे देवर्षि, भूलोकांतील ब्रह्मारण्यांत सरस्वती नदीचे तीरावर एका शमीवृक्षाच्या पोकळीत राहात असलेला एक सरडा तुम्हाला सत्संगाचे माहात्म्य निवेदन करील.'

ताबडतोब नारदमुनी ब्रह्मारण्यांत गेले. तेथे सरस्वती नदीच्या तीरावरील शमी वृक्षाच्या पोकळीत एक सरडा छिद्रांतून बाहेर तोंड काढून जणू काही नारदमुनीच्या आगमनाची वाट पहात असावा, असा त्यांना बसलेला दिसला. थोडावेळ नारदमुनी व तो सरडा एकमेकांकडे पाहात राहिले.

नंतर नारदमुनींनी त्यास विचारले कीं, 'अरे सरड्या, भगवंताच्या आज्ञेवरून मी तुला सत्संगाचे माहात्म्य विचारीत आहे. तर ते तूं मला सांगावे?' तेव्हा 'भगवंताच्या आज्ञेवरून...' हे एवढेच शब्द त्या सरड्याच्या कानी पडताच तो पोकळीतून बाहेर आला व नारदमुनींच्या चरणाजवळ तडफड तडफड करीत एका क्षणांत मरण पावला.'

त्या सरड्याची अशी विचित्र स्थिती पाहून नारदमुनि घाबरले व भगवंताजवळ जाऊन सांगु लागले कीं, 'मला पाहाताबरोबर तो सरडा तर मरण पावला. तर मग हेंच कां सत्संगाचे महात्म्य! आज भगवंतांनी सत्संगाचे यथार्थ महात्म्य मला सांगितलेंच पाहिजे.'

भगवान नारदमुनीस सत्संगाचे महात्म्य सांगू लागले कीं, 'अहो मुनिवर! सत म्हणजे श्रेष्ठ, सनातन परिपूर्ण अशा परमात्म्यास जो परायण असेल - जाणणारा असेल तो सुध्दां 'सत्' शब्दानें ओळखला जातो. तर तशा सत्पुरुषाचा संग म्हणजे भेट अथवा सहवास होणे. यास सत्संग म्हणतात. ज्याप्रमाणे अंधारात चाचपडत असलेल्या माणसास दीपरूप सत्पदार्थांचा संग झाला असता अंध:काररूप महदापत्ति नष्ट होते, त्याप्रमाणे सत्पुरुषाचा संग झाला असतांना भवदु:खरूप महदापत्ति समूळ नष्ट होऊन जाते. तो पुण्यवान सरडा कांही महद अपराधामुळे अशा अधम योनीत जन्म घेऊन वासनादु:ख भोगीत होता, परंतु तुमच्या सारख्या सत्पुरुषाचा संग तर राहिलाच पण केवळ दर्शनाने सर्व पापापासून मुक्त होऊन तो परमपदास पावला. हेच सत्संगाचे माहात्म्य होय.'

सत्संगाच्या योगाने दुष्ट पुरुषहि सत्वगुणी आणि साधु बनतात. सत्संगाच्या योगाने पापी जनही पुण्यवान व पवित्र होतात. सत्संगाच्या योगाने मुर्ख पुरुषहि पंडित होऊन जातो; बुध्दीची जडता नाहिशी होते. वाणीच्या ठायी सत्याचे सिंचन होते. उन्नति प्राप्त होते, पाप नाहिसें होतें, चित्तास प्रसन्नता येते, कीर्ति प्राप्त होते, कुमतीचा नाश होतो व सर्व प्राण्यांच्या प्रेमास मनुष्य पात्र होतो. अहों! सत्संगाच्या योगाने काय काय होत नाही?

सत्समागमाच्या योगाने अविद्या नष्ट होऊन सद्विद्या प्राप्त होते. सत्संगाच्या योगाने सद्गुरुच्या चरणकमलांचा आश्रय मिळतो आणि मानवी प्राण्यांस परमउच्च जे मोक्षपद तें प्राप्त होते. अनेक साधनापेक्षा ज्ञान हे मोक्षाचे परम साधन होय. अग्निशिवाय पाक तयार होत नाही, त्याप्रमाणें ज्ञानाशिवाय मोक्ष मिळत नाही. ज्ञान प्राप्तीचे द्वार सत्संग होय व सत्संग हे सर्व शुभ साधनांचे मूळ आहे; वैराग्याचा मार्ग आहे. भगवत्प्राप्तीचे द्वार आहे व मोक्षाची शिडी आहे, त्याविषयी जेवढे सांगावे तेवढे थोडेच आहे.

अशारीतीने त्या अमदाबाद शहरांतील सर्व पीरांच्या मनांत इमामशहा विषयी असलेले वैर-द्वेषभाव सद्गुरुंच्या समागमाने नष्ट झाले. म्हणून सत्संगाचा महिमा जेवढा वर्णावा तेवढा थोडाच आहे. गुरुजींचा असा अलौकिक महिमा ऐकून मोठमोठें महात्मे त्यांच्या दर्शनास येऊं लागले; पुष्कळसे रंजले-गांजलेले पीडीत लोक दु:ख निवारण करण्याकरिता झुंडीच्या झुंडी येऊन व्याधिमुक्त होऊन जाऊं लागले. कित्येक यति, सति, संन्यासी लोक त्यांचे दर्शनार्थ येऊन विविध प्रकारे शास्त्र चर्चा करून आनंदाच्या भरांत डुलत असत व सद्गुरुंचा जयजयकार करीत असत.

★ ★ ★

# १९. सद्गुरुंचे खाण्डव वनांतून प्रयाण व हरिण श्रावकावर दया.

तदनंतर गुरुजी कोचरब या गांवी आले. तेथे ते एक वर्षपर्यंत राहिले. इतक्या काळांत त्यांनी तेथील व त्याच्या आजुबाजुच्या गांवामधील कित्येक लोकांना तत्वज्ञानाचा म्हणजे ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला.

नंतर तेथून निघाल्यावर पुढे गुरुजींनी खंडी वनात प्रवेश केला. हे अरण्य अगदी दाट होते. आणि तेथे सर्व प्रकारचे प्राणी राहात होते. तेथे अनेकविध वनस्पति वाढलेल्या होत्या. उंच उंच झाडावर हिरव्यागार वेली चौफेर पसरलेल्या होत्या. त्यावर अनेकविध बहुरंगी फुले उमललेली होती. मंद मंद सुशीतल वायुच्या झुळकेने वेली इकडून तिकडे डोलत होत्या, त्यायोगे वनाची शोभा विशेषच रम्य दिसत होती. जिकडे तिकडे फुलेंच फुलें उधळली होती. त्यामुळे वाऱ्याच्या मंद झुळकेने येणारा सुगंध मनास आल्हादित करीत होता. तशात निरनिराळ्या पक्षांचा विविध कलरव मनाला अधिकच उल्हसित करीत होता.

अशा त्या अपार नयनरम्य वनांत एक लहानसें तळें शोभा पावत होते. त्या तळ्याच्या कांठावर सद्गुरु इमामशहा महाराज आपला परमशिष्य हाजरबेग यासह आपल्या गाडीवर बसून आले. हाजरबेगने तळ्याच्या शेजारीच असलेल्या एका घनदाट छायेच्या भव्य वृक्षाखाली गाडी सोडली.

तेथें स्नान, संध्या, जप, ध्यान वगैरे केल्यानंतर गुरुजी सहज बसले असतां एकदम एक हरीणाचे पिलू अतिशय चपळ गतीने पळत पळत गुरुजीजवळ आले. ते गुरुजीच्या समोर अगदी शेजारी उभे राहिले. त्या पाडसाचे सर्वांग शाहारले होते व सर्व शरीर थरथरत होत. अतिशय भीतीमुळे ते पाडस गर्भगळीत झाल्यासारखे दिसत होते आणि सद्गुरुंना जणू भीतीयुक्त करण्याविषयी याचना करीत असावे असे त्याच्या एकंदर स्थितीवरून समजून येत होते.

सद्गुरुंनी हळूच त्या पाडसाच्या अंगावर प्रेमाने हात फिरविला आणि त्यास कुरवाळून धीर दिला तेव्हां जणूं कांही मायेची पाखरच आपल्या अंगावर घातली गेली असे त्यास वाटू लागले.

इतक्यांत तेथे एक अक्राळ विक्राळ असा वनराज सिंह येऊन ठेपला. सर्वांना बघून तो सिंह अति आनंदाने मेघगर्जना करूं लागला व मोठमोठ्याने शेपटी जमिनीवर आपटू लागला. परत ते पाडस भीतीमुळे तडफडू लागले आणि त्यास वाटूं लागले की आतां मात्र आपणा सर्वांचा फडशा उडेल.. हळूं हळूं तो सिंह गुरुजी जवळ येऊं लागला. त्यामुळे हाजरबेगला सुध्दां अतिशय भीती वाटूं लागली. तिकडे आम्रवृक्षाखाली बांधलेले बैल सुध्दां तडफड तडफड करूं लागले परंतु तेथे एक चमत्कार घडून आला.

तो सिंह सद्गुरुजवळ गेला तो त्यांना मारण्याकरितां नव्हे; तर त्यांच्या जवळ जाऊन तो नम्र भावाने उभा राहिला. सद्गुरुंनी त्यास आशिर्वाद देण्याकरितां हात वर उचलला आणि एक क्षणाचाही विलंब न लावतां तो वनराज तेथून दुसरीकडे निघून गेला.

हा सर्व प्रकार बघून हाजरबेग यास अतिशय आश्चर्य वाटले व सद्गुरुचरणी त्याने अतिप्रेमाने साष्टांग प्रणाम घातला. गुरुजींचा असा प्रताप बघून ते पाडस सुध्दां त्यांच्या चरणी लोळूं लागले. गुरुजींनी त्याच्यावर दया करून त्यास निर्भय केले.



# २०. पीराण्यास सद्गुरुंच्या परमशिष्यांचे आगमन व त्यांना सद्गुरुंनी केलेला ब्रह्मोपदेश.

कालांतराने सद्गुरुंनी उभारलेले मंदिराचे भव्य बांधकाम सर्व पूर्ण झाले. गुरुजींनीआपल्या मंदिराचे बांधकाम ज्या ठिकाणी केले ते ठिकाण त्यांनी बसविल्यामुळे त्यास "पीराणा" हे नांव पडले. गुरुजींनीं आपले वडिल वारल्यानंतरचा आपला देश पर्यटनाचा उद्योग जवळ जवळ येथेच संपविला व ते पीराणा येथे कायमचे स्थाईक झाले. पीराणा हे अहमदाबाद पासून दक्षिणेकडे १४ मैल आहे; साबरमती नदीच्या पूर्व काठापासून २ मैल; विराट म्हणजे धोलका गांवापासून उत्तरेकडे १४ मैल अंतरावर आहे. त्यासच 'कुंवारीकाक्षेत्र' 'हीमपूर', 'इमामपूर,' 'निकलंकीचे धाम,' 'छेल्लो आखाडो' सुध्दा म्हणतात.

चिलोत्तर जिल्हयातील पेटलाद तालुक्यांतील देवा या गांवी सद्गुरु श्री इमामशहांची व आपला परममित्र व शिवाय गुरुबंधु श्री भाभाराम यांची आज्ञा घेऊन श्री नायाकाका सत्पंथाचा उपदेश करण्याकरितां निघाले होते. ते सन्मार्गाचा, सध्दर्माचा देशोदेशी व गांवोगांवी उपदेश करीत करीत खूपच लांब निघून गेले. जरी ते खूप लांब निघून गेले होते तरी सद्गुरु श्री इमामशहाबाबा कडून प्राप्त झालेल्या अंतर्ज्ञानाच्या योगाने त्या सर्वांच्या हकीकती ते पूर्णपणे जाणीत असत. देशाटन करण्यास व उपदेश करण्यास फार लांब मुदत म्हणजे २४-२५ वर्षे निघून गेल्यामुळे त्यांना गुरुजीची व भाभारामाची भेट घेण्याची इच्छा झाली. त्याप्रमाणे ते परत येण्याच्या मार्गास लागले.

मजल दर मजल मुक्काम करीत करीत ते चिलोत्तर जिल्हयांतील पेटलाद तालुक्यांत येऊन पोहोचले व भाभाराम ज्याठिकाणी तपश्चर्या करण्याकरितां गेले होते त्याठिकाणी ते जाण्यास निघाले. ते ठिकाण देवा गांवच्या अगदी नजीकच होते. तेथे भाभाराम यांनी सतत २४ वर्षे फार खडतर तपश्चर्या केली. तपश्चर्येने त्यांचे शरीर जरी कृश झाले होते तरी त्याचे तेज अप्रतिम असें होतं. त्यांची तपश्चर्या चालू असतांना त्यांची बहिण कीकीबाई जी केवळ सद्गुरुंच्या दर्शनाने परम पावन झालेली होती त्यांची सेवा चाकरी करून त्यांच्या तपश्चर्येचा मार्ग सुलभ करीत असे व ती स्वत:सुध्दां नेहमी सद्गुरु व परमेश्वर भक्तीत मग्न रहात असे. अशा प्रकारे तपश्चर्या करीत असतांना २४ वर्षे कसे निघून गेले हे त्यांना समजले सुध्दा नाही.

नंतर एके दिवशी ते सहज एका झाडाखाली बसले असतां त्यांच्या मनात सद्गुरुंच्या दर्शनाकरीता जाण्याचा विचार आला. इतक्यांत त्यांना दुरुन कोणीतरी व्यक्ति आपणाकडे येत असल्याचे दिसून आले ती एखाद्या दिव्य विभुतीप्रमाणे असलेली व्यक्ति कोणबरे असावी असा ते विचार करूं लागले. तोच त्यांना आपल्या योगबळाच्या सामर्थ्याने सारे समजून गेले व एकां क्षणाचाही विलंब न लावता ते ताबडतोब आपल्या जागेवरून उठले व त्या व्यक्तिकडे धावत गेले. त्या व्यक्तिनेसुध्दा भाभाराम यासमोठ्या प्रेमाने हृदयाशी लावले. वाचकहो, ती व्यक्ति कोण असावी हे तुम्ही अगदी बिनचूक ओळखले असेलच. ती व्यक्ति दुसरी तिसरी कोणी नसून ते नायाकाकाच होते. ते उभयता मोठ्या आनंदावेशाने परस्परांच्या भुजात भुज घालून एकमेकास बिलगले व प्रेमाश्रूंनी परस्परांची अंगे भिजवून टाकू लागले.

प्रिय वाचकहो, त्यावेळेस त्या दोघांचे हृदय कशा स्थितीत असेल त्याचे यथार्थ वर्णन करण्यास माझ्या अंगी असावी तेवढी शक्ति नाही. ईश्वरी सामर्थ्याने येवढेच फक्त सांगता येते की त्यांना आपलेपणाचेही भान राहिले नाही. त्यांची मनेहि बहुदा एकच होऊन गेली होती असे वाटते. मने एक झाल्यावर आत्मा एक होण्यास काय उशीर? मध्ये फक्त चर्मदेहांचा थोडासा अडथळा राहात होता; परंतु अलौकिक प्रेमभावाने ते एकरूपच झालेले होते. ह्या गोष्टीचे रहस्य शून्य, दंभी, क्रूर, स्वार्थी, कपटी, आपलपोटी, अभिमानी, द्वेषी, दुष्ट व निच आणि पापी हृदयाची मनुष्यें स्वप्नातही समजू शकत नाही. शकणारही नाहीत. भाग्यच कोठून असेल की समजतील? निष्पाप व सरळ शुध्द अंत:करणाची मनुष्ये - ज्यांच्या ठायी भगवत्कृपेने प्रेमरसाचा अंश तरीअसेल तसे रसिकच ब्रह्मवेत्तेच फक्त या रसाचे मर्म समजतात.

प्रेम ही मानवी प्राण्यास ईश्वराने दिलेली एक महत्तम देणगी होय. ह्या प्रेमाच्याच योगे अधिकारी, अप्रतीम, दिव्य, शुध्द प्रेमभावनेने भक्ति करून परमेश्वरास साध्य करता येते. प्रेम भावानेच परमेश्वराशी आत्मपणाचे नाते जुळवून त्याचे आकलन करता येते. प्रेम हेच सर्वरस सर्वब्रह्म जाणण्याचे साधन होय! प्रेमातच ब्रह्म आहे प्रेमांत सर्वांचा वास आहे ते अद्वैत आहे. ऐक्याचे सत्य आहे. आणि तेच खरे अखंडद्वैत सच्चिदानंदघन ब्रह्मस्वरूप होय!!! अशा तऱ्हेचे प्रेम या जगांत सापडावयाचे नाही आणि अशा प्रेमाचे मानवी बुध्दीला आकलन वर्णन करता येणार नाही. या ब्रह्मस्वरूपांत ते दोघे थोडावेळ का होईना परंतु अद्वैत ऐक्य भावाने तत्स्वरूपी मिळून गेले. ते जरी शरीराने दोन दिसत होते तरी मनाने व आत्म्याने तर एकच होते.

थोड्या वेळानंतर भानावर येऊन भाभाराम नायाकाकास आपल्या नेहमी तपश्चर्येस बसण्याच्या ठिकाणी घेऊन आले व मोठ्या प्रेमाने त्यांनी व त्यांची बहीण कीकीबाईनी



सद्‌गुरु इमामशाह महाराज आपल्या सर्व प्रेमी शिष्यास दिव्य ज्ञानोपदेश करीत आहेत.

त्यांचा आदर सत्कार केला. नंतर थोडा वेळ सर्वांचा वार्तालाप होऊन ते दोघे नायाकाकास म्हणाले की, महाराज, आम्हाला परमपूज्य सद्गुरु महाराजांचे दर्शन घ्यावयाचे आहे.

नायाकाका म्हणाले, 'एकाक्षणाचाही विलंब न लावता आपण त्या मार्गास लागावे.' असें म्हणून ते तिघे जण तेथून उठून चालू लागले. सद्गुरु नामाचा जयघोष करीत करीत व परमेश्वरांचे नाम संकीर्तन व स्तुती करीत करीत त्यांनी पीराण्याचा रस्ता धरला.

रस्त्याने नायाकाकांनी भाभाराम व कीकीबाईस पुष्कळच ज्ञानपर व उपदेशपर गोष्टी सांगितल्या. अशाप्रकारे उपदेश व वार्तालाप करीत करीत; देवाची चरित्रें, धर्म कथा व भक्ति, ज्ञान, वैराग्य वगैरेच्या दृष्टांत व सिध्दांन्तांचे कथन, महात्मा नायाकाकाच्या मुखातून श्रवण करीत करीत व आपणांस या अलभ्य सत्समागमामुळें कृतार्थ मानीत ती दोघें बहिण-भाऊ त्या महात्म्याची तन मनाने सेवा करीत करीत पिराणा गांवच्या आसपास जाऊन पोहोंचली. त्या वेळी नायाकाका या दोघाकडे बघून त्यांना म्हणाले,

'प्रिय गुरुबंधू व भगिनी, श्री गुरु महाराजांच्या धामाचे हें मुख्यद्वार आलेले आहे. आपण आता नम्र भाव स्वीकारून पूज्य गुरुजी समोर, त्यांच्या नावाचा जयघोष करीत व त्यांची स्तुति करीत आंत प्रवेश केला पाहिजे. कारण शिष्य या नात्याने आपण आपले कर्तव्य बजावले पाहिजे.'

असे सांगून नायाकाका व ते दोघे जण गुरुजींची स्तुति करीत आंत जाऊं लागले. तोच त्रिकाळदर्शी, महाकृपाळू प्रेमळ अंतर्यामी सद्गुरु महाराज त्यांना घेण्याकरीतां सामोरे आलेले त्यांना दिसले. ते पाहून नायाकाका अति हर्षित होऊन, जवळ जाऊन त्यांच्या चरणी लागले. त्यानंतर भाभाराम आणि कीकीबाई सुध्दा अतिनम्रतेने सद्गुरुंच्या चरणी लागले. सद्गुरुंनी सर्वांना आशिर्वाद पूर्वक आपल्या हाताने उठवून मोठ्या प्रेमाने सर्वांना हृदयाशी कवटाळले. गुरुजीबरोबर त्यांचा परम सेवक हाजरबेग सुध्दां होता. सद्गुरुंनी त्यास सांगितले कीं, भाभाराम व कीकीबाई व नायाकाका या सर्वांना पूर्ण विश्रांती घेण्यास एकांत स्थळी घेऊन जा, त्यांना चालण्यामुळे अतिशय थकवा आलेला आहे. त्यांची तू चांगल्या प्रकारे सेवा कर. असे सांगताच हाजरबेग आनंदाने सेवा करण्यास तत्पर झाला.

ज्यावेळेस भाभारामने आणि कीकीबाईने सद्गुरुंचे दर्शन घेतले तेव्हा त्यांचा आनंद गगनात मावेना. ते अत्यानंदाने हर्षवेडे झाले. ज्याप्रमाणे एखाद्या लंगड्यास पाय मिळावा, आंधळ्यास दृष्टी यावी. रोग्यास सुख व्हावे, किंवा मृतास जीवन

प्राप्त व्हावें, त्या प्रमाणे त्यांच्या हर्षास कोणत्याही प्रकारची सीमा नव्हती. त्यांना विश्रांतीचीहि आवश्यकता नव्हती. त्यांचा सर्व थकवा केवळ सद्गुरुंच्या दर्शनाने पार नाहिसा झालेला होता. परंतु केवळ सद्गुरुंच्या आग्रहास्तव त्यांनी एक दिवस विश्रांती घेतली.

तदनंतर दुसऱ्या दिवसापासून गुरुजींनी त्या सर्वांना ब्रह्मज्ञानाचा उपदेश करण्यास सुरुवात केली. भाभारामनेहि त्या वेळेस आलेल्या सर्व शंकांचे गुरुजनांकडून निरसन करून घेतले व सद्गुरुंनीसुध्दां त्यांच्या सर्व प्रकारच्या संशयाचे निराकरण केले. सद्गुरु महाराजांनी कृपा करून सर्व शिष्यास आपल्या सन्मुख बसविले. मग पूर्णानंद पूर्ण पुरुषोत्तम सर्वेश्वर अशा व्यापक परब्रह्मांचे ध्यान स्मरण करून मंगलाचरण करून त्या परब्रह्माची प्राप्ती होण्यासाठी सर्वोत्तम प्रकारचे कथन करण्यास आरंभ केला. प्रथम प्रत्येक मनुष्य प्राण्यास जन्माबरोबरच अत्यावश्यक कर्तव्य काय आहे ते सांगितले. मग मायेच्या सर्व पदार्थांचा मनांतून त्याग करून मनास भगवंताचे अनन्य शरणागत करावे, असा सिध्दांत सांगितला. हे मन अदृश्य अशा व सर्वांत व्यापक असून गूढ पण सर्व शक्तिमंत भगवंतास अनन्य भावाने सदासर्वदा शरण कसें राहिल व मायेच्या पदार्थापासून विरक्त कसें होईल, ही गोष्ट सर्वांत कठीण असल्यामुळे व त्वरीत ध्यानात उतरण्यासारखी नसल्यामुळें तिचे विस्तार पूर्वक पृथ:करण करून ते आपल्या शिष्यास सांगू लागले. माया कोण, तिचा विस्तार, तिचा छळ, जीव कोण, आत्मा हा काय, त्याची सत्ता किती, परमात्मा कोण, त्यास कसे ओळखावे त्यासाठी काय काय साधनें केली पाहिजेत, जीवाची सेना, जीवाचा स्वभाव, जीवाचे मायिक व अमायिक बल, बलाबलामुळे जीवाची पराधीनता, परमात्म्याचे शोधन-ज्ञान, त्याचा निर्लेपपणा शुध्दता, त्याचे सामर्थ्य साम्राज्य, तत्त्वबल, मनुष्याचें मूर्खत्व, सत्संगाचें महत्व, चैतन्य प्राप्तीसाठी शरीर आणि हृदयाचे रक्षण; मायिक व निर्मायिक पदार्थ, परलोक, मृत्यु, जीवाचा अखंडपणा, प्राणचेतना, चैतन्यकला, यममार्ग, मायेच्या वियोगाने होत असलेली मायिक जीवास दु:खे, अभिमानाचा नीचपणा, सुख दु:ख इत्यादिचे वर्णन करण्याच्या रूपाने ज्ञानाची आवश्यकता समजाऊन देऊन मग मनुष्याचे मन व मनोवृत्ती, भगवंतरूप मण्याच्या स्पर्शाने व घर्षणाने कशारीतीने सुवर्णरूप कराव्या त्याचा प्रकार, फार स्पष्ट व असंख्य दृष्टांत देऊन व सिध्दान्तांनी स्पष्ट करून त्यास समजावून दिला.

सद्गुरु महाराजाच्या अपूर्व समागमाने व त्यांच्या उपदेशामृताच्या योगाने त्यांचे सर्व सेवक मोक्षपदाचे परम अधिकारी झालेले होते. परंतु सत् तत्वांचे कीतीही पारायण केले तरीही तो विषय अति गहन असल्यामुळे व सामान्यबुध्दि मानवास तत्काळ

आकलन करण्यासारखा नसल्यामुळें आपल्या मनांत पूर्णपणे तो बिंबावा-ठसावा म्हणून पुन: पुन: ते तत्वज्ञान श्रवण करावे या उद्देशाने जीवनमुक्त दशेस प्राप्त झालेल्या भाभारामने सद्गुरु महाराजांना प्रश्न रुपाने विचारण्यास सुरुवात केली. सद्गुरु महाराजांनी देखील त्यांच्या सर्व प्रश्नांचे सर्वांना समजेल अशा सुगम व सविस्तर रीतीने विवरण केले.

भाभाराम - 'महाराज! ब्रह्मवेत्ता कोणास म्हणावे?'

सद्गुरु इमामशहा महाराज - 'प्रिय सद्भक्त! जो मनुष्य सर्व प्रकारचा अहंकार सोडून सबंध भूत प्राणिमात्रांत ते ब्रह्म स्वयं साक्षीरूपाने व्यापलेले आहे असे जाणतो. 'एकमेवाद्वितीयंनास्ति' (परमेश्वर एकच आहे त्यावाचून अन्य कांहीही नाही) 'एकोदेव: सर्वभूतेषु गूढा' (एकच परमेश्वर सर्व भूतप्राणिमात्रांत गूढतेने व्यापलेला आहे), 'अणुरेणुमहतोमहीयां' (तो परमेश्वर अणु परमाणुहून अतिसूक्ष्म असून महदाकाशाहूनही अति महान आहे.) ह्या श्रुतिवचनांचा ज्याने दृढतेने अनुभव घेतला आणि ज्यास त्या वचनाप्रमाणें प्रत्यय घडला जाणिव झाली की मी तो पूर्ण आत्मा आहे. मी अच्युत आहे अनंत आहे, मी देह नाही. मी इंद्रियस्वरूप नाही तर त्याहून म्हणजे देहेंद्रियाहून अतित असून केवळ नित्य शुध्द, क्षराक्षरातीत अज, अव्यय, सर्वज्ञ, अवस्थात्रयाहून भिन्न, जीवशीवांचा साक्षीरूप पूर्ण ब्रह्म आहे. मी जन्मतही नाही व मरतही नाही. नित्य शाश्वत आनंदरूप असून मी पंचकोशाहून वेगळा, षडविकार रहित, त्रिविध अहंकार रहित त्यांचा नाश करणारा व जितेन्द्रीय मी आहे याची जाणीवच काय पण हे तत्व ज्याचे प्रत्यक्ष कृतीतून उतरले, जीवन जगत असतांना जो ह्या तत्वानुसार वागू लागला. (नुसते सांगणे वा ऐकणे नव्हे) तो पुरुष ब्रह्मवेत्ता गणला जातो.'

भाभाराम - सद्गुरुनाथ! या ब्रम्हांडात एकवीस स्वर्गावर आणि सप्तपाताळाखाली आणि मध्यभागी ओत प्रोत भरलेली अशी कोणती वस्तु आहे की ती सर्वव्यापक, सर्वांतरी असून सर्वाहून भिन्न आहे अशीही जाणवीली जाते? महाराज या माझ्या शंकेचे आपणाकडूनच समाधान होईल अशी मला खात्री झाल्यामुळे या बालकाचं अज्ञान खंडन करावे.

सद्गुरु महाराज - शाबास भाभाराम धन्य धन्य आहेस तूं! खरा मुमुक्षु आहेस तूं. आतां मी तुझ्या शंकेचे निरसन करतो. तूं शांत चित्ताने श्रवण कर. एकवीस स्वर्गाच्या वर आणि सप्त पाताळांच्या खालीं आणि त्यांचा मध्यभागीच काय परंतु जेथें आपल्या मनाचीही गती चालणार नाही अशा गहन ठिकाणी सुध्दा सर्वत्रअद्वय निरंजन चिन्मात्र आनंदघन रूप ब्रह्म ओत प्रोत सामावलेले आहे. ते कसे म्हणाल,

तर ज्याप्रमाणें पाण्यामध्ये एखादी गार पडावी म्हणजे त्या गारेच्या अंतरबाहेर मध्यें पाणीच राहते किंवा समुद्रामध्ये मीठ पडावे म्हणजे सर्व एकरूपच होऊन जाते. मातीचे न भाजलेले कच्चे भांडे पाण्याने विरले म्हणजे मातिरूप होऊन जाते. त्याप्रमाणे वर, खाली, मध्ये, सर्वत्र चिन्मात्र निरंजन सच्चिदानंदघनब्रह्म आहे; परंतु हे म्हणणे सुध्दां त्यातच विरून जाते. ज्याप्रमाणे एक थोरली मोठी शिळा फोडून तीचे लहान लहान दगड केले. कांही दगडांच्या साहाय्यानें अनेक प्रकारची घरें, मंदिरे, गोपुरे, भींति वगैरे बांधली, कांही दगडाच्या मूर्ति घडल्या, अशा प्रकारे भिन्न भिन्न प्रकारच्या जरी आकृत्या भासल्या तरी मुळांतून तो एकच दगड असतो. त्यामध्ये कोणत्याही प्रकारचा विकार द्वैतभेद असूं शकत नाही. हवेच्या चंचळत्वाने सागराच्या पृष्ठावर जरी नानाप्रकारचे स्पंद लहरी तरंग दिसले तरी तो सर्व एकच जलनिधी आहे. एखादा मोठ्या प्रमाणाचा बर्फाचा तुकडा घेऊन एखादा लहान मुलगा त्या बर्फाशी खेळूं लागला. प्रथम त्याने त्या बर्फाचा खडा थोडासा कोरून त्यांत पाणी भरले. थोड्या वेळाने त्यास तहान लागली. त्याने बर्फातील पाणी पिऊन आपली तृष्णा भागविली तेव्हां तो म्हणतो अबब! केवढे थंडगार हे पाणी जणुकांही बर्फच! तेव्हा त्या मुलास एका शहाण्या मनुष्याने सांगावे, बाबारे! बर्फ आणि पाणी हे एकच आहे, त्यात काय फरक आहे कापसाच्या अगर रेशिमाच्या अनंत उभ्या आडव्या धाग्यांनी मिळून एक आकृति निर्माण होते तीला पट किंवा वस्त्र म्हणतात. वस्त्र म्हटले म्हणजे त्या धाग्यांना तेथे नामाभिधान उरत नाही. तव्दत ब्रह्म हे सर्वत्र व्यापून राहिलेले असूनसुध्दां अनाम निरंजन पूर्ण ब्रह्म सनातन भिन्नत्वास येत नाही.

भाभाराम - महाराज! ' पूर्ण सनातन ब्रह्म असे जर आहे तर सर्वांच्या जाणिवेस ते का येऊ शकत नाही?'

सद्गुरु महाराज - हे मुमुक्षु! जीवांच्या अन्यान्य कर्मगतीच्या योगाने प्राप्त झालेल्या भ्रांतिमुळे व मायेच्या आवरणाच्या योगाने निर्माण झालेल्या भ्रमामुळे जीवात्म्यास अंधारांत दोरावर ज्याप्रमाणे सर्पाचा भास व्हावा, खांबावर चोराचा भास व्हावा, पळसाच्या लालबुंद फुले व हिरव्यागार पानांच्या योगाने पोपटाचा भास व्हावा, शिंपल्याच्या चकचकीत भागावर रूप्याचा भास व्हावा तद्वत ब्रह्मावर मायेच्या योगाने मिथ्या भास होत असतो. आपल्या भ्रांतीचे निरसन झाले म्हणजे त्या त्या वस्तु आपणास सहज दिसू लागतात. चकचकीत आरशावर ज्या प्रमाणे अतिशय धूळ बसून तो मलिन व्हावा अथवा चकाकणाऱ्या लोखंडावर ज्याप्रमाणे गंज चढावा, त्यायोगे आपले प्रतिबिंब त्यांत उमटू शकत नाही, त्याप्रमाणें जीवात्म्याच्या मनावर ही मायेची धूळ पसरल्यामुळे तो आपल्या मूळ स्वरूपास पाहू शकत नाही. जाणू शकत नाही. ती धूळ दूर केली म्हणजे त्यास आपले मूळ स्वरूप बघता येईल. आपल्या मनावरील मायारूप

भ्रांतीच्या आवरणांचे निवारण सद्गुरु कडून करून घेतले म्हणजे एकमेव सद्ब्रह्म सर्वत्र व्यापलेले आपणास समजून येईल. सूर्य उगवल्यावर ज्याप्रमाणे समईची आवश्यकता राहात नाही. किंवा जव्हेरी ज्या प्रमाणे रत्न खड्यांची परिक्षा करून रत्न फक्त ठेवतो गारगोटी फेकून देतो, त्याच प्रमाणे जो जीवात्मा सद्गुरुंचा कृपाप्रसाद प्राप्त झालेल्या शुध्द ज्ञानाप्रमाणे वागतो, सदैव तसे क्रियाचरण करतो तोच ब्रह्मविद् म्हटला जातो व त्याच सद्भक्ताचा महिमा वेदसुध्दा वर्णन करीत असतात.

भाभाराम - ' अपार दयानिधे सद्गुरु महाराज ! तूंच आमचा माता, ताता, स्त्रष्टा, उध्दर्ता, गुरु असल्यामुळे हा बालक आपणाकडून आणखी एका गोष्टीचें समाधान करू इच्छितो. सद्गुरुनाथ ! ब्रह्म कसे समजावे ?

सद्गुरु महाराज - ' हे ब्रह्मविद् बालक ! ऐक,

"आत्माराम तमे अविगत सेवो। सर्वही भूत निवासी हो॥"
"ब्रह्मा बालक तमे ब्रह्म पछानो। तो वेदवीना अर्थ ना सुझे॥"
"-पुंजसो तो पामसो संसारमध्ये सोयजी।
प्रगट आत्मा स्वामी मारा पुजाना फल जोयजी॥"

हे नामरूपधारी भाभाराम ! 'सदेव सौम्येदमग्र आसात्' हे शान्त गुणि ! सृष्टी होण्यापूर्वी हे जगत सत्‌रुपच ब्रह्मरुपच होते. हे ब्रह्म ते तूं आहेस (तत्वमसि) पण ज्यांच्या हृदयावर गुरु कृपाकटाक्ष पडलें नाहीत, ज्यांच्या मनांत अद्वैताचा उदय झाला नाही अशा हतभागी जिवास हे मिथ्या जगत सत्य भासते व त्यासच मरणाचे भय व्यापते. जो ब्रह्म आहे त्यास मरणे काय व जन्मणे काय ? कांहीच नाही. जो 'मी' व 'हे' ह्या दोहोंचा प्रकाशीत बुध्दिने त्याग करतो. त्यास ह्या विश्वांत राहिला असताही सर्व द्वैतरहित दिसते. स्थूल देहात वासकरीत असलेला जीवात्मा; पंचमहाभूतें, पंचतत्वें, पंचकोश व ज्ञानाचे विषय या सर्वांपासून भिन्न होय. जो सर्वांपासून भिन्न आहे तोच परमात्मा होय. ज्या प्रमाणे मंदिरांत असलेला दिवा मूर्ति, भक्त, भिंती, पडदे, पूजासाहित्य वगैरेवर सारखा प्रकाश पाडतो त्याचप्रमाणे अखिल ब्रह्मांडांत तोच प्रभु प्रकाशित करतो. हा परमात्मा अशब्द अस्पर्श, अरूप, अव्यय, रसरहित, गंधरहित, नित्य, अनादि, अनंत व अचल आहे, ज्यापासून भूतमात्र उत्पन्न होतात. उत्पन्न झाल्यावर राहतात जीवाच्या सर्व स्थानी जे आहे तेच ब्रह्म होय. हे ब्रह्म तू स्वत: आहेस. तू जीवही नाहीस, भाभारामही नाहीस, मनुष्यही नाहीस पण ब्रह्म आहेस. हे ब्रह्म चैतन्य स्वरूप निर्मळ अविनाशी द्वैतरहित आनंद स्वरूप आहे व ते अनुभवानेच ओळखता येते. ज्यास अद्वैतसिध्दी प्राप्त होते तो अद्वैत आत्मज्ञानाच्या सामर्थ्यांच्या योगाने जगत् मिथ्या समजून लोकप्रसिध्द नामरूपात्मक

देहाच्या देहीपणाचा त्याग करून व्यवहारात वागतो, त्यास चराचरांत सच्चिदानंद स्वरूपाखेरीज दूसरें कांही भासत नाही. तोच सदा जन्ममरणापासून मुक्त होऊन ब्रह्मरूपास पावतो. तो समजतो की संपूर्ण प्रपंच ब्रह्मरूप आहे, तत्वांचे तत्व ब्रह्म आहे. चिंतन करण्यास योग्य विचार करण्यास योग्य-सांगण्यास योग्य-सर्वांचे सारभूत ब्रह्मच आहे ते कांही ओळखावयाचे नाही, विचार करावयाचेनाही, सांगावयाचे नाही व ऐकावयाचेही नाही. ह्या जगताच्या सर्व मोहजालातून सुटण्याची अंत:करणांतील भावना झाल्याने जेव्हा चित्तवृत्ति पूर्णपणे क्षीण होऊन जाते तेव्हा चित्ताच्या सर्व वृत्ति बाह्य स्वरूपात विसरून अंतरात प्रविष्ट होऊन ते चित्त सामान्यता प्राप्त करून तदाकार होऊन जाते व तेव्हा हे जग वितळून विध्वंस होऊन किंवा लोप होऊन कोठे जाते ते समजतच नाही अशी जी वृत्ति वासना-भावना तेच ब्रह्म. हेच ब्रह्म जन्ममरणापासून मुक्त करणारे होय. ध्यानांत ठेव की अयमात्मा ब्रह्म सर्वानुभू: हा आत्मा सर्वानु भवरूप होय. तोच ब्रह्म होय.ते ब्रह्म तूं आहेस, मी आहे, हे सर्वजण आहेत आणि संपूर्ण चित्-जड-भूत प्राणिमात्रांत चैतन्यरूपाने जे नटलेले आहे ते सर्वब्रह्मच होय. हाच अथर्ववेदाचा सार होय.

भाभाराम - महाराज! जन्ममृत्यूपासून कोण मुक्त होतो? काय केल्याने मनुष्य मुक्त होऊ शकेल?

सद्गुरु महाराज - जो मनुष्य केवळ कनककामिनीचा त्याग करतो तो मुक्त होऊं शकत नाही. पण जो सूक्ष्म व कारणरूप वासनांचा त्याग करतो, तोच मुक्त होतो. कनक व कामिनीचा त्याग हठानेही होतो. तो स्थुल त्याग आहे. त्यांत विशेषता नाही पण जो सूक्ष्म व कारणाचा त्याग करतो तोच श्रेष्ठ होय. कामाचा त्याग सरळपणे करता येतो पण सूक्ष्माचा, वासनेचा त्याग करणे अतिकठिण आहे व दुर्लभच आहे. सामान्य माणसाकडून अशी कृत्ये होऊं शकत नाहीत कारण या सूक्ष्म मायाविकारांनी जेथे ज्ञान्यांची त्रेधा उडून जाते तेथे सामान्यांची काय कथा? पूर्ण ब्रह्मनिष्ठ ब्रह्मांत लीन झालेल्या व्यक्तिकडूनच हा सूक्ष्माचा व कारणाचा त्याग होऊ शकतो, कारण त्या ब्रह्मनिष्ठ पुरुषाची प्रज्ञा त्रिकाळी दृढ-समतायुक्तच राहते. त्याच्या स्थानांतून द्वैत वितळून जाते. जो ह्या तत्वास जाणतो त्यासच हा सूक्ष्म व कारणाचा त्याग करता येतो व तोच जन्म मृत्यूपासून मुक्त होतो. ज्याने ब्रह्मास आत्मरूपाने ओळखले नाही जो अव्यक्ताचा ज्ञाता नाही असा अनेकाग्रही बुध्दियुक्त पुरुष तपयोग दानादि करीत असूनही कालांतराने देहासच पावतो व जन्ममरणापासून मुक्त होऊ शकत नाही.'

भाभाराम - महाराज, जीवात्म्यास परमेश्वर साक्षात्कार केव्हा व कसा घडतो?

सद्गुरु महाराज - हे मुमुक्षु सद्भक्ता! ह्या कलियुगाचा प्रताप असा आहे की सर्व जीव ब्रह्मब्रह्म, ईश्वर ईश्वर, परमात्मा परमात्मा असा पोपटाप्रमाणे उच्चारकरीत असतात व त्याचा आपणास प्रत्यक्ष साक्षात्कार झाल्याचा बाहच देखावा लोकांना दाखवीत असतात, पण ज्या प्रमाणे,---

"धरम लीया तो शुं थया। अने गुरुसु न लागा रंग।।
जेम पाणीमाहे फत्तर बसे। तेनु नीरे ना भीजे अंग।।
मिट्टीमा नीर जो दिजीये। अने पडता वेलु थाये।।
येम जे सतियारा मुनिवरा। ते ज्ञान सुणे गली जाये।।"

अनंत वर्षापासून पाण्यांत भिजत असलेल्या गारेच्या दगडास शीतल व मधुर पाण्याच्या स्पर्शाचा उपयोग होऊ शकत नाही. कारण, त्याच दगडास चकमकीत ठेऊन घासल्यास त्यापासून ठिणग्या निर्माण होतात त्या प्रमाणेच ह्या जिवासही ब्रह्माचा यत्किंचितही स्पर्श होत नाही. ते पोपटपंची करणारे असतात, मायेत मुग्ध असतात उदर परायण राहून विषय सेवनांत प्रवृत्त राहणारे असतात, ब्रह्म ओळखण्यास त्यागाची जी आवश्यकता असते तिच्यापासून ते बहिर्मुख असतात. ज्याची बुध्दि शुध्द नाही, जो जीव ज्ञानामृताचे पान करून तृप्त व कृतकृत्य झाला नाही तो जीव खुशाल अनेक शास्त्रे पढलेला असो तथापि बाह्य इंद्रियास अंतरात वळविल्याशिवाय तो ब्रह्म-परमेश्वर परमात्म्याचा साक्षात्कार करूं किंवा करवूं शकत नाही.

नाशवंताच्या ठायी अविनाशीची बुध्दि-कल्पना होणे हे अध्यासाचे स्वरूप होय. या अध्यासाचें कारण अविद्या होय अविद्येचा नाश करण्यास तत्वमस्यादि महावाक्यांचे जो पर्यंत विशुध्द अंत:करणाने अहंकार वृत्ति रहित होऊन ज्ञान होणार नाही; तो पर्यंत अविद्येचा नाश होत नाही. अविद्येचा नाश व विद्येची प्राप्ति झाल्याने ईश्वराचा साक्षात्कार होतो. सूर्याच्या योगाने अंध:काराचा नाश झाल्यानंतर, वाटेल तेवढ्या जोराने पळत असलेला अंध:कार ज्या प्रमाणे सूर्याचा प्रकाश नाहीसा करूं शकत नाही, त्या प्रमाणे पराविद्यारूपी सूर्याचा अंत:करणांत संपूर्ण प्रकाश व्यापल्यानंतर, अपरा विद्यारूपी अज्ञान त्याच्या अंत:करणांत टिकत नाही. ज्याप्रमाणे हिरे, मोती, लाल, पांचू आदि रत्नांची परिक्षा करण्यास शिकण्यास सर्व आयुष्य पाहिजे तरीही संपूर्ण ज्ञान प्राप्त होत नाही त्याप्रमाणेच सर्व आयुष्य पाहिजे व मोठा अभ्यास केला पाहिजे. शब्दातीत व इंद्रियातीत परम पुरुषास पाहण्यासाठी ज्याने थोडाच काळ घालविला आहे व अल्पसे साधन प्राप्त केले आहे, अशा जिवास त्याचे दर्शन कसें बरे करता येईल? ज्याप्रमाणे हिऱ्याची परिक्षा शिकवून शिकवीली जाणार नाही ती स्वत:च्या श्रमाने, स्वत:च्या दृष्टीनेच शिकता येते. पुष्कळ काळाने शिकता

येते, त्या प्रमाणे ईश्वर दर्शन देखील पुष्कळ श्रम केल्यानंतर पुष्कळ श्रवण, मनन, निदिध्यासन शुध्द प्रेमानेच व दृढश्रध्दा ठेऊन अभ्यासानेच होऊ शकते.

अन्नमयादि कोशांच्या आकाराने असलेली अविद्याशक्ति जेव्हा निवृत्त होते तेव्हा जीवशीवाचा भेद लय पाहून विकल्प रहित आत्मस्वरूप प्रकाशित होते. याकरितां मनुष्याने जगाच्या सर्व उपाधीचा म्हणजे मिथ्या काल्पनीक दृश्यवस्तूंचा लय करून वासना-मात्राचा त्याग केला पाहिजे. तेव्हा साक्षात् परब्रह्म परमेश्वरांच्या विश्वव्यापक स्वरूपाचा साक्षात्कार होईल.

हा साक्षात्कार करण्यासाठी संकल्पांचा संन्यास करून भगवत्परायण होऊन द्वैतमात्राचा त्याग केला पाहिजे. भोक्ता असून अभोक्ता झाले पाहिजे. शुभाशुभ, लाभ, हानी या सर्वात समानवृत्ति ठेवली पाहिजे. रागद्वेषापासून विमुक्त झाले पाहिजे. चित्तवृत्तीचा निरोध केला पाहिजे. मनाचा नाश केला पाहिजे. वासनांचा क्षय केला पाहिजे व शमदमादि गुणसंपन्न झाले पाहिजे ही स्थिती प्राप्त होण्यास स्वत:चा पुरुषार्थच उपयोगी पडतो. स्वत:च्या पुरुषार्थानेच साक्षात्कार होऊं शकतो. दुसरे कोणीही ईश्वराचा साक्षात्कार करवूं शकत नाही. ज्याप्रमाणे शरीरांतील रोग स्वत:च औषध प्याल्यावाचून व पथ्य पाळल्याशिवाय जात नाही. ज्या प्रमाणे आपणास लागलेली क्षुधा आपण स्वत:च कांही खाल्ल्याशिवाय शांत होत नाही. त्याप्रमाणेच परमात्म्याचा ब्रह्माचा साक्षात्कार स्वत:च्या साधनावाचून होत नाही. रागद्वेषादिकांनी पूर्णपणे भरलेला असा हा संसार स्वप्नासमान मानून, परमात्म्याच्या गुणमयी दैवी मायेचा त्याग करून, ज्या प्रमाणे अळी भ्रमरीच्या दंशाने भ्रमरीचेच स्मरण करीत राहते व शेवटी भ्रमरीच होऊन जाते त्याप्रमाणे जो जीव परमात्म्यास प्रसन्न करून रात्रंदिवस परमात्म्याचेच स्मरण करीत राहतो, तोच परब्रह्मरूपाचें दर्शन करूं शकतो. ज्याने गुरुचे वचन परमपूज्य मानून त्याप्रमाणे मनोनिग्रह केला त्या परमश्रध्दावान जीवाच्या हृदयांत स्वयंप्रकाश, सर्वांचा साक्षिरूप परमात्मा प्रकाशित होऊन शुध्द सात्विकरूपाने दर्शन देईल.

सद्गुरु महाराजांच्या मुखातून अशा प्रकारची परम मंगलकारक दिव्य मधूर वाणी ऐकून सर्व शिष्यगण कृतकृत्य व तृप्त झाले. सद्गुरु महाराजांचे सर्व सच्छिष्य पुष्कळ काळपर्यंत नित्य नियमपूर्वक महात्मा सद्गुरु महाराजाकडून श्रवण केलेल्या उत्तमोत्तम ज्ञानाच्या योगाने केवळ स्पर्शमण्यासारखे बनून गेले आणि पूर्ण कृतार्थ झाल्यामुळे सद्गुरु चरणी वारंवार प्रणाम करूं लागले. ज्ञानोपदेशाच्या समाप्तीच्या आनंदांत हर्ष सागरांत निमग्न झालेल्या सर्व शिष्यास अंतिम मंगलाचरणरूपाने गुरुमहाराजांनी स्वत: उपदेश केलेल्या चैतन्यरूप स्पर्शमण्याचा स्पर्श करावयास म्हणजे त्या भगवत्स्वरूपाचे

ध्यान करावयास सांगितले त्याबरोबर ते सर्व सच्छिष्य व स्वत: सद्गुरु इमामशहा महाराज देखील त्या कृपाळू प्रभूच्या मंगल स्वरूपाच्या ध्यानांत समाधिस्थ होऊन गेले.

अशाप्रकारे संपूर्ण ब्रह्मज्ञान प्राप्त झाल्यावर तर भाभाराम अति आनंदित होऊन ब्रह्मानंदांत पूर्ण निमग्न झाला व त्याच्या सर्ववृत्ति समूळ नाश पावून तो वृत्तिशून्य झाला विरक्त झाला. सद्गुरु महाराजांच्या ज्ञानोपदेशाने तोपूर्ण जीवनमुक्त नित्यमुक्त झालेला होता. परमतत्वाच्या ठायी अखंड वृत्तीचा प्रवाह वाहावयास् लावून अंत:काळी भगवद्रूप यथार्थ ओळखून कैवल्यगतीस पावला होता. आपले पुढील आयुष्य येथेंच गुरुजींच्या सेवेत राहून घालवावें असे सर्व जणांनी पक्के ठरविलें, त्याप्रमाणे हाजरबेग, नायाकाका, भाभाराम, कीकीबाई, शाणाकाका वगैरे सर्वजण सदैव गुरुजी जवळच राहूं लागले. आपल्यास अशा अलभ्य, अगम्य ज्ञानाचे सागर, संपूर्ण वेदशास्त्र शिरोमणी असे साक्षात सृष्टिगुरु ब्रह्माचा सद्गुरु महाराजांचा केवळ चैतन्यरूप स्पर्शमण्याचा की ज्याच्या केवळ_ स्पर्शामध्ये इतर सामान्यवस्तु सुध्दां स्पर्शमणिरूप होऊन जातात अशा साक्षात् योगेश्वर महाराजांचा समागम अलभ्य लाभ झाला असें जाणून सर्व जण स्वत:स कृतार्थ मानूं लागले व सद्गुरु नामाचा पूर्ण प्रेमाने जयजयकार करूं लागले.

सद्गुरु इमामशहा महाराज दररोज सर्वांना नवीन नवीन ज्ञान सांगत असत. त्यांनी ते सर्व ब्रह्मज्ञान-तत्वज्ञान, आत्मज्ञान, अध्यात्मज्ञान, युगधर्माचे, अवतारपात्राचें, सृष्टिमंडळाचे ज्ञान, आगमज्ञान, योगज्ञान वगैरे सर्व प्रकारचे ज्ञान मूळबंध, विराटस्वरूप, निकलंकी गीता, शिक्षापत्री, दशावतार, सद्गुरुबोध, मुनिवर चेतावणी, ऋषिवर चेतामणी, योगवाणी, आगमवाणी, संतवाणी, गुरुवाणी (भजन संग्रह) सद्गुरुंचे दोहरे वगैरे वगैरे अनेक ग्रंथांत अगदी तत्वरूपाने, सार रूपाने ग्रंथित केलेले आहे.



# २१. गंगासिंह गोहिलवर इमामशाहांची करूणा.

चितोडगढमें नायाजी चेताये, गंगासींह गोहिलको जगाये।
दिये उपदेश हरिस्मरण करै हो, दरश चाहे गुजरातमें जै हो।।
स्नेही सुभागी खोजत आये, कुकसमेंगुरू दर्शन पाये।
सदगुरू संग गुरू महिमा जाने, ताथे दरश हित जै हो पीराने ।।

संत नायाजी पावन पर्यटन करीत असता चितोडगढला गेले होते, त्यांनी गंगासिंह गोहीलला उपदेश देऊन सजाग बनवीले होते. त्यास हरीस्मरणाचा आदेश देऊन तेथुन परत फीरू लागले. तेव्हा गंगासिंहाने विचारले की, 'गुरूदेव! फिरून आपले दर्शन केव्हा होईल?' संत नायाजीने समजावले, 'बाळा, जेव्हा तुझ्या हृदयात दर्शनाची भावना प्रकट होईल तेव्हा गुजराथमधे ये सद्गुरूंचे दर्शन होईल तुझे सारे मनोरथ पूर्ण होतील' असे सांगुन ते चितोडगढहून परत फिरले.

कित्येक वर्षानी त्या भाग्यशाली राजपूताचे भाग्य जागले. त्याच्या हृदयात सद्गुरू दर्शनाची भावना जागृत झाली व तो चितोडगढहून निघाला गुजराथमध्ये आला. तपास करून कुकसच्या संत धामामध्ये दाखल झाला. सद्गुरूंचे दर्शन घेतले. त्या समयी सदगुरू नायाजींनी आपल्या सदगूरूंचा महिमा वर्णन करून सांगितला तेव्हा सदगुरू इमामशाहांच्या दर्शनाची आभिलाषा त्याच्या मनात जागृत झाली म्हणून तो पीराण्यास आला.

पीर इमामम नही पाय दिदारा, सायाजी कर गये प्रयाणा।
बैठे रैन सुमीरे गुरू पीरा, आधी रेन आये गुणगंभीरा।।
पाय दिदार ताहीको पै हो, गंगाजी गुरू चरण ग्रहै हो ।
सायाजी मै परम सुभागा, सुफळ भये मेरा अनुरागा।।

गगासिंह पीराण्यास आला आणि पाहतो तर आपण ज्यांच्या दर्शनाकरीता आलो होतो ते महापुरूष तर समाधीस्त झालेले आहेत. मनोभंग झालेला गंगासिंह सद्गुरूंच्या ध्यानास बसला. खरी प्रेमलागणी होती. बरोबर मध्यरात्रीस सद्गुरू चरण पकडले आणि म्हणाला 'हे नाथ! माझा अनुराग खरा होता म्हणून आपले दर्शन घडले. मी खरोखरच भाग्यशाली झालो.

प्रगट मोहे मिल गये पीराना, मिट गये मेरा आवागवाना।
दयानिधी मोपे किरपा करो हो, गुरू लीलामृत दीनको दैह हो।।
चाहत सोही तोहे मीली जावे, गंगा तोहे सब कुछ पावे।
आशिष दिन्ह गुरू कृपानिधाना, छीनमे हो गये अंतरधाना ।।

'मला प्रगट सद्‌गुरू इमामशाहा मिळाले. माझा आवागमनाचा फेरा मिटला. हे दयानिधी माझ्यावर करूणा करून मला आपल्या विशुध्द लीलामृताचे दान द्या.' अशा रीतीने गंगासिंहाने सदगुरूस आपल्या विमल चरीत्राचे दान मागीतले. त्याच्या या अलौकीक याचनेने प्रसन्न होऊन सदगुरूसही आश्चर्य वाटले. विस्मयाने ते म्हणाले, 'गंगासिंह तु आपल्या गुरूची तन मन प्राणाने सेवा कर तुला जे पाहिजे आहे ते त्यांच्या प्रसादाने प्राप्त होईल.' असे म्हणून त्याच्या शीरावर आपला वरदहस्त स्थापून सद्‌गुरू अंतर्धान पावले.

आंनद उरमें अधीक छवाये. हरख भरे गुरूके घर आये ।
नायाजी मुख दर्शन देखी, गुरूजी मेरी गती सब पेखी।।
पीव पाया गंगा घर आया, धन्य हो मेरी सुफळ कमाया।
सद्‌गुरू लीलामृत मागा, धन्य धन्य तेरो अनुरागा ।।

गंगासिंहाच्या हृदयात अपार आनंद झाला. स्वत:तो सद्‌गुरूंच्या दर्शनाने धन्य बनून गेला होता. ज्या कार्याकरीता आलेला होता तो फेरा सफळ झाला. अत्यंत विनयाने गुरूजीच्या धामात जाऊन झुकून निरोप मागितला व मार्गाला लागला. पर्यटन करीत करीत गुरूच्या धामावर कुकसला येऊन पोहचला. सदगुरू नायाजींनी त्याचे हसत मुख निरखून समजून गेले की गंगाजीने जे पाहीजे ते प्राप्त करून घेतले आहे. ते म्हणाले, 'गंगाजी आज तुझे जन्माचे सार्थक झाले. तू दुसरे काहीच न मागता सद्‌गुरूलीलामृत मागीतले यावरून तुझे प्रेम खरोखर धन्यतेस पात्र आहे.' सदगुरूनी मुक्तकंठाने त्याचे यशोगान केले ते ऐकताच गंगासिंह म्हणाला -

गुरूजी पुरन करो अभिलाषा, गुरूलीलामृत पीवनकी आशा ।
समय पाय अमिरस पै हो, गंगा तोहे सुख शांती मीलै हो।।

'गुरूदेव मला तर सदगुरू लिलामृत-गुरूदेवाचे पावन चरित्राचे पान करायचे आहे. मला ही गुरूलीला ऐकवा. गंगासिंह गुरूंना विनयाने म्हणाला.

'गंगासिंह तुझी ही इच्छा जरूर पूर्ण होईल. समय प्राप्त झाल्यावर तुझी ही अभीलाषा जरूर तृप्त करीन त्यायोगे तुझ्या हृदयात सुख शांति प्राप्त होईल.' असे म्हणून सदगुरू नायाजींनी गंगासिंहास दृढ आश्वासन दिले.

★ ★ ★

# २२. देवाधामावर योगी लोकांचा मेळावा.

बडी सुहानी रेन थी , सत्संग की मोज !!
भाभाराम गुरू पीरजी, कीये अगमकी खोज ॥१॥
योगी पुरूष गुरू धाममे, आय ठाढे महाराज ॥
सोही सिध्द योगीजना, यहां पर आयेगे आज ॥२॥

शरद् ऋतुतील पौर्णिमेची रात्र. संपूर्ण वातावरणात पूर्णचंद्राच्या किरणांनी न्हाऊन निघालेला गोड गारवा. त्या अति मनोहर रात्रीच्या समयी सद्गुरु इमामशाह महाराज आणि संत भाभाराम समागमे बसून अगम्य अशा ज्ञानाची चर्चा करीत होते. त्या समयी संत भाभाराम म्हणाले, 'महाराज, आपण म्हणत होता कीं जे योगी पुरूष येथे येतात, त्या महापुरूषांचे आगमन पीराणा धामात पण होत असते, त्याच सिध्द पुरुषांचे योगीजनांचे आताच येथे आगमन होईल.' भाभारामचे हे शब्द श्रवण करताच चकित होऊन इमामशाह महाराज मंद मंद हास्य करीत म्हणाले 'प्रीय भाभाराम, संत महापुरूषांच्या आगमनाने कोणाच्या हृदयात आनंद होणार नाही बरे!' अशाप्रकारच्या आंनद रसात ते मग्न होते, तोच अचानक चार योगी पुरूष जणू काही अंतरिक्षातुन राजहंस उडत यावे त्या प्रमाणे लगबगीने येऊन तेथेच उभे राहिले.

बानी भाभाराम की, सुनत पीरा मुष्कराय ॥
छीनमे हाजीर हो गये, चार योगी सुखदाय ॥३॥
झुक झुक चारो बेठिया, पाक पीरा सत्संग ॥
ता दिन गुरू इमामको, लगे सवाया रंग ॥४॥
कहोजी उत्तरा खंडकी, सत्संग कथा सुनाय ॥
ताथे हमरा हियरा, मानो परम सुख पाय ॥५॥

ते सिध्द पुरूष योगी अडबंगनाथ, योगी जान्हवीदास, योगी सतानन्दजी आणि योगी रसिकनाथ हे चारही महापुरूष नम्र भावाने झुकून सदगुरू इमामशाह व संत भाभाराम जवळच बसले. त्यांचे दर्शन होताच इमामशाहाच्या हृदयात खरोखर प्रेमाब्धि उचंबळून आला. प्रेमावेशात ते म्हणाले, आमच्या महद्भाग्याने आज आपण योगीपुरूष येथे आलेला आहांत. आज आम्हाला उत्तराखंडातील सत्संगाच्या कथा ऐकायचा सुयोग प्राप्त झाला आहे. ज्यायोगे आमच्या हृदयास परम सुखाची प्राप्ति होईल.'

पावन कथा सत्संगकी, मुखसे बरनी न जाय ॥
पीरजी हम कैसे कथे, रसना बेन न आय ॥६॥



संत भाभारामचे महानिर्वाण शिवलिंगात ज्योतिस्वरूपाने लीन होणे.

फिर भी कुछ बाते करे, प्रेमाग्रह गुरू पीर ॥
उत्तराखंड अेक रेनको, बैठे गुण गंभीर ॥७॥
योगी अपने मोजमे, सहज दाखे सत्संग ॥
तादिन आय डाछ रहे, मानो बडे भुजंग ॥८॥
पलभर सतसंग परखता, चोला तजे तेही ठार ॥
दिव्यरूपसे ऊड गये, मानो तीरे मजधार ॥९॥
सोहि प्रगटे नेपालमे, सूर्यवंश निरधार ॥
बडे सुभागी देखियाँ, रोहीत राजकुमार ॥१०॥

सदगुरू इमामशाहांचे हे शब्द श्रवण करताच योगी अडबंगनाथ म्हणाले, 'बाबा, ही फारच चांगली वाणी उच्चारिली. सत्संगाची पावन कथा अशी विमल असते की तिचे मुखाने वर्णनच करता येत नाही. कोणत्या रीतीने तिचा उल्लेख करावा, रसनेच्या आवाक्या बाहेरचे ते काम आहे. तरीपण आपल्या प्रेमाग्रहाने आपली आज्ञा स्विकारून सत्संगाची एक कथा आपणास निवेदन करतो.' असे म्हणून योगी अडबंगनाथांनी पावन कथा सांगण्यास सुरूवात केली.

उत्तराखंडात इंद्रकिल पर्वतावर एका मंगलमय रात्री अनेक महापुरुष एकत्रीत जमलेले होते. सत्संगाची अमृतधारा वहात होती. त्याच समयी एक विषधर नाग तेथे आला आणि शांतचित्ताने संतांच्या जवळच बसला आणि क्षणभरात त्याने आपल्या हजार वर्षांचा जीर्ण देह टाकून दिला. त्याचा आत्मा दिव्य प्रकाशाप्रमाणे उडून गेला. तो विषधर सर्प संसाराच्या मध्यातून जणू मुक्तच होऊन गेला. नागाचे शरीर टाकून त्याने नेपाळच्या सूर्यवंशी राज कुलात जन्म धारण केला त्याचे नांव रोहितसेन असे ठेवण्यात आले.

आ गई मोज कुमारको, अगले जन्म की याद ॥
राजपाट सुख साह्यबी, सबसे हो गये बाद ॥११॥
खोजत मात्रसे मिल गये, अडबंगनाथ गुरू पीर ॥
ताको लेके चल बसे, उत्तराखंड अति धीर ॥१२॥
महामूत्यंजय पहाडपे, बैठे ध्यान लगाय ॥
मानो मोरे गुरू देवजी, सोही योगी यहाँ आय ॥१३॥

नेपालचा हा राजकुमार सुखवैभवात आकंठ बुडालेला होता. अपार धनसंपत्तीत भान विसरलेल्या रोहितसेनला अचानक आपल्या पूर्व जन्माची आठवण झाली व तो त्याच क्षणी अस्वस्थ होऊन गेला. स्वप्नात पाहिलेल्या अद्भूत दृश्याप्रमाणे पूर्व जन्माचा जीवन पट त्याच्या नजरेसमोरून सरकू लागला. क्षणभर विचार करून त्याला

प्राप्त झालेल्या वैराग्यपर विचारावरून त्याने राज्यपाट सुख वैभवाचा त्याग केला व सर्वस्व सोडून नि:संग बनून तो चालू लागला. हृदयपटावर वैराग्याचा पक्कारंग लागला होता. सदगुरूचा शोध करीत फिरत असता त्याची मनोवृत्ति अतितिव्र बनून गेली. अचानक त्यास योगी अडबंगनाथांचा पुनर्मिलाप झाला. पूर्व जन्माची प्रेम लागणी होतीच म्हणून सद्गुरूंनी सुध्दा त्याचा हात धरून त्यास उत्तरा खंडात महामृत्यूंजयाच्या पहाडात घेऊन गेले. तेथे त्यास संपूर्ण योगाभ्यास शिकवून गिरीकंदरात ध्यान मग्न बनविले. कित्येक वर्षे व्यतीत झाली हा ध्यानी पुरूष रोहीतनाथ याच दशेत एकाग्र बनून राहीला. गुरूदेव, तेच योगी पुरूष आपल्या आसनावरून उठून येथे येतील'. सिध्द पुरूषांचे हे शब्द श्रवण करून क्षणभर आश्चर्य वाटले आणि त्या महापुरूषाची वाट पाहू लागले.

योगी रोहितनाथजी, प्रगट भये तेही ठार ॥
प्रथम वन्दे गुरूदेवको, सबको किये जुहार ॥१४॥
गुरूजी रोहितनाथजी, लगी हरीसे प्रीत॥
योगी की गतिको लिखे, सुमिरन किये अमित ॥१५॥

हरणीच्या उडी प्रमाणे अमित गतीने योगी रोहितनाथजी तेथे येऊन दाखल झाले. प्रथम ते त्यांच्या वंदनीय सदगुरू अडबंगनाथांच्या चरणकमळी दंडवत पडून राहिले. सदगुरूनी त्यांच्या शिरावर आपला वरदहस्त अतिशय प्रेमाने स्थापन करून हात धरून त्यास उठविले. त्यानंतर त्यांनी अन्य योगीजनांच्या चरणावर झुकून प्रणाम केला व महापुरुषांच्या समुहात प्रेमाने बसले. सदगुरू अडबंगनाथांनी इमामशाहांना म्हटले,' पीरजी याच रोहितनाथाने श्री हरीवर अनन्यनिष्ट होऊन प्रेमलागणी लाविली होती. योगीपुरुषांच्या या अशा गतींचे वर्णन करता येण्यासारखे नाही. त्यांनी प्रेमळ प्रभुच्या ध्यान स्मरण चिंतनात आपला गहन काळ निर्गमन करून टाकला. ते खरोखरच प्रभुचे प्रेमी बनले'. असे म्हणत ते योगी अवाक् बनून गेले.

★ ★ ★ ★ ★ ★

वन्दे गुरु इमामको, योगी जान्हवीदास॥
सत्संग गुरु देवजी, कैसे बखान हुं खास॥१६॥
योगी तिब्बत चल बसे, लामा हिया हरखाय।
लोंगप्पा नामे शिष्य थे, योगी चरणचित रहाय॥१७॥
पारस परस कांचन हुवे, मिट गये हमरा विकार ॥
योगी संगमे ले चलो, बहुरी किय जुहार ॥१८॥
लामा तुमरे गुरु देवजी, हमरा कैसे होई॥
गुरु द्रोही मत बनो, जनम जनम बिगोई॥१९॥

फिर मिलही गुरू देवजी, झुक झुक छांडे शरीर ॥
लामा नैन देखत रहे, हियरा जाके अधिर ॥२०॥

सिध्द पुरूष अडबंगनाथांच्या नंतर योगी जान्हवीदास म्हणाले पीर इमामशाहजी, संत संग केव्हाही वर्णन करून सांगण्यासारखा विषय नाही; पण खास प्रसंग सांगतो. एकदा पावन पर्यटन करीत करीत तिबेटला जाणे झाले. तेथील धर्मगुरू लामा यांचेशी समागम झाला. परस्परांच्या भेटीने परस्परांना आनंद झाला. तेथे त्यांचा एक शिष्य होता. त्याचे नाव लोंगपा. तो अत्यंत विनम्र भावाने योग्यांच्या चरणावर झुकून म्हणाला.' आपल्या सारख्या पारसमण्याच्या संगाने माझ्या हृदयातील मोह विकार रूपी मलीनता मिटून गेली म्हणून आपण मला आपल्या संगे घेऊन चलावे.' असे म्हणत तो आणखी योगीचरणावर दंडवत पडला. त्याचा हात धरून उठवित योग्याने त्यास म्हटले, 'बेटा! तु तुझ्या गुरूचा शिष्य आहेस. लामा तुझे गुरूदेव आहेत तु त्याचा आहेस. मग माझाही शिष्य कसा बरे होऊ शकशिल? माझी तुला सल्ला आहे की जीवनात कधी ही गुरूद्रोही बनू नये. जो मनुष्य गुरूद्रोही होतो तो आपला हा जन्म व पुढील अनेक जन्मापर्यंत घोर अंधारात दुःखद्वंद्वात पडत असतो. म्हणून केव्हाही असे दुष्कर्म करू नये.' अशा प्रकारचा सदुपदेश त्यांनी दिला तो ऐकून लोंगपा म्हणाला 'बाबा मी गुरू द्रोही होणार नाही पण आपणास नंतर केव्हातरी येऊन मिळेल.' अशा प्रकारे योग्यास वंदन करून आपला गुरू लामा यांचे जवळ गेला आणि त्यांच्या चरणावर झुकून पूर्ण भावाने नमस्कार केला. त्यांचा आशिर्वाद घेऊन कमान मधून तीर सुटावा त्याप्रमाणे तेथल्या तेथेच प्राण त्याग केला. गुरूदेव लामा तर डोळे फाडून पाहू लागले आणि शिष्याची ही गति पाहून आश्चर्यचकित होऊन गेले. त्याला वाचविण्याकरितां त्यांनी बराच खटाटोप केला, पण काहीही उपयोग होऊ शकला नाही. गुरूजी अधीर होऊन गेले, पण या समयी त्यांचे काहीही चालण्यासारखे नव्हते. लोंगपाचा अनुराग पाहून योग्याच्या हृदयात सुध्दां जबरदस्त धक्का बसला. तिबेटमधून योग्याने प्रयाण केले. त्यानंतर या गोष्टीस जवळजवळ अठरा वर्षे होऊन गेली.

योगी वहाँसे आगे चले, बीते अढारा साल॥
आन अचानक पेखीया, जा पहूँचे नेपाल॥२१॥
अगले जन्मकी याद थे, योगीसे हुई पहेचान॥
गुरुजी मेरा आ गये, दिल चहे दिल जान॥२२॥
कर ग्रही संगमे ले चले, फिरते सौराष्ट्र देश॥
गढ गिरनार पे बैठके, बिसर गये क्लेश॥२३॥
बारा बरस सुरता लगे, सन्मुख आये गुरुदेव॥
दत्त प्रभु दयानिधी, जय जय दत्त गुरुदेव॥२४॥

दत्त प्रभुको पायके, हरिहर हो गये न्याल॥
सोही गुरुजन आयके, यहाँ पर ठाढ मराल॥२५॥
बानी योगी जनकी, मुखसे बेन उचरंत॥
हरिहर दास हाजीर हुवे, संत वचन गज दंत॥२६॥
बेर बेर वंदन किये, सबको शिर झुकाय॥
योगी भाभाराम अरू, पीर, इमामको लागे पाय॥२७॥

बऱ्याच काळानंतर योगी पुरुष नेपाळला जाऊन पोहोचले. त्या समयी हरिहर सिंह नावाच्या एका नेपाळी गृहस्थाने या महापुरुषाचे दर्शन घेतले आणि त्यांच्या चरणी दंडवत पडला. योग्याने त्याचा हात धरून त्यास उठविले त्या समयी त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा वहात होत्या. सदगुरु योगीनाथ चकित होऊन त्याच्याकडे पाहू लागले. तेव्हा तो म्हणाला, 'बाबा, आपण मला ओळखले नाही. मी आपणास तिबेटला भेटलो होतो तो लोंगपा मीच आहे. गुरुदेव, आपला शिष्य होण्याकरिताच मी त्यावेळेस शरीर त्याग केला होता. आता आपण येऊन मिळाला आहात. कित्येक दिवसापासून आपल्या आगमनाची वाट पहात होते. आज माझ्या भाग्याने दिलाचा दिलजान मला सद्गुरु येऊन मिळले आहेत. माझे जीवन धन्य झाले. आता मी आपला संग सोडणार नाही.' असे म्हणत त्याने आपल्या सद्गुरुंचा हात पकडला. त्यांच्याबरोबर पावन पर्यटन करीत करीत गुरुदेव कित्येक दिवसांनी सौराष्ट्र देशात आले.

तेथे ते गड गिरनारवर चढून गेले. योगी पुरुषाने हरिहरला ध्यान मग्न बनविले. आसन मांडून ते ध्यानात एकाग्र बनून गेले आणि महापुरुष तेथून प्रयाण करते झाले. या ध्यान चिंतनात बारा वर्षाएवढा काळ निघून गेला. त्यानंतर जणू करवट बदलावी त्याप्रमाणे भगवान दत्तात्रयांनी आपल्या भक्तावर अनुग्रह करून प्रगट झाले व त्याच्या समोर येऊन उभे राहिले. या परमानंद प्रभूचे दर्शन करून हरिहर खरोखरच आनंद विभोर होऊन गेला. आज तो अखंड आनंदात मग्न होऊन बसलेला आहे. हा ध्यानी संत हरिहरदासजी आताच येथे येऊन पोहोचेल. योगी पुरुषाच्या मुखातून वाणी निघताच योगी हरिहरदासजी तेथे येऊन पोहोचले. गजदंताप्रमाणे महापुरुषांचे शब्द फुटून निघाले. आपल्या वंदनीय सदगुरुंच्या चरणी झुकून वंदन केल्यानंतर तेथे बसलेल्या अन्य योगी पुरुषाच्या चरणी सुध्दां त्यांनी वंदन केले. योगी भाभाराम आणि गुरु इमामशाहांचा चरण स्पर्श करून त्या ध्यानी संताने प्रणाम केला. अशाप्रकारे महापुरुष जान्हवीदासांनी सत्संगाच्या पावन सूर सरिता मधून उद्धवलेला हा पावन प्रसंग सांगितला व त्याबरोबरच त्यांचे प्रत्यक्ष प्रगट प्रमाण म्हणून योगी हरिहरदासजींचे पण दर्शन सर्वांना घडून आले.

★ ★ ★ ★ ★ ★ ★

योगी सतानंदजी, आये पुष्कर धाम॥
सरोवर स्नान करने लगे, ग्राह ग्रहे तेही ठाम॥२८॥
मगर मत नुगरा बनो, रहो सुगराके संग॥
बेमूल अवसर आयके, सहज लिखे सत्संग॥२९॥
योगी बचन हियरा लगे, मगर निकसे बहार॥
छीनमे चौला छांड ते, गुरु चरण न बलिहार॥३०॥

पावन पर्यटन करीत असता योगी सतानंदजी तिर्थराज पुष्करला येऊन पोहोचले. स्नान करण्यासाठी ते सरोवरात उतरले. तेवढ्यात एका मोठ्या मगराने येऊन त्यांचा पाय पकडला व खोल पाण्यात ओढून घेऊन चालला. योग्याने बळ एकवटून त्याला थांबविले आणि शब्द प्रहार करीत त्याला म्हटले, 'रत्नाकरात राहून सुध्दां तू असाच नुगरा राहिलास. सुगराचा संग कर. असा वेळ प्रसंग वारंवार येत नाही. तो तुला प्राप्त झाला आहे तो व्यर्थ दवडू नकोस.' योग्याच्या या शब्दबाणाने मगराचे हृदय भेदले. तो अवाचक प्राणी बाहेर आला. आणि संतपुरुषाच्या चरणावर आपल्या विकराळ शरीराचा त्याग केला. ते दृश्य पाहण्याकरितां लोक तेथे जमू लागले. परंतु जास्त वेळ जर तिथे थांबलो तर लोक आपणास ओळखून घेतील व कारण नसता उपाधी पाठिशी लागेल या भयाने तो तेथून चालता झाला.

पल्ला छुटे योगी लिखे, फिरते रमता राम॥
पहूँच गये मुलतानमें, बनिया झुके बहुनाम॥३१॥
आय मिले गुरु देवजी, में हूँ मकर कराळ॥
मनुज तन मोह मिले, सचमुच हो गये न्याल॥३२॥
अब तो बैया पकडलो, संगमें रखो गुरु राय॥
अपनो जान छांडोनही, अब मत रखो जुदाय॥३३॥
मकर सोही मनुज हुवे, बनिया निजानंद॥
इन्द्रकिल पे जायके, पेखे परमानंद॥३४॥
लगन अजहु लागी रहे, हरीसे नाता अखंड॥
सोही योगीजन आयगे, मानो परम सुखकंद॥३५॥

मगराने संत पुरुषाचा पाय आपल्या मुखातून सोडून दिला व त्याचबरोबर त्याच्या प्राणाने पण तो देह टाकून दिला. संताच्या शब्दबाणाने विंधला गेलेल्या मगराने त्यांच्या चरणी आपले नश्वर शरीर त्यागीले. लोक तेथे जमा होऊ लागले. तत्काळ योगीपुरुषाने तेथून काढता पाय घेतला. त्यानंतर रमताराम साधु पुरुषाने कोण जाणे किती काळ व्यतीत केला असेल. कित्त्येक वर्षांनी फिरत फिरत ते मुलतानला येऊन पोहोचले. तेव्हा तेथील निजानंद नावाचा एक तरूण व्यापारी त्यांच्या चरणी वंदन करण्यास आला. विनयाने

त्यांच्या चरणावर झुकून पडताच त्याला सर्व स्मृति जागृत झाली. तो म्हणाला, 'गुरुदेव, आपण मला परत येऊन मिळालात. आपले दर्शन प्राप्त होताच मी केवळ भाग्यशाली बनून गेलो. आता आपण मला माझा हात धरून घेऊन चलावे. एके समयी मी पुष्कर सरोवरात मगर होतो. आपण स्नानाला आला असता म्या पामराने अज्ञान बुध्दीने आपणास मारण्याकरितां आपला पाय पकडला. पण त्या समयी आपण नेमका शब्दवेधी बाण मारला तो माझ्या जिव्हारी लागला. तत्काळ माझा मृत्यू पण झाला. पण 'अंते मति सा गति' अनुसार मला आपला संग हवा होता. पूर्व कर्मातील प्रारब्ध योगाची फळे भोगल्यानंतर आज आपला संग झाला आहे. गुरुदेव, आता आपण माझ्यापासून दूर राहू शकणार नाही. मला आपल्या समागमे घेऊन चलावे.' त्याच्या प्रेमाग्रहाला वश होऊन सद्‌गुरुंनी त्याचा हात हातात घेतला व त्यावर अनुग्रह केला. त्यास ते उत्तरा खंडातील इंद्रकिल पर्वतावर घेऊन गेले व तेथे त्या नित्यानंदी तरूणाला ध्यान योगी पुरुषाच्या आसनावर स्थिर केले. तो ध्यान मग्न होऊन गेला. कित्येक वर्षे होऊन गेली पण अजूनही त्याच्या ब्रह्मानंदाची टाळी खुलली नव्हती. तो निजानंद ध्यानी पुरुष आता मात्र आपली समाधी सोडून आपल्याजवळ संत समागमाकरिता येत आहे. थोड्याच वेळात योगीपुरुषाचे कथनानुसार योगी निजानंदजी त्या संत समागमात येऊन पोहोचले. आपल्या सद्‌गुरुचरणी झुकून त्याने प्रणाम केला. नंतर अन्य सर्व योगी पुरुषांना व संत भाभाराम, सद्‌गुरु इमामशाह महाराजांच्या चरणावर वंदन करून शांत चित्ताने संत समागमात येवून बसला. तीनही योगी पुरुषांनी सतसंगाच्या अमृत धारेचे पान करीत असता परम पावक व दुर्लभ प्रसंगाचे वर्णन करून सांगितले. व त्या बरोबरच ते योगी पुरुष पण सत्संगात हजर झाले.

★ ★ ★ ★ ★ ★

बानी योगी जनकी, सत्य बचन निरधार॥
योगी निजानंद आयके, प्रेमे किये जुहार॥३६॥
बडी रेन सत्संगकी, अब तो मगन भये पीर॥
अब तो रसिकनाथजी, जल्वा दिखाये लगीर॥३७॥

योगी निजानंदजी येऊन दाखल झाले. संतास संत मिळाला. सत्संगाची ही रात्र खरोखर मंगलमय बनून गेली. सद्‌गुरु इमामशहांच्या हृदयात तर अनहद आनंद दाटला होता. ते आनंद विभोर होऊन म्हणाले, 'आता योगी रसिकनाथजी, आपण काहीतरी चमत्कार करून दाखवाल अशी नम्र आशा बाळगून आहे.'

योगीको जल्वा कहा, सहज बूझ सत्संग॥
ताथे हम निर्मल भये, मानो सुरसरित गंग॥३८॥

रिवाराज्य बन खंडमे, विचरे योगी राज ॥
छापा मारे व्यालको, तब बोले महाराज ॥३९॥
अधम तेरी यो गति, हिंसक तेरो स्वभाव ॥
अपना ढंग छांडे नही, चाहे बोध सुनाव ॥४०॥
छीनमे व्याल थंभी गयो, संत बचन प्रमाण ॥
झुके योगी चरण ते, गति पाये निरवाण ॥४१॥
चौला अपना छांडके, प्रगटे गुर्जर देश ॥
बन खंडमे किरातको, मचाय दियो क्लेश ॥४२॥

सदगुरु इमामशहांच्या प्रेमाग्रहाला वश होऊन योगी रसीकनाथ म्हणाले, 'योगी पुरुषाजवळ जल्वा-चमत्कार वगैरे काहीच नाही. हां, थोडी सत्संगाची झलक मात्र जरूर दिसेल. पण अनहोनी गोष्ट होनी बनेल अशी आहे. एकदा पर्यटन करीत असता रिवाराज्यात वनखंडीत गेलो. घनघोर अरण्य होते. घनदाट जंगलातून जात असता एका हिंसक वाघाने समोरून धावत येऊन अचानक योग्याच्या अंगावर पंजा मारला. हिंसक प्राण्याने त्याच्या जाती स्वभावानुसार हल्ला केला. नंतर थोडा दूर सरला. त्या समयी योगी पुरुष म्हणाले 'अरे अधमा, तुझी ही गति? अखेर तू हिंसकचा हिंसकच राहिला. जाती स्वभाव सुटला नाही आणि अशा अधम योनीत येऊन पडलास. तुझ्या सारख्याला अनेक प्रकारे बोध देऊन समजाविले परंतु अखेर तू सुधरशिल असे वाटत नाही.' योगी पुरुषाच्या या शब्दांनी हिंसक वाघ खरोखर स्तंभीत झाला. जणू हृदयात तो काही विचार करीत असावा. तो त्वरेने योगी पुरुषाच्या चरणी येऊन झुकला. महापुरुषाने त्याच्या मस्तकावर आपला वरदहस्त स्थापून शुभ आशिर्वाद दिला. क्षणानंतर हिंसक वाघाचा पंचप्राण अनंतात विलीन झाला. एके समयीचा जो हिंसक प्राणी होता तो पुढील जन्मात मनुष्य जन्मात आला पण हिंसक म्हणूनच जन्मला. गुजरातमध्ये एका भिलाच्या घरी त्याचा जन्म झाला. जंगलात वनचराप्रमाणे शिकार करण्याकरित हातात तीरकामठा घेऊन भटकत असे. निर्दोष पशु पक्ष्यांना मारून झोळी भरत असे. घरी येऊन त्यावर आपला व कुटुंबीयांचा निर्वाह चालवीत असे. असा त्याचा रोजचाच क्रम बनून गेला.

जीव हिंसाके धंधमे, सारी उमर गमाय ॥
अनुग्रहकी मंगल घडी, मानो वे दिन आय ॥४३॥
पावागढसे उतरे योगी, चांपानेरमे आय ॥
वनखंडीमें मिल गये, वलिया किरात त्यांय ॥४४॥
योगी पुरुषको देखते, अपनी झोली तजाय ॥
धाये गुरुके चरणोमे, बहुरी लागे पाय ॥४५॥

गुरुजी मेरी यो गति, कबतक रखे निभाय॥
बरसो कई बीत गयो, अब तो मिल गये आय॥४६॥
वलिया बाते बनायके, मोहे करे बदनाम॥
कैसे नाता किरातसे, तुम्ही सदा बदकाम॥४७॥

त्या किराताच्या अनुग्रहाचा मंगलदिवस नजिकच येऊन ठेपला. आणि योगी पुरुष रसीकनाथांचे अचानक आगमन झाले. ते महापुरुष पावागडाहून उतरून चापानेरला आले. तेथून जंगलातून जात असता वलिया नामक किराताने त्या महात्म्यास पाहिले. निरखून पाहताच त्याची मागील स्मृति जागृत झली. तो एकदम गाढ विचारात पडला. अंतरात कांहीतरी दिव्य अनुभूति जागृत होऊन त्याच्या रोमरोमात आनंद व्यापला. आपल्या खांद्यावरील पशुपक्षांच्या रूधीराने लडबडलेली झोळी काढून टाकून त्याने दूर झुंगारून दिली. त्वरेने धावत जाऊन त्याने योग्याचे चरण घट्ट धरले व त्याच्या चरणावर दंडवत पडून राहिला. त्याच्या डोळ्यातून स्त्रवणाऱ्या अश्रुमेघांनी त्याने योग्याचे दोनही चरण प्रक्षालन केले. थोड्यावेळाने शुध्दिवर येऊन तो म्हणाला, 'गुरुदेव माझ्या अशा अधम गतीची आपण कोठपर्यंत बरदास्त कराल! किती वर्षे होऊन गेली मी या जंगलात क्रूरपणे पशूपक्ष्यांची शिकार करून निर्वाह करीत आहे. मला खात्री होती की एकन् एक दिवस आपण याल. आपले मिलन होईल आणि माझ्या या अधमकृत्याचा अंत होईल. आज आपण अनुग्रह करून येथे आला आहात. आता तरी मला या अधम गतीतून सोडवा - मुक्त करा.'

या अजाण्या किराताचे शब्द श्रवण करून संत म्हणाले, 'किराता, तू मला नाहक बदनाम करीत आहेस. कारण की तुझा नि माझा तसा काहीच संबंध नाही. तसेच आपली ओळख, परिचय, नाते वगैरे काहीच नाही. तू एक निच काम करणारा पापी किरात आहेस. तुझ्याबरोबर माझा मेळ बसेल असे काहीच नाही.' महापुरुषाचे हे शब्द कानी पडताच किराताचे मुख उतरून गेले आणि हृदयाचा चक्काचूर होऊन गेला. थोडा वेळ तर त्याने ओक्साबोक्सी रडून घेतले. मग थोड्या वेळाने शांत झाल्यावर तो म्हणाला,

बदकामी बनके रहुं, फिर भी गुरु पिछनाय॥
देखो अपने बदनपे, मैने पंजा लगाय॥४८॥
याद अगले जन्मकी, किरात क्यो गत पाय॥
बाबा किरपा आपकी, सहज सत्संग पाय॥४९॥
व्याल तेरा गुरु आयगे, पेखत लीजे किरात॥
दाव चुके भव जालमे, सदा रहे उत्पात॥५०॥

बाबा मे ता दिनसे, खोजत हुं गुरु आप।।
अब तो मोहे मिल गये, सत्संगके प्रताप।।५१।।

'बाबा, मी बदकाम करीत होतो, असे असूनही मी आज आपणास ओळखले आहे. आपणास वाटल्यास आपण इन्कार करा. परंतु आपणाशी माझा पूर्वजन्माचा संबंध आहे. पूर्व जन्मात मी हिंसक वाघ होतो. त्यासमयी मी आपणावर हल्ला केला होता. आपल्या छातीवर माझ्या पंजाची निशाणी असेल ती पहा व खात्री करून घ्या. मी तोच वाघ या जन्मी क्रूर किरात झालेलो आहे. आता तर आपण इन्कार करणार नाही ना!' त्या अधम भिलाचे भाषण श्रवण करताच योगीपुरुष चमकले व त्यांच्या डोळ्यासमोर त्या क्रूर हिंसक वाघाने हल्ला करून त्यांच्या छातीवर पंजा मारला होता, त्याची स्मृति झाली आणि त्यावेळेस वाघास केलेला उपदेश आठवून योग्यास आश्चर्य वाटले. हळूच ते त्या किरातास म्हणाले, 'किराता, तू म्हणतोस ती गोष्ट खरी आहे. पण तुझा हा दुसरा जन्म असून तुला मागील जन्माची स्मृति कशी राहिली. पापगतीत आकंठ बुडालेल्या एका भिलाला गत जन्माचे ज्ञान कशा रीतीने समजले हेच मला समजत नाही.'

योगी पुरुषाचे हे शब्द श्रवण करताच वलीया भील म्हणाला, 'महाराज, आपण एवढे महान योगी पुरुष असून चकित कां झाला! एके दिवशी या जंगलातून संत पुरुषांचे आगमन झाले असता मी त्यांची प्रेमाने सेवा केली. त्या समयी संत प्रसन्न झाले. मी त्यांच्या जवळ बसून सत्संग श्रवण केला. त्या समयी संत पुरुषांनी माझ्या भविष्याविषयी आगम सांगतांना म्हणाले, 'किराता, तू गत जन्मात मांसभक्षी वाघ होतास. तू एका महापुरुषावर प्राण घातक हल्ला करून छातीवर पंजा मारलास पण त्या महापुरुषाने तुजवर अनुग्रह करून तुझा उध्दार करण्याकरितां तुला मानव देह दिला व त्याच महापुरुषांचे येथे आगमन होऊन ते तुझे जीवन धन्य बनवितील. बेटा, तू हा महान् अवसर चुकू नकोस. तुझ्या आवागमनाचे फेरे फिटून जातील. जर तू हा अवसर चुकशिल तर भवाटवीत दुर्गति पावून भटकशील.' संताच्या या उपदेशाने मी सजाग बनून आपल्या आगमनाची वाट पहात होतो. शेवटी आपले आगमन झाले व माझे भाग्य उदयास आले.' किराताचा हा खुलासा ऐकून निःशंक झालेल्या योगी पुरुषाने हर्षित होऊन वाचा खोलली. ते म्हणाले,

सोही अधम किरातको, बिमल बानी सुनाय।।
मायासे मुख मोडके, बैठे ध्यान लगाय।।५२।।
पावा परबतके पिछे, अजहु ठाढे उमंग।।
क्या जाने किरातको, लगे हरीसे रंग।।५३।।

बीस बरस येही दशा, अब जागनकी बेर॥
पीरजी सोही वलीनाथको, निरखे बेरही बेर॥५४॥
आय खडे बलीनाथजी, गुरुचरणन बलिहार॥
धन्य धन्य किरातको, सुमीरे जगदाधार॥५५॥
योगीको अपनी गति, सहज दिखाये शान॥
अब तो पीर इमामशाह, लीला कहियो बखान॥५६॥

'किरात, हा संसार असार आहे. सत्य एक श्रीहरीचेच नाम आहे. म्हणून या मृगजलासमान मायेचा त्याग कर.' सदगुरुंच्या उपदेशाने व आदेशाने त्याच क्षणी किरात स्वस्थ झाला व त्याने घरादाराचा त्याग करून संताबरोबर प्रयाण केले. त्या समयी आपल्या झोळीतील मृत पक्षी भरलेले होते. संताला दाखवीत त्याने म्हटले, 'बाबा, माझे हे रोजचे पापकर्म पहा.' योग्याने अमृतदृष्टी करून त्या पक्ष्यावर पाणी शिंपडताच त्याच क्षणी मृतवत पडलेले ते पक्षी फडफडाट करीत उडून गेले. सद्गुरुंच्या समागमे वलिया घनदाट जंगलात चालत जात होता. पावागडच्या पहाडी टेकड्यांच्या मागील जंगलात एका उंच गिरीकंदरात ते आले. तेथे एका रमणीय स्थानात गुरु महाराजांनी आसन मांडले. किरात सुध्दां शांत चित्ताने त्याच ठिकाणी बसला. सदगुरु महाराजांनी त्यास दिव्य उपदेश करून त्याच्या शिरावर वरदहस्त स्थापन केला. वलिया एकाग्रतेने प्रेमलगनीत पूर्ण मग्न व स्थिर होऊन गेला. वीस वर्षे व्यतीत झाले, अजून सुध्दा तो किरात प्रेम मग्न ध्यान योगात चकचूर होऊन हरी साधन करीत आहे. त्याच सुभागी किराताचे आता आगमन होईल. त्यास डोळे भरून निरखून घ्या.' योगी पुरुषाने अशा प्रकारे वाणी उच्चारतांच योगी वलियानाथचे आगमन त्याठिकाणी झाले. गुरुदेवांचे चरणवंदन करून त्यांनी सर्व योगी पुरुषांना वंदन केले. त्या किरातास पाहताच गुरु इमामशाह महाराज चकित होऊन गेले आणि योगी पुरुषाच्या अगम्य गतीचे यश गाऊ लागले.

योगीकी गति अकळ, हिया मेरा हरखाय॥
भाभारामको देखते, तुम केसे गये लुभाय॥५७॥
योगी भाभारामसे, अगले जनमकी प्रीत॥
ताथे हम आवन लगे, निभाय प्रेमकी रीत॥५८॥
योगीसे योगी मिले, वे सुख को बरनंत॥
हिल मिल पीर इमामसे, बैठे ध्यानी संत॥५९॥

'योगी महात्मा पुरुषांच्या अकळगतीचे भान होताच आश्चर्य वाटते आणि त्या बरोबरच अपार आनंद पण होतो. असे असूनही मला एका गोष्टीचे खूप नवल

वाटते की तुम्ही भाभारामला पाहून कां बरे लोभायमान होता. एकदा नव्हे पण अनेकदा तुम्ही भाभारामच्या धामावर येतात याचे कारण काय बरे असावे. हे समजू शकत नाही.' 'महाराज, आपण म्हणतात ती गोष्ट बीलकुल सत्य आणि साफ आहे. भाभाराम योगी आहे. गतजन्मी गंधमाधन पर्वतावर त्यांच्याशी आमचा समागम झालेला होता. म्हणून योग्याशी योग्याची प्रीती जमून येते. या प्रीतिला निभावण्यासाठीच योग्यांचे आगमन होत असते. योग्याशीच योग्यांचे मिलन होत असते. या मंगलदायक सुखाचे वर्णन कोणाकडूनही होऊ शकत नाही.

आज गुरु इमामशाहांच्या संगतीने सर्वच ध्यान योगी पुरुष अखंड सुखाचा आस्वाद अनुभवीत आहेत. म्हणून या ठिकाणी सर्व एकत्र आलेलो आहोत. हा आनंद अवर्णनीय आणि अकथ्य आहे. आज आम्हाला सद्गुरुंच्या मुखारविंदातून ज्ञान श्रवण करण्याची इच्छा आहे. योगी पुरुषांनी नंतर सद्गुरु इमामशाहांशी सत्संग करून संत समागमाची सुरसरिता वाहवून परमानंद प्राप्त केला.

संत-समागमकी कथा, गुरु नायाजी सुनाय॥
गंगासिंह अनुजको, योगी यश बरनाय॥६०॥

संत समागमाची ही पावन कथा सद्गुरु नायाजीने सांगितली. त्याचे गंगासिंह गोहिल यांनी यथार्थ आलेखन केले. त्या सुभागी शिष्यांच्या परिश्रमानेच आपणास त्या पावन प्रसंगाचे अमृतोपम धारांचे पान करायला मिळून भाग्यशाली झालो आहोत.

★ ★ ★

## २३. संत समागम - गीतासार.

देवा मुक्कामी संत भाभाराम तपस्या भुमीवर संत सद्गुरु इमामशाह महाराज आपल्या परमसेवक हाजरबेग सह आले असता, संत भाभाराम व संत साध्वी कीकीबाई या उभय बंधुभगिनींनी त्यांचे स्वागत पूजन व वंदन करून सत्कार केला. गुरु महाराजांची तनमनाने एकाग्रतेने सेवा-पूजा करून त्या उभयतांनी त्यांचे मन प्रसन्न केले. प्रसन्न चित्ताने गुरु महाराजांनी त्यांना तत्त्वबोधाचा प्रसाद दिला. उभय योगी व योगीनी स्वरूप बंधुभगिनीं समवेत अन्य योगी अडबंगनाथ, योगी रोहितनाथ, योगी जान्हवीदास, योगी हरिहरनाथ, योगी निरंजननाथ, योगी निजानंदजी, योगी रसिकनाथ, योगी वलियानाथ वगैरे सर्व मुमुक्षुजनांना सुध्दा त्या तत्त्वबोधाचा लाभ घडून आत्मोन्नति करण्यास ते भाग्यशाली झाले. एका सत्संगाच्या रात्री योगीवर संत भाभारामने [illegible] महाराजांना श्रीमद्भगवद्गीतेचे तत्त्वज्ञान जाणून घेण्याची तीव्र इच्छा दर्शविल्या[illegible] गुरु इमामशाह महाराज म्हणाले, 'भाभाराम, तू हा उत्तम फलदायक व [illegible]प्रद

तत्वज्ञानाचा विषय काढलास. तू परम भाग्यवान व योगभ्रष्ट योगी आहेस. भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनास लक्ष्य करून संपूर्ण सृष्टीतील सूज्ञजनांच्या उध्दारास्तव ही मानाची अमुल्य देणगी देऊन ठेवलेली आहे. भगवान श्रीकृष्णांनी म्हटलेले आहे की -

## ★ पद ★

कर्म करो, निष्काम थई, येनी आशा त्यजी दो तमाम॥
फळ इच्छा दुःखदायक छे, सहेजे पामो सुखधाम॥ टेक॥
मनमा भरेली कामना, ज्यारे त्यजी देवाय॥
आत्मां संतुष्ट बनी रहे, स्थितप्रज्ञ ते कहेवाय॥१।
काचबो समेटी लेय अंगने, तेम विषयो इंद्रियोथी दूर थाय॥
विषयो जेना दूर थई गया, तेनी बुध्दि स्थिर थई जाय॥२।
विषयो भले दूर थया, अेनी रसवृत्ति रही जाय॥
सर्व रसना स्वामी मळे, रसवृत्ति निवृत्त थई जाय॥३॥
हरिमां प्रीति जेहनी, तृप्ति प्रभुजीमां पाय॥
ईश्वरेच्छा अधिक गणे, अेने कर्तव्य रहे नही काय॥४॥
स्वधर्मने आचरो, चाहे अल्प गुण दर्शाय॥
स्वधर्मे मरवुं श्रेष्ठ छे, परधर्म मानो दुःखदाय॥५॥
राग द्वेष उरमा नही, सर्वे इच्छा तजी छे सदाय॥
संन्यासी अेने जाणो सदा, कर्म बंधनथी मुक्त रहाय॥६॥
समदर्शी सोही महात्मा, अेने जन्म रहे नाय॥
जीती गया संसारने, अेना प्रेमे पुजीये पाय॥७॥
सुख दुःख अन्यने थाय छे, अेवु समजे योगी जन॥
समवृष्टी निरखे सर्वने, परमसिध्द योगी पावन॥८॥
मन चंचल दुष्कर अति, सहेजे वश नही थाय॥
वैराग्यना अभ्यासथी, अेने पण रोकी शकाय॥९॥
योगभ्रष्ट साधकनो, आलोक परलोक माय॥
कल्याणकारनी दुर्गति, कदि विनाश न थाय॥१०॥
पुण्यवानोना लोकमा, रहे छे लांबा काळ॥
श्रीमानने घेर अवतरी, साधना आदरे रसाळ॥११॥
अभ्यास करता देह छुटे, स्वर्गमा नही जाय॥
योगी कुळमा अवतरे, अेवो जन्म दुर्लभ जगमाय॥१२॥

योगी कुळमा अवतरे, पूर्व देह बुध्दि संयोग॥
योग संसिध्दीने पामवा, पूर्ण करे साधना संयोग॥१३॥
योगी यत्नवान थई, सर्व पापोथी शुध्द थाय॥
अनेक जन्मे पण सिध्द करे, परम गतीने पाय॥१४॥
शास्त्रज्ञानी अने तपस्वी, कर्म योगीथी श्रेष्ठ जान॥
अध्यात्मयोगी बनो मुनिवरो, आत्मयोगी महान॥१५॥
योगी श्रध्दावाळो थई, अंत:करणथी भजे भगवान॥
अध्यात्म योगी अंतरंगीने मे, परमोत्तम योगी कह्यो जान॥१६॥
योगी गति अकळीत छे, बुझे योगी भाभाराम॥
भणे इमामशाह सोही योगी जनो, आ संसारीयामा सुखदाय॥१७॥

श्लोक : प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान्॥
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते॥गीता २/५५
यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः॥
इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥२/५८

भगवान श्रीकृष्ण अर्जुनास म्हणतात की हे पार्था! जेव्हा कोणी एखादा मनुष्य आपल्या मनात येणाऱ्या सर्व कामना सोडून देऊन आपल्या ठायीच आणि आपणाशीच संतुष्ट असतो तेव्हां त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात. दु:खामध्ये ज्याचे मन संत्रस्त होत नाही, सुखासाठी जो उचंबळत नाही, आवड, भय, क्रोध हे ज्याचे मनातून निघून गेलेले आहे. तो मनुष्य स्थिर बुध्दिचा होय. तसेच ज्याला कशाचीही आत्यंतिक आसक्ति नाही, जसा कासव आपले सर्व अवयव सहज आत ओढून घेतो, तशी ज्याने आपली इंद्रिये विषयापासून आवरून धरिली, त्याची बुध्दि स्थिर झाली. ज्याने विषयांचे सेवन केले नाही, त्या पासून विषय दूर झाले खरे तरी वासना राहते. पण ज्याची बुध्दि स्थिर झाली, त्याला परमात्मज्ञान मिळते आणि त्याची भोगवासनाही नाहीशी होते. मनुष्य कितीही विद्वान असला आणि फार जपून जरी वागत असला तरी इंद्रिये फारच उचंबळणारी असल्याने ती त्याचे मन बळेच ओढून नेतात, त्या सर्व इंद्रियांना उत्तम प्रकारे आवरून भगवंतावरच विश्वास ठेऊन योगे करून वागावे. कारण, की ज्याची इंद्रिये स्वाधिन आहेत त्याचीच बुध्दि स्थिर होते.

श्लोक : श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्॥
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः॥३/३५

इंन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ।।
तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ।।३/३४
राग द्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन्।।
आत्मवश्यै र्विधेयात्मा प्रसादमधि गच्छति।।२/६४

स्वत:चा धर्म अवघड असला आणि परक्याचा धर्म सोपा असला तरी परधर्मापेक्षा स्वधर्म श्रेयस्कर, स्वधर्मामध्ये मरणही श्रेयस्कर परंतु परधर्म भयंकर होय. स्वधर्म म्हणजे आत्मा प्राप्तीचा श्रेयस्कर मार्ग आणि परधर्म म्हणजे ईन्द्रियजन्य सुखाचा प्रेयमार्ग होय. अमूक इंद्रियाची अमूक विषयाशी प्रीति आणि अमूक विषयाशी त्याचा द्वेष हे ठरलेले आहे. त्या प्रीतीच्या आणि द्वेषाच्या आटोक्यात मनुष्याने शिरू नये; कारण की ते त्याचे शत्रु होत जो मनुष्य विषयांचे चिंतन करतो, त्याची त्यांच्या ठायी आसक्ति उत्पन्न होते, आसक्तिमुळे इच्छा होते, इच्छेला प्रतिबंध झाला म्हणजे क्रोध उत्पन्न होतो. क्रोधापासून संमोह होतो, म्हणजे कार्य अकार्य यांचा भेद समजेनासा होतो, संमोहापासून स्मृतीचा भ्रंश होतो. भ्रंशापासून बुध्दि नष्ट होतो. आणि बुध्दिच्या नाशापासून सर्वस्वाचा नाश होतो. इन्द्रियांना रागद्वेषापासून सोडवून जो आपल्या स्वाधीन ठेवतो आणि मन आवरून विषयामध्ये वागतो त्यालाच प्रसाद म्हणजे चित्ताची प्रसन्नता प्राप्त होते. तोच स्वधर्म होय. तोच प्रसाद रूप श्रेयस्कर मार्ग होय. प्रसाद प्राप्त झाला म्हणजे त्याच्या सर्व दु:खाचा नाश होतो, कारण की ज्याचे चित्त प्रसन्न आहे. त्याची बुध्दि त्वरीत स्थिर होते.

श्लोक : तस्मादवसक्त: सततं कार्यं कर्म समाचर।।
असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पुरुष:।।३/१९
कर्मणैव हि संसिध्दिमास्थिता जनकादय:।।
लोक संग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि।।३/२०
यद्यदाचरति, श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जन:।।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते।।३/२१

हे अर्जुन, करायाचे जे कर्म ते तू अवश्य कर. पण त्यामध्ये आसक्ति ठेवू नकोस कां कि, जो मनुष्य आसक्ति न धरितां कर्म आचरितो तो उत्तम पद प्राप्त करतो. कर्मानेच जनकादिकांना उत्तम सिध्दी प्राप्त झाली. जनांना चांगला मार्ग लागावा एवढीच गोष्ट ध्यानात ठेऊन देखिल तुला कर्म आचरणे योग्य आहे. श्रेष्ठ मनुष्य जे जे करतो ते ते इतर लोक करूं लागतात. तो जे खरे मानितो तेच इतर लोक खरे मानीतात.

श्लोक : ये तु सर्वाणि कर्माणि मयि सन्यस्य मत्परा: ॥
अनन्ये नैव योगेन मां ध्यायंत उपासते॥१२/६
तेषामहं समुध्दर्ता मृत्यू संसारसागरात् ॥
भवामि नचिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम्॥१२/७

जे आपली सर्व कर्मे मला अर्पित करून सर्वस्वी मजवर भरिभार ठेवून अनन्यभक्तिने माझे ध्यान करितात आणि माझी सेवा करीतात त्यांचे चित्त माझ्या ठायी बांधलेले असते म्हणून मृत्युयुक्त जो संसारसागर त्यापासून हे पार्था त्यांना मी त्वरीत वर उचलून घेतो. याकरितां तू मनाचा संयम कर आणि अनन्य भावे करून मला शरण येऊन सर्वथा फलाची आसक्ति सोडून कर्म आचरण कर. कारण की, अभ्यासाहून ज्ञान श्रेष्ठ, ज्ञानाहून ध्यान श्रेष्ठ आणि ध्यानाहून कर्माच्या फलाचा त्याग श्रेष्ठ. त्यागापासून त्वरीत शांति प्राप्त होते.

श्लोक : श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाध्दद्यानं विशिष्यते॥
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम्॥१२/१२
अद्वेष्टां सर्व भूतानां मैत्र: करूण एव च॥
निर्ममो निरहंकार: सम दु:ख सुख: क्षमी ।१२/१३

जो कोणाचाही द्वेष करीत नाही, जो सर्व भूतांचा मित्र, जो दयाळू ज्याला माझेपण नाही, मी पणा नाही. सुखदु:ख ही दोन्ही ज्याला समान जो क्षमावान्, जो सर्वदा संतुष्ट, जो स्थिरचित्त, ज्याच्या मनाचा संयम झाला, ज्याचा निश्चय बळकट, ज्याने आपले मन आणि बुध्दि ही मला अर्पित केली असा जो माझा भक्त तो मला अत्यंत आवडता वाटतो. मिळेल त्यात संतुष्ट, शुचिर्भूत, दक्ष म्हणजे आळसापासून दूर, निष्पक्षपाति, खेदरहित, फलाची आसक्ति सोडून कर्मे करणारा असा जो माझा भक्त तो मला प्रिय आहे. शत्रुशी आणि मित्रांशी जो सारखा मान आणि अपमान या दोहोमध्ये सारखा, शीत-उष्ण, सुख-दु:ख यामध्ये सारखा आणि सर्व आसक्तिपासून जो मुक्त, ज्याला निंदा आणि स्तुति समान, जो बडबड करीत नाही, जो जे काही असेल त्यात संतुष्ट मानतो हे घर माझे असा ज्याला दुराभिमान नाही, ज्याचे चित्त स्थिर, जो भक्तिमान, तो मनुष्य मला अत्यंत प्रिय आहे.

श्लोक : चंचलं हि मन: कृष्ण प्रमाथि बळवदढम्।
सत्याहं निग्रहं मन्ये वायोरिवसुदुष्करम् ६/३४
असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम्॥
अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येणच गृह्यते॥६/३५

मन हे चंचल, उचंबळ, फार दांडगे आणि अभेद्य आहे, त्याला बांधून ठेवणे हे वायुला बांधून ठेवण्याप्रमाणे अत्यंत कठिण काम आहे, यात संदेह नाही, पण ते अभ्यासाने आणि विरक्तपणाने स्वाधीन करता येते. ज्याच्या मनाचा संयम झाला नाही त्याला योग दुर्लभ असतो, परंतु ज्याचे मन स्वाधीन झाले त्याने प्रयत्ने करून साधनाभ्यास करून योगप्राप्ति करून घ्यावी.

श्लोक : प्राप्य पुण्यकृताँल्लोकानुषित्वा शाश्वती: समा: ।।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽ भिजायते।।६/४१
अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।।
एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ।।६/४२

योगाभ्यास करणाराला या लोकीही विनाश नाही आणि परलोकीही विनाश नाही कारण की चांगले कर्म करणाराला कोणतीही दुर्गति नसते. पुण्यकर्त्या जनाला मिळायची जी स्थाने ती प्राप्त करून घेऊन तेथे बहुत वर्षे वास करून पवित्र अशा श्रीमंतांच्या घरी योगभ्रष्ट हा जन्म घेतो. अथवा बुध्दिमान अशा योग्यांच्याच कुळामध्ये जन्माला येतो. अशा प्रकारे जन्म प्राप्त होणे ही तरी या लोकी अत्यंत दुर्लभ गोष्ट आहे. पूर्वजन्मी घडलेल्या बुध्दिसंस्कारांची त्याला तेथे प्राप्ति होते आणि उत्तम सिध्दी मिळविण्याचा यत्न तो पुन: तेथून करू लागतो पूर्वी केलेल्या त्या अभ्यासानेच तो अवश्यपणे मोक्ष पावतो.

नुसती योग जाणण्याची ज्याला इच्छा झाली तोहि शब्दरूप ब्रह्म जो वेद त्याच्याही पलिकडचे फळ पावतो. प्रयत्नाने श्रम करून योगाभ्यास करणारा तर पापापासून शुध्द होऊन अनेक जन्मामध्ये मिळविलेल्या योगाच्या साधनाने ज्ञानाची सिध्दी पावून मग उत्तम गतीला पोहोचतो. तपस्व्यापेक्षा योगी श्रेष्ठ ज्ञान्यापेक्षाहि योगी श्रेष्ठ आणि कर्माची आसक्ति धरणारापेक्षाहि योगी श्रेष्ठ मानिला आहे. यास्तव तुम्ही योगी व्हा, सर्व योग्यामध्येहि जो माझ्या ठायी अंत:करण ठेवून श्रध्दापूर्वक मला भजतो त्याला सर्वापेक्षा मी अधिक श्रेष्ठ मानतो.

★ पद ★

इच्छा नही होवा छता, पुरुष कोनाथी प्रेराई।।
पाप कर्म पराणे आचरे, अे तो कहो ने समजाई।।टेक।।
पाप कर्मनां प्रेरनारो, रजोगुणने जाण।।
अग्नि जेवो अतृप्त छे, अेवो काम अरि निवारण।।१।।

खरो वेरी काम छे, महापापी क्रोध अेने जाण॥
धुमाडाथी अग्नि ढंकाई रहे, जेम दर्पण मेलु जाण॥२॥
गर्म ढंकायलो ओरथी, कामनाथी ढंकायलु अज्ञान॥
अनल कदी धराय नहि, काम रिपुथी ढंकायलु ज्ञान॥३॥
काम रिपुना रहेठाण छे, इंद्रियो मन बुध्दि सार॥
इंद्रियोनी क्रिया वडे, विषय दरशे निरधार॥४॥
श्रवण कल्पना निश्चय थया, तेमाथी उपजे छे काम॥
आत्मज्ञान ढंकाय गयु कामथी, जीव लोभायो आठो जाम॥५॥
विषयोमा मोहित थया, अेना ज्ञान विज्ञान थया नाश॥
महापापी अे कामनो, तमे करी नांखोने विनाश॥६॥
इन्द्रियो अति प्रबळ छे, अेनाथी छे मन बळवान॥
मनथी प्रबळ बुध्दि कही, बुध्दिशी प्रबळ छे काम॥७॥
काम रिपु बलवान कह्यो, आत्मा अपार बळवान॥
महाबली अे आत्मा, अेने परमात्मा तु जाण॥८॥
अति प्रबळ जेणे जाणीयो, आत्मानी करी ओळखाण॥
बुध्दिथी मनने हठावीने, काम रिपु हरो निरवाण॥९॥
कामरिपुने तमे मारजो, सच्चिदानंदमा स्थिर थवाय॥
भणे इमामशाह भाभाराम सुणो, परमानंदने पाय॥१०॥

**श्लोक, अर्जुन उवाच**

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पुरुषः॥
अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः॥३/३६

**श्री भगवानुवाच :**

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः॥
महाशनो महापाप्मा विध्दयेनमिह वैरिणम्॥३/३७

अर्जुन म्हणाला - हे यादवा मनुष्याची इच्छा नसताही, बळेच नेऊन चिकटविल्याप्रमाणे तो पाप करू लागतो. त्याला तसे करण्याला कोण प्रवृत्त करीतो ?

श्री भगवान म्हणाले, - हा काम होय. हाच क्रोध. रजोगुणापासून याची उत्पत्ति, हा मोठा अधाशी, अति उग्र, हाच या लोकी वैरी असे जाण. अग्नीवर जसे धुराचे झांकण, किंवा आरशावर जसे मळाचे झाकण किंवा गर्भावर जसे खोळीचे झांकण असते तसे याचे या सर्व जगतावर झाकण आहे. हा कामरूपी नित्य वैरी

हा कधीही तृप्त न होणारा अग्नि होय. याने ज्ञानी मनुष्यांच्या ज्ञानावर झाकण घातले आहे. इंद्रिये मन आणि बुध्दि हे याचे आश्रयस्थान म्हटले आहे. याच्या आश्रयाने हा देहीचे ज्ञान झाकून टाकितो आणि त्या देहीला मोहात पाडितो. यास्तव तू आधी इंद्रियांना आपल्या स्वाधीन करून ठेव आणि शास्त्रज्ञान व अनुभवज्ञान यांचा नाशक जो हा उग्र काम, याला मारून टाक. असे म्हटले आहे कीं इंद्रिये वेगळी, इंद्रियाहून मन वेगळे, मनाहून बुध्दि वेगळी आणि बुध्दिहूनही जो देही तो वेगळा. या प्रमाणे बुध्दिहून देही वेगळा. आणि तोच तू असे जाण आणि त्याला म्हणजे आपणालाच आपण आटोक्यात ठेव, म्हणजे तो कामरूपी शत्रुजरी सापडायला कठिण तरी त्याला तू मारू शकशिल.

## ★ पद ★

ज्ञान यज्ञ अति श्रेष्ठ छे, अंतःकरणथी शुध्द थाय॥
गति मळे ध्यान योगनी, अेना सर्वे कर्मो छुटी जाय॥टेक.॥
सर्वे कर्मो जेना छुटी गया, अेनी वृत्ति थई गई लीन॥
परमात्म समाधीमा बेसीने, अे तो बनी गया तल्लीन॥१॥
जीवनमुक्त बनी रहे, जेने उपज्यु आतमज्ञान॥
तत्त्वज्ञान उरमा वसे, ते मोह न पामे दिलजान॥२॥
भितर बाहिर अेक रूपने, तत्त्वदर्शिओ जोई॥
आत्मज्ञान रूडी रीते, बीजा वरणी शके नही कोई॥३॥
पापीओथी अधिक जे, महापापी भले कहेवाय॥
ज्ञान रूपी नौका वडे, निश्चे पापोथी तरी जाय॥४॥
अग्नि जेम प्रज्वलित थयो, काष्टनो करे छे नाश॥
प्रबळ अग्नि छे ज्ञाननो, पापकर्मनो करे विनाश॥५॥
तत्त्वज्ञान जेवुं जगतमा, पवित्र नथी बीजु ज्ञान॥
सिध्दात्मानी सहायथी, अेना अंतरमा उपजे ज्ञान॥६॥
योगद्वारा काळे करी, अंतःकरण शुध्द थाय॥
अंतरात्माथी जाणी शके, अेने घटमां अजवाळा थाय॥७॥
सिध्दात्माना संगथी, अेना दिलमा दिवा थाय॥
अेक दिपकना संगथी, अनेक दिवा प्रगटाय॥८॥
अनुभवने सद् भावना, जितेन्द्रिय जेही होई॥
परमशांति अेना उरमा, परमात्म रूपने जोई॥९॥

अज्ञानीने श्रध्दा नही, संशय उरमां अपार ॥
आ लोक के परलोकमां, अे शांति नहि पामे लगार ॥१०॥
ज्ञानवडे संशय गया, कर्म फल त्याग होई ॥
पिव परायण थई गया, अेने कर्म बंधन नहि होई ॥११॥
संशयरूपी अज्ञानने, छेदे तत्वज्ञाननी तलवार ॥
भणे इमामशाह भाभाराम सुणो, योगबुध्दिमां रहो चित्तधार ॥१२॥

श्लोक : श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ॥
सर्व कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥४/३३॥
तद्विध्दि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ॥
उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥४/३४॥

अनेक प्रकारचे यज्ञ वेदमुखाने सांगितलेले आहेत. त्या सर्वांचे मूळ कर्म आहे असे तू जाण.- हे परंतपा पार्था, द्रव्यमय यज्ञापेक्षा ज्ञानमय यज्ञ श्रेष्ठ आहे, कारण की सर्व कर्मांचे जे फळ त्याचा अंतर्भाव ज्ञानाच्या फळामध्ये होतो. तू ध्यान्यात घे की ज्ञानी, तत्त्वजाणते जे आहेत त्यांना दंडवत नमस्कार केल्याने, पुनः पुनः प्रश्न केल्याने आणि त्यांची सेवा केल्याने तुला या ज्ञानाचा ते उचित उपदेश करतील. परंतु ते ज्ञान येथे तुला श्रमावाचून मिळत आहे.

श्लोक : यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ॥
येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥४.३५॥
अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ॥
सर्व ज्ञानप्लवेनैव वृजिनः संतरिष्यसि ॥४/३६।

हे पांडवा, हे ज्ञान प्राप्त झाल्यावर तुझ्या मनामध्यें पुनः असल्या वेड्या कल्पना उत्पन्न होणार नाहीत आणि सर्व भूतें तू आपल्या ठायी आणि माझ्या अभेदपणाने पाहशील. जरी कदाचित तू सर्व पाप्यापेक्षा अत्यंत पापी असलास तरी तूं ज्ञानरूप नौकेच्या योगाने सर्व पाप समुद्र अनायासे तरून जाशील.

श्लोक : यथैधांसि समिध्दोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ॥
ज्ञानाग्निः सर्व कर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥४/३७।
नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ॥
तत्स्वयं योग संसिध्दः कालेनात्मनी विंदति ॥४/३८॥

अर्जुना, जसा प्रदीप्त केलेला अग्नि काष्ठांचे भस्म करून टाकितो तसा ज्ञानरूप अग्नि सर्व कर्मांचे भस्म करून टाकतो. ज्ञानासारखे पवित्र या लोकी दुसरे काही नाही. कर्मयोगी जो आहे तो आपोआप योग्य काळी तितक्या योग्यतेस पोहचून आपल्या ठायी हे प्राप्त करून घेतो.

श्लोक : श्रध्दावांल्लभते ज्ञानं तत्पर: संयतेंद्रिय: ।।
ज्ञान लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ।।४/३९।।
अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।।
नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मन: ।।४/४०

जो श्रध्दावान आहे, ज्याची ज्ञानाच्याच ठायी एकनिष्ठा आहे, ज्याने इंद्रियांचा संयम म्हणजे उत्तम प्रकारे निरोध केला आहे, त्याला ज्ञान प्राप्त होतें. ज्ञान प्राप्त झाले म्हणजे त्याला त्वरीत मोठी शांति प्राप्त होते. जो अज्ञानी आहे आणि ज्याला श्रध्दा नाही आणि ज्याचे मन सदा संशयी असते तो मनुष्य नाश पावतो. ज्याचे मन संशयी त्याला हा लोकही नाही, परलोकातही स्थैर्य नसते आणि त्यास सुखही प्राप्त होत नाही.

श्लोक : योग संन्यस्तकर्माणं, ज्ञान संछिन्न संशयम् ।।
आत्मवंतं न कर्माणि, निबध्नंति धनंजय ।।४/४१।।
तस्माद्ज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मन: ।।
छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत: ।।४/४२।।

धनंजया, योगाच्या रीतीने ज्याने कर्माचा त्याग केला आहे. आणि ज्ञानाच्या साधनाने ज्याचा संशय उत्तम प्रकारे नष्ट झाला आहे. त्या सावधचित्त मनुष्याला कर्मापासून बंधन प्राप्त होत नाही. यासाठी अज्ञानापासून उत्पन्न झालेला असा जो तुझ्या हृदयातील संशय तो ज्ञानरूप शस्त्राने तोडून टाक आणि योगाचा आश्रय कर. उठ आणि कार्याला लाग.

## ★ पद ★

विषयभोग संयोगना, अे तो उत्पत्तिने नाशवंत ।।
दु:खदायक अेने ओळख्या, योगी मुनि· अने संत ।।टेक ।।
अनासक्त अे सुखथी, ज्ञानी जन रहे दूर ।।
काम क्रोधथीउपजता, आवेग थई गया अेना दूर ।।१।।
अंतरमा सुख शोधीया, बाह्य विषय नहि भाय ।।
चित्त चरित्र अेमा शुध्द थया, अेने ज्ञान ज्योति प्रगटाय ।।२।।

पाप दोष जेना क्षीण थया, ज्ञानथी संशय निवार॥
योगी परहित पेखीने, स्थिर थया आने ठार॥३॥
काम क्रोध नहि उरमा, अंत:करण वश कीन॥
दान शिल अेवी त्यागी जनो, ब्रह्म निर्वाणमा लीन॥४॥
इंद्रियोने मन बुध्दिने, वश किधा निरवाण॥
इच्छा भय नहि उरमा, जेने क्रोध न उपजे लगार॥५॥
अंतरदृष्टीमां लीन थई, अेवा योगी जनो धरे ध्यान॥
सच्चिदानंदमां लीन थया, सदाकाल मुक्त बखाण॥॥६॥
अभिलाषा नही उरमां, मुनिजन हरीने चहाय॥
हरि बिना बीजा कोई नहि, अेतो हरीमा रहे समाय॥७॥
परम शांतिने पामीया, अेवा योगीजनो उपराम॥
पीर इमामशाह अेम बोलीया, तमे योगी छो भाभाराम॥८॥

श्लोक : ये हि संस्पर्शजा भोगा, दु:ख योनय एव ते॥
आद्यंतवंत: कौन्तेय न तेषु रमते बुध:॥५/२२
शक्नोतीहैव य: सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात्॥
कामक्रोधोद्भवं वेगं स युक्त: स सुखी नर:॥५/२३
योऽन्त: सुखोऽन्तरारामस्तथांत ज्योतिरेव च:॥
स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति॥५/२४

जे इंद्रियांच्या स्पर्शापासून होणारे भोग ते खरोखरी दु:खाचे उत्पादक होत. त्यांना आदि आहे आणि अंतही आहे. हे कुंतीपुत्रा यांच्या ठायी ज्ञाता मनुष्य आनंद मानत नाही. जो मनुष्य यालोकी असतांनाच शरीर सोडण्यापूर्वी कामक्रोधांचा वेग सोसू शकतो. म्हणजे त्या पासून विकार पावत नाही तोच योगी आणि तोच सुखी होय. ज्याला आंतूनच सुख आहे. आतूनच आनंद आहे आणि आतूनच प्रकाश आहे तो योगी ब्रह्मस्वरूप होऊन ब्रह्माच्या ठायी निर्वाण पावतो.

श्लोक : लभंते ब्रह्मनिर्वाणमृषय: क्षीणकल्मषा:॥
छिन्नद्वेधा यतात्मान: सर्वभूतहिते रता:॥५/२५
कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम्॥
अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम्॥५/२६

जे खरे जाणते, ज्यांचे पाप क्षीण झाले, ज्यांचा संशय फिटला, ज्यांच्या मनाचा संयम झाला, जे सर्व प्राण्यांचे कल्याण करण्यामध्ये गढून गेलेले ते ब्रह्माच्या

ठायी निर्वाण पावतात. जे काम क्रोधापासून दूर झाले, ज्यांची कर्मावरील आसक्ति सुटली, ज्यांच्या चित्ताचा उत्तम प्रकारे निरोध झाला. ज्यांना आत्म्याचे तत्त्व समजले त्यांना उभयलोकी ब्रह्मनिर्वाण प्राप्त होते.

श्लोक : स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवो:॥
प्राणापानौ समौ कृत्वां नासाभ्यंतरचारिणौ॥५/२७
यतेंद्रियमनोबुध्दिर्मुनिर्मोक्ष: परायण:॥
विगतेच्छाभयक्रोधो य: सदा मुक्त एव स:॥५/२८
भोक्तारंयज्ञतपसां सर्व लोक महेश्वरम्॥
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति॥५/२९

बाह्य विषयांचे स्पर्श दूर टाकून, दोन्ही भुवयांच्या मध्यभागी दृष्टी लावून प्राण अपान हे दोन्ही नाकांच्या आंत सारखे चालू ठेऊन जो मननशील मनुष्य इंद्रिये मन आणि बुध्दि यांना उत्तम रीतीने आपल्या दाबात ठेवतो, इच्छा भय आणि क्रोध ही ज्याची गेली आहेत ज्याला मोक्ष हाच सर्वात मोठा प्राप्त करून घेण्याला योग्य पदार्थ वाटतो, तो सर्वदा मुक्तच आहे. मी यज्ञांचा आणि तपश्चर्येचा भोक्ता सर्व जगताचा परमेश्वर सर्व प्राण्यांचा सुहृद हे जो जाणतो त्याला शांति प्राप्त होते.

## ★ पद ★

वहालानी विभूतिने ओळखो, अेने अकळगति छे अनूप॥
पारपाम्यो कोई मुनिवरा, ओळखी लीधा अविगत रूप॥टेक॥
अविनाशी कहे मुखथी, महाबाहुने वाणी विस्तार -॥
परम पदार्थ मय वेण सुणी, अनुरागी आ वार॥१॥
देवगणो अने महर्षियो, मुज उत्पत्ति जाणे नहि॥
आदि कशुज नथी मारू, अेवु देवो माने नहि॥२॥
महर्षिओ अने देवनु, आदि कारण मने जाण॥
मारू आदि कशुज नही, आदि पुरुष मुजने वखाण॥३॥
मुजने अेवो अजन्मा, अनादि बुझे नहि कोई॥
महेश्वर जाणे लोकमां, अेवा ज्ञानी विरला कोई ॥४॥
सर्वज्ञ सर्व संपन्न, भक्तवत्सल ओळखाय॥
मृत्युलोकमा मोह रहित, अेवा ज्ञानी विमुक्त थई जाय॥५॥
सुक्ष्मबुध्दि तत्त्वज्ञानने, निर्मोहता क्षमा सत्य जाण॥
इन्द्रियनिग्रह मनोनिग्रह, सुख दु:ख उत्पत्ति विनाश॥६॥

भय अभयने अहिंसा, समता संतोष तप दान॥
यश अपयश भाव प्राणीओना, माराथी उपजेला वखाण॥७॥
भाव भक्ति राखे मुजमा, सप्त महर्षिओ जाण॥
सनकादि चारे ऋषीओ, स्वायंभुव आदि वखाण॥८॥
चौद मनुओ जेमनी, आ संसारमा सर्व प्रजाय॥
तेओ सर्वे मारा मन वडे, संकल्पथी उपजेला जाण॥९॥
मारी अेवी अनेकविध, विभूति छे महान्॥
योग शक्तिने जाणे तत्वथी, ज्ञान योगे मुजमां समाय॥१०॥
सर्व जगतनी उत्पत्तिनुं, कारण मुजने जाण॥
मुज सत्तास्फूर्ति वडे, सर्वे जगत् प्रवर्ते निरवाण॥११॥
पिछाणे कोई पारखी, मुज महत्ताओ चित्तधार॥
भावाविष्ट थइने मने, स्मरण करे प्राणाधार॥१२॥
मारामा चित्त जोडीने, प्राणने स्थिर करणार॥
गुण प्रभाव समजावता, मुज कथन कीर्तनमारमणार॥१३॥
सदा रहे मुज ध्यानमा, प्रीतथी मने भजनार॥
तत्त्वज्ञाने बुध्दियोगथी, मुजने प्राप्त थाये निरधार॥१४॥
अनुग्रहकाजे भक्तना, अंत:करणमां करू प्रकाश॥
तत्त्वज्ञान दीपक वडे, मोह अंध:कारनो करूं नाश॥१५॥

हे महाबाहो, पुन्हा माझे परम वचन ऐक. तुजवर माझी अत्यंत प्रीती म्हणून तुझे हित व्हावे या इच्छेने हे मी तुला सांगतो. माझी उत्पत्ति देवगणांनाही ठाऊक नाही आणि महर्षिनांही ठाऊक नाही. कारण की सर्व प्रकारे देवांचे आणि महर्षिंचेही आदिकारण मी आहे. मी अजन्मा, मला आदि नाही, मी सर्व लोकांचा परमेश्वर, ही गोष्ट जो जाणतो तो मोहापासून दूर राहतो आणि सर्व मनुष्यामध्ये सर्व पापापासून मुक्त असा होतो.

बुध्दि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, उत्पत्ति, विनाश, भय, अभय, अहिंसा, समता, संतोष, तप, दान, यश, अपयश हे निरनिराळ्या प्रकारचे भाव प्राण्यांना मज पासूनच प्राप्त होतात. सात महर्षि आणि त्यांच्या पूर्वीचे चार महर्षि, सर्व मनु हे माझ्या मनापासून जन्मले. त्यामध्ये माझा प्रभाव होता. त्यांच्यापासून जगतामध्ये या सर्व उत्पत्ति झाल्या. जो ही माझी विभूति म्हणजे माझ्या ईश्वरत्वाचे सूचक पदार्थ आणि माझा योग म्हणजे चातुर्य ही खरेपणाने जाणतो त्याला असंशय ज्ञान प्राप्त होते. त्यात काही संदेह नाही. मी सर्वांचा उत्पादक, मजपासून सर्व उत्पन्न होते हे जाणून ज्ञातेजन प्रीतीपूर्वक मला भजतात.

ते माझ्या ठायी जीव लावून परस्परांना मजविषयी बोध करीत, माझे किर्तन करीत, सर्वकाळ संतोष पावतात आणि आपले रंजन करितात. ते समाधान चित्ताने राहून प्रीतीपूर्वक मला भजतात, त्यांना मी अशा प्रकारचे बुध्दिरूप साधन देतो की तेणे करून ते मला प्राप्त करून घेतात. त्यावर अनुग्रह करण्यास्तव मी त्यांच्या बुध्दिमध्ये वास करून सुप्रकाशित ज्ञानदीपाच्या योगाने अज्ञान मूलक अंध:काराचा नाश करितो.

देवर्षि नारद मुनि, असित देवल व्यास ।।
आदिदेव अजन्मा कहे, तमे सर्व व्यापक अविनाश ।।१६।।
योग शक्ति आपनी, विभूति कहो ने विस्तार ।।
वचनामृतो सुणता, प्रभु तृप्ती न थाय लगार ।।१७।।
दिव्य विभूती कहुं, अेना विस्तारनो नथी अंत ।।
आत्मा रूपे सर्वमां रह्यो, आदि मध्य अने अंत।।१८।।
आदित्योमां विष्णु हुं, ज्यातिओमा सूर्य वखाण ।।
वायु देवताओमां मरीची छुं, नक्षत्रोमां चन्द्र मने जाण ।।१९।।
वेदोमा सामदेव छुं, देवोमां छुं इंद्रराय ।।
भूतोमा छु चेतना, इंद्रियोमा छुं मनराय।।२०।।
रूद्रोमां शंकर छुं, यक्षराक्षसोमां धन कुबेर।।
अष्ट वसुओमां अग्नि छुं, शिखर पदार्थोमां छुं, सुमेर।।२१।।
पुरोहितोमां बृहस्पति, सेनापतीओमा कार्तिकस्वामी।।
जलाशयोमां सागर अने महर्षिओमां भृगु नाम।।२२।।
वाणीओमां अेकाक्षर, ॐ कार मुजने जाण।।
यज्ञोमां जप यज्ञ छु, स्थावरमां हिमगिरी वखाण।।२३।।
सर्व वृक्षोमां पिपळो, देवर्षिओमां नारद जाण।।
गंधर्वोमा चित्ररथ कहे, सिध्दोमां कपिल भगवान।।२४।।
अश्वोमां उच्चैश्रवा, गजेंद्रोमां अैरावत जाण।।
मनुष्योमां छुं नराधिप, आयुधोमा वज्र वखाण।।२५।।
गायोमां कामधेनु हुं, प्रजोत्पत्तिमां कामदेव।।
सर्पोमां छुं वासुकी, नागोमा अनंत शेष देव।।२६।।
जळदेवोमां वरूण छुं, पितृओमां पितृदेव।।
आर्यमां मुजने कहो, शासनकर्ता छुं, यमराज।।२७।।

दैत्योमां प्रल्हाद छुं, समयमां काल भगवान॥
पशुओमां मृगराज छुं, पक्षीओमां गरूड मुने जाण॥२८॥
पावन पदार्थोमां पवन छुं, शस्त्रधारीओमां राम॥
जलचरोमां मगरमच्छ हुं, जलप्रवाह भागीरथ धाम॥२९॥
सृष्टिओनो आदि अंत, मध्य मुजने जाण॥
विद्याओमां मुख्यत्वे, अध्यात्म विद्या मुजने जाण॥३०॥

अर्जुन म्हणाला -

तु परब्रह्म, तु श्रेष्ठ पवित्र परंधाम, तुला शाश्वत स्वयं प्रकाश पुरुष आदिदेव, अजन्मा, सर्वव्यापी असे सर्व ऋषि, तसेच देवर्षि नारद, असीत, देवल, व्यास हे म्हणतात आणि तु स्वत:ही मला असेच सांगतोस. केशवा जे तू मला सांगतोस ते हे सर्व मी सत्य मानितो. हे भगवन, देवांना आणि दानवांनाही तुझे स्वरूप समजलेले नाही. पुरूषोत्तमा, तु सर्व भुतांचा उत्पादक, सर्व भूतांचा नियंता, प्रकाशकांचा प्रकाशक आहे, - सृष्टीचा पालक तु स्वत: आपल्या शक्तीने आपणाला जाणतोस. तुझ्या ज्या अति अद्‌भुत विभूती, ज्या विभुतींच्या योगाने तू या सर्व लोकांना व्यापून राहिला आहेस, त्या तूं मला पूर्णपणे सांगण्याची कृपा कर. हे योगिन्, तुला कोणकोणत्या विभूतींच्या रूपाने सदा चिंतीले असता तुझे ज्ञान मला होईल? हे भगवान् कोणकोणत्या वस्तूमध्ये तुझे मला चितंन करणे योग्य आहे? जनार्दना, विस्तारे करून तु आपला योग आणि विभूति ही मला पुन: सांग. कारण की तुझे अमृतासारखे भाषण ऐकतां ऐकतां माझी तृप्तीच होत नाही.

श्री भगवान म्हणाले,

कुरूश्रेष्ठा ठिक आहे. माझ्या विस्ताराला अंत नाही म्हणून मुख्य मुख्य ज्या माझ्या दिव्य विभूति तेवढ्याच मी तुला सांगेन. हे गुडाकेशा, मी सर्व भूतांच्या अंतरी असणारा आत्मा आहे, मीच सर्व भूतांचा आदि मध्य आणि अंतही आहे. आदित्यांमधे मी विष्णु, तेजस्व्यामध्ये मी प्रकाशमान सूर्य, मरूद्‌गणामध्ये मी मरिची, नक्षत्रामध्ये चन्द्र, वेदामध्ये मी सामवेद, देवामध्ये मी इन्द्र, इंद्रिया मध्ये मी मन, प्राण्यामध्ये मी चैतन्य, रूद्रामध्ये मी शंकर, यक्षराक्षसामध्ये मी कुबेर, वसुमध्ये मी अग्नि, पर्वतामध्ये मी मेरू, पार्था, पुरोहितामध्यें मुख्य जो बृहस्पति तो मी असे जाण, सेनापतिमध्ये मी स्कंद, जलाशयामध्ये मी सागर, महर्षीमध्यें मी भृगु, भाषणामध्ये मी ॐ हे एकाक्षर, यज्ञामध्ये मी जपयज्ञ, स्थिर पदार्थामध्ये मी हिमालय, सर्व वृक्षामध्ये मी अश्वत्थ, देवर्षिमध्ये मी नारद, गंधर्वामध्ये मी चित्ररथ, सिध्दामध्ये

मी कपिलमुनि, अश्वामध्ये क्षीरसागरातून निघालेला उच्चैश्रवा घोडा मी आहे असे जाण. गजेन्द्रामध्ये मी ऐरावत, नरामध्ये मी नराधिप म्हणजे राजा, आयुधामध्ये मी वज्र नावाचे आयुध, गाईमध्ये मी कामधेनु, प्रजा उत्पन्न करणारा मी मदन, सर्पामध्ये मी वासुकी, नागामध्ये मी अनंत म्हणजे शेष, जलदेवतामध्ये मी वरूण, पितरामध्ये मी अर्यमा, नियमन करणारामध्ये मी यम, दैत्यामध्ये मी प्रल्हाद, गणकामध्ये मी काल, मृगामध्ये मी मृगेन्द्रसिंह, पक्ष्यामध्ये मी गरूड, शुध्द करणारा मध्ये मी पवन वायु, शस्त्र धरणारामध्यें मी राम, मत्स्यामध्ये मी मकर नद्यामध्यें मी भागीरथी, अर्जुना मी सृष्ट पदार्थांचा आदि मध्य आणि अंत, सर्व विद्यामध्ये आत्मा काय? अनात्मा काय! यांचा भेद दाखविणारी जी अध्यात्मविद्या ती मी वाद करणारांचा जो वाद तो मी आहे असे समज.

विवाद करनाराओंमा मने, प्रमुख रूपे तु जाण।।
तत्त्वनिर्णय माटे करातो, वाद मुजने वखाण।।३१।।
अक्षरोमां अकार छुं, समासोमां द्वन्द समास।।
सर्व काळोमां अविनाश छुं, मुजने पेखील्यो अविनाश।।३२।।
विराट रूपे ईश्वरा, धाता मुजने जाण।।
मृत्यू अने उत्पत्ति, भाग्योदयनुं कारण जाण।।३३।।
स्त्रीओमां कीर्ति हुं, शोभाने वाणी वखाण।।
स्मरणशक्ति बुध्दि धीरज, क्षमा गुण मुजने जाण।।३४।।
सामवेदनी श्रुतिओमां, बृहत् साम मने जाण।।
छंदोबध्द ऋचाओमां, गायत्री मुजने वखाण।।३५।।
मासोमा मागसर मास छुं, ऋतुओमां हु छुं वसंत।।
छळभेदीनो जुगार छुं, तेजस्वीओनु तेज भणंत।।३६।।
जीवनाराओमां विजय छुं, निश्चये छुं निश्चयवान।।
सत्ववाळाओनो मने, सत्वगुण वखाण।।३७।।
पांडवोमां अर्जुन हुं, वृष्णीवंशीओमां वसुदेव
कविओमां शुक्राचार्य छुं, मुनिओमां व्यास देव।।३८।।
दमन कारोनो दंड छुं, जीतनारानी नीति जाण।।
गुप्त राखनारानुं मौन छुं, ज्ञानवानोनु ज्ञान वखाण।।३९।।
सर्व भूतोनी उत्पत्ति नुं, बीज मुजने जाण।।
चर अचर कोई भूत पदार्थ, मारा विना नही जाण।।४०।।
दिव्य विभूति माहरी, अेनो अंत नही दर्शाय।।

संक्षेपमां कही तुजने, विस्तारथी केम कथाय।।४१।।
पदार्थ जे विभुतिवाळा, श्रीमान कान्तिमान।।
शक्तिमान उत्साही जे, मारा तेजना अंशथी जाण।।४२।।
समग्र ब्रह्मांडने अेक, अंशवडे धारण कीन।।
सर्वत्र ने सर्वथी पर, मने स्थित लखे मुनिजन।।४३।।
अनंत ब्रह्माडोथी अति, अपार, विशाल अने महान।।
भणे इमामशाह भाभाराम सुणो, पिवजीनी विभूति वखाण।।४४।।

अक्षरामध्ये मी अकार, समासामध्ये मी द्वन्द्वसमास, अक्षय जो काल तो मीच, सर्व कर्मांचे फल नेमणारा विधाता मी, हरण करणारा मध्ये सर्वहर मृत्यू मी, पुढे उत्पन्न होणारामध्ये उद्भव मी. स्त्रियामध्ये मी कीर्तिलक्ष्मी, वाणी, स्मृति, मेधा, धृति आणि क्षमा मी. सामगायनामध्ये मी बृहत्साम, छंदामध्ये मी गायत्री छंद, मासामध्ये मी मार्गशिर्ष मास ऋतुमध्ये मी वसंत, फसविणारामध्ये द्यूत म्हणजे जुवा मी. तेजस्वी जे त्यामध्ये तेज मी, जय मी, उद्योग मी, सात्विकामध्ये सत्व मी, यादवामध्ये वासुदेव मी, पांडवामध्ये तू जो धनंजय तो मी, मुनिमध्ये व्यास मी, कवीमध्ये शुक्राचार्य मी. दमन करणारामध्यें दंड मी म्हणजे शिक्षा मी, शत्रूस जिंकू इच्छिणारांचे कारस्थान मी, गुह्यगोष्टी मध्ये मौन मी, ज्ञानवंत जनांचे ज्ञान ते मी आणि अर्जुना जे कार्हीं सर्व भूतांचे बीज ते मी, मजवाचून असू शकेल असे चराचर भूत काही नाही. हे परंतपा माझ्या दिव्य विभूतिंना अंत नाही. हा जो मी विस्तार केला तो केवळ त्या विभूतींची दिशा दाखविण्यास्तव केला. जी जी वस्तु ऐश्वर्ययुक्त किंवा शोभायुक्त किंवा काहीतरी प्रभावाने युक्त असेल ती ती माझ्या तेजाच्या अंशापासून झालेली आहे. असे तूं जाण किंबहुना, अर्जुना तू इतकेच ध्यानात ठेव म्हणजे झाले कीं एका अंशाने या सर्व जगताला व्यापून मी राहीलो आहे.

अर्थात् श्रीकृष्ण भगवंताचे हे थोडेसे शब्द जरी मनुष्याने आपल्या हृदयात उतरविले तरी तो सच्चिदानंद घन परमात्मा ह्या अनंत ब्रह्मांडा पेक्षा कितीतरी पटीने अपार-विशाल आणि महान आहे ही गोष्ट उत्तम रीतीने ध्यानात आल्यानंतर सर्वच लौकिक इच्छा व चिंता टळून जातील आणि कायम रूपाने त्याचे परम धाम प्राप्त करून देणारा सर्वोत्तम स्वधर्म आचरणाची प्रेरणा, योग्यता आणि प्रयत्न सफळ होतील यांत तिळमात्र संशय नाही.

संत सद्गुरु इमामशाहांनी भाभाराम महाराजांना हा विभूतियोग विस्ताराने सांगितला. ईश्वराच्या अकळित कळांचे ते खरोखरच ज्ञाते होते. म्हणूनच अविगत परमात्म्याची ओळख करून देतांना त्यांनी भगवंताच्या विभूतिंचे मुक्त कंठाने यशोगीत गायीले. यावरून एवढे तरी स्पष्ट होतेच की संत इमामशाह महाराज गीतेचे अनुरागी आणि ज्ञाते साक्षात्कारी महापुरुष होते.

★ ★ ★

# २४. महापुरुषांच्या छळाचे फळ.

पीर फकीर सोही दीनको पेखे, दीनबिना कछु ओर न देखे।
दीन राह लगे जाको नीकी, आन महजबकी बाते लगे पिखी॥१॥
पीर इमामको कैसे बखाने, मोमीनसे मिलत नही आने॥
हिंदवा देखके निकट रहावे, मोमीनसे दूर सदा रहावे॥२॥
ताको कोन बखान पीरा, अपने मोमीनसे जेही नही हजूरा॥
हिंदवाको जेही मुरीद बनावे, मोमीनको इन्कार सुनावे॥३॥
मोमीनको नही रखे मुरीदा, अैसे इमामपे कोन बने फिदा॥
पीर फकीरकी मिजलस होवे, जहाँ तहाँ इमामका नाम बिगोवे॥४॥

'पीर आणि फकिर दीन म्हणजे धर्माला जाणून असतात. ते धर्माशिवाय दुसरे कांही समजू शकत नाही. धर्म, मार्ग यांना अत्यंत आवडता असतो, बाकी सर्व मार्ग त्यांना फिके वाटतात. पीर आणि फकिरांची अशी जर रीत आहे तर इमामशाहांची ती रीत कां असू नये. त्यांचीच रीत कां वेगळी आहे? ते तर कोणत्याही मोमीनला आपला शिष्य बनवू इच्छित नाही. हिंदुंना आपल्या जवळ बोलावितात, त्यांना मान सन्मानाने जवळ घेतात पण मोमीनला मात्र सदैव दूर ठेवण्याचा प्रयत्न करतात. त्यांची जर अशा प्रकारची मनोदशा असली तर त्यांना पीर कां म्हणावे? कारण की आपल्या स्वतःच्या ज्ञातीबांधवांशीच त्यांनी मुख फिरविले आहे. हिंदुंना आपले शिष्य बनवितात आणि मुसलमानांना साफ इन्कार करतात. असा प्रकारचा भेद जे मानतात त्यांना पीर म्हणून कोण मानेल? त्याच्यावर कां म्हणून आपला प्राण टाकावा.' अशा प्रकारचा विचार मनसुबा अमदाबाद येथील पीर फकीरांच्या मिजलसमध्ये चालला

होता. व त्यांना कोणीही मानू नये, त्यांची मान खंडना करावी, अशा प्रकारची चर्चा त्यांच्यात चालली होती. त्या बरोबरच त्यांची निंदा नालस्ती पण होत होती.

कितने अैसे दिखे फकिरा, ल्यानत नाम इमाम पीरा।।
अैसी दशा चली रही साई, अमदाबादमें पीरकी पीराई।।।५।।
सुनी इमामशाहकी कहानी, कापे कसाई रमजु दिलजानी।।
अैसे फकीरको कैसे रखैया, जल्दही यहाँसे दूर पठैया।।६।।
बडे कहार जुलमगीर देखा, कसाईको अब हमने पेखा।।
फकीराके मन हुवा उल्हासा, इमामका अब देखो तमाशा।।७।।
रमजुको सबने भरमाया, संभल संभल चलीये रमजाया।।
रमजुको अजहु नहि देखा, अमदाबाद रमजुको पेखा।।८।।
बडे अभिमानसे रमजु चलैया, पीर इमामको भान दिलावा।।
रमजु आगे कोन बडेरा, आगे तमाशा देखीयो मेरा।।९।।

कित्त्येक पीर आणि फकीर इमामशहांना बदनाम करीत होते. त्याचे कारण हेच होते की ते कोणत्याही मोमीनला शिष्य बनवित नव्हते हाच त्यांचा इमामशहावर रोष होता.

रमजुद्दिन नावाचा एक क्रूर कसाई फकीरांच्या या मैफिलीमध्ये बसून गांजाची चिलीम फुंकत बसला होता. त्याच्या कानावर ही वार्ता पडली आणि तो गरजला - 'अशा पीर फकीराला तर येथून कायमचे घालवून द्यायला हवे. मी जरूर त्याची शान ठिकाणावर आणून ठेवीन.' रमजुला सारे अमदाबाद शहर ओळखत होते. त्याच्या जुलुमाने मोठमोठे लोक थरथर कापत होते. त्या रमजुला फकिरांनी धारेवर चढविले म्हणून तो अधिकच टरटरू लागला आणि इमामशाहावर आपला हात उगारण्यास तो सिध्द झाला. फकिरांनी त्याला आणखीच चेतविले. 'देख रमजू जरा सांभाळून पाय धरायचा. इमामशाहा कांही सामान्य फकिर नाही.' 'अरे सोडा या गोष्टी! हा रमजु कांही तसा डरपोक मनुष्य नाही. मला कोणी ओळखलं आहे. अशा भेदरटासारख्या काय गोष्टी करतात. एकवेळ माझा झपाटा तर पहा. तुम्ही डोळ्याने जेव्हा पाहाल तेव्हाच तुमची खात्री पटेल की या रमजुचा किती धाक आणि बोलबाला आहे ते!'

रमजुला अशारीतीने चढवून दिल्यावर फकीरांना खूप आनंद झाला. ते समजत होते की बस आता इमामशाहांचा काळ आता भरलाच. रमजु त्याला कधीही सोडणार नाही. त्याचा पिच्छा पुरविल्याशिवाय राहणार नाही. पाहू आता तमाशा काय होतो तो. असे मनसुबे रचित ते एका खऱ्या पीराच्या पाठीमागे लागले.

बंदरको ज्यों मदिरा पाये, अैसे रमजुको आन सताये।।
उरमे रखकर जुठ बहाना, रमजु आयके ठाढे पीराणा।।१०।।
साई मो पे रहम कुछ कीजे, मुरीद अपना बनाई लीजे।।
करामत मैने बहुरी सुनैया, ताथे साई कदमोमे आइया।।११।।
रमजुको जुठे विनय बताया, साईके आगे शिर झुकाया।।
अधम रमजुको पेख लिये सैया, शयतानको कैसे समजैया।।१२।।
फिरभी शान्त हुवे गुरु पीरा, रमजुसे कहे गुण गंभीरा।।
रमजु प्यारे राह भूलीया, अमदाबादसे यहाँ क्यो आया।।१३।।
वहाँ ही बडे बडे नेक फकिरा, पाक दिदारा पाक हे पीरा।।
ताका कदमोमें जाय झुकैया, तोहे मुरीद बनावही सैया।।१४।।
मुझमें तो कछु नही पीराई, लोगन झुठी बाते बनाई।।
रमजु छोड दो मेरा संगा, अमदाबाद जाइये उमंगा।।१५।।

माकडाला मदिरा पाजून ज्याप्रमाणे पिसाट बनविले जाते. त्याप्रमाणे रमजुला पिसाट बनवून चढविले व इमामशाहांच्या विरूध्द निशाण बनवून पुढे केले. हा रमजु अज्ञान अंध:कारात गोते खात होता म्हणून तो फकिरांची चाल न समजता पीर इमामशाहांची शान ठिकाणावर आणण्याकरिता त्यांच्याशी संमत झाला. आपल्या जुलुमाने अमदाबाद शहरातली सारी जनता चळचळा कापते पण पवित्र हृदयाच्या पीर इमामशाहाला आपण भिववू शकणार नाही हे त्याला काय माहित? परंतु या समयी मात्र तो अहंकाराने अंध बनला होता. म्हणून आवेशाने अमदाबादहून निघाला आणि पीराण्याला जाऊन पोहोचला. शिष्य बनण्याचा बहाणा करून तो इमामशहांना छळण्यासाठी आला होता म्हणून तो झुकून पडला आणि दंभाने म्हणाला, -

'बाबा, माझ्यावर दया करून मला आपला शिष्य बनवून घ्या मी आपल्या चमत्कारांच्या बऱ्याच गोष्टी ऐकल्या आहेत. म्हणून माझं मन आपल्याकडे वळलं आहे आणि आपलं शिष्यत्व पत्करावं असा निश्चय करून मी आलेलो आहे. म्हणून मला आपला करून घ्या.' असे म्हणत त्याने इमामशाह चरणी लोटांगण घातले.

सर्वज्ञ संत इमामशाह समजून गेले. त्या अधमाचा हेतु त्यांनी जाणला तरी पण शांत चित्ताने त्यांनी रमजुला म्हटले - 'रमजु! तुला खरा मार्ग कोणीच सांगितला नाही असे वाटते. अरे अमदाबाद शहरात केवढे मोठमोठे वली, पीर, फकीर आहेत की ज्यांच्या केवळ कृपाकटाक्षाने मनुष्य पावन होतो. त्यांच्या चरणी लोटांगण घालून त्यांचाच शिष्य होऊन रहा. माझ्यात कांही त्यांच्यासारखी पीराई नाही. लोकांच्या तोंडून माझ्या विषयी ज्या काही गोष्टी ऐकल्या असतील त्या सर्व अफवा आहेत.

म्हणून रमजू, सत्य काय आहे ते शोधण्यासाठी तू अमदाबादला जा. तेथे गेल्यानंतर तुझी मनोकामना पूर्ण होईल आणि तुला पवित्र अशा पीरांचे दर्शन होईल.' अशाप्रकारे पीर इमामशाहांनी त्याला परोपरीने समजाविले.

वहाँ मुराद हाँसल होवे, रमजु बेन कह्यो चित्त खोवे।।
सायाजी मत करो बहाना, मैने सुना तुमी हो गुणवाना।।१६।।
मै तो मुरीद तुम्हारा बनैया, मोहे दुजा न भावी सैया।।
रमजु तेरे दिलकी जानी, अब तो मेरी सुनो दिलजानी।।१७।।
मुलतान शहर मेरा निवासा, वहा मानो अेक हवे तमाशा।।
मेरा पिदरका निकसे जनाजा, बिकल हुई मैने किन्ह अवाजा।।१८।।
साया सुनो मेरा कहेना, मेरा हक्क मुझे ही देना।।
ता दिन लोग मुलतानी हसेरी, हक्क लेनेको आये कहाँसेरी।।१९।।
जिन्दा थे तब मुख फिराया, मरने पिछे उठकर धाया।।
मेरा हक्क मेरा हक्क बखाने, मरने पिछे कहा हक्क दिवाने।।२०।।

'रमजु अमदाबादला गेल्यानंतर तुझी सारी मनोकामना पूर्ण होईल. तुला मी जे कांही सांगतो ते तू आपल्या हृदयात धारण कर.' इमामशाहांनी त्याला समजाविण्याचा बराच प्रयत्न केला पण रमजु जाणून बुजून आलेला होता. तो म्हणाला, 'साई, तुम्ही खोटा आव आणता आहांत. मी ऐकले आहे की तुम्ही अत्यंत गुणवान आहांत, म्हणूनच मी निश्चय केलेला आहे की मी तुमचाच शिष्य होऊन राहील म्हणून दुसऱ्या कोणाकडेही मला पाठवू नका व मी जाणार नाही. तुम्हीच मला आपला बनवून घ्या.' अशा रीतीने रमजुने अत्याग्रह केला तेव्हा इमामशाहांनी त्याला मूळ हकिकत सांगण्यास सुरुवात केली.

'रमजु तुझ्या चित्ताची गति मला पूर्णपणे समजली आहे. आता तुला माझ्या चित्ताची व्यथा काय ते सांगतो. ऐक, गोष्ट अशी आहे कीं मुलतानला माझे वास्तव्य होते. तेथे एक असा काही तमाशा झाला की त्याची व्यथा आज पण मला सतावीत आहे. माझा पिता स्वर्गस्थ झाला तेव्हा त्यांची प्रेत यात्रा निघाली. मी खूप लांब गेलेलो होते, पण मला समजताच त्याठिकाणी हजर झालो आणि व्याकूळ होऊन मी जनाजा खाली उतरविला. मी म्हटले, 'पिताजी, मला माझा हक्क (हिस्सा) द्या.' माझी ही मागणी ऐकताच कांहीएक विचार न करता मुलतानवासीलोक माझी हसी उडवायला लागले. जेव्हा बाप हयात होता तेव्हा तोंड फिरवून दूर निघून गेला होता, आणि मरण पावल्यावर आता हिस्सा मागायला आलेला आहे. याला मूर्ख नाही म्हणावे तर काय?'

मुलतानी यही रीत बरखानी, मरनेके पिछे मंगनी ठानी॥
तादिन बहुत हुई मेरी हाँसी, साई को लाज राखी सुखराशी॥२१॥
मुलतानीको बेन सुनाया, अब मोहे मोमीन नहि भाया॥
मोमीन मेरा नही बनैया, हिंदवा मेरा संगी रहैया॥२२॥
हिंदवाही मेरा मुरीद होवे, मोमीनसे हम दूर विगोवे॥
मोमीनको मे नही दिल ठाणु, हिंदवा मेरा सदाही बखानु॥२३॥
मेरी प्रतिज्ञा हुई पुरानी, ताथे हिंदवा लगे दिलजानी॥
मोमीनसे अब छुट गया नाता, कैसे मुरीद बनावहु भ्राता॥२४॥
मुलतानकी बाते रही मुलताना, अब तो यहाँ रहो गुलताना॥
मोहे मुरीद बनावहु साई, यहाँ से दूर कबहुं नही जाई॥२५॥

मुलतानी त्याचे नांव की मेलेल्या पासून मागतो. आता अशा या दुःखद प्रसंगी हक्काची मागणी करणे ही काय शहाणपणाची रीत आहे असे म्हणत त्यांनी माझी खूपच टिंगल केली. परंतु माझ्या पित्याने माझी लाज राखली. मला माझा हक्क मिळाला. नंतर मी आवेशाने प्रतिज्ञा केली, 'आता यापुढे कोणाही मुसलमानाशी संबंध (गुरु-शिष्य या नात्याचा संबंध) ठेवणार नाही. हिंदुच माझे मित्र होतील माझी शिकवण वैदिक सनातन धर्माची राहिल. ॐ स्मरण, ज्योतीस्वरूपाचे ध्यान, अथर्ववेदीय मंत्रोपचाराने कलशपूजा, अवतार उपासना, श्रीनिष्कलंकी नारायण गायत्री मंत्रोपचाराने हवनविधी, वेद उपनिषद उपदेशित देवयान मार्गानेच माझे मार्गदर्शन राहिल व ही तत्वे मानणाराच माझा शिष्य राहिल.' अशा प्रकारची मी प्रतिज्ञा केलेली आहे. रमजु माझी ही प्रतिज्ञा निट लक्षात घे. तू ही माझी तत्वे मानणार असशील तर माझा शिष्य होण्यास पात्र आहेस. पण तू हे मानणार नाहीस याची मला खात्री आहे म्हणून तू विनाकारण हट्ट करू नकोस. माझ्या सांगण्याचा विचार कर व अमदाबादला जा तेथे कोण्याही वली, पीर, महापुरुषाच्या चरणी मस्तक झुकव व त्याचे शिष्यत्व पत्कर.

गुरु इमामशाहांनी रमजुला एवढ्या चांगल्या शब्दांत उत्तम रीतीने समजाविले परंतु रमजु तर जाणून बुजून भानगड उपस्थित करण्यासाठीच आला होता. तो आपली जिद्द सोडण्यास तयार नव्हता. इमामशाहांनी त्याला परोपरीने समजावले पण तो आपले जुनेच तुणतुणे वाजवत होता. तो म्हणाला, 'बाबा, आपले वर्णन तर मी ऐकले. ती मुलतानची गोष्ट मुलतानला राहू द्या. आता इथे त्या गोष्टीचा काय संबंध? आता तर तुम्ही गुजराथमध्ये आलेला आहांत म्हणून ती प्रतिज्ञा इथे काय कामाची? बस आता जास्त विचार व उशीर करू नका. मला आपला शिष्य करून घ्या.

जो पर्यंत तुम्ही माझी मागणी पूर्ण करणार नाही तोपर्यंत मी येथून उठून कोठेही जाणार नाही.' अशा रीतीचा हट्टाग्रह करून रमजु शेवटच्या पायरीवर जाऊन बसला. तो आपल्या जातीस्वभावावर आला. त्याने आपला अस्सल स्वभाव व्यक्त केला.

रमजुको सबही पहिचाने, अमदाबाद के लोग बखाने॥
सायाजी इनकार मत कीजे, रमजु को अपना कर लीजे॥२६॥
इन्कार कियेसे विपरीत होवे, रमजुद्दीन किसका नही होवे॥
शोच विचारके कर हो साई, समजुको अपना मुरीद बनाई॥२७॥
छुरी निकालके बैठे तेही ठामा, साई कहे येही जिद्द निकामा॥
रमजु तोहे मैने साफ सुनाया, मोमीन मुरीद नही मोहे बनाया॥२८॥
मेरी प्रतिज्ञा सोही रहेगा, साई कबहु नही तोसे डरेगा॥
रमजु ता दिन छूरी उठाया, क्रोधमें साईको मारन धाया॥२९॥
रमजु छूरी तेरे हाथ रहावे, अंधे किसको तु मारन धावे॥
खोजत अपने पंथ चलैया, अंधियारा मत राखहु पैया॥३०॥

'बाबा तुम्ही या रमजुला ओळखले नाही म्हणूनच असा इन्कार करीत आहांत. सारे अमदाबाद शहर या रमजुला ओळखते आणि ते सुध्दा रमजु ज्या गोष्टीची जिद्द करतो ती पूर्ण करूनच सोडतो म्हणूनच! मी आपणास आग्रहाने सांगतो की कोणत्याही प्रकारचा इन्कार न करता मला आपला शिष्य बनवून घ्या. इन्कार केला तर त्याचा परिणाम चांगला होणार नाही. जो पर्यंत मी भल्या मनाने गोष्ट करीत आहे तोपर्यंत आपण तयार होऊन जा. नाहीतर हा रमजु बिफरला तर कोणाच्या समजाविण्याने समजणार नाही. जाणून बुजून जे बोलायचे ते विचार करून बोला व नीट विचार करून काय करायचे ते करा! या रमजुला आपला शिष्य बनविल्यानेच सुटका आहे.' असे म्हणत त्याने धारदार तिक्ष्ण सुरी काढली आणि हातात धरून तिथेच बसला.

त्याचा तो आवेश पाहून इमामशाह म्हणाले, 'रमजु! अरे तू ही जिद्द करणार हे मला माहिती होते. कारण हे तू तुझ्या बुध्दिने करीत नसून, द्वेष मत्सरबुध्दिने तुझ्याकडून हे कार्य करविले जात आहे व मोठ्या अभिमानाने तू हे काम करण्याचा विडा उचलला आहेस. पण तू मूर्खपणा करीत आहेस हे जाणत नाहीस. मी कोण्याही मोमीनला शिष्य बनविला नाही तसेच तुला पण मी शिष्य बनविणार नाही. मी ही तुला स्पष्ट शब्दांत सांगितले आहे. की माझी प्रतिज्ञा ती प्रतिज्ञाच समज. मी काही तुझ्या धाकधमकीला बाधेल असा नाही. रमजु मी तुला आणि तुझ्या आवेशाला भिऊन माझा शिष्य बनवून घेईन हे मुळीच होणार नाही. असे शिष्यत्व पत्करण्याचे

नाटक तू करीत आहेस पण लक्षात ठेव याचा परिणाम ठिक होणार नाही. तू स्वत:च स्वत:ला फसवित आहेस.'

इमामशाहांनी स्पष्ट शब्दांनी त्याला ठणकाविले पण कांही उपयोग झाला नाही. आवेशाने क्रोधांध होऊन हाती सुरी घेऊन तो सरळ इमामशाहांच्या अंगावर धावून गेला. इमामशाह निर्विकार मनाने त्याचे कडे पाहून म्हणाले, 'रमजू! तुझी सुरी तुझ्याच हातात राहू दे! अरे आंधळ्या माणसा तू कोणाला मारण्यासाठी चवताळला आहेस!'

संत पुरुषाच्या मुखातून हे शब्द निघताच रमजू ज्या ठिकाणी उभा होता त्याच ठिकाणी स्थिर होऊन गेला. इमामशाहाला मारण्यासाठी उगारलेली सुरी त्याच्या हातातच राहीली. तो खरोखरच आंधळा बनून गेला. त्याच्या दोन्ही डोळ्यांचे तेज साफ विझून गेले. त्याला सारी दुनिया अंध:कारमय भासू लागली. पीर इमामशाहाला सतावण्याकरीतां व त्यांची शान ठिकाणावर आणण्याकरिता आलेल्या रमजूचीच शान व भान दोन्ही ठिकाणावर आली.

साईको मुखसे बेन सुनाया, रमजु ताहि भये अंधियारा॥
अंधे को कछु सुझत नाही, रमजु कहे तुमी कहा हो साई॥३१॥
तेरा किया सो तुझको पावे, रमजु तुमी यहा नही रहावे॥
अमदाबाद बेगे चली जै हो, अपना संगीको खबर पडै हो॥३२॥
इमामको मत आन सतावै, रमजुकी गति देख डर पावै॥
कसाईकी कोऊ न बुझैया, रमजु अमदाबाद चलैया॥३३॥
रमजुको सबने अंधे दिखैया, सबही अचरज हो गैया॥
रमजु तेरा यह हाल क्यों हुवा, किस कारन तुमी आखोखुवा॥३४॥
पीर इमामको पीराणा सताये, रमजुको उनका फळ पाये॥
अपने कर्मका येही खेला, रमजु अब तो हो गया अकेला॥३५॥

रमजूचा आवेश उतरला. डोळे बंद होताच त्याला आपल्या गतीचे भान आले. आता तो जरा विरघळला आणि दीनतेने म्हणाला, 'साई तुम्ही कोठे आहांत?' 'रमजू' आता साई तुला कांही करू शकतील असे काही राहिलेले नाही. तुला तुझ्या कर्माचे फळ मिळालेले आहे. आता तू येथे राहूं शकणार नाही म्हणून मुकाट्याने अमदाबादचा रस्ता धर. तेथे जाऊन ज्यांनी तुला या कामाकरिता चढविले होते आणि पीर इमामशाहाला सताविण्याची सल्ला दिली होती त्यांना ही खबर सांग की पीर इमामशाहाला फिरून कोणी सतावू नये. आणि कोणाच्या मनात अजून तशी खुमखुमी असलीच तर त्यांनी आधी रमजूची स्थिती पाहावी नंतरच इमामशाहाला सताविण्याचा संकल्प करावा.'

इमामशाहांनी त्याला साफ शब्दात ठणकाविले. आंधळा झाला तरी पण तो स्वमानी होता म्हणून तो पीराण्यास थांबला नाही. हळू हळू चांचपत चांचपत त्याने मार्ग काढला व तो अमदाबादच्या मार्गाला लागला. त्याचा अभिमान अजून सोबतच होता. स्वत: मोठी चूक केली होती पण त्याने एका शब्दानेही इमामशाहांची माफी मागितली नाही. अडथळत पडत झडत तो कसातरी अमदाबादला येऊन पोहोचला.

रमजु आला, पण त्याला आंधळा झालेला पाहताच सर्वांना आश्चर्य वाटले व ते त्याला विचारू लागले, 'रमजू' अरे तुझी ही दशा अशी कशी रे झाली. तुझे डोळे असे एकाएकी कसे गेले? लोक विचारू लागले, तेव्हा दिन बनून तो म्हणाला, 'मित्रांनो' हे तर माझ्या कर्माचे फळ आहे. पीराण्याला गेलो आणि पीर इमामशाहाला सताविले म्हणून त्याचे हे फळ मला मिळाले. माझे डोळे गेले मी आंधळा झालो. मला माझ्या दुष्कर्माचा मोबदला पुरेपुर मिळाला. आतापर्यंत रमजूचे सर्वच होते पण आता हा रमजू एकटा पडला. आता या रमजुला कोणीही साथ देणार नाही. रमजुला एकटयालाच त्याच्या कर्माची फळे भोगावी लागतील.' त्याची ही अशी दशा पाहून लोक अवाक् होत होते.

फकिराको कुफ्र ही ठांना, तासे में हुवा बैगाना।
शयतानियात साईसे किन्ही, करमे छुरी उठायके लिन्ही॥३६॥
साई इमामको देखे पीराई, अंधे यहां क्यों छुरी उठाई॥
साईने मोहे सबक शिखाया, यारो कबहु नही पीर सताया॥३७॥
रमजु अपने ही घर लौटे, देखत चकित हुये छोटे मोटे॥
साईको कैसे सतावन गैया, तासे तुमरी अखियाँ बिलैया॥३८॥
शयतानको सबेही सुनावा, अब तो मेरा कहां हे दावा॥
अखियाँ गई दुनिया अंधियारा, रमजुको यहाँ कोई न प्यारा॥३९॥
अपने कर्मपे बहुरी बिगोया, रमजु रेन दिन ही रोया॥
अंधे हुई के घरमे पूराये, रमजु को कही चेन न पाये॥४०॥

'रमजू, तुला ही सल्ला कोणी दिली? आणि पीर इमामशाहला सताविण्यासाठी तू सुध्दां कसा बरे तयार झालास?' लोक रमजुला विचारु लागले तेव्हा तो म्हणाला -

'सद्‌गृहस्थांनो, मी फकीरांच्या संगतीत बसत होतो. त्यांच्या हृदयांत द्वेष, मत्सर होता म्हणून ते इमामशाहांचा विरोध करीत होते. त्या लोकांनी मला लक्ष बनविले. मला व्यसनाधिन केले आणि आवेशात येऊन मी हे काम करण्यास तत्पर झालो. पीर इमामशाहांची शान ठिकाणावर आणण्यासाठी पीराण्यास गेलो. हातात सुरी घेऊन उभा राहिलो. तेवढ्यात पीर इमामशाह म्हणाले, 'आंधळ्या, इथे कोणावर सुरी

उगारतोस. तुझी सुरी तुझ्याच हातातच राहिल. अंध माणसा इथे सुरी उगारण्याचे काम नाही.' त्यांचे ते शब्द माझ्या कानावर पडले मात्र मी खरोखरच आंधळा झालो. मित्रांनो, पीराने मला धडा शिकविला तो असा कीं नाहक कोणालाही असे सतावू नये. या रमजूची ही दशा पहा आणि तुम्ही पण हा धडा लक्ष्यात घ्या.' असे म्हणत तो आपल्या घराकडे गेला.

रमजू घरी आला. त्याची ती दयनीय दशा पाहताच घरातले सर्व लहान मोठे आश्र्चर्यचकित झाले. रमजुने सर्वांना आपली करूण कहानी सांगितली. ती ऐकून सर्वांनी त्यालाच ठपका दिला. तेव्हा तो म्हणाला, 'तुम्ही आता सर्वच मला दोष देणार पण मी काय करूं, मी त्यावेळेस सैतान झालो होतो. म्हणून मला साऱ्यांचेच ठपके ऐकावे लागतील.' रमजु खरोखरच आता दीन आणि लाचार झाला होता. आपल्या कर्माला दोष देत तो दिवस व रात्रभर एकांतात बसून अश्रु ढाळीत होता. डोळे गेले त्याला सारे जग अंध:कारमय लागत होते. रमजू आता सर्वांना नको नकोसा झाला होता. तो स्वत: आंधळा होऊन घरात गाडला गेला होता. त्याचे हृदय आता पश्र्चात्तापाने व्याकुळ होत होते.

दुनिया दिखे स्वार्थके संगी, अंधे सें सब रहे असंगी।।
अंधेको कोई भाव न देखे, जब कमाई तब आवते देखे।।४१।।
अब तो पराधिन हो गये पंडा, रमजु फस गये भवके फंदा।।
अपराधीको याद सतावे, पीर इमामके बेने सुनाये।।४२।।
सायाने मोहे बहुत समुझाया, साईका बेन सबे ठुकराया।।
फिरभी साई मनावन लागे, रमजु ता दिन हुऐ अभागे।।४३।।
जा दिन मैने छूरी ग्रहैया, ता दिन मेरा भाग बिलैया।।
पाक पीरासे हाथ उठैया, कसाई को कैसे गम पैया।।४४।।
छूरी लेके हम मारन धाये, ता दिन मोहे मिली सजाये।।
साहिब मुखसे उचरे बेना, तुरतही मेरा चल गये नैना।।४५।।

घरातील व घराबाहेरील सर्वच लोक आता त्याच्या दूर दूर राहू लागले. जेव्हा तो पैसा कमावून आणीत होता. तेव्हा तो सर्वांना प्रेमाचा होता. त्याला आवकारीत होते. पण आता आंधळा होऊन पराधिन झाला तर त्याची विचारपूसही कोणी करीत नव्हता. दुनिया स्वार्थाची आहे. रमजुला अेकांतात बसून आकाशातले तारे चमकावे त्या प्रमाणे आपल्या कृतकर्माचे विचार आठवू लागले. पीर इमामशाहांचे शब्द अजूनहि त्याच्या कानावर येत होते. 'रमजू, तुला समजायला पाहिजे. माझी प्रतिज्ञा आहे म्हणूनच तुझ्यावर मी अनुग्रह करू शकणार नाही.' अशा रीतीने वारंवार त्यांनी

मला समजाविले पण त्या समयी माझ्यात सैतान संचारला होता. मी त्यांच्या साऱ्याच गोष्टींचा अनादर केला. मी खरोखर अभागी, हृदयात द्वेष भरलेला, मत्सराने पेटलेला होतो. म्हणूनच त्यांच्यावर सुरी उगारण्याची दुर्बुध्दि मला झाली. रमजुला त्या कृत्याची सजा मिळाली. अरे! पण त्यांनी मुखातून उद्‌गार काढताच माझे डोळे आंधळे झाले कसे? हे एक आश्चर्यच नव्हे तर काय? असा 'वली' महापुरुष तर कोठेच पाहण्यात आला नाही. अभागी रमजुला आता पीर इमामशाहांची दिव्यशक्ति समजून आली. पण आता काय उपयोग? पश्चात बुध्दि काय कामाची?

> ऐसे वलीको मैने नही देखा, रमजु अभागा अब कहा पेखा।।
> अब तो चल गई अखियाँ तुमारी, जहा तहा फिरत रहो जखमारी।।४६।।
> रमजु अमदाबाद फिरैया, बहुरी पीर फकीरको झुकैया।।
> साया रहम कर हो पीराई, अखियाँ मोहे वापस करो साई।।४७।।
> रमजुकी सुनही बानी, हांसी करने लगे दिलजानी।।
> अखियाँ गई सो गई दिलजानी, अखियाँ वापस मिले नही जाना।।४८।।
> ऐसा कभी होने नही पाया, गई अखियाँको वापस लाया।।
> रमजु अब तो भये दिवाना, अखियाँ खोज भये हेवाना।।४९।।
> शेरका बच्चा रमजु जब आवे, देखतहि सबही डर पावे।।
> वे दिन अब तो गये बिलाई, रमजु अब तो अजा दिखाई।।५०।।

'रमजु, आता तर डोळे गेले. आता या दुनियेत इथे तिथे भटकत फिर.' ऐकान्तात बसलेल्या रमजूला विचार आला. तो हळूच उठला आणि घराच्या बाहेर निघाला. अमदाबादमधिल मोठ मोठ्या पीर फकिराकडे गेला. त्यांच्या चरणावर झुकला व त्यांना डोळ्याची (दृष्टीची) मागणी केली. त्याची ती मागणी ऐकून कोणी त्याचे हसे केले, तर कोणाला त्याची दया आली. पण ते काम कोण करू शकणार? ज्यांनी त्याची ही दयनीय अवस्था पाहिली, त्यांनी कळवळून त्याला म्हटले, 'रमजु कोणाचेही गेलेले डोळे परत मिळाले असे तर आम्ही ऐकले सुध्दा नाही. रमजू, अरे आता तर तू वेड्यासारखा डोळे मागत फिरलास तरी काही उपयोग नाही. उलट अशा फिरण्याने तू मनुष्य मिटून वेडापिसा होशिल. एके समयी तू सिंहाचा बच्चा होतास की ज्याला पाहताच लोक चळचळा कापत होते पण आज तर तू बकरीपेक्षाही लाचार झाला आहेस. आज तुला कोणीच किंमत देत नाही. विचारीतही नाही.'

फकिराको बहु बेन सुनाये, रमजुके हियरा दु:ख पाये॥
नेकी दिलमे नाही रखैया, रमजू कुफ्रकी राह चलैया॥५१॥
फस गये बदीका फंदा, साई तेरी अब कहा सुने बंदा॥
सप्तसाल रमजू भटकाये, अमदाबाद लगे दु:खदाये॥५२॥
अेक दिन मिल गये फकिरा, रमजु पेखलिया सोही पीरा॥
जिसने ताहिको अंध बनैया, सोही वलीके कदमोंमे झुकैया॥५३॥
सायाजीको अरज सुनावो, रहम दिल दया दिल लावो॥
बडे पीराना रहम करैया, रमजु तोहे कुछ नफा मिलैया।५४॥
अमदाबाद तुम काहे भुलैया, यहाँ कोई तेरा बने नही सैया॥
खोजत खोजत उमर गमावे, रमजु तोहे जलवा नही पावे॥५५॥

ज्या लोकांनी त्याला इमामशाहांना छळण्याकरिता चढविले होते तेच लोक आज त्याची हसी उडवू लागले. त्यांच्या शब्दांचे घाव आता रमजुच्या हृदयाला बसूं लागले. जखमेवर मिठ चोळावे त्याप्रमाणे ते म्हणु लागले 'रमजू, तु आपल्या हृदयात सद्भाव ठेवला नाही आणि द्वेष मत्सराच्या रस्त्याने चाललास त्याचे हे फळ आहे. कूकर्मात फसलास, आता साई तुझी कोणतीही फिर्याद ऐकतील असे राहिले नाही.' अशा रीतीने बोलून त्याला फिरते करीत. रमजू शहरातील गल्लीगल्लीतून फिरला. मिळेल ते खात असे न मिळाल्यास उपाशीच राही पण कोणालाही काहीच मागून सतावीत नसे. जागा मिळेल तेथे झोपून राही.

अंध रमजूची हातात कांठी घेऊन शहराच्या रस्त्यारस्त्यात फिरण्यात सात वर्षे व्यतीत झाली. अमदाबाद आतां त्याला दु:खदायक वाटू लागले. कारण की ज्या आशेने तो फिरत होता. ती फलदायक ठरली नाही. तो निराश झाला. एके दिवशी असाच भटकत असता त्याला एका चांगल्या फकिराचा संग झाला. रमजूने त्याला आपली कर्म कहाणी सांगितली. ते ऐकून पवित्र हृदयाच्या फकिराने सांगितले, 'रमजू, ज्याने तुला अंध बनविले त्या वली (महापुरुषा) जवळ जा आणि त्यांच्याच चरणावर झुकून माफीची भिक माग. तो महापुरुष जरूर तुला क्षमा करील. रमजू, तू सर्व भटकंती सोड आणि त्या महापुरुषालाच शरण जा, अमदाबाद मध्ये राहून तुझे दु:ख मिटणार नाही. फिरून फिरून तुझे आयुष्य निघून जाईल, पण तुला कसलाही लाभ घडणार नाही. महापुरुषांच्याच कृपाप्रसादाने तुझे कल्याण होईल.'

जल्वा जहाँ तुने खूदही देखा, रमजु सोही पीरको नही पेखा॥
अखियाँ अंधी तेरा हियरा अंधा, तासे बिलखत गाफिल गंदा॥५६॥

हमदर्दीसे तोहे मनाये, दिल चाहे सो करही उपाये॥
फकीरको सदा नेकी प्यारी, रमजु फकीरी बाते बिचारी॥५७॥
साईके बेन लग रहे नीके, समझ पाई लगे सुधहीके॥
रमजु तादिन साईको झुकैया, बाबा भुले को राह दिखैया॥५८॥
रमजु यहाँ बहूत भटकैया, आपे ही मोटे मिला दिये सैया॥
अमदाबादसे अंधे चलैया, चलते आ गये जहाँ है सैया॥५९॥
अंधे को पीर दैहो सहारा, साई तुमी हो दीनके रखवारा॥
अंधे ठाढे द्वार तुम्हारे, बैया पकडलो साई पियारे॥६०॥

'रमजु! ज्या दिव्यशक्तीच्या शोधात तू आहेस, त्या दिव्यशक्तीचा चमत्कार तर तू स्वत:च अनुभवला आहेस. त्या समयी या पीराला तू ओळखले नाहीस? आश्चर्य वाटते कीं तुझे डोळे अंध झाले तरीही तुझे कठोर हृदय कां द्रवले नाही? तुझ्या या अज्ञानपणाने तू इतके वर्षेपर्यंत दरदर भटकत फिरलास! तुझ्या या दयनीय स्थितीकडे पाहताच माझे फकीराचे हृदय द्रवले म्हणूनच तुला योग्य मार्ग दाखवीत आहे की तू पीराण्यासच जा. तेथेच तुझी भटकंती मिटेल. फकीराला सत्य व सरळ मार्गच आवडत असतो. मी तुला जे सांगितले त्यावर चांगला विचार कर आणि तुला जे आवडेल ते कर.'

फकीराचे शब्द या समयी रमजूला फारच गोड वाटले. रस्ता चुकलेल्या एका मुसाफिराला अचानक मार्ग मिळावा त्याप्रमाणे त्याला आनंद झाला. तो अत्यंत नम्रतेने त्या फकिराच्या चरणावर झुकून पडला आणि म्हणाला, 'बाबा, मला आंधळ्याला आपण रस्ता दाखविला रमजू आतापर्यंत इथे कितीतरी भटकला पण कोणीही असे मार्गदर्शन केले नाही. एवढ्या सात वर्षानंतर आपण मजवर कृपा केली. आता मी आपल्या म्हणण्याप्रमाणे वर्तन करीन.' असे म्हणत त्याने आपला मनोभाव व्यक्त केला. ते ऐकून फकिर निघून गेला. रमजुने त्याच क्षणी अमदाबादमधून प्रस्थान मांडले. हळू हळू मार्ग काढीत तो पीराण्यास येऊन पोहोचला. इमामशाहांना म्हणाला, 'बाबा, या आंधळ्याला पदरात घ्या. आपण दीनदुबळ्यांचे बेली आहांत. हे दीनदयाळू मला आपल्या चरणी सहारा द्या. एक कृतकर्माचा आंधळा भिकारी आपल्या द्वारी दयेची याचना करीत झोळी घेऊन उभा आहे. त्याला भिक वाढा. हा भिकारी आपल्याच दुष्कर्माचे दु:खाच्या खाईत पडला आहे. याला करूणेचा हात देऊन वर काढा.' आंधळ्याची ही दीनवाणी ऐकून गुरु इमामशाहा आसनावरून उठले आणि दरवाजात आले.

रमजुको साद किये तेही ठारा। सांई आय खडे रहे द्वारा॥
रमजु वापस यहाँ क्यों आये? किसने तुझे यहाँ बेर पठाये॥६१॥
गुन्हेगार हुई रमजू आया, मोहे माफ करो पिवराया॥
रमजुको अेक आश तुम्हारी, साया सुनोरी आरत अमारी॥६२॥
मरतेको पीर बेर कहां मारो, साई अपनो बिरद बिचारो॥
रहमदिल तुमी हो साई, में हुं रमजु अधम कसाई॥६३॥
साई मोहे माफ करै हो, पाक पीरा मोहे अखियाँ दै हो॥
रमजु अभागा पीर नही पेखा, कर्म गति भुगतही देखा॥६४॥
बक्षो गुना मोरे साई, झुक गये कदमोमे कसाई॥
बैया ग्रही गुरुदेव उठाये, रमजु तुमी अब नही भटकाये॥६५॥

साई दरवाजात आले आणि पाहतात तो रमजू बाहेर उभा आहे. हात जोडून तो आंधळा कळवळून विनवित होता. त्याला गुरु इमामशाह म्हणाले, 'रमजु! तू परत आलास! आता कोणाच्या सांगण्याने तू येथे आला आहेस? तुला आणखी कोणी चढविले आहे कीं काय? तुला ही सल्ला कोणी दिली?' 'बाबा! मी गुन्हेगार म्हणून येथे आलो आहे. मी आपला मोठा गुन्हा केलेला आहे. मला माफ करा रमजुला आता फक्त आपलीच आशा आहे. हे साई, माझी आर्त वाणी ऐका. मी आता मरत आहे. ह्या मरणाऱ्या रमजुला अधिक मारू नका हे सांई, तुमचे ब्रीद मारण्याचे नाही, तारण्याचे आहे. आपण तर दयेचे सागर आहांत. हृदयात दया आणून या अपराधी रमजुचा विचार करा. मी तर एक अधम काम करणारा रमजु कसाई आहे. माझा अपराध माफ करा. हे पवित्र महापुरुषा मला माझी दृष्टी परत द्या. आतापर्यंत तर या अभाग्या रमजुने आपल्याला ओळखले नाही. मी खूप भटकलो. कर्माच्या फेऱ्याने मला काहीच सुचत नव्हते. पण आता मला सत्य समजून आले. माझा अपराध माफ करा.' असे म्हणत रमजु सदगुरुंच्या चरणावर दीनतेने झुकून पडला. त्या समयी गुरु इमामशाहांनी त्याला हात धरून उठवित म्हटले, 'रमजु, उठ आता तुझे भटकणे संपले आतापर्यंत तुला भटकावे लागले पण आता तू नियतठिकाणी आला आहेस. आता तुला भटकावे लागणार नाही.'

नैन खोलके देखो जहाना, अब मत करो कुफ्र बहाना॥
रमजु साईके बेन सुनाये, तुरतही अखियाँ वापस आये॥६६॥
दिखे पीराना बेर झुकैया, अवगुण माफ करै हो सैया॥
मोहे अपना बनालो साई, रहम करै हो पाक पीराई॥६७॥
रमजु बेरही बेर सुनाये, मोमीन मेरा मुरीद न होये॥
फिरभी उचरे मुखसे बेना, अेक दिन तेरे बिलापे नैना॥६८॥

सायाजी अब हाल कहा मेरा, तुमसे मेरा लगे सनेरा।।
मोहे कोई उपाय बतावो, तासे दिलमे लगे उमावो।।६९।।
मुरीद होनेको बेर लुभाया, मोमीन मुरीद मोहे नहि भाया।।
मेरा मुरीद हे हिंदवा फकीरा, कुकस ग्राम बसे सोही पीरा।।७०।।

'रमजु, तुला डोळे पाहिजेत ना?' 'होय बाबा, मला माझी दृष्टी परत द्या! आपल्याजवळ मी हेच मागीत आहे.' 'रमजु, डोळे उघड आणि या जगताचे दर्शन कर. पण एक गोष्ट लक्षात ठेव फिरून या द्वेषमत्सराच्या मार्गास जाऊ नकोस?' संताचे ते शब्द ऐकताच त्याचे डोळे उघडले आणि त्याला भगवंताच्या सृष्टीचे फिरून दर्शन झाले. आपल्या समोर उभ्या असलेल्या गुरु इमामशाहाला पाहताच त्वरेने त्याने त्यांचे पाय धरले व त्यांच्या चरणावर साष्टांग नमस्कार घातला. आपल्या अवगुणांची माफी मागून तो म्हणाला, 'बाबा, मला माफ करा. मी खरोखर आपला अपराधी आहे. मला माफ करून या चरणी ठाव द्या. मला आपला करून घ्या.' रमजुचे हे वचन श्रवण करताच सद्गुरु म्हणाले, 'रमजु, तुला वारंवार ऐकवीले कीं, 'मोमीन माझा शिष्य होऊ शकणार नाही. तरी पण तू तीच गोष्ट पुढे करीत आहेस. या हट्टाग्रहाने तुझे डोळे गेले होते या गोष्टीचा नीट विचार करून परत तसा हट्टाग्रह करू नकोस. 'गुरु महाराज आपण जर असा साफ इन्कार केला तर माझी काय दशा होईल? स्वामी, माझा स्नेह तुमच्यावर जडला आहे तो आता सुटणार नाही. मला दुसरा कांहीतरी उपाय सांगा तो मी करीन पण आपल्यावरील भावात तीळभर अंतर पडणार नाही. आपणास वाटले तर मला जवळ घ्या अथवा दूर लोटा पण माझ्या अंतरात आपणाविषयी जो भाव प्रगटला आहे तो बुजून जाणारा नाही तो अविस्मृत अखंड राहीन.'

सद्गुरु म्हणाले, 'रमजु! तुझे हृदय मी जाणले. मी तुला जरी माझा शिष्य करू शकलो नाही पण तुला माझा सदैव होऊन राहायचा असेल तर त्यास एक उपाय आहे आणि तो म्हणजे 'कुकस' या गांवी माझा परमशिष्य आहे, त्याच्या जवळ जाऊन अनुग्रह घे व त्याचा होऊन राहा. यामुळे तुझेही कार्य होईल व मला मर्यादेचे पालन केल्याचे श्रेय मिळेल.'

नायाजीको नाम बुझैया, ताको जायके लागहु पैया।।
सोही तोहे मुरीद बतावे, उपदेश तोहे आन सुनावे।।७१।।
रमजु मोसे कछु नही होवे, चलै हो कैसे राह बिगोवे।।
पीर इमामसे आज्ञा पाई, रमजु कुकस पहूँचे जाई।।७२।।

नायाजीका चरण ग्रहैया, साई मोहे मुरीद करैया॥
पीर इमामको आज्ञा पठाया, तासे साई कदमोमे आया॥७३॥
रमजु कुफ्रकी राह मत जैहो, संभल संभल नेकी पग दैहो॥
रमजु तोहे मुरीद करै हो, कबहु न साइको नाम बिगैहो॥७४॥
सायाजी होनी सो होई, रमजु अब शेतान न होई॥
सोही शेतान रमजु मर गैया, रमजु को अब मिल गये सैया॥७५॥

'कुकस गावास जाऊन संत नायाजींचे स्थान विचार. तेथे जाऊन त्याची विनवणी कर.' तो तुला शिष्य बनविल आणि उपदेशाच्या गोष्टी सांगेल त्या ऐकून त्या प्रमाणे वाग म्हणजे तुझे कल्याण होईल. याशिवाय माझ्याने दुसरे काहीही होण्यासारखे नाही. केवळ हा एकच रस्ता आहे त्या मार्गाने जा आणि बिना कारणाची बदनामी सोडून दे.' सद्‌गुरुंनी मार्गदर्शन केले त्या प्रमाणे त्याने त्यांची रजा घेऊन कुकसकडे प्रयाण केले.

नायाजीचें नाव अत्यंत प्रसिध्द होते. संत धामात जाऊन त्यांचे चरण धरुन नम्रतेने रमजु म्हणाला, 'बाबा, मला आपला सेवक बनवा. सद्‌गुरु इमामशाहांनी आज्ञा देऊन मला आपणाकडे पाठविले आहे. त्यानुसार मी आपल्या चरणी आलेलो आहे. मला आपला शिष्य बनवा व गुरु उपदेश द्या.' असे त्याचे विनयाचे बोलणे ऐकून संत नायाजी सारी हकिकत समजून गेले. त्याला अनुग्रह देऊन नायाजींनी म्हटले, 'रमजु, शिष्य होण्याकरितां तू आलास पण आता कधीही द्वेष मत्सराच्या मार्गाने जायचे नाही. असत्याच्या मार्गाने जाऊ नकोस. केव्हाही कोणतेही काम करतांना पहिल्यांदा खूप विचार करून सांभाळून पाय ठेवावां.' संत नायाचे हे वचन ऐकून रमजु म्हणाला, 'गुरु महाराज, एकेसमयी जो रमजु सैतान होता तो कधीच मरून गेला. आता जो रमजु आहे त्याला गुरुची प्राप्ती झाली आहे. आता तो एक सेवक आहे, दास आहे, तो सनाथ आहे. आता त्याच्याकडून कोणतेही धर्ममर्यादेचे उल्लंघन होणार नाही. त्याला आपल्या कृपाशिर्वादाने समज आली म्हणून तो आता बदचालीने कधीही वागणार नाही.'

रमजु यहाँ रहो सुखदाई, हरदम साईकी जीक्र बनाई॥
मुरसदके चरणोमे रहैया, रमजुको अखंड सुख पैया॥७६॥
दिखे जालीम जात कसाई, रमजु खोजत साईको पाई॥
बंदगी पियारी लगे दिन रेना, रमजु साईसे मिला दिये नैना॥७७॥
बरसो रहे मुरसदके धामा, रमजु संत हुअे निष्कामा॥
मुरसद मोहे दियो बिदाई, अब तो गिरीकंदरा मन भाई॥७८॥

रमजु उत्तराखंडमें जै हो, वहाँ गये यहाँ बेर न अै हो।।
शिर झुकाइके रमजु चलैया, जाय उत्तराखंड खोजेरी सैया।।७९।।
रमजुको अपना पियु पाया, बेर बेर यहा नही आया।।
नायाजीके दिलमे हुई हानी, रमजु मेरा चल गये दिल जानी।।८०।।

संत नायाजींनी रमजुला आपला शिष्य बनविले आणि आपल्या संत धामात ठेवून घेतले. ते म्हणाले, 'रमजु, आता तुला दुसरीकडे कोठेही जाण्याची गरज नाही. तू आता इथेच राहशील. शांतचित्ताने भगवंताच्या भक्तीत आता चित्त लाव.' सद्गुरुंची आज्ञा शिरोधार्थ मानून रमजु तेथेच राहिला. सदगुरुंच्या चरणी राहून रमजु अखंड सुखाचा आनंद उपभोगू लागला. एके समयीचा जालीम जातीचा कसाई भगवंताच्या भक्तीत सेवेत एवढा मग्न-अेकाग्र बनून गेला की दिवस आणि रात्रीचेही भान हरपले. निशदिनी तो ध्यानावस्थेत मग्न होऊ लागला. ही प्रेमसाधना करता करता तो खरोखर निष्कामच बनला. एके दिवशी त्याने आपल्या सद्गुरुजवळ विनम्र भावाने सहजतेने गोष्ट काढली.

'गुरुदेव! मला आज्ञा असावी, भगवंताच्या सेवेकरितां, ध्यानस्मरण चिंतनाकरितां गिरीकंदरात जाण्याची माझी तीव्र इच्छा आहे.' संत नायाजींनी सांगितले, 'रमजु तुला ध्यान चिंतनाकरितां गिरीकंदरात जायचेच असेल तर उत्तराखंडात जा. तिथे जाऊन अनन्य भावाने ईश्वराच्या ध्यान चिंतन प्रेमात एकाग्र बनून जा. आणि त्या भगवंताचाच होऊन राहा. त्या भगवंताला प्राप्त केल्यानंतर कोणी ही जिवात्मा या मायीक प्रपंचात परत आला नाही. रमजु, तू सुध्दा त्या भगवंताचे दर्शन करून फिरून या जगतात येण्याच्या मोहात पडू नको. भगवंताचा बनून भगवंतातच लीन होऊन जा.' असे सांगून वरदहस्त त्याच्या शिरावर ठेवून सद्गुरुंनी त्याला निरोप दिला.

रमजु त्याच क्षणी गुरुजींची आज्ञा शिरसावंद्य मानून निघाला. उत्तराखंडात जाऊन गिरीकंदरात एकाग्रतेने बसून ईश्वरध्यान चिंतनात तो मग्न होऊन गेला. भगवंताच्या अनंत चैतन्य दिव्य स्वरूपाचा साक्षात्कार करवून तो त्यातच लीन होऊन गेला.

अनंत काळ व्यतीत झाला पण त्याचे पुनरागमन झाले नाही. संत नायाजींच्या ह्रदयात एक प्रकारचा खटका आघात करीत होता. कारण की आपला रमजु गेला तो गेलाच. कधीही त्याचे पुनरागमन झाले नाही. त्याची आठवण संत नायाजींच्या ह्रदयाला सतावीत होती.



## २५. तुंवार मंकासेन

इडरगढ पहूँचे गुरू राया, ता दिन की कथा सुखदाया।।
मंकासेन नाम रजपुता, वंश तुवार इतिहासे ख्याता ।।१।।
मंकासेन यौवन रंग बंका, शिकारी बन फिरे नि:शंका।।
रूपनिधान दिखे बन खंडा, ता दिनसे अपनी शुध छंडा ।।२।।
मंका आपे बिछोना सोया, ता दिनसे सुख सबही बिगोया।।
मंका मुखसे कछु नही बोले, घायल दील का भेद न खोले।।३।।
दुर्बल देह हो गई बिहानी, दीन थोडे रही जिंदगानी ।।
बहुरी बैद हकीम बुलाये, मंकाको कछु फेर ना पाये ।।४।।
घरका सबही हार गयेरी, मंकाकी क्या गती हुवेरी ।।
साधु संत को बहुरी पेखे, जाके आयगे दिन अनोखे ।।५।।

सदगूरू इमामशाह पावन पर्यटन करीत असता मारवाडहून इडरगढला आले त्यावेळची ही हकीकत आहे. मंकासेन नावाचा एक तुंवार वंशीय राजपुत युवक मोठा बलवान शुर तरूण इडरगढला राहात होता. त्याला शिकारीचा खुप नाद होता म्हणुन तो नेहमी जंगलात फिरत असे. अेकदा असाच शिकारीच्या नादाने जंगलातुन फिरत असतांना त्याला अचानक एक रूपसुंदरी दिसली, तिला पाहताच तो आपली शुध्द आणि बुध्दिही हरपून बसला, त्या रूप सुंदरीच्या आठवणीने विरह व्याकूळ होऊन तो बिछान्यावर पडला. त्या दिवसापासुन त्याची तबियत खालावली. दिवसेंदिवस तो अधिकाअधिक दुर्बल होत चालला, वैद्य आले, हकीम आले. सर्वतोपरीचा औषधोपचार होऊ लागला, पण कोणतीच औषधी त्याला गुण देऊ शकत नव्हती. घरातील सर्वजणांना त्याची चिंता वाटू लागली. दवा काम देऊ शकत नाही, दुवा तरी काम करू शकेल म्हणून अनेक साधु संत महात्मा फकिरांना घरी बोलावून विनयाने सेवा करून दुवा मागु लागले. पण व्यर्थ. अंथरूणावर पडलेला युवक एवढा कांही खंबीर होता की आपली दशा अशी का झाली याविषयी ब्रसुध्दा मुखातून बाहेर काढित नव्हता.

सोही आशये दिन सुहाना, साई इमामका हुवा गवाना।।
साईको झुकके बचन कहैया, राजपूता अेक बिछोना गिरैया।।६।।
बने सो कुछ रहम किजे, सायाजी देखत दिल दिजे।।
साइको अपने धाम ले आये, मंकाजीका हाल दिखाये।।७।।
सदगुरु बेठ गये बिछोना, मंका इष्कमे गये बिगोना।।
बनमें देवांगना दरशाये, ताके विरहमे तन मुरझाये।।८।।

बिरहानलमें छांडे शरीरा, मंका जगे बिरही पीरा ।।
मंकासेन खहे हो जै हो, मोहिनी मुरत तोहे आन मिलै हो ।।९।।
देवांगनासे देहु मिलाई, सच मानो घर आ गये साई ।।
मंकाको तबही सुध आई, अपनी पियासे आन मिलाई ।।१०।।

सदगुरु इमामशहांचे ईडरगढला आगमन झाले. त्या महात्मा पुरुषाला पाहताच मंकासेनच्या स्वजनांनी त्यांच्या चरणावर झुकून म्हटले. 'बाबा, एक युवक बिछान्यावर पडलेला आहे. त्याला काय झाले आहे. कांहीच समजू शकत नाही. आपण कांहीतरी दुवा देऊन त्याला वाचवा.' दयानिधी संतानी त्याला आपल्या डोळ्याने निरखण्याचे सांगितल्यावरुन त्यांना घरी नेण्यात आले. मंकासेनचे हाल पाहून सदगुरु किंचीत ध्यानस्थ झाले. संपूर्ण परिस्थिती संताच्या लक्षात आली. ते त्याच्या बिछान्याजवळ गेले व बसून म्हणाले, 'मंकासेन, इष्काने तू घायल झाला आहेस. वनात शिकार करायला गेलास आणि तिथे एका देवांगनेला पाहून तुझीच शिकार झाली. तिच्या विरहाने झुरुन -झुरुन तू या शरीराची पायमल्ली केलीस. अरे असे करशिल तर विरहानलाने शरीरसुध्दा सुटून जाईल. मंकासेन, विरहाची पीडा फार कठिण असते म्हणून तुंवार कोणत्याही प्रकारचा उशिर न करता ताबडतोब उठून बैस. पथारी सोड. तुला लवकरच त्या देवांगनेचे पुनर्मिलन करवून देतो. कदाचित तुला सत्य वाटणार नाही पण भगवंत करेल ते खरे.' सदगुरुंचे ते शब्द ऐकताच मंकासेनच्या हृदयात बराचसा धीर आला व तो आपल्या प्रिय पात्राला प्राप्त करण्यास तयार झाला.

सहजमें सबही शुध आई, मेरी प्रिया मोहे मिला दो साई ।।
मंका चलोरी संग हमारे, बैठ तोखार चले दो न्यारे ।।११।।
बनमें वावजो बहूत पुरानी, यहाँ मैने दिखे रूपराणी ।।
साईके संग ढाढे मंकासेना, बीत गये दिन भयेरी रेना ।।१२।।
मध रेनाको भये प्रकाशा, आय देवांगना प्रेम उल्हासा ।।
मंकाजी निंद भरमे सोया, रूपराशीको नैन भर मोहचा ।।१३।।
साई कहे सुनो परिजाना, तेरे लिये जीवकी हुवे हाना ।।
रजपूता तेरी यादमे सोया , देखो उनका हाल बिगोया ।।१४।।
उनकी बनी रहो नुरानी, तासे उनकी बचे जिंदगानी ।।
साई मेरा चले नही अेका, मेरा पिदरको मनावहु नेफा ।।१५।।

सद्गुरु इमामशाहांनी सांगितलेली गोष्ट ऐकताच तुवारच्या हृदयात जागृति आली. आपल्या प्रेमपात्रास प्राप्त करण्याकरिता तो अत्यंत अधिर झाला. संताने त्याला आपल्याबरोबर येण्यास सांगितले तेव्हा तो तयार होऊन अश्वारूढ झाला. दोघे वेगवेगळ्या घोड्यावर

बसून जंगलात जाण्याकरितां रवाना झाले. थोडे दूर गेल्यानंतर जंगलात एक जुनी विहीर होती ती पाहताच तुवारने सद्गुरुंना थांबवले व म्हटले, 'गुरुदेव या विहिरीजवळच मला त्या रूपराणीचे दर्शन झाले होते.' सद्गुरुंनी तेथे उतारा केला आणि विहीरीच्या चौथऱ्यावर बिछाना टाकून तेथे त्यांनी बैठक मांडली. दिवस मावळला आणि भयानक अशा काळोख्यारात्रीचे सामाज्र सर्व दूर पसरले. बिमार मंकासेन तर निरांतपणे पडताबरोबर निद्रादेवीच्या आधिन झाला. सद्गुरु मात्र सजाग बनून बसून राहिले. बरोबर मध्यरात्रीचा समय झाला. एवढ्यात त्या विहीरीमधून एक देवांगना बाहेर आली. तिला जवळ बोलावून संताने म्हटले, 'हे परिजान बाले! तुझ्याकरितां हा तुवार युवक मरणाला टेकला आहे. वियोगाच्या असह्य ज्वाला त्याला जाळत आहे. तुझ्याकरिता झुरुन झुरुन तो दुर्बल होऊन पडला आहे जर तू त्याच्यावर दया करून त्याची होऊन राहशिल तरच तो वाचेल. त्याला जिवंत ठेवायचे असेल तर त्याच्याशी विवाह कर. नाही तर आजच तो तुझ्या नावाचा जप करीत कायमचाच या लोकातून निघून जाणार आहे.' संताचे शब्द ऐकताच ती स्त्री म्हणाली, 'बाबा, आपण सांगतात ते बरोबर आहे, पण माझे कांही चालू शकेल असे नाही. माझ्या पित्याला जर वळवाल तरच हे कार्य होऊ शकेल.' देवांगनेने अधिक खुलासा करून म्हटले.

उनको संग लेके में अै हो, सायाजी जागृत रहै यो।।
देवांगना हो गई अरूपा, छीन आई संग अपने पिता।१६।।
साइको देख झूके सभागा, सायाजी उपने अपने अनुरागा।।
आज्ञा कियोरी पाक पीराई, मोसे जो कुछ बनी ही साई।।१७।।
बेटी तुम्हारी गुणवाना, उनको देख भयो तुवार दिवाना।।
मरण घडी ठाढे रजपूता, अपने स्वजन रहे शिरकुटा। ।।१८।।
बिछानसे उठाई यहा लाये, बुझो उनकी प्रेम सगाये ।।
भावर भली भातसे करै हो, दुहिताका सुख ऊर धरै हो।।१९।।
साई तुम्हारे मुखके बेना, हम कब नही भेट शकेना।।
साई आज्ञा जेसी फरमाये, अैसाही करहुं मन भाये ।।२०।।

'बाबा, मी माझ्या पित्याला येथे बोलावून आणते. तुम्ही सावध राहा असे म्हणून ती निघून गेली. दोन घडी गेल्यावर ती आपल्या पित्याला बरोबर घेऊन हजर झाली. गुरू इमामशाहाला पाहाताच तो झुकून प्रणाम करून उभा राहीला व म्हणाला 'बाबाजी! हूकुम करा. माझ्याने जी सेवा होऊ शकेल ती सांगा. मी आपल्या आज्ञेचे जरूर पालन करीन.' असे विनयाने बोलुन तो ऊभा राहीला. संत म्हणाले, 'आपली कन्या फार गुणवान आणि प्रियदर्शनी आहे. तीला एकदाच पाहता हा तुवारकुमार दिवाना बनला. त्याचे मन तुमच्या कन्येवर जडले पण विरहानलाने त्याची मरणाची घडी नजिक आलेली आहे. त्याचे स्वजन तर त्याची ही अवस्था

पाहून शिर आपटत होते. त्यासमयी अचानक माझे तेथे जाणे झाले. मी सारी हकिकत जाणली आणि शक्य झाल्यास या नीरपराध प्रेमी हृदयांची गांढ घालुन द्यावी अशी इच्छा धरून आपल्या भेटीकरिता येथे आलेलो आहे. हे प्रेम सगाइचे नाते आहे. आपण व आपल्या कन्येने जर ही गोष्ट मनावर घेतली तर एक मानवी जीवन अबधित राहिल व त्याचे सारे स्वजन सुखी राहतील म्हणून आपल्या कन्येच्या सुखाचा सुध्दा विचार करून हा विवाह घडवून आणा.' अशाप्रकारे गुरू इमामशाहांनी तिच्या पित्याला सारे समजावून दिले. बराच वेळ विचार करून शेवटी तिचा पिता म्हणाला,'बाबा, आपले वचन मी केव्हाही उल्लंघणार नाही. आपण ज्याप्रमाणे सांगाल त्याप्रमाणे मी करीन.' अशाप्रकारे भाष्य देऊन व आपल्या स्वजनांना बोलावून आणण्याकरीता तो निघून गेला.

> रेन अंधेरी हो गई सुहानी, देवांगनाके आये दिलजानी ।।
> स्वजन आयके भांवर किन्हा, तुंवरासंग दुहिताको दिन्हा।।२१।।
> मंगलचार मोड फिराये, तुंवराको दिन्ही कन्याये।।
> पीर इमामको सबही झुकैया, आया अैसा गेब चली गैया।।२२।।
> चन्द्रावती देवांगना नामा, सद्गुरुको किये प्रेम प्रणामा।।
> भोरही अश्वपे बैठके आये, संग चन्द्रावती राणी सुहाये।।२३।।
> चकित भये ईडरके बासी, तुंवरा घेर आये अविनाशी।।
> बिछोनासे लिये जगाई, देवांगना सेजे दिलवाई।।२४।।
> बूझत नाम इमाम फकिरा, शाह तुमी हो पीरोंका पीरा।।
> मंकासेन गुरु चरण झूकैया, साई मोमे बडी रहम करैया।।२५।।

अंधारी रात्र उज्वल झाली. देवांगनेचे स्वजन आले आणि तुंवार बरोबर तिचे गंधर्वपध्दतीने लग्न लावून दिले. मंगलाचरणाचे चार फेरे फिरवून पित्याने कन्यादान केले. त्यानंतर ते सदगुरु इमामशाहांच्या चरणी झुकून त्यांचा निरोप घेऊन निघून गेले. स्वप्नाप्रमाणे सर्व गोष्टी भराभर घडून आल्या. देवांगनेचे नाव चंद्रावती होते. तिला बरोबर घेऊन इमामशाहांच्या सोबत मंकासेन सुध्दा ईडरला परत आला. त्या देवकन्येचे रूप पाहून ईडरनिवासी सर्वजण आश्चर्यचकित झाले. त्यांना भान झाले कीं इमामशाहांच्या रूपाने तुंवारवर खरोखरच अविनाशी भगवान प्रसन्न झाले आणि त्याला मृत्युशय्येवरून उठवून देवकन्येबरोबर त्याचा विवाह करवून दिला. तदनंतर ही वार्ता सर्वदूर पसरून तुंवार प्रसिध्दीस आला. सद्गुरु इमामशाहांच्या चरणावर झुकून तुंवार मंकासेन विनम्रतेने म्हणाला, 'बाबा आपण मला मृत्यूपासून वाचविले. त्याचबरोबर जिच्या विरहवेदनेने झुरुन मी मरत होतो. त्या देवांगनेची प्राप्ती करवून दिली. जर आपण कृपा दृष्टी केली नसती तर मी खचित मरणच पावलो असतो

पण आपले आगमन झाले व माझे भाग्य उजळले यांत केवळ आपलीच कृपा कारणीभूत आहे.

तुमबीन मे जरूरही मरैया, आपे मोहे उबारे सैया ॥
बिरहीकी गति साई पिछानी, साहिब तुमी मोरे दिलजानी ॥२६॥
मोपे रहम करो गुरूदेवा, नाम सदा रहे चित्त भेवा॥
चहु दिदार कहा मैं पावु, कहो गुरूजी कहा में आवु॥२७॥
अमदाबादमें धाम पीराणा, मंका वहांही होवे मिलाना ॥
चंद्रावती साई चरण गैहैया, परभवका मिला दिये सैया ॥२८॥
साहिब कैसे भुले उपकारा, तुमी हो हमारा खेवनहारा ॥
अपने अनुजकी खातीर करैयो, गुरूजी बिरह संताप हरैयो ॥२९॥
देवांगना गुढ बेन सुनाई, साईको सबही बाते बुझाई ॥
सद्गुरू सबके सुखदाता, ईडरसे गुरू चले रंग राता ॥३०॥

'गुरूदेव! माझ्यावर अशी दया करा कीं ज्यायोगे माझे चीत्त आपल्या चरणावर लागून राहिल. जेव्हा माझ्या हृदयात आपल्या दर्शनाची इच्छा जागृत होईल तेव्हा मी कोठे येऊ म्हणजे आपले दर्शन होईल. मला फिरून आपले दर्शन केव्हा होईल?' 'बेटा, जेव्हा तुला दर्शन घेण्याची इच्छा होईल तेव्हा तूं अमदाबादला ये. पीराण्यास तुला सद्गुरुंचे पुनर्दर्शन होईल.' असे सांगून सद्गुरुंनी त्याचे समाधान केले. नंतर देवांगना चंद्रावती समोर आली आणि सद्गुरु इमामशाहांच्या चरणावर झुकून प्रणाम करून म्हणाली, 'बाबा, हा तर पूर्वकर्मांचा ऋणानुबंधाचा योग होता म्हणून आपण माझे हरवलेले सौभाग्य परत आणून दिले. दयानिधी आपले उपकार मी कशी बरे विसरू शकेन. आपण तर माझे मार्गदर्शक नावाडी आहांत. आम्ही तर आपले अनुज दासानुदास आहोंत. आमचा सांभाळ करावा. बाबा, एक वेळ असा येईल की विरहाग्नीची असह्य ज्वाळा भडकेल व त्यायोगे जीवन असह्य होईल तेव्हा हे दयाळू स्वामी आपण माझ्या पतीची मनसमजावणी करावी.' असे सांगून देवांगनेने भविष्याची भयानक गुढ गोष्ट समजावून सद्गुरु कडून आपल्या पतीच्या रक्षणाचे वचन मागून घेतले. कृपानिधान सद्गुरुंनी होकार देऊन आणि शुभाशिष देऊन तेथून प्रयाण केले.

ईडरगढहून निघून सद्गुरु आनंदमग्न बनून मानव कल्याणाचा पावन मार्ग विचरण करीत करीत अमदाबाद व तेथून पुढे पीराण्यास येऊन पोहोचले व तेथेच स्थाईक झाले.

पर्यटन किये पीर हितकारा, पीराणा ठाढे निरधारा॥
सप्तसाल अैसेही बितैया, चन्द्रावतीको देह तजैया॥३१॥
मंकासेन दिल घायल होया, बालक हुई बहुरी रोया॥
मरघट जाय संग जली जाऊ, रूठे तुवराको लीये मनाऊ॥३२॥

पकड झकडकर रखे स्मशाना, चन्द्रावती तन खाक समाना।।
बिरह घाव रूझत नही घेरा, तुवरा रोवे सांज सवेरा।।३३।।
याद अचानक सद्‌गुरु पीरा, चहु दिदार गुरु गुण गंभीरा।।
ईडर गढसे किन्ह प्रयाणा, अमदाबाद आ गये श्याना।।३४।।
खोज गुरुको पीराणा पाये, साई दर्शन मेरा दु:ख बिलाये।।
मंकासेनको दिखेरी सांई, गुरुको याद ईडरकी आई।।३५।।

ईडरमध्ये तुंवार मंकासेनला देवांगना चन्द्रावतीच्या प्राप्तीने अतिशय आनंद झाला. तिच्या संगतीत तो सारे दु:ख विसरला होता. सुख सागरात तो यथेच्छ डुंबत होता. हा अलभ्य सुखाचा काळ हरिणाच्या उडीप्रमाणे क्षणात व्यतीत झाला. काळ कसा निर्गमन होतो हे सुखाच्या क्षणात कोणालाच समजू शकत नाही. सात वर्षांचा काळ व्यतीत झाला आणि अचानक देवांगना चन्द्रावतीने मृत्यूलोकाची यात्रा संपवून परलोकात प्रयाण केले. तिचे प्राणपाखरू अकस्मात देहातून उडून गेले. मंकासेन तर या घटनेने जबरदस्त शोकातूर होऊन वेडा झाला. स्मशानात जाऊन त्याने आपल्या प्राणप्रियेबरोबर जळून मरण्याचा निश्चय जाहिर केला. त्याचे मित्र व परिवार त्याच्या विरहवेदना समजून गेले. महत्प्रयासाने त्यांनी स्मशानभूमीत त्याला पकडून ठेवले. चन्द्रावतीचा स्थूल देह राखेत मिळून गेला. विरहाची जखम अधिकाधिक चिघळू लागली. त्याला क्षरभरही विस्मरण होत नव्हते. रात्रंदिवस विरह असह्य होऊन तो रडत असे. अचानक एके दिवशी अशाच विरहवेदनेने घायाळ झालेला असतांना त्याच्या चित्तात एकदम सद्‌गुरुंची स्मृति जागृत झाली. याच दयानिधी महात्मा पुरुषाने चन्द्रावतीची प्राप्ति करवून दिली होती. घायाळ हृदयाच्या मंकासेनच्या हृदयात आता एकाएकी उजेड पडला. त्या महापुरुषाला आपण आता कोठे बरे शोधावे असा तो विचार करू लागला. त्याला त्यांचे वचन आठवले की तुला दर्शनाची इच्छा होईल तेव्हा अमदाबादला ये तेथून जवळच पीराण्यास आपली भेट होईल. दु:खाच्या वाळवंटात त्याला सद्‌गुरु दर्शनाचा झरा दिसला. ताबडतोब अमदाबादला येऊन तपास करीत करीत तो पीराण्यास आला. सद्‌गुरु महाराजांचे दर्शन होताच त्याला अपार आनंद झाला. त्यांच्या चरणावर तो झुकून पडला. त्याला पाहताच सद्‌गुरु इमामशाह महाराजांच्या हृदयात ईडरगढचा तो प्रसंग जिवंत झाला चन्द्रावतीच्या शब्दांचे त्यांना स्मरण झाले. तिला त्यांनी वचन देऊन आश्वासन दिले होते.

देवांगनाके बेन सुनैया, पिवकी लाज रखैयो सैया ।।
सब कुछ बुझे सद्‌गुरू पीरा, फिरभी पुछन लगे गंभीरा ।।३६।।
तुवरा कैसे यहाँ चली आया, हिया बडा उदास दीखाया।।
सायाजी दिलकी गति जानो, फिरभी कैसे मुख बखानो।।३७।।

मोसे कछु कह्या नहि जाये, जाणनहार उर सबही समाये॥
रोवन लगे तुवरा अधिरा, शांत किये सद्गुरू पीरा ॥३८॥
तुवरा परभव प्रीति बखानो, मिले चन्द्रावती दिल जानो ॥
कहा मनुज कहा देवांगना पैखो, यही तोहे परभवको लेखो॥३९॥
सप्तसाल रहे तुज संगा, मुदत बीते चल गई मनभंगा ॥
मंगल मिलन रखो दिल यादी, ओरही याद बनो बरबादा॥४०॥

'बाबा, एखाद्या दिवशी अत्यंत दुःसह्य असा विरह संताप उपस्थित होईल त्या समयी माझ्या पतीला आश्वासन देऊन सांभाळून घ्यावे!'तो विपरीत दिवस येऊन ठेपला होता. सदगुरू सारे कांही समजून गेले होते. तरीपण मंकासेनला विचारू लागले 'बाळ! तु एवढा उदास कां झालेला आहेस? येथे येण्याचे कारण काय झाले? मंकासेन म्हणाला,'बाबा, या हृदयाची गति तुम्ही जाणता, तरीपण आपण विचारीत आहात. माझ्याने सांगता येण्यासारखे नाही. आपण त्रिकालदर्शी आहांत. आपण सर्व कांही जाणत आहात.' असे म्हणत तो ओक्साबोक्शी रडू लागला. सद्गुरुंनी त्याला आश्वासन देऊन शांत केले आणि म्हटले, 'तुंवार, ही तर पुनरभवाची प्रीति होती. कोठे मानव आणि कोठे देवांगना! कर्म संयोगाने तुमचे मिलन झाले होते. सातवर्षापर्यंत ती तुझ्या संगतीत राहिली. मुदत पूर्ण होताच म्लान वदनाने तिला या लोकातून जावेच लागले या गोष्टीस तिचाही काही दोष नव्हता व तुझाही कांही कांहीच इलाज नव्हता! आता फक्त एकच गोष्ट करायची तुझ्या हातात आहे आणि ती म्हणजे कर्म धर्म संयोगाने झालेल्या तुमच्या मंगलमिलनाची स्मृति मनात बाळग. बाकीच्या सर्व गोष्टी विसरून जा विस्मृति शिवाय अन्य उपाय नाही. तरच तू सुखाने राहू शकशिल अन्यथा शोक संतापाने दुःख मिटणार नाही.'

पाया है तो अब क्यों रोना, प्रीत कीये अब कैसे बिगोना॥
चन्द्रावती मोहेबेन सुनाया, बिरहा लाज रखैयो साया॥४१॥
ता दिन उनकी बानी बुझैया, बचन मैने ताहिको दैया।
मंका जो चाहो सुख कंदा, नामसे निशदिन लग रहो बंदा॥४२॥
जूठ जगत मायाका फंदा, साच कहुं बंदगी करो बंदा॥
सत हे साहिब नाम बखानी, आन जगत सब दिखे फानी॥४३॥
हरि सुमीरनमें हेत करैया, तासे तेरा बिरहा बिलैया॥
नाम अमिरस जे कोई पिवे, मरने सोही बहुरी जीवे॥४४॥
आगे संतको नाम रस पीया, याद सुजत हरखे मेरा हिया॥
सोही संतकी राहचलैया, तुवरा तोहे परमसुख पैया॥४५॥

एकवेळ तुला देवांगनेची प्राप्ति झाली, तू तिच्यावर जीवापार प्रेम केलेस पण ऋणानुबंध संपताच ती निघून गेली. आता कोणत्याही उपायाने ती परत तर येऊच शकत नाही पण व्यर्थ शोक, संताप करून स्वत:ची हानी करून घेऊ नकोस. उपभोगलेल्या प्रेमाचा सारखा ध्यास घेऊ नकोस. चन्द्रावतीने मला अंतीम गोष्ट सांगितली होती की विरहाच्या क्षणी लाज राखावी. त्या दिवशीच्या तिच्या वाणीचा विचार करूनच मी तिला आश्वासन दिले होते. मंकासेन! जर तुला खऱ्या सुखाच्या प्राप्तीची इच्छा असेल तर भगवंताच्या नामाचे संकीर्तन कर. हे जगत तर नाशिवंत आहे. नाशिवंत पदार्थमात्रातून चिरंतन सुखप्राप्ति होत नाही, त्या फंदापासून दूर राहून आपल्या आत्मसुखाकरिता भगवंताच्या नामाची जिकीर कर. भगवंताचे नामच सत्य आहे. बाकी दुनिया मिथ्या आहे. त्या भगवंताच्या नावावर प्रेम कर. त्याचे स्वरूप निरंतर हृदयात धारण कर म्हणजे तुझ्या हृदयात जी विरहाग्नीची ज्वाला प्रज्वलित झालेली आहे ती बिलकुल शांत होईल. जो कोणी नामामृत रसपान करतो तो मरूनसुध्दा अमर होत असतो. आजपर्यंत जे अनेक संत होऊन गेले ते नामरसप्यासी होते. ज्यांच्या स्मृतीने हृदय पुलकित होते अशा त्या महापुरुषांच्या मार्गदर्शनाने वाग म्हणजे तुला परम सुखाची प्राप्ती होईल.

गुरु उपदेश मंका शिरनामे, आज्ञा दियो गुरु होगे बिदाये।।
बिकल मन नहि हाथ रहावे, गुरु कृपा मन स्थिर होई जावे।।४६।।
प्रेमसे प्रभुका भजन करैया, डुबही उबारीये मेरी नैया।।
शुभाशिष दैहो गुरु पीरा, मंका सुमीरे श्री रघुबीरा।।४७।।
नाम जपो हरिनाम जपैया, मंका तोहे परम सुख पैया।।
हरि सुमीरन हरिका होई जावे, चंद्रावतीका हिया हरखावे।।४८।।
मोरे पियारा हो गये संता, वंदते दु:खको आवत अंता।।
बडो महिमा देवांगना जाने, तुवरा तेरी प्रीत बखाने।।४९।।
नामसे लगे तेरा मन निरबाना, साईको सदा चहो दिलजाना।।
सद्गुरुको शिर झुकाई, तुवरा इडरगढ बनमे आई।।५०।।

सद्गुरुंनी विमल उपदेश केला तो ऐकून मंकासेनचे अंत:करण स्वस्थ झाले. त्याने सद्गुरु चरणी शिर नमविले व म्हणाला, 'बाबा, मला आज्ञा असावी. आता मी आपण सांगितल्याप्रमाणे भगवंताचे नामस्मरण करीत करीत काळ कंठिन, पण व्याकूळ बनलेले मन एकाएकी स्थिर होईल हे सांगता येणार नाही. त्यासाठी माझ्यावर अशी कृपा करा कीं ज्यायोगे माझे मन शांत व स्थिर होईल, आपण सांगितल्याप्रमाणे प्रेमाने मी भगवंताचे भजन करीन. माझ्या बुडणाऱ्या नावेला आपणच वाचवू शकणार

आहे. मला शुभाशिर्वाद द्या कीं ज्यायोगे श्रीभगवंताचे भजन करण्याचे सामर्थ्य मला प्राप्त होईल.'

'मंकासेन, तू नामस्मरण कर, त्यायोगे परमसुखाची प्राप्ति होईल. हरिस्मरण करीत करीत तू हरिमय होऊन जा. हरिरूप हो, त्यायोगे तुझ्या चन्द्रावतीचे हृदय आनंदीत होईल. त्या देवांगनेच्या हृदयात माझा स्वामी प्राणनाथ संत बनावा अशी अभिलाषा होती त्याच्या चरणावर वंदन करून दु:खमुक्त होऊन लोकांनी सुखसागरात विहार करावा अशी तिची मनोकामना होती. ती संतांचा महिमा जाणत होती. तिची ती मनोकामना तू पूर्ण करावीस. ती तुझ्या प्रेमप्रीतीची वाखाणणी करीत होती. म्हणून त्या प्रेमाचा रंग फिका पडणार नाही. याकडे लक्ष दे आणि सदैव तुझे मन हरिस्मरणात दृढतेने लाव. त्या भगवंताशीच तू एकरूप बनून राहा.' असे सांगून सद्‌गुरु इमामशाहांनी त्याच्या शिरावर आपला वरदहस्त स्थापून शुभाशिर्वाद दिला. त्याच क्षणी सद्‌गुरुंच्या चरणकमली झुकून सद्‌गुरुंची चरणरज मस्तकी धारण करून मंकासेनने प्रयाण केले. तो ईडरगढच्या बिकट पहाडीत आला आणि एकाग्रतेने आसन मांडून ध्यानमग्न होऊन गेला.

बिक पहाडीमें जाय बिठैया, तुवराकी गती काहुं न पैया॥
खोजत खोजत हरिवर पाया, मंका यहाँ बेर न आया॥५१॥

तुवार मंकासेन ईडरगढच्या पहाडात जाऊन आसन मांडून एकाग्रतेने प्रभु नामस्मरणचिंतनात मग्न होऊन गेला. लोकांना त्याची जाणिव झाली. स्वजन त्याला शोधण्यासाठी गेले पण नंतर तो योगीपुरुष कोणालाच आढळला नाही. तो अशा अगम्य स्थानात स्थिर झाला की मागाहून त्याला कोणीच शोधू शकले नाही. अनन्य प्रेमाने हरिस्मरण करीत करीत व आपल्या प्रीयप्रभूला शोधत शोधत शेवटी मंकासेन हरिरूप होऊन गेला. प्रभु रूपात सामावला गेला तो परत या मायीक प्रपंचात आलाच नाही.

भगवंताचा लाडका बनलेल्या या योगी पुरुषाचे गीत संत नायाजींनी गायीलेले आहे की, 'भगवंतापासून वेगळ्या पडलेल्या जीवात्म्याला फिरून भगवंताची प्राप्ती घडवून अंति त्याच भगवंत स्वरूपात सामावल्या गेलेल्या प्रेमी सद्‌भक्ताची ही जीवनगाथा आहे.

नायाजीको मंगल गाया, बिछरे पियुसे आन मिलाया॥५२॥

ज्या भगवंताचे स्वरूप दिशा अथवा कालाच्या अतीत आहे. अनंत व चैतन्यरूप आहे ते अेकच आत्मज्ञानरूप शांत आणि प्रकाश रूप आहे, त्या परब्रह्मास मी नमस्कार करतो.

श्लोक : बोध्दारो मत्सरग्रस्ताः प्रभव स्मयदूषिताः॥
अबोधो महताश्चान्ये जीर्णमंगे सुभाषितम्॥२॥

वैराग्य शतक.

★ पद ★

ज्ञानी मत्सरमां डूबी रह्या, राजवी मन अभिमान॥
अबुध बिचारा शुं करे, अेने केमकरी आवे ज्ञान॥ टेक॥
पुण्यना परिपाकने, सहज सुखकर कहेवाय॥
पुण्य अवधि पुरण थये, आवी पडे मृत्यूलोकनी मांय॥१॥
पृथ्वी खोदी पर्वतीय, धातुओ गाळी राखी बहु खंत॥
संतोष्या कई राजवी, स्मशाने आराध्या महामंत॥२॥
फूटी बदाम मळी नही, फरीया देश विदेश॥
यौवन रंग उडी गयो, अंगे उजळा थई गया केश॥३॥
जाती कुळाभिमान तजी, चाकरी करी मन भंग॥
मान रहित थई पेट भर्यु, जेम काग भोजन असंग॥४॥
तृष्णा हजु मटी नही, दिन दिन वधती जाय॥
सेवा किधी खल पुरुषनी, अेना वेण सह्या नही जाय॥५॥
आंखे आसुडा लुछता, नीचने कर्या नमस्कार॥
तृष्णा तारी बारमो, मारो अेळे गयो अवतार॥६॥
नचावे तेम नाची रह्यो, संतोषनु नही नाम॥
भणे इमामशाह भाभाराम तमे, तृष्णा तजो आने ठाम॥७॥

ज्ञानीजन मत्सराने व्यापलेले असतात, राजपुरुष आपल्या स्वात्माभिमानातच लिप्तायमान असतात आणि बाकी तर सर्वच अबुध्द असतात मग जीवनाचे सुभाषित आमच्याच अंगात जीर्ण होऊन जाते, अर्थात संसारात तीन प्रकारचे लोक असतात, जो ज्ञानी असतो तो ईर्षा, द्वेष, मत्सराने दुसऱ्यास ज्ञान देण्याची परवाच करीत नाही; जो धन, मान, मरातबाने मोठा असतो तो मीच गुणी आणि विद्वान आहे अशा अहंकाराने सर्वांची अवगणनाच करीत असतो आणि जे अज्ञान अविद्याग्रस्त असतात ते बापडे तर काहीच समजू शकत नाही. आणि म्हणून जगतात विद्वान आणि विद्येची तुलनाच होत नाही. संसारात राहून प्राप्त केलेले सुकृत पण दुःखकारीच असते. कारण की

विचार करून पाहिल्यास पुण्याचा परिणाम पण भय उत्पन्न करणारा ठरतो. पुण्याच्या प्रभावाने प्राप्त होणारे स्वर्गीय सुख पुण्यक्षीण झाल्यानंतर जन्म मरणास व तिर्यकादि निकृष्टयोनीचे दुःखभोग भोगण्यास कारणीभूत होते.

पैसा, धन संपत्तिची भोगतृष्णा कधीही आणि कशानेही मिटत नाही. संपूर्ण पृथ्वी जरी खोदून काढली, पर्वतीय धातु आदि शोधून काढले, समुद्राचे तळ धुंडाळून धन, संपत्ति, हिरे, माणिक मोति, पाचू, रत्न जमविण्याचा प्रयत्न केला, मोठमोठ्या राजे महाराजांना संतुष्ट करून घेतले अथवा मंत्रसाधन करण्यासाठी रात्रीच्या रात्री स्मशानात काढल्या तरी पण फुटकीबदाम सुध्दा मिळाली नाही तर हे तृष्णा तू आता तरी मला सोड अलंघ्य आणि दुर्गम प्रदेशात फिरला पण काहीही फळ मिळाले नाही, चाकरी करण्याकरितां कुलाभिमान व जाति अभिमान सुध्दा सोडून दिला, परक्याच्या घरी मानरहित कावळ्याप्रमाणे शंकाशिल होऊन पोट भरले तरी पण पापकर्मात आसक्त असणारी हे तृष्णा तू तरी प्रतिदिन वाढतच आहे, पण संतोष होत नाही. खल पुरुषांच्या सेवेत तत्पर राहून त्यांचा ठपका सहन केला आणि त्यांच्या ठपक्याने अंतरात आलेले अश्रुसुध्दा रोखून त्यांच्या आनंदात शुन्य मनाने सहभागी झालास तरी पण हे आशा निष्फळ होऊन तू मला कां नाचवीत आहेस.

श्लोक : आदित्यस्य गतागतैरहरहः संक्षीयते जीवितं॥
व्यापारैर्बहुकार्यभार गुरुभिः कालो न विज्ञायते॥
दृष्ट्वा जन्मजराविपत्तिमरणं त्रासश्च नोत्पद्यते॥
पीत्वा मोहमयीं प्रसादमदिरामुन्मत्त भूतं जगत्॥७॥

**★ पद ★**

दिन उगे ने आथमे, आयुष्य ओछु थाय॥
समय क्यारे वीती गयो, एनी शुध्दबुध्द गई विसराय॥टेक॥
यौवन गयु ने आवी जरा, बुझुर्ग थयुं शरीर॥
विपत्तीना वादळ वरसीया, तेओ चेत्यो नाहि बधीर॥१॥
मरण माथे आवी रह्युं, उजळा थई गया केश -॥
दिलमा जरा उगतो नथी, जाणे जीवन जीवीश हमेशा॥२॥
मोह माया बळगी रही, प्रमाद मदिरा किधु पान॥
जगत उन्मत्तबनी गयु, भूली बेठा शुधने शान॥३॥
इच्छा भोग विलासनी, हवे निवृत्त थई दुःख देन॥
पुरुषत्व गयु आ गळी, तो ये पाम्या नही सुख चेन॥४॥

समोवडिया सहु संचर्या, साथी गया सूरलोक॥
लाठी लईने चालता, आखे देखाय नही कोक॥५॥
अवदशा आवी गई, तोये दुर्बल छुटे न शरीर॥
मरण भयथी कांपी रहे, अंगे अंगमा उठे पीर॥६॥
बुध्दि आपी मनुजने, भाभाराम भव संसार॥
गुरु इमामशाह अेम बोलीया, तमे शोधील्योने तत्‌सार॥७॥

रात्रंदिवस सूर्य मावळतो आणि उगवतो. त्यायोगे आयुष्य कमी कमी होत जाते. मोठमोठ्या अनेकानेक कामात वेळ कसा निघून जातो हे समजतही नाही. जन्म, जरा, वृध्दापकाळ, विपत्ति आणि मरण पाहून सुध्दा मनुष्यास त्रास उत्पन्न होत नाही. कारणकी मोहरूप प्रमाद मदीरापानानेच संपूर्ण जगत्‌ उन्मत्त झालेले मला भासते आहे. भुक लागल्याने रडत असलेली गरीब बालके की ज्यांचे कपडे अत्यंत जीर्ण चिथडे झालेले आहेत, घरात त्या बालकांना द्यायला अन्नाचा एक कण नाही. तशात विधवा झालेली एखादी कुलवान स्त्री कोणाकडे हात पसरेल पण याचनाभंग होण्याच्या भयाने गद्‌गदीत कंठाने तुटक्या वाणीने म्हणजे मला काही द्या तेव्हा तिला जे अपार दु:ख होत असेल ते अवर्णनीय आहे. मनस्वी मनुष्याला याचना करण्यासारखे दुसरे दु:ख नसते.

भोगविलासाची इच्छा निवृत्त झाली, पुरुषत्वाचा अभिमान गळून पडला, साथीदार सर्व देवलोकास गेले, सुहद संबंधी सुध्दा आपापल्या दशेस पावले, काठीच्या आधाराने कशीतरी उठ बैस होते. डोळे अंधारमय झाले अशी दशा झाली तरी पण नीच देह अजूनही मरणाच्या भीतीने थरथर कापू लागतो. मरण कोणालाच आवडत नाही.

मरना है रे जरूर जुगमा चेतीने चालोजी॥टेक॥
कायानो घट तारो खूप बनू है, पंचहि तत्वनो मूळ॥१॥
काया नगरमा मन है रे राजा। चेतीने नूर माहे नूर॥२॥
तेज स्वरूपी चेतन करी जाणो। काया माया सर्वे कुड॥३॥
काया नगरपर भय एक भारी। काळ करे चकचूर॥४॥
काया नगरमां पाचे चोर वसे छे। चेतीने चालो मारा वीर॥५॥
करो हुशियारी सतगुरु चेतावे। तो नाम लिजे निर्मल मन॥६॥
दया सखावंत हरदम किजे। तो क्षमा धरमनो मूल॥७॥
कहेत इमामशाहा सुणो मनवा मेरा। रहे जो सद्‌गुरुने हजूर॥८॥

श्लोक : न ध्यातं पदमीश्वरस्य विधिवत्संसारविच्छित्तये॥
स्वर्गद्वार कपाट पाट नपटुर्धर्मोऽपि नोपर्जित:॥
नारीपीनपयोधरोरूयुगलं स्वप्नेऽपि नालिङ्गीतं॥
मातु: केवलमेव यौवनवनच्छेदे कुठारा वयम्॥११॥

★ पद ★:

भवबंधनथी छुटवा, नही धर्यु हरीनु ध्यान॥
सुख नही पाम्यो संसारमा, परलोकनुं राख्यु नही भान॥टेक॥
भोग भोगवाया नही, अमे काळथी गया भोगवाई॥
तपस्या कोई बनी नही, अमे दु:खथी गया तवाई॥१॥
काळमयोने घरडा थया, जर्जरीत थई गई काय॥
तृष्णा बनी नव यौवना, अे तो नित्य रंगमा रंगाय॥२॥
क्षमा गुण नही उरमा, सुखभोग त्यज्यानही संतोष॥
तपनुं फळ मळ्यु नही, अमे वेठ्या कठिन क्लेश॥३॥
अंगे अंग शिथील थया, काया गई कुमळाय॥
पण तृष्णा तो दिन प्रति दिन, तरूणी बनती जाय॥४॥
सूर्य चंद्र आकाशमां, वादळथी ढंकाय॥
मानवी तारी शी गति, अेक दिवस तूं ढंकाय॥५॥
विणयोने तजतो नथी, मंद पडीने चाल्या जाय॥
रखेशर तमारा उरमा, परिताप घनेरो थाय॥६॥
विवेकना विकास थी, तृष्णा टळे भाभाराम॥
गुरु इमामशाह वाणी उचर्या, तमे पामो परमसुख धाम॥७॥

या संसारामधून सुटण्याकरिता विधीवत ईश्वर ध्यान केले नाही तसेच स्वर्गद्वार प्राप्त करण्यास समर्थ असे धर्माचे पण आचरण घडले नाही. एवढेच काय पण स्त्रीचे अमृतमधूर चुंबन, स्तनमर्दन वा दृढ आलिंगन सुध्दा स्वप्नवत ठरले कारण, अरेरे आपण तर केवळ मातेचे यौवनवन छेदणारे कुऱ्हाडीरूपच ठरलो. या तीनही गोष्टीस असमर्थ झालेला जिवात्मा केवळ ब्रह्मज्ञानानेच मोक्षपद प्राप्त करू शकतो. भोग तर भोगलेच गेले नाही पण आम्हीच काळाचे भोग मात्र बनलो, तप तर तपविले गेले नाही उलट आम्हीच दु:खात होरपळले गेलो, काळ तर गेला नाहीच पण आम्हीच काळाच्या स्वाधीन झालो, तद्वत तृष्णा तर जीर्ण झालीच नाही पण आम्ही मात्र जीर्ण-वृध्द होऊन गेलो. आम्ही क्षमा केली पण क्षमेच्या गुणाने नाही, घरात भोगयोग्य सुखांचा त्याग केला पण संतोषाने नाही. दु:सह थंडी, वारा, ताप

सहन केला पण क्लेश सहन करून तप केले नाही. रात्रंदिवस धनोपार्जनाचे ध्यान केले पण नियमीत प्राणायाम करून शिवपदाचे ध्यान केले नाही. अशा रीतीने ऋषीमुनिंनी करायची सर्व कर्मे आम्ही केली पण त्यांना प्राप्त झालेल्या फळाप्रमाणे आम्हाला काहीच प्राप्त झाले नाही. मुखावर सुरकुत्या पडल्या, मस्तकावरील केस पिकले आणि सर्व गात्रे शिथील झाली पण ही तृष्णा तर दिवसेंदिवस तरूणच होत आहे. एखाद्या वस्त्राच्या तुकड्याने ज्याप्रमाणे चन्द्र सूर्यासमान मुख झाकले जाते, तद्वत वादळ अथवा अभ्राने सूर्य व चन्द्र सुध्दा झाकला जातो तर मायावी पडद्याने मानवी मन कां झाकले जाणार नाही? विकारवश कां होणार नाही? विषय विकार बराच काळ उपभोगले तरी कालांतराने ते अवश्य जातीलच मग जे मंद पडणारे आहेत व जे मनुष्याने आपण होऊन त्यागलेले आहेत यात काय भेद आहे? काहीच नाही, तरी पण मनुष्य त्या विषयांचा स्वेच्छेने त्याग करीत नाही पण विषयच जेव्हा स्वतंत्र होऊन निघून जातात तेव्हा मनात अत्यंत परिताप संताप पश्चात्ताप करतो. पण मनुष्याने त्यागिलेले विषय मात्र मनुष्यास सुखशांति देतात. भोगतृष्णेच्या त्यागाने मनुष्याच्या ठायी विवेकबुध्दी जागृत होते. तिचा विकास होतो व मनुष्यास चिरशांति लाभते. सुख ऐश्वर्य शांति लाभून अंति मोक्षसुध्दां प्राप्त होतो.

श्लोक : भिक्षाशनं तदपि नीरसमेकवारं॥
शय्याच भू: परिजनो निजदेहमात्रम्॥
वस्त्रंच जीर्णशतखंडमयी च कंथा॥
हा हा तथाऽपि विषया न परित्यजंति॥१९॥

## ★ पद ★

वासना वेरण थई, तमने वळगी रखेशर भाई॥
छोडावी छूटे नही, अे तो अंगे अंग लपटाई॥टेक॥
हाड चाम सुकाई गया, अंगमा कीडा अपार॥
दुर्बळ बनेला श्वान सम, भमे विषयनी लार॥१॥
भीख मांगी भोजन करे, भुमी पथारी सोई॥
अंगना वस्त्रो फाटी गया, तो ये वासना तजे नही कोई॥२॥
मलमुत्रना देहमा, दुर्गन्ध भरी छे अपार॥
विषय विलासी जीवडो, मानी रहे सुख अपार॥३॥
पतंग जेम अज्ञानथी, अग्नीमां जई होमाय॥
मच्छ गळे जम आंकडी, अेनो तडपीने जीव जाय॥४॥

अेवी दशा छे रखेशरो, तमे डुबी रह्या संसार।।
झबकीने नही जागशो, वीती जाशे अफळ अवतार।।५।।
चेतो चेतो आ समे, गुरु आव्या चेतावनहार।।
चरण वंदो साहेबना, अे छे बंद छोडावनहार।।६।।
मोह विकार तजी मुनिवरो, योगी थया भाभाराम।।
गुरु इमामशाह उचरे, सहु पामे परम सुखधाम।।७।।

मागून आणलेली निरस आणि ती सुध्दा एकचवेळ पुरेल एवढी अल्प भिक्षा असली, अंथरायला पृथ्वी व पांघरायला आकाश असले, परिजन अथवा सेवक दुसरे कोणी नसून केवळ स्वतःचा देहच असला जुने पुराणे वस्त्र तेही फाटके व शंभर ठिकाणी ठिगळ दिलेले अशा चिंधड्या झालेले वस्त्र असले, अशा परिस्थितीत जरी जीवात्मा येऊन पडलेला असला तरी अरेरे विषय मात्र तो सोडू शकत नाही. केवळ हाडकांचा पिंजराच राहिलेल्या, कान्हातिरपा लंगडत चालत असलेला, बूचा बांडा जखमी झालेला, व्रण पडलेला भुकेने दुर्बल झालेला जीर्ण शरीराचा जरी एखादा कुत्रा असला तरी एखाद्या कुत्रीमागे फिरतांना आढळतो. खरोखर मदन मेलेल्यास सुध्दा मारत असतो. स्त्रीयांचे स्तन जे केवळ मांसाच्या गाठी असतात त्यांना सुवर्णकलशाची उपमा देतात. रजरक्त मुत्राने थबथबलेल्या मांड्यांना हत्तीच्या सोंडेची वा कर्दळीस्तंभाची उपमा देतात. खरोखर दुर्गंधाने भरलेल्या शरीरास कवी लोकांनी वाखाणून सुंदर बनविले आहे व विषयी विलासी जीवात्मे त्या शरीराच्या भोगासच सर्व सुखाचे आगार मानतात. अग्निच्या तेजाच्या आकर्षणाने अज्ञानपणाने पतंग जसा अग्नित होमला जातो, रसविषयाच्या नादी लागलेला मासा जसा गळास बळी पडून स्वतःच्या मुखात काटा अडकून घेऊन तडफडत मरण पावतो. पण ते त्या जीवात्म्यांचे अज्ञानपणाने दुःख प्राप्त होते. पण मानव तर या संसाराच्या क्षणिक मोहक पण नाशिवंत सुखासाठी विषयांचे ज्ञान असूनही मोहात पडून आत्मनाश करून घेत असतो. हे ऋषीवरा जगताची ही स्थिती पाहून जाणून ही जर तूं खडबडून जागा झाला नाहीस आणि आपला हा मानवजन्माचा फेरा निरर्थक गमावशिल तर पशुपेक्षाही तुला नीच समजायला पाहिजे, पण तूं पशूही नाहीस, नरपशुही नाहीस तू आहेस परमपुरुष पुरुषोत्तमाचा दास. गुरु महाराजांचा परम सेवक तू चेत! जागृत हो. परब्रह्मनारायणाच्या स्वरूपास शरण जा. गुरु महाराजांच्या चरण पादूकास शरण जा वंदन कर व हा भवबंध सोडून घे. मोह विकारांचा त्याग कर. हे भाभाराम तू योगी आहेस परम योगी तुला परमसुखाचे धाम प्राप्त होईल.

श्लोक : बिसमलमशनाय स्वादु पानाय तोयं
शयनमवनिपृष्ठे वल्कले वासीतीच॥
नवघनमधुपान भ्रान्त सर्वेन्द्रियाणा।
मविनयमनुमन्तुं नोत्सहे दुर्जनानाम्॥२॥

## ★ पद ★

फळ मूळ आरोगी धरती सुवे, वल्कल पहेरिये अंग॥
दुर्जन वेण सहेवाय नही, धन मद भरे अेना अंग॥टेक॥
पुण्य पुरुषे जग उपावीयु, बीजाये कर्यु पालन॥
कोइये जीतीने आपी दिधुं, कोई भोगवे चौद भुवन॥१॥
राजवी भर्या छे राजमद, अमने गुरु सेवानु अभिमान॥
अमथी तु अलगो रहे, अमे तमथी दूर दिलजान॥२॥
चाल्या गया कई राजवी, अवनि अेनी नही थाय॥
धरतीना अेक टुकडा कारणे, तमे शानी लडो छो लडाय॥३॥
पृथ्वी माटीना पिंड छे, अे जळथी रह्या विटळाय॥
युध्द करीने कई राजवी, पोढी गया छे त्यांय॥४॥
माटी केरा अे पिंडनो, ग्रहण करे कई राज॥
विदाय भया भोग भोगवी, अेने आप्या नही सुखराज॥५॥
दरिद्रच अने शुद्र राजवी, जे ओ आपी शक्या नहि काय॥
कोई अल्प आपी करी, अही थी थया छे विदाय॥६॥
अधर्मी अेवा राजवी, थापो नही भाभाराम॥
गुरु इमामशाह वाणी उचरे, याचो मारा साहेब छे सुखधाम॥७॥

भोजनाकरितां केवळ फळे मिळाली त्यात आनंद आहे, तहानलेल्यास स्वादिष्ट जल मिळाले व पृथ्वीवर झोपायला मिळाले, नेसायला वस्त्राच्या ऐवजी वल्कले जरी मिळाली तरी त्यात आनंद आहे पण थोड्या धनाच्या मदाने धुंद झालेल्या, भ्रमीत झालेल्या इंद्रियांच्या आधिन झालेल्या दुर्जनांचा अविनय सहन करण्यासारखा नसतो. कोण्या उदारहृदयी पुण्यवान पुरुषाने पूर्वी जगत निर्माण केले, दुसऱ्याने पालनपोषण केले, तर कोणी जगतास जिंकून तृणवत् समजून त्यागिले. अर्थात ब्रह्माने जगत निर्माण केले, विष्णुने पालनपोषण संरक्षण केले, परशुरामाने जगतास जिंकुन शेवटी तृणवत् समजून कश्यपास दान करून टाकले. बळीने चौदा चौकड्यांचे राज्य केले पण त्याला गर्व आला नाही. पण नुसत्या एकाच गावाचे अधिपत्य करणाऱ्या मनुष्यास

मोठा अहंकार यावा हे अनुचित पण आश्चर्यकारक नव्हे काय? राजमदाने भरलेला राजा जसा अहंकाराने प्रेरीत असतो, पण आम्ही सुध्दा गुरु सेवेच्या बुध्दीने उन्नत आहोत. हे राजवी तू वैभवाने प्रख्यात आहेस पण आम्ही वैभव भोगाच्या त्यागाने तुझ्यापेक्षा दूर उन्नत आहोत. शेकडो राजांनी या पृथ्वीचा भोग उपभोगीला नाही असा एक क्षणही गेला नाही, त्या पृथ्वीचा लाभ होण्यातच राजे लोक मोठा अभिमान बाळगतात, पण या पृथ्वीचा व अपार वैभवाचा भोग भोगून कित्येक राजे काळाच्या स्वाधिन झाले पण पृथ्वी जशीच्या तशीच राहिली. ती एखाद्या अंशानेही कोणाची झाली नाही व होणारही नाही. मग मी पृथ्वीपति असा अभिमान बाळगण्यात काय अर्थ? परमेश्वर सर्व समर्थ आहे हे न जाणता जो मनुष्य राजा अथवा तत्सम व्यक्तीकडून काही धनाची याचना करतो असा मनुष्य धि:कारास पात्र आहे. ही पृथ्वी म्हणजे मातीचा पिंड आहे त्यास पाण्याच्या रेखेने - समुद्राने वेढलेले आहे पण या मातीच्या पिंडाच्या किंचीत एखाद्या तुकडयाच्या प्राप्तीने अहंकारी जीवात्मे एकमेकांशी लढाई युध्द करून जिंकण्याचा प्रयत्न करतात. जिंकल्यानंतर पृथ्वीच्या त्या पिंडाचा उपभोग भोगतात. दुसऱ्यास किंचीतही न देणारे असे दरिद्री याचकास काय देणार आहेत. पण लाचार याचक मात्र धि:कारास पात्र होतो. या करिता हे भाभाराम अधर्मी अशा राजा प्रमाणे होऊ नये. अहंकाराचा त्याग करून जगाचे नश्वर स्वरूप ओळखून गुरुला शरण जा व चिरसुखाची प्राप्ती करून घे.

★ ★ ★

## २६. हिरजी नाविक

रेवाके तीर नाविक निवासा, हिरजी हियरा हुवे ज्ञान प्रकाशा।।
सद्‌गुरुका दर्शन जब पाया, तादिन जोरी प्रेम सगाया।।१।।
कायम गुरुको नाम जपैया, सायाजी मेरा तुमही खेवैया।।
सफरी जहा में सफर करैया, संग ही संग रहो मेरे सैया।।२।।
हिरजी झुके सद्‌गुरुके चरणा, सायाजी मोहे रखलो शरणा।।
अब तो सफर लग रही जावा, यहांसे गये कबहुनहि आवा।।३।।
हिरजी हिया रखो विश्वासा, साहिब पुरे सबनकी आशा।।
शुभाशिष गुरु देवसे पाये, हिरजी सफरको हुवे बिदाये।।४।।
नैया बह रही मझधारा, हिरजी हियरा नाम पियारा।।
मध दरीये तोफान जगैया, अब तो क्या गत होवही सैया।।५।।

रेवा नदी किनाऱ्यावर नाविकांचे निवासस्थान होते. त्यांत हिरजी नाविकाचा निवास होता. सद्गुरु इमामशाहाकडून अनुग्रह घेऊन त्याने बरेच दिवस सद्गुरु महाराजांची सेवा चाकरी करून ज्ञान संपादन केले होते. त्याची निष्ठा सद्गुरु नामावर अढळ होती. त्याच्या हृदयात ज्ञान प्रकाश उदीत झाला होता. सद्गुरु दर्शनापासून त्याच्या चित्तात प्रेमप्रकाश पसरला होता. नित्य सद्गुरु महाराजांचेच नामस्मरण करून तो म्हणत होता की, 'हे सायाजी तूच माझा खरा नावाडी आहेस कारण माझी जीवन नौका मी तुझ्यावरच सोपविली आहे. मी तर एक सफरी आहे. दुनियेची सफर करण्याकरिता आलेलो आहे. तुम्ही माझ्या या जीवननौकेवर तारणहार म्हणून साथीदार होऊन बसा. मी माझ्या जीवननौकेचे सुकाणु आपल्या हातात सोपविले आहे. माझा सांभाळ करावा.'

अशा प्रकारची ज्याच्या हृदयात विमल भावना होती तो नाविक एकदा सद्गुरु इमामशाहांच्या निवासस्थानी दर्शनास गेला असता त्यांच्या चरणावर विनयाने झुकून म्हणाला, 'बाबा, मी तर आता जावाच्या सफरला जात आहे. येथून निघाल्यानंतर कधी परत येऊ शकेन अशी खात्रीच वाटत नाही.' त्याचे असे शब्द ऐकून सद्गुरु म्हणाले, 'हिरजी हृदयात विश्वास ठेव. भगवान सर्वांची आशा पूर्ण करतो.'

हिरजीने विनम्र भावाने सद्गुरु चरणावर शिर नमविले तेव्हा सद्गुरुंनी त्याच्या शिरावर प्रेमवत्सल हात ठेवून शुभआशिर्वाद दिला. सद्गुरुंचा निरोप घेऊन तो जावाला जाण्यासाठी निघाला. मध्य दर्यात नाव चालत होती. त्या समयी हिरजी आपल्या खेवनहार सदगुरुंच्या ध्यानचिंतनात-नामस्मरणात मग्न होता. बाह्य जगताचे भान विसरून एकाग्र बनून तो सद्गुरुंचे चिंतन करीत होता. अचानक सागरात तुफान सुरु झाले. सर्व नाविक भयभीत झाले. आता काय गति होईल. या विवंचनेत पडून आपापले वाहन सुरक्षीत ठेवण्याचा ते आटोकाट प्रयत्न करू लागले.

संग अेकादश नाव चलैया, देखत देखत सबही बिलैया।।
दश नैया रत्नाकर ग्रासे, हिरजी हियरा जगेरी त्रासे।।६।।
अब तो आगई मेरी बारी, सद्गुरु कैसे लै हो उबारी।।
मरनेकी हो गई तैयारी, आइये गुरु इमाम निजारी।।७।।
सद्गुरु तोहे लाग हुं पैया, अब तो बनो मेरा साई खेवैया।।
गुरुजी पार लगावहु नैया, डुबत ग्रही लीजो मोरी बैया।।८।।
हिरजी बिकल हुइके पुकारे, बेगे धाइये गुरुजी हमारे।।
बिपत पडे मन रहियो दुरा, सायाजी तुमी हाल हजुरा।।९।।
हिरजी साईको नाम पुकारे, नैया नाच रही मझधारे।।
जलपटपें दिखे गुरु पीरा, हियरा हिरजीके हुई धीरा।।१०।।

हिरजीच्या होडी सकट जलसागरात अकरा होड्या होत्या. अचानक उठलेल्या तुफानामुळे एकेक करता दहा होड्या सागराने ग्रासून टाकल्या. ते पाहून हिरजीचे काळीज तर चिरून गेले. त्याचे हृदय थरथरू लागले. त्याला वाटले आता आपणच काय ते शिल्लक आहो आणि आता आपलाच नंबर लागला आहे. आता सद्गुरुनाथ आपले कसे बरे रक्षण करू शकतील! मरणाची तयारी तर होतच आहे. हे गुरुदेव! हे नेजाधारी खेवणहार! हे इमामशाहा गुरु महाराज धावा! धावा!! या आपल्या गरीब दासानुदासाला वाचवा या तुफानी रत्नाकरात हा तुमचा सेवक खरोखरच बुडत आहे. त्याला वाचवा! मी आपल्या चरणी शरण आलो आहे माझे नावाडी व्हा आणि या दर्यातून माझी बुडती नाव पार घेऊन चला. माझा जीवनदोर मी आपल्या हाती सोपविला आहे. माझा हात धरून मला या तुफानी सागरातून पार उतरून न्या.' अशा रीतीने हिरजी नाविक अति व्याकुळ होऊन सद्गुरुला पुकारत होता. 'गुरुदेव आपण लवकर यावे. या संकटकाळी माझ्यापासून दूर राहू नका. प्रभु तू तर हाजराहजूर आहे. ताबडतोब या.' अशा रीतीने व्याकुळतेने तो आपल्या सद्गुरु महाराजांचे स्मरण करू लागला. तेव्हा त्याची होडी वादळी तुफानाच्या मध्यभागी मृत्युनाच करीत होती. त्या समयी जलपटावर एक आश्चर्य दिसले. त्याला एकाएकी आपल्या गुरु इमामशाहांचे दर्शन झाले. त्यांना पाहता बरोबर हिरजीच्या हृदयात धीर आला व तो आनंदीत झाला.

अब तो उबारही मेरी नैया, सांयाजी मेरा आ गैया॥
बडे तोफान दरियामे जागे, तामे चल रही नैया आगे॥११॥
हिरजी हरीके खेल निहारे, क्या गती तेरी किरतारे॥
बडे बडे खेवैया हारे, जायके डुब गये मझधारे॥१२॥
बिकट औगाह बहे मेरी नैया, साहिब सचमुच बने खेवैया॥
मोहे उबारन पियरा आये, हिरजी कैसे हरियरा गाये॥१३॥
सायाजी शरणागत जानी, आप खडे सद्गुरु दिलजानी॥
मझधारसे उबरे मोरी नैया, हिरजी नाविक जावा पहुचैया॥१४॥
जावा गये सो फिर नही आये, लोगनकी यही बानी सुनाये॥
बरसो कई जावामें बिताया, हिरजी बहुरी धन कमाया॥१५॥

सद्गुरु महाराजांचे दर्शन होताच हिरजीच्या हृदयात दृढमूल श्रध्दा जागृत झाली व त्यास धैर्य आले. आता आपली नाव बुडण्याचे भय गेले असे जाणून त्याने स्वस्थचित्ताने आणखी दृढतेने नामस्मरण सुरु केले. आता नावेच्या सुकाणुकडे त्याचे लक्ष्य नव्हते. लक्ष होते फक्त सद्गुरुंच्या स्वरूपावर. दर्यात अजून तुफान जोरच करीत होते आणि जोराची सुरकांडी मारून त्याची होडी चालतच होती. त्यात किती

काळ गेला हे त्यास समजले सुध्दा नाही तो तर शांत चित्ताने अविगत अशा आपल्या खेवणहार-तारणहार अशा सद्गुरुंची अतर्क्य लिला अवलोकन करून दंग झाला होता. मोठ मोठे कुशल नावाडी त्याच्या समोर हरले जाऊन काळाच्या स्वाधिन झाले होते हे त्याने आपल्या डोळ्याने पाहिले होते तरी पण आपली नौका काळभयानक दर्यातून पुढे चालतच आहे हे जाणून त्याला आश्चर्य तर वाटतच होते पण या सर्वास कारण आपले तारणहार सद्गुरुच आहेत असे जाणून अनन्य निष्ठेने त्याने त्यांचे भजन कीर्तन सुरु केले. मला शरणागत जाणून सद्गुरुदेव दिलदार होऊन आले. आणि बुडत असलेल्या माझ्या होडीला सावरून सुस्थिर केलें. अशा महापुरुषाचे एकाग्रतेने ध्यान चिंतन स्मरण केल्याने आपली जीवन नौका का नाही पैलतिराला लागणार? असे मनातल्या मनात सद्गुरु कृपेचे व महिमेचे गोडवे गात गात तो केव्हा जावाच्या किनाऱ्याला येऊन पोहोचला हे त्याचे त्याला सुध्दा समजले नाही. हिरजी नावाड्याची होडी जावाच्या किनाऱ्याला लागली. जावा किनाऱ्यावर पाय ठेवताच त्याला खूप आनंद झाला.

लोकामध्ये अशी म्हण प्रचारात आहे की, 'जो जावे जावा, ते फरी नही आवा.' जो जावाला जातो तो फिरून परत कधी येत नाही. हिरजी जावाला आला. सद्गुरुंच्या कृपाशिर्वादाने त्याने उत्तम धंदा व्यवसाय करून अपार धन संपत्ति मिळविली. कांही वर्षे झाली तो खरोखरच धनवान झाला होता. आता त्याचे लक्ष घराकडे लागले. जावाहून कांही आवश्यक माल घेऊन होड्या सज्ज करून मायदेशास येण्याची त्याने तयारी केली.

फिर लौटनकी हुई तैयारी, तादिन याद आये गुरु प्यारी।।
सद्गुरु संग ही संगमे आये, जावा मोहे लाये निरधारे।।१६।
अब तो मोहे ले चलो गुरु पीरा, जावन चहु रेवाके तीरा।।
बहुरी गुरुकी अरज गुजारी, हिरजी नैया किन्ही सवारी।।१७।।
सद्गुरुका दर्शन पाया, मझधारे हुवे सद्गुरु सहाया।।
जल्वा पाया सोही पिछाने, गुरुकी गति गुरु गमसे जाने।।१८।।
भरोशा जाको उरमाही, विघन ताके सब दूर कराही।।
हिरजीको बडी ओट बखाना, दिखे तोफान करे नहि दाना।।१९।।
साइया जाके राखनहारा, सोही सदा रहे निरधारा।।
कुशळक्षेम रेवा तिर आये, संपत्ति सबही घर पहूँचाये।।२०।।

त्या समयी त्याच्या हृदयात सद्गुरुंची आठवण जागृत झाली. अत्यंत विनम्र भावाने गद्‌गदीत होऊन त्याने सद्गुरु महाराजांचे स्मरण केले. सद्गरु महाराज तुम्ही माझे पाठीराखे म्हणून माझ्यासोबत आला होता. तुमच्या साथ सहकार्याने व कृपादृष्टिने

मी येथवर येऊन पोहोचलो होतो. आता येथून परत जातांना सुध्दा हे गुरुदेवा आपण माझ्या सोबत येऊन रेवातीराला पोहोचवा. अशा रीतीने प्रार्थना करून हिरजीने आपल्या होडीवर आरोहण केले. त्या समयी त्याला सद्गुरु महाराजांचे दर्शन घडले. ज्या स्वरूपातून तुफानी सागरातून सद्गुरु महाराजांनी त्याची होडी वाचविली होती त्याच स्वरूपाचे त्यास आता सुध्दा दर्शन घडले. ज्याची दृढश्रध्दा व एकनिष्ठा असते त्यालाच असे दैवी सहाय्य मिळत असते. गुरुगमानेच गुरुची गति समजू शकते. त्याच्या हृदयातल्या दृढश्रध्देनेच त्याची सारी विघ्ने दूर होतात. हिरजीच्या हृदयात आता पूर्ण खात्री होती की आता माझा तारणहार खेवैया सद्गरु माझ्या जवळच आहे. तोच अंतर्प्रेरणेने मला शक्ति देत आहे. माझ्या जीविताची अथवा येणाऱ्या संकटाची मला आता कसलीच चिंता नाही. मला भिण्याचे आता कांहीच कारण नाही. माझी सर्व फिकीर आता माझ्या तारणहार सद्गुरुलाच आहे. अशारीतीने निर्भय बनून हिरजी शांत चित्ताने ध्यानस्थ बसला. समुद्रात आता सुध्दा वादळी तुफान सुरु झाले पण ते तुफान आता हिरजीच्या हृदयाला भिववू शकणार नव्हते. ज्याचा रक्षक सद्गुरु, ज्याचे जीवन सर्वस्व सद्गुरु त्याला आता कशाची भीति राहणार. अशा निर्धारी हिरजीला सद्गुरुंनी खरोखरच पार पोहोचविले. सहीसलामत त्याची होडी रेवा तीरावर लागली. कुशलतेने त्याने सारा माल खाली उतरविला आणि घरी पोहोचविला. सर्व संपत्ति घरात भरली. त्याच्या हृदयात आता पूर्णपणे शांतीचे साम्राज्य व्यापले होते.

दिलमे याद गुरुकी आई, अमदाबाद पहूँचे जाई॥
प्रगट दिखे गुरुदेव पीराणा, साई मेरा फिर नही गवाना॥२१॥
अब तो मैं सफरे नही जाऊ, साईसे ऐसी दुवाही पाऊ॥
सायाजी आय खडे मझधारा, अपनो जान कीये उसपारा॥२२॥
सद्गुरु मेरा गरीब नवाजा, अपनो जान रखे मेरी लाजा॥
शरणागतको बिरद महाना, मै क्या जानुं बडे अज्ञाना॥२३॥
सायाकी गति मै क्या जानु, जल्वा दिखे ता दिन बखानु॥
बडे तुफान समंदर गहरा, काळबलिका लग गये प्रहरा॥२४॥
ता दिन मैने सायाको पुकारा, तुरतही आपे उबारनहारा॥
मझधारमें नैया डुबेरी, ता दिन साई खेवैया हुवेरी॥२५॥

सद्गुरु इमामशाहांची आठवण त्याच्या चित्तात जिवंतच होती. घराच्या बाबतीत निश्चिंत होऊन म्हणजे सर्व कारभार बायको व मुलाबाळावर सोपवून तो पीराण्याला आला आणि अत्यंत नम्र भावाने सद्गुरु चरणावर झुकून पडला व म्हणाला, 'स्वामीजी मी कधीच परत येऊ शकलो नसतो. आपण मला वाचविले म्हणूनच माझे पुनरागमन

झाले. आता तर असा आशिर्वाद द्या की या आपल्या परमपावन चरणापासून कधीच ढळणार नाही. या दासानुदासा करितां गुरु महाराज आपणास किती कष्ट पडले हे मी प्रत्यक्ष पाहिले. पण कनवाळूपणाने स्वामी आपण मला अतिशय बिकट अशा जीवघेण्या प्रसंगातून वाचवून सुखरूप घरी परत आणले. हे गरीबनवाज आता कोठेही सफरीवर जाऊ शकणार नाही अशी कृपा दृष्टी या बालकावर करा. आपण आपला जाणून त्या संकटातून पार उतरवीले. शरणांगताचे रक्षण करणारा असे आपण ब्रीद तर पाळले पण मी अज्ञानी माया मोहांध आपला महिमा कसा बरे समजू शकेन? माझ्यावर आलेल्या बिकट प्रसंगातून आपण मला वाचविले एवढ्या वरून मी आपला महिमा समजू शकतो. पण तुमच्या शक्तिच्या पार लागणे माझ्या सारख्या अल्पमति जीवात्म्याच्या आटोक्याची गोष्ट नाही. त्या दिवशी मला मनोमन आपले दर्शन घडले आणि तेव्हा मला आपल्या कृपादृष्टीची जाणिव झाली व माझा आत्मविश्वास जागा झाला माझा स्वामी माझ्याहून दूर नाही माझ्यातच व्याप्त आहे. स्वामीनाथ परततांना सुध्दा मला पूर्ण खात्री झाली म्हणून कोणत्याही प्रकारची दिक्कत न पडता आपण मला सुखरूपतेने परत आणले. आता एवढा प्रत्यक्ष प्रगट अनुभव आल्यानंतर मी हे आपले चरण कसे बरे सोडणार? म्हणून हे स्वामीनाथ या परमपावन जगदुध्दारक चरणांची सेवा करण्याची संधी मला द्यावी.'

बिकट औगाह मैने साइको देखा, प्रगट पीराना साहिब पैखा।।
ता दिन मोहे बडा यकीना, साहिब दूर नही पल छीना।।२६।।
साया समंदरमे चली आये, बैया ग्रही मोहे पार लगाये।।
अबही बेर रहम कर हो पीराई, यह संसार माया दुःखदाई।।२७।।
महासागरमें मोहे उबारे, साहिब अब तो किजो भवपारे।।
साई मेरा हो मोहे न बिसरो, अपनो जान दया उरधारो।।२८।।
आवागवनका बिकट फंदा, सांई उबारीये में हुं बंदा।।
सद्‌गुरु मै तो शरण आयो, रहमे समंदर रहम बरसायो।।२९।।
हिरजी चरण ग्रही के रोया, सद्‌गुरु अरजी चित्त पोया।।
हिरजी काहे नैन बहावे, सांया तोहे उबारन आवे।।३०।।

हे सद्‌गुरुनाथ आपण त्या समयी माझ्यावर दया करून समुद्रात बुडत असतांना माझी नौका सांभाळून मला पार उतरविले तर हे गुरुदेव! या संसाराची माया अतिदुःखदायक आणि दुस्तर आहे. त्या मायेच्या फंदात फसल्यानंतर जीवात्मा आत्मभान विसरून जातो; तसा मी विसरू नये अशी कृपादृष्टी मजवर करून मला भवसागरातून पार घेऊन चला. आवागमनाच्या फेऱ्यामधून मला वाचवा मी आपला सेवक दासानुदास

आहे. मी आपल्याला शरण आलो आहे. हे दयानिधी दया करा. मला या बिकट भवसागरातून पार उतरवा! असे म्हणत अधिर बनून हिरजीने सद्‌गुरु चरणावर मस्तक ठेवले. अपार प्रेमाश्रुंनी त्याने सद्‌गुरुंचे चरण धुतले. त्याच्या हृदयाची ती व्यथा व्याकूळ अवस्था जाणून सद्‌गुरुंनी अपार वात्सल्याने त्याला वर उचलून म्हटले- ' हिरजी, तूं कां म्हणून एवढा व्याकूळ होत आहेस. तुला या संसाराचे कां भय वाटत आहे. संसार हा भयकारक नाही. त्याची आसक्ति ही भयप्रद असते. एरवी संसार तर सत् मार्मदर्शकच आहे. तूं का म्हणून एवढे भय बाळगतो. सद्‌गुरु तुला उध्दरून नेण्याकरितां तत्पर आहेत. तुझी प्रेमभाव व भक्ति जाणून कोण तुझा त्याग करील बरे! पण तुझ्या हिताची एक गोष्ट मी तुला सांगतो ती लक्षात घे व त्याप्रमाणे वाग. तुझा इहलोक आणि परलोकही सुखदायक होईल.'

धन पाया कछु नेकी बखानो, नेकी बीना कैसे जिया बेगानो॥
नेकी करो कुछ बंदगी कमायो, मानव तनमे लिये उमायो॥३१॥
बंदगी साईको बहुत पियारी, बंदगीसे हरदम रखो यारी॥
दिल दया सदाही रखैया, दया बिना सुख काहु न पैया॥३२॥
साहिब मेरा गरीब नवाजा, हिरजी तुमी रखो रंक की लाजा॥
गरीबको देख मुख मत मोडो, रंकही से निशदिन प्रीत जोडो॥३३॥
हिरजी तेरी नेक कमाई, परमार्थ में कछु काम लगाई॥
सद्‌गुरुकी सुनेरी बानी, नाविक दिल हुवे दिलजानी॥३४॥
प्रेमे गुरुजीको शिर नमाई, रेवा के तीर ठाढे आई॥
अपनी दोलत करे नेक कमाई, दान दया जाके उर भाई॥३५॥

'हिरजी, तू बरीचशी धन संपत्ति जमविली. धन संपत्ति संसार कार्याकरितां अवश्य कमवायला हवी आहे. पण सुक्रित म्हणून त्या धनाचा काहीतरी अंश धर्मकृत्यात भगवद्‌कार्यात लावायला हवा आहे. धन मिळविले पण नेकी नाही मिळविली त्या धनामधून सुकृत्य नाही केले तर ते धन शुध्द होऊ शकत नाही. सुकृत अथवा दानधर्माने 'नेकीने' धनाची शुध्दता होत असते व तसे शुध्द झालेल्या धनाचा संसार कार्यात विनियोग झाल्यास ती दैवी संपत्ति जीवात्म्यास हानीकारक न ठरता उपयुक्त ठरते म्हणून धनाचा उपयोग नेकीच्या कार्यात सत्कृत्यात करावा. मानवजन्म मिळाला आहे. त्याचा लाभ घडवून घ्यावा. भगवंताची भक्ति करावी, भगवंताला भक्तीच खूप आवडती आहे. हृदयात सदैव दयाभाव-प्रेमभाव ठेवावा. त्याशिवाय जीवनात कोणी सुखीच होत नाही. ईश्वर 'गरीबनवाज' गरीबांचा कनवाळू आहे. गरीबांचा बेली आहे. पण गरीब कोण? गरीब कोणाला म्हणावे. धन संपत्ति नसलेल्या

कंगालाला केवळ गरीब म्हणता येणार नाही. जो सत्यशील, स्वभावाने मृदू व परदु:ख परिहार करणारा निर्व्यसनी तोच गरीब. अशा सत्पुरुषांची सेवा हीच भगवंताची सेवा होय. आपल्या धनाचा विनियोग रोजच्या रोज सखेसोयरे, इष्टमित्रमंडळाच्या भोजनाच्या पंक्ति खानपानाच्या दावती दिल्याने सतकृत्यात गणला जाणार नाही तर जे रंजले गांजले असतील दु:खपिडीत, रोगपिडीत, नैसर्गिक आपत्तीने पिडीत असतील त्यांना मदत केल्याने जशी ज्यास आवश्यकता असेल त्या स्वरूपातून मदत केल्याने व तीही निस्वार्थ त्याग बुध्दिनेच व्यय केल्याने सत्कृत्य गणले जाते. हिरजी! दैव योगाने स्वप्रयत्नाने व सचोटीने तू धनसंपत्ती जमविली आहे. रंक जनाकरिता तिचा यथाशक्ति व यथामति उपयोग कर. गरीबाकडे पाहून तोंड मुरडू नको. भिकाऱ्याकडे पाहून त्याला हिनवू नको. भिकारी, भिक्षुक हे आपणास धडा शिकवितात ते सांगतात, 'आम्ही वर हात करून कोणलाही कांहीही दिलेले नाही म्हणून तुमच्यासमोर हात पसरत आहोत, पण तुम्ही जागृत व्हा.' अशा प्रकारचा पाठ ते आपणास देतात ते लक्षात घ्या. अशा रीतीने हिरजी तू आपल्या नेक कमाईचा नेक कार्यात विनियोग कर.' अशा रीतीने सद्गुरु महाराजांनी त्यास परमार्थ कार्यात प्रवृत्त केले. गुरुजींचे शब्द त्याच्या हृदयात अंकीत झाले. सद्गुरु चरणावर शिर ठेवून त्यांचा आशिर्वाद घेऊन तो तेथून रवाना झाला. रेवातीरावर येऊन खऱ्या अंत:करणाने त्याने दान, दया व परमार्थाचे आचरण करून नेक मार्ग स्विकारला.

हिरजी बडे सद्गुरुके संगी, संत सेवा रखे उर उमंगी॥
नाविककी नेक जिंदगानी, देखत अचरज हुवे बेगानी॥३६॥
किसने तोहे दियो उपदेशा, हिरजी हियाको मिटे क्लेशा॥
निशदिन परमानंदको पाया, पीर इमामका राह दिखाया॥३७॥
सोही सद्गुरु दिये उपदेशा, काट दिये यही भवक्लेशा॥
सतकी कमाई सोही सतमें जावे, असत चोर लुटेरा खावे॥३८॥
हिरजी गये सद्गुरुके भवना, साया कहे तेरा आगये गवना॥
शुरा होय सो झुझे मेदाना, कायर भाग चले बेगाना॥३९॥
सद्गुरु मोहे निर्भय किन्हा, तासे मैं कबहु नही बिन्हा॥
अब तो सज्ज भये हुं सांई, हिरजी को गुरु दियो बिदाई॥४०॥
खटमास रहो रेवा के तीरा, प्रेमही से सुमीरो गुण गंभीरा॥
दिल अपना गंभीर जो करना, प्रभु भजनमें ताली लगाना॥४१॥

हिरजी आता सद्गुरु महाराजांचा खरा अनुग्रही झाला होता. तो संतांची सेवा तर अति उत्साहाने करीत होता. पण अनेक रंजल्या गांजलेल्यांना साह्य करीत

होता. गोर गरिबांना अडीअडचणीच्या वेळी मदत करीत असे. कोणाला कपडयांच्या रूपाने, कोणाला औषधोपचाराच्या रूपाने, कोणाला अन्नाच्या रूपाने अशा अनेकानेक प्रकारे तो तन-मन-धनाने जनतेची सेवा करू लागला. त्यायोगे त्याच्या संपत्तीत घट तर मुळीच नव्हे पण उत्तरोत्तर वृध्दीच होऊ लागली अनेकांचा आशिर्वाद फळून संतति, संपत्ति युक्त होऊन तो सुखी झाला. त्याची ती संस्कृति पाहून त्यांचे ते शुध्द आचरण पाहून मुग्ध होऊन लोक त्याला विचारीत, 'हिरजी! तुला असा कोण उपदेशक-मार्गदर्शक मिळाला? तुला कांही ऋध्दि-सिध्दी प्राप्त झाली की काय? एवढे लोकोपयोगी-परोपकाराची कामे तू करतोस तुला खास कोणाचे तरी साहय्य असले पाहिजे. एक सामान्य नाविक एवढे परमार्थाचे काम करतो हे पाहून आमचे मस्तक चक्रावून जाते.' तेव्हा सरळ हृदयाचा हिरजी म्हणायचा, 'बंधुंनो, मला ऋध्दि सिध्दि नाही मिळाली व त्यांची मी अपेक्षाहि करीत नाही, पण त्या ज्यांच्या दासी आहेत अशा सद्गुरुंची प्राप्ति झाली. त्यांच्या सद्उपदेशाने माझ्या हृदयातला क्लेश समूळ मिटून गेला आणि मी खरोखरच सुखी झालो आहे. रात्रंदिवस ईश्वराचे स्मरण करतो पण त्यापेक्षाही माझ्यासमोर जो दिनदुबळा, उपेक्षित, भुकेला, नागावलेला बापुडा जीवात्मा येतो त्यात माझ्या सारखाच ईश्वरी अंश आहे असे जाणून मी माझ्या परीने होईल तेवढी सेवा करतो. हा कानमंत्र मला माझ्या सद्गुरु इमामशाहांनी दिला. इतर सर्व मंत्रापेक्षा हा मंत्र श्रेष्ठ आहे, असे मला समजून आले. माझ्या गुरुंनी मला हा खरा मार्ग दाखविला व त्याचे आचरण करून माझे जीवन सार्थकी लागले. सद्गुरुंनी मला हा अमृतोपदेश देऊन माझ्या आवागमनाचा फेरा कायमचा मिटविला. माझे भवक्लेश नाहीसे झाले. जी सत्याची सचोटीची कमाई होती ती अखेर सत्यधर्मानेच वागविण्याची बुध्दि देते आणि असत्याची अधर्माची कमाई असते ती चोर आणि लुटारूच खाऊन टाकतात.' हिरजीचे शब्द ऐकून अवाक् बनून लोक निघून जात. ज्यांना हिरजीचे शब्द मानवत ते धन्यता मानीत. हिरजीला कोणी मानोत वा निंदोत त्याची पर्वा नव्हती. तो आपल्या सरळ मार्गाने जात होता.

मधून मधून वेळ मिळताच तो सदगुरु महाराजांच्या दर्शनास पीराण्यास जाई. पूजा, अर्चा करून सद्गुरुंचा उपदेश ऐकी व त्यांचा आशिर्वाद घेऊन उपदेशाचे मनन चिंतन करीत घरी येई. एकदा तो असाच सद्गुरु महाराजांच्या दर्शनाला गेला असतां सद्गुरुंनी त्यास म्हटले 'हिरजी आता तुझी जाण्याची तयारी होत आहे. शूर असतात ते मैदानात सन्मुख लढतात आणि कायर असतात ते भयभीत होऊन पळ काढतात.' हिरजी म्हणाला, 'गुरुदेव आपण मला कायमचेच निर्भय केलेले आहे. माझ्या हृदयात तीळमात्र भय नाही. मी तर तयार होऊनच बसलेला आहे. आताही जरी काळाचे बोलावणे आले तरी आपल्या कृपाशिर्वादाने मी आपली आज्ञा

समजून सुखाने व आनंदाने प्रयाण करीन.' हिरजीने आतुरता व्यक्त केली पण सद्गुरुंनी त्याला धीर देऊन समजाविले 'हिरजी अजून तुला सहा महिन्याचा अवकाश आहे. रेवातीरावर जाऊन शांत चित्ताने राहा आणि प्रेमाने ईश्वराचे स्मरण कर. अमुल्य अवसर मिळाला आहे त्याचा लाभ घडवून घे. ईश्वराच्या भक्तीत तल्लीन होऊन जा.'

दाव अमोलख तोहे पाया, हिरजी प्रेमसे जिक्र बनाया।।
मानव तन बेर बेर न पावे, दाव चुके बहुरी पछतावे।।४२।।
गुरु पीराको दिये चेताई, हिरजी चले साईको शिर नमाई।।
रेवा तीर आयके ठाढे, निशदिन साईको नाम आराधे।।४३।।
जैसे योगी ध्यान लगाया, अैसे हिरजी बैठे सुखदाया।।
रसना लग गई नाम जपैया, रेन दिन सुमिरन किये सैया।।४४।।
हिरजी अैसे हरीसे लागा, मानो सचमुच हुवे सभागा।।
खट्मास अैसेही बीतैया, हिरजी हरिकी जिक्र करैया।।४५।।
अपनो जान हरी बुलवा पठाये, हिरजी सचमुच शिर झुकाये।।
ठाढो प्यारे मोहे अेकही आशा, सद्गुरु दिदारका प्यासा।।४६।

सद्गुरुंचा आदेश व उपदेश प्राप्त करून हिरजी तेथून स्वस्थानी आला. रेवा तीरावर एकांत स्थान बघून तेथे तो निश्चिंत मनाने एकाग्रतेने योगी पुरुषाप्रमाणे ध्यानमग्न झाला. रसना नामस्मरणात व मन परमेश्वर ध्यानात तल्लीन होऊन गेले. या प्रेम लागणीत सहा महिने केव्हा निघून गेले. ते समजले सुध्दा नाही. हिरजी खरोखरच महाभाग्यशाली झाला. आपला समजून भगवंताच्या प्रदेशातून बोलावणे आले. भगवंताचा संदेश घेऊन येणाऱ्या दूतांना हिरजीने शिर झुकवून आपल्या अंतरातली अभिलाषा व्यक्त केली तो म्हणाला, 'महाराज, मी तर तयारच आहे, पण माझी शेवटची इच्छा माझ्या सद्गुरुंचे दर्शन घेण्याची आहे. एवढे दर्शन मला घेऊ द्या हीच अंतीम अभिलाषा आहे.' स्वस्थ झालेल्या हिरजीने आपले मनोगत व्यक्त केले.

गुरुकी याद उरहीमें आई, ता दिन प्रगट हुवे गुरुराई।।
हिरजीको गुरु दर्शन दिन्हा, नाविक कैसे बिकल मन किन्हा।।४७।।
साहिब मोहे दर्शनकी आशा, अब तो मेरी पूरन हुई आशा।।
सद्गुरुके चरण झुकैया, हिरजी यहाँसे अमरापुर गैया।।४८।।
बडी देखी भक्तनकी रीती, जाको सदा सदगुरुसे प्रीती।।
जाको लगे सद्गुरुसे यारी, सोही रखे खबरीया हमारी।।४९।।

हिरजीचे मनोगत व मनोबल पाहून देवदूत क्षणभर स्तंभीत झाले. त्याच क्षणी सद्गुरु इमामशाह त्या ठिकाणी प्रगट झाले. त्या वंदनीय सद्गुरुला पाहताच तो अत्यंत त्वरेने त्यांच्या चरणावर झुकून पडला. सद्गुरुंनी त्याला वर उचलून म्हटले, 'नाविका, तुझे मन व्याकुळ कां झाले?' 'गुरुदेव, मला केवळ आपल्या दर्शनाची अभिलाषा होती, आता ती पूर्ण झाली. आता मी आनंदाने आपला निरोप घेतो.' असे म्हणत खरोखरच तो सद्गुरु चरणावर पडून कायमचा पूर्ण विराम पावला. त्याचा अमर आत्मा अमरापुरीच्या वाटेने निघून गेला. या भक्ताची रीत खरोखरच महान होती. सद्गुरु चरणावर ज्याचा खरा अनुराग असतो त्याचा सांभाळ ते करीत असतात. संत नायाजी अशा महान सद्गुरुला प्राप्त करून हर्षभरीत होऊन त्यांचे मंगलगीत गाऊ लागला.

नायाजी सद्गुरुको पाया। हरख हरख महा मंगल गाया॥५०॥

★ ★ ★

## २७. जुगल वणझारा.

देश उत्तरगुजरात सुहाना, जुगल नाम बडे गुणवाना॥
बनझारा फिरे देश विदेशा, बीते जुवानी बिरध भये केशा॥१॥
तृष्णा अजहु न मिटे मनकी, जुगल खोज करत हे धनकी॥
पोठ लेके फिरे बनझारा, उद्यम करते सांझ सवारा॥२॥
शहर अमदाबादमें आये, माल बीके अरू खूब कमाये॥
ता दिनसे बनझारा बूझे, अमदाबादको पंथ ही सूझे॥३॥
चलते फिरते चल गये पीराणा, दिखे धाम दिल लगे सुहाना॥
जायके साईका दर्शन पाया, प्रेमसे पीरको शिर झुकैया॥४॥
जुगल तोसे मेरी अगली सगाया, दिन बीते तेरी याद लुभाया॥
आज ही तेरा आवन हुवा, देखत तोहे मेरा दिल खुवा॥५॥

उत्तर गुजराथमध्ये एक जुगल नावाचा व्यापारी राहात होता. तो फार गुणवान हुशार व चतुर होता. देश परदेशात फिरून त्याने तारूण्यात बराच व्यापार केला. पण आता वार्धक्य जवळ आल्याने त्याने लांब लांब जाण्याचे टाळले. मनात धन कमावण्याची लालसा होतीच म्हणून जवळपास जाऊन व्यापार करू लागला. एकदा तो व्यापारानिमित्तानेच अमदाबादला आला. आपल्या जवळचा माल विकून चांगला नफा मिळविला. त्या दिवसापासून त्याचे मन अमदाबादला रमले. तो वारंवार व्यापारानिमित्त अमदाबादला येऊ लागला. दैवयोगाने तो एकदा सहज पीराण्याला गेला. सद्गुरुधामाची

व नामाची कीर्ति त्याने ऐकलेलीच होती. त्याने सद्गुरु धामाचे दर्शन घेतले. त्याला खूप आनंद झाला. नंतर तो गुरु इमामशाहाजवळ आला. आपल्या बऱ्याच शिष्य समुहात बसून सद्गुरुंचा दिव्य ज्ञानोपदेश चाललेला होता. तो ऐकून जुगल फारच प्रभावित झाला. प्रवचन संपल्यावर तो सद्गुरु इमामशाहांच्या जवळ आला व त्यांच्या चरणारविंदी झुकून त्याने प्रणाम केला. त्याच्याकडे पाहताच सद्गुरु म्हणाले 'जुगल, अरे तू एवढे दिवस कोठे होता. धन जोडण्याची लालसा अजून संपलेली नाही की काय? अरे पण ते ऐहिक नाशिवंत धन जोडण्यात तू आपले पारलौकिक अविनाशी सुखाचे धन हरवून बसतो आहेस त्याची वाट काय? तू मला ओळखले नसशिल पण मी मात्र तुला ओळखले आहे. तशी आपली ओळख फार जुनी म्हणजे मागच्या जन्मातील आहे. कित्येक दिवसापासून तुझी वाट बघत आहे तोतू आज येऊन मिळालास आणि तुला पाहताच माझे हृदय उल्हसीत झाले.' सद्गुरुंचे हे शब्द श्रवण करताच जुगल फारच आश्चर्यचकित झाला.

मेरा तुमी मोहे याद सतावे, जुगल मेरा कबही आवे।।
बिकल जियरा तेरी यादमे होवे, साच कहु कभी नैना रोवे।।६।।
आजही तुमरा दिखे दिदारा, जुगल तुमी हो साई को प्यारा।।
बानी लगे बडे अचरज बेना, दिखे जुगल बहे साईके नैना।।७।।
साहिब में हुं बडे अभागा, सांया मुजमें क्यों रखे अनुरागा।।
दिलकी लगी तुमी कहा जानो, अगले भवकी याद बखानो।।८।।
तोहे उबारन कोल करैया, असल बाते कैसे साई भुलैया।।
जुगल मेरा हे मेरा रहैया, कबहु न मुझसे न्यारे रहैया।।९।।
जुगल मै तेरा बनी गैया, दिल चहे सोही मंगले सैया।।
सायाजी तुमी सबही जानो, कैसे मुखसे बेन बखानो।।१०।।

जुगल, तू माझा प्रेमी आहेस म्हणून हृदयात तुझी सतत आठवण सतावीत होती. माझा जुगल केव्हा येईल? असे म्हणत माझे हृदय सतत व्याकुळ होत होतेआणि खरेच सांगतो तुझ्याकरिता विरहाने माझ्या डोळ्यातून अश्रु येत होते. आज तू आलास मला खूप खूप आनंद झाला. जुगल तू खरोखर माझा फार प्रीय आहेस.' सद्गुरुंनी निर्मल अंत:करणाने त्याला आपला पूर्व जन्माचा संबंध सांगितला. तो श्रवण करून आश्चर्यचकित झालेल्या जुगलने सद्गुरुकडे प्रेमार्द्र दृष्टीने पाहिले, तो खरोखर त्याला सद्गुरुंच्या नयनात प्रेमाश्रु दाटलेले दिसले. ते पाहताच तो म्हणाला, 'स्वामीजी, मी तर एक अभागी सामान्य मनुष्य आहे. आपण माझ्यात एवढा अनुराग कां दाखवितात हे जाणणे माझ्या बुध्दिच्या पलिकडे आहे. मला आपण समजावून

सांगा मी अल्पज्ञ आहे आपण सर्वज्ञ आहांत.' सद्‌गुरु म्हणाले, 'जुगल, अंत:करणापासून मी जी वार्ता जाणतो ती पूर्वजन्माची आहे. ती तुला समजू शकणार नाही. त्या जन्मात तुझा उध्दार करण्याचे वचन तूं माझ्याकडून मिळविले होते. ती गोष्ट मी कसा बरे विसरेन! जो माझा प्रेमी बनला त्यास मी कधीच अन्यत्र भटकविणार नाही. त्याला सरळ मार्गावरच आणीन पण आज तुला काय हवे आहे तेसांग मी तुझी सारी इच्छा पूर्ण करीन कारण तूं माझा आहेस. तेव्हा जुगल म्हणाला, 'स्वामीजी, तुम्ही माझ्या मनाची सारीच गति जाणत आहांत तर माझ्या मुखातूनच कां बरे वदवून घेत आहांत.' त्याचे शब्द ऐकून सद्‌गुरु म्हणाले, -

जुगल तुमी हो धनका प्यासा, धन खोजतही फिरे चोपासा॥
आजही तोहे धन दिखावे, वंश तेरा न्याल हो जावे॥११॥
रेनको आइये संग हमारी, सोही भूमी दिखावही न्यारी॥
जुगलको गुरु बेन सुनाया, बनजारा दिलमे हरखाया॥१२॥
बिकल जुगल कब दिन बितैया, रेनको गुरु संग धन दिखैया॥
दिन बिते हो गई रेना, सद्‌गुरु उचरे मुखसे बेना॥१३॥
चुपकीसे चलो पंथ निहारा, बडे सावध हुई बनजारा॥
सद्‌गुरु संग चले बनजारा, भूमि भयानक रेन अंधियारा॥१४॥
इमली वृक्ष दिखे बन खंडा, सद्‌गुरु दूरसे ठाढे रहे पंडा॥
दिखे भुजंग विष ज्वाळ कराळा, कांपे जुगल आये महाकाला॥१५॥

'जुगल, खरे सांगू सांप्रत तुझ्या हृदयात धनाची लालसा आहे. आणि म्हणून तू एवढा वृध्दापकाळ आला तरी धन प्राप्ति करण्यासाठी चौफेर फिरत आहेस. आज तुझी ती धनाची अभिलाषा मी तृप्त करणार आहे. तुला एवढे धन मिळेल की तुझ्या वंशपरंपरागत वारसांना सुध्दा त्या धनाचा लाभ घडेल. आज रात्री तू माझ्या सोबत ये. जेथे धन आहे ती भूमीच वेगळी आहे. तुला मी तेथे घेऊन जाऊन ती भूमि दाखवीन.' अशा रीतीने सद्‌गुरुंनी त्याला सांगितले. ते ऐकताच धनलोभी जुगलचे हृदय पुलकीत झाले. त्याचे मन व्याकूळ झाले. आणि ते इतके की तो दिवस त्याला खूपच लांब वर्षाप्रमाणे भासू लागला. केव्हा दिवस मावळतो आणि केव्हा रात्र पडते आणि सद्‌गुरु बरोबर केव्हा आपल्याला त्या भुमीजवळ जायला मिळेल व केव्हा ते धन आपल्या पदरात पडेल असे त्याला होऊन गेले. अधिर होऊन वाट पहात असता सूर्यास्त झाला. रात्रीचा अंध:कार पसरू लागला. त्याच्या हृदयाला थोडी फार शांति लाभली आणि हळूच सद्‌गुरुंच्या जवळ जाऊन तो बसला. सद्‌गुरुंनी त्याला न्याहाळले व म्हटले, 'जुगल स्वस्थ चित्त ठेव. माझ्या बरोबर

चालतांना रस्ता चांगला न्याहाळून सावधानतेने पाऊल टाक.' वणझारा सद्‌गुरुंच्या पाठोपाठ चालू लागला. रस्त्याने चालता चालता भयानक भूमि लागली. तेथे एक विशाल पण घनदाट चिंचेचे झाड होते. तेथे जाऊन सद्‌गुरुंनी लांबच थांबून जुगलला निर्देश करून सांगितले की, 'जुगल, ज्याचा शोध घेण्यासाठी येथवर आलास तेच हे स्थान आहे. समोर त्या विशाल वृक्षाखाली पहा म्हणजे तुला इच्छित लाभ होईल.' जुगलने डोळे विस्फारून पाहिले. तो त्याला एक मोठा विषधर भुजंग वेटोळे करून त्यांच्याकडेच पाहात असलेला दिसला. त्यास पाहता बरोबर जुगल तर थरथर कापू लागला व आताच मृत्यू जवळ आला असे त्यास वाटले.

धनका ढेरको छांडो भुजंगा, भाग्यशाळीको पाया प्रसंगा॥
आय खडे जुगल बनझारा, देश उत्तर गुजरातसे प्यारा॥१६॥
जिनका धन उनहीको दिजे, सतकी राह वासुकी बीजे॥
सायाजी कैसे चली जावे, असल धणीकी प्रतित न आवे॥१७॥
वासुकी सत बेन सुनाई, तो हे अबही प्रतीत कराई॥
बनझारा के चरणको देखो, पद्मरेखा महाभागीको पेखो॥१८॥
भुजंगा बडी खेपसे धाये, बनझारा के चरण छुवाये॥
देखतही अचरज हो गैया, महाभागी सचही हे सैया॥१९॥
सायाजी मोहे मुक्त करै हो, बनझाराको सबही धन दै हो॥
आज मोरे दिल अति उमंगा, शिर नमायके चले भुजंगा॥२०॥

महाकाय भुजंगाला पाहताच वणझारा थरथर कापू लागला. त्याच्या सर्वांगाला घाम सुटला. भीतीने त्याची बोबडी वळली. ते पाहून सद्‌गुरु त्याच्यावळ जाऊन त्याला धीर दिला व सर्पाला म्हणाले, 'हे वासुकी, आता या धनराशीवरून उठून जा. जो या धनाचा अधिकारी आहे तो उत्तर गुजराथ मधून आलेला हा जुगल वणझारा आता हे धन घेण्याकरितां आलेला आहे तर तू त्याचा मार्ग मोकळा करून सत्यमार्गाने मुक्त हो.' सद्‌गुरुंनी त्याला आदेश देताच मनुष्याप्रमाणे संकेत करून म्हणूं लागला- 'सद्‌गुरुजी जे आपण म्हणतात त्याप्रमाणे मी कसा बरे निघून जाऊ! मला खऱ्या मालकाची ओळख (खात्री) पटल्याशिवाय कसे बरे हे स्थान सोडू? धनाचा खरा मालक असेल व तशी माझी खात्री झाली तर हे स्थान सोडण्यास माझी काहीच हरकत नाही.' त्याचा असा संकेत जाणून सद्‌गुरु म्हणाले, 'हे वासुकी, तू खरी गोष्ट सांगत आहेस. तुला खात्री करून देतो. हा पहा जुगल बनझारा, माझ्या जवळ उभा आहे. त्याच्या पायावर पद्मरेषा आहे. ती बरोबर न्याहाळून खात्री करून घे. हाच या धनाचा खरा मालक आहे.' सद्‌गुरुंची वाणी ऐकून

सर्प जवळ आला आणि वणझाराच्या पायाला स्पर्श केला व त्याच्या पायावर जी पद्मरेषा होती ती न्याहाळून खात्री केली. आश्चर्यचकित होऊन संकेत करून सर्पराज म्हणाला, 'महाराज, आपण जे सांगितले ते अक्षरशः खरे आहे. हा खरोखर महाभाग्यशाली पुरुष आहे. आता तुम्ही हे सर्व धन याच्या ताब्यात देऊन मला मुक्त करा. अनेक वर्षानंतर आज मला खरा आनंद होत आहे.' असे म्हणत विनयाने सद्गुरु चरणावर झुकून सर्पराज तेथून निघून गेला.

बनझारा धरती खुदवै हो, सप्त देग यहाँसे ले जै हो॥
तेरा हे तुमहीको दिया,साई कछु उपकार न किया॥२१॥
कैसी बानी गुरुदेव उचारे, हम पर तुमरी किरपा अपारे॥
मोहे अज्ञानीको नैन दिखैया, ताही से मैने पेखेरी सैया॥२२॥
साया मेरा अनुग्रह किया, निर्धनीयाको बहुत धन दिया॥
ओर मांगु कछु सद्गुरु देवा, कबहु न्यारे नही रहू भेवा॥२३॥
अटल बने मेरा अनुरागा, सदगुरु मोहे करहु सुभागा॥
जुगल मेरा मुजहीको प्यारा, मेरा मुजसे रहे क्यो न्यारा॥२४॥
अब तो तुम्हारा काम करै हो, धन लेके बेगे चली जै हो॥
बनझाराको सेन दिखाई, गुरुजी निज आसने आई॥२५॥

जुगल तुला ज्याचे भय वाटत होते तो विकराळ भुजंग तर या ठिकाणाहून निघून गेला. त्याने या स्थानाचा कबजा सोडून दिला. आता तू त्या ठिकाणी जा. जमिन खोद. तुला सोन्याने भरलेले सात चरू मिळतील. ते घेऊन तू सुखाने घरी जा. जे तुझे होते ते तुला अर्पण केलेले आहे. ते घेऊन तू आनंदाने घरी जा. यात सद्गुरुंनी तुजवर मोठा उपकार केला आहे असे समजू नकोस.' हे शब्द ऐकताच बनझारा म्हणाला, गुरुदेव आपण ही कशी गोष्ट करीत आहात. आपण माझ्यावर केवढी मोठी कृपा केलेली आहे हे केवळ शब्दाने बोलून दाखविता येणार नाही. माझ्या सारख्या अज्ञान्याचे डोळे उघडले. मी आपणास पूर्णपणे ओळखले. आपण माझ्यावर अनुग्रह केला आणि निर्धन्याला धनवान बनविले. ही कांही साधारण करूणा नाही. आपण माझ्याकरिता एवढे सर्व काही केले पण अजून माझे एक मागणे आहे की मी आपणापासून क्षणभरही दूर राहणार नाही. माझे मन सदैव आपल्यातच लागून राहिल अशा प्रकारची कृपादृष्टी करून आपल्या समागमाचा नित्य सभागी बनवा.' सद्गुरु म्हणाले, 'जुगल, तू माझा आहेस म्हणून माझ्याहून तू वेगळा होऊ शकणार नाही. पहिल्यादा तू तुझे काम करून घे. हे धनाचे चरू उचलून झपाट्याने तू घरी निघून जा. ही बातमी कोणालाही समजण्याच्या आधी तू तुझ्या घरी निघून

जा.' अशा रीतीने सदगुरूनी त्याला सजाग बनविले म्हणून तो स्वस्थ होऊन सद्गुरु चरणावर झुकून पडला. गुरुदेव तेथून निघून आपल्या ठिकाणावर परत आले.

बनझारा को भूमि खुदवाये, सप्त देग सुवर्ण छलकाये।।
पोठ भरे जावनकी बेला, बिदा गुरजीसे चले अकेला।।२६।।
सायाजी यही धनका भारा, कैसे घर पहूँचे निरधारा।।
जुगल तापे सद्गुरुकी सहाया, बनाशतीर पहूँचे सुखदाया।।२७।।
प्रेमे गुरुकोशिर नमाये, जुगल नैना जलधार बहाये।।
साया कब मे आन मिलैया, दर्शन बीन कैसे दिन बितैया।।२८।।
जुगल येही संसारकी माया, निशदिन नामे जीव लुभाया।।
जबही छुटे मायाका फंदा, साईसे साई मिलै हो बंदा।।२९।।
अब तो अपने धाम सिधावो, मिले योग जरूर यहा आवो।।
असुवन नैन चले बनझारा, अपना पोठ लाय संग सिधारा।।३०।।

सकाळ होताच वणझारा आपल्या साथीदारांना घेऊन त्या ठिकाणी आला आणि जमीन खोदून सोन्याने भरलेले सात चरू बाहेर काढले. सर्व धनाचे गाठोडे बांधून तयार केले व तो सद्गुरुजवळ आला आणि म्हणाला, 'गुरुदेव, हे धनाचे गाठोडे सोबत घेऊन जाऊन मी घरापर्यंत कशारीतीने सुखरूप पोहोचेल.' 'जुगल, तू चिंता करू नकोस. तुझ्यावर सद्गुरुंची कृपा आहे. तू बनास काठापर्यंत म्हणजे घरापर्यंत बिनदिक्कत पोहोचशिल. कोणतेही अरिष्ट तुजवर येणार नाही. आले तरी ते निवारण होईल.' सद्गुरुंनी त्याला आश्वासन देऊन अभय दिले म्हणून साश्रुनयनांनी झुकून त्याने विनयाने सद्गुरुंना प्रणाम केला. तो म्हणाला, 'गुरुदेव, मी आपणास परत केव्हा येऊन मिळेल? आपल्या दर्शना शिवाय माझे दिवस कसे बरे व्यतीत होतील?' 'जुगल, ही संसाराची माया आहे. त्यात रात्रंदिवस जीव लोभलेला असतो. जेव्हा त्या मायेचे बंधन ढिले पडेल तेव्हा तू सद्गुरुंना येऊन मिळशिल. आता तर तू निर्भयतेने हे धन घेऊन जा. त्याचा विनियोग उत्तम प्रकारे करून सुखी हो. जेव्हा अनुकुल योग येईल तेव्हा सद्गुरु समागमाकरिता तू येशील.' असे आश्वासन देऊन सद्गुरुंनी त्याला निरोप दिला. साथीदारांच्या डोक्यावर धनाचे गाठोडे देऊन साश्रुनयनांनी सद्गुरुंना प्रणाम करून निरोप घेऊन जुगल जाऊ लागला.

अमदाबाद जावन लगे दूरा, मार्गमें सिपैया ठाढे हजूरा।।
बनझाराकी पोठ दिखैया, सिपैयाको कुछ और दिखैया।।३१।।
कुशलक्षेम चले बनझारा, उत्तर गुजरातको पंथ निहारा।।
रेन बारैया लुटन आये, बनझारा दिलमे तडपाये।।३२।।

सायाजी अब क्या गति होवे, रक्षा करो गुरु नैना रोवे ।।
बारैयाको सब पोठ निहारे, कोयला देख मुख हो गये कारे ।।३३।।
बनझाराको छांड चलैया, रखवाला ताको कोन लुटैया ।।
सद्‌गुरुका जेही हो गये प्यारा, तासे साईया रहे क्यो नारा ।।३४।।
बनझाराको बचन दिये सैया, बनाशके तीर सोहे पहूँचैया ।।
बहुत धन पाये बनझारा, परहित जाके उर पियारा ।।।३५।।

अमदाबाद शहरातून बाहेर पडतांनाच दरवाजात शिपायांनी त्यांना अडविले आणि त्यांचे गाठोडे उतरवून तपासून पाहिले. त्यांत त्यांना काही वेगळ्याच निरूपयोगी वस्तू दिसूं लागल्या. शिपायांनी त्यांना निघून जाण्याची रजा दिली. म्हणून ते आपापले गाठोडे घेऊन पुढे निघून गेले. अशा रीतीने राजरोसपणे ते उत्तर गुजरातच्या मार्गाला लागले. एके दिवशी रात्रीच्या समयी वाटचाल करतांना थकल्यामुळे जंगलातच त्यांनी मुक्काम केला. जेवण वगैरे केल्यानंतर थोडी विश्रांती घेण्यासाठी आडवे पडले. एवढ्यात एक लुटारूंची टोळी तेथे येऊन दाखल झाली. लुटारूंना पाहताच सर्वांची पाचावर धारण बसली. लुटारूंनी त्यांना धमकावून निमूटपणे गाठोडे आमच्या ताब्यात द्या नाहीतर प्राणास मुकाल असा हुकूम सोडला. जुगल मनोमन सद्‌गुरुंचा धावा करूं लागला. लुटारूंनी गाठोडे उचलून सोडून पाहिले तो त्यांना त्यांत काय दिसले? गाठोड्यात निव्वळ कोळसा भरलेला पाहताच लुटारूंची तोंडे काळी ठिक्कर पडली. ती गाठोडी तशीच सोडून देऊन त्यांनी आपली तोंडे काळी केली. ते निघून गेल्यावर व्यापाऱ्यांनी आपापली गाठोडी सावरली. सद्‌गुरूंचा जो भक्त प्यारा आवडता झाला आहे त्याच्यापासून तो कधीही वेगळा राहू शकत नाही. वणझाराला वचन दिलेले होते त्यानुसार त्याला बनास काठापर्यंत सुखपूर्वक पोहाचविले. त्याला बरेचसे धन मिळाले होते. जुगल परहिताचा विचार करणारा परमार्थी पुरुष होता. म्हणून या धनाचा सदुपयोग कशारीतीने करावा याचा विचार करूं लागला.

संतसेवा सदाव्रत राखा, साधु अतीत पोखे प्रेम दाखा ।।
सतकी कमाई सोही सत राहे, बनझारा कैसे चुकेनिगाहे ।।३६।।
बारा बरस अैसे बीत गैया, परमारथकी राह बुझैया ।।
अेक दिन याद गुरुकी आई, ता दिन बैठे नैन बहाई ।।३७।।
गुरुजी में हुं कैसा अभागा, धन पाई भूले अनुरागा ।।
क्षमा किजे गुरुदेव पिराई, पतितपावन तुमी हो साई ।।३८।।

तुरतही जुगल हुवे असवारा, घटको छांड गुरु पंथ निहारा।
मगसे लगी गुरु दर्शन प्यासा, बनझारा दिल बडा उदासा।।३९।।
कबही नैन दिखे गुरुराये, देखही मेरा जिया हरखाये।।
जबही गुरुको नैन दिखैया, तबही मोहे परमसुख पैया।।४०।।

सद्भाग्यवान जुगलला धन प्राप्त झाले होते पण तो सजाग असल्याने सन्मार्गानेच त्याचा वापर व्हावा यासाठी त्याने आपल्या अंगणांत सदाव्रत मांडले. साधुपुरुष, अतिथी, अभ्यागत, यांचा सत्कार, गोरगरीब भुकेला, आधळ्या, पांगळ्यास भोजन व सर्व प्रकारच्या सेवेचे कार्य होऊ लागले. धन जरी विनासायासं त्याला मिळाले होते पण सत्कृत्यांच्या योगाने ते दिपून जात होते. सत्यमार्ग व दानधर्माकरिताच त्याचा विनियोग होत असल्याने जुगलची कीर्ति सर्वत्र पसरू लागली. परमार्थाच्या पावन व्यवसायात बारा वर्ष केव्हा व्यतीत झाले हे समजलेच नाही. एके दिवशी अचानक त्याला सद्गुरुंची आठवण झाली व त्या स्मृतीत त्याच्या नयनातून अश्रु धारा वाहू लागल्या. विनयाने मनोमन सद्गुरुंची क्षमा मागून तो म्हणू लागला, 'गुरुदेवा, मी किती अभागी आहे. धन प्राप्त करून आपणास विसरूनच गेला. मला क्षमा करा. गुरुदेवा, आपण पतितांना पावन करणारे आहांत. अशा प्रकारे प्रार्थना करून तो तसाच घोड्यावर स्वार होऊन अमदाबादला आला. रस्त्याने येतांना त्याच्या हृदयात गुरु दर्शनाची एकसारखी तळमळ लागली. त्याचे अंत:करण उदास होऊन गेले. केव्हा पीराण्याला पोहोचू आणि सद्गुरुंचे दर्शन करू असे त्यास होऊन गेले. सद्गुरुंना पाहताच आपले हृदय कसे शांत होईल असा मनोमन सुखद विचार तो करू लागला. सद्गुरु आपणास काय म्हणतील? आपण त्यांची स्तुती करून प्रसन्न करून घेऊ. सद्गुरुंना आपण डोळ्यांनी साक्षात पाहू तेव्हाच आपल्या चित्ताला परमसुख प्राप्त होईल. जुगलच्या हृदयात विचारांचे काहूर उठलेहोते. सद्गुरु दर्शनाची अभिलाषा जागृत झाली होती. तो पीराण्यास येऊन पोहोचला.

उरहीमें बडी अभिलाषा, जुगल आये सद्गुरु अवासा।।
कहा हे गुरु इमामशाह मेरा, मोहे गुरु दर्शनका सनेरा।।४१।।
जुगल चहु दिश खोज लगाये, सद्गुरुजीको काहु न पाये।।
बिकल हुई के उचरे बेना, गुरुबीन बहने लगे दो नैना।।४२।।
शाणाजी उनकी गति जानी, सुनो मेरे गुरुके दिलजानी।।
गुरुजी मेरा परदे हो गैया, भितर जायके दरश करैया।।४३।।
जुगल बिकल हुई के धाये, सायाजी यह कैसी लीलाये।।
मोहे अकेला छांड चलैया, तुम बीन जुगल कैसे रहैया।।४४।।

जुगलको संग रखो गुरु देवा, अगली सगाई कहै मुख भेवा॥
कैसे बिसारे अपनो जानी, दिलकी व्यथा सुनो दिलजानी॥४५॥
अब तो मोसे रहा न जावे, गुरुजी मेरा जिया तडपाये॥
अपना अनुजको संग रखैया, सद्‌गुरु मोहे कैसे तजैया॥४६॥
बनझाराकी सुनो गुरु पीरा, तुम बीन कैसे रखु शरीरा॥
मोहे अेक तुम्हारी आशा, सायाजी मत करो निराशा॥४७॥

सद्‌गुरु दर्शनाकरिता आतुरलेला जुगल पीराण्याला आला. त्याचे हृदय सद्‌गुरुंच्या दर्शनासाठी अधीर झाले होते. सद्‌गुरुंच्या आसनाजवळ येऊन पाहतो तो ते आसन रिकामे. त्याच्या हृदयात धस्स झाले. चौफेर हिंडून पाहिले पण सद्‌गुरु त्यास दिसेनात म्हणून मोठमोठ्याने ओरडून तो लोकांना विचारू लागला. 'गुरु इमामशाह कोठे आहेत? मला त्यांचे दर्शन घ्यायचे आहे. त्यांना भेटायचे आहे. कोठे गेले माझे स्वामी महाराज?' असे म्हणता म्हणताच त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहु लागल्या त्याच्या हृदयाची गति जाणून शाणाकाकांनी त्याला जवळ बसविले व गुरुंचा अत्यंत अंतरस्थ भक्त जाणून त्याला समजाविले की गुरुजी तर वैकुंठवासी झाले. तुम्हाला दर्शन करायचे असेल तर आत मध्ये त्यांचे समाधीस्थान आहे. तेथे ते अखंडज्योती स्वरूपाने स्थित आहेत.' जुगल हे ऐकताच अतिशय व्याकुळ झाला. एकदम अधिर होऊन तो समाधीस्थानात गेला. गुरु महाराजांची समाधी पाहताच त्याच्या डोळ्यातून विरहाचे अश्रु वाहू लागले. रडत रडत तो म्हणाला, गुरु महाराज ही आपली कोण्या प्रकारची लीला आहे. मला एकट्याला मागे टाकून आपण निघून गेलात आता मला जिवीत राहण्यात कांहीच तथ्य नाही. मी सुध्दा तुमच्या सोबत येतो. आपण म्हणत होता की तुझ्याशी माझा जुना प्रेमसंबंध आहे. हे स्वामी तर मग आता मला मागे सोडून आपण एकटेच का निघून गेलात. आता माझ्याने येथे राहता येणार नाही. मला येथून घेऊन चला. स्वामीजी मला एक तुमचाच केवळ आसरा आहे. स्वामी मला निराश करू नका.'

दर्शनके हित यहाँ मे आयो, सायाजी क्यों मुख छिपायो॥
निराश मत करो मेरे साई, तुम बीन क्षण एक रहा न जाई॥४८॥
बैठके जुगल बहुरी रोया, रेन अचानक निंदमे सोया॥
आये गुरु जुगल मेरा आया, प्रेमहीसे पुनी कंठ लगाया॥४९॥
जुगल मेरे कैसे नैन बहावे, तेरे बीना मोहे चेन न आवे॥
साच कहु मैने लिन्ह समाधी, तेरी प्रीत हियरा में बांधी॥५०॥

तोसे कबहु रहु न न्यारा, जुगल तुमी हो मुजको प्यारा।।
जुगल अब मत नैन बहैया, तोसे आयके मिल गये सैया।।५१।।
हम तुम दोनो अेक भयेरी, अब तो जुदाई कोन लहेरी।।
जब चाहो तब पाये दिदारा, सुनो जुगल येही बचन हमारा।।५२।।
जाके हिया गुरु पीर बसैया, तासे कबहु न्यारे मत रहैया।।
जुगल मेरे दिलकी जानो, सायाजीकी गति पहिचानो।।५३।।
परमार्थको तोहे दिये आदेशा, कायम राखो परहितको भेखा।।
साधु फकिर गरिबको देखो, ताको साईका रूप ही पेखो।।५४।।
दिन जनो पे रहम करैया, जुगल तासे रीझे मेरे सैया।।
सायाजी तोहे साच कहैया, जुगल अब मत नैन बहैया।।५५।।

'स्वामीजी आपल्या दर्शनाकरिता येथे आलो पण आपण मला येथेच सोडून निघून गेलात.' अधिर झालेला जुगल तेथेच बसून खूप रडू लागला. थोड्यावेळाने त्याच्या हृदयातील भार हलका झाला. तरीपण विरहशोकाने त्याच्या चित्ताला चैन पडत नव्हती. रात्री तो थोडावेळ निद्राधिन झाला. तेवढ्यात सद्गुरु त्याठिकाणी आले व त्याला म्हणाले, 'जुगल, तू आलास!' असे म्हणत सद्गुरुंनी त्याला आपल्या हृदयाशी लावले. 'जुगल तू माझा आहेस तू कां अश्रु ढाळीत आहेस. तुझ्याशिवाय मला सुध्दा चैन पडत नव्हती. परंतु खरी गोष्ट अशी आहे की मी जरी आता समाधी घेतलेली आहे तरी पण तुझ्या प्रीतीला क्षणभर सुध्दां विसरलो नाही. तुला तर मी माझ्या हृदयाशी बांधून ठेवलेले आहे. तुझ्याशिवाय मी वेगळा राहूच शकत नाही. कारण जुगल तू मला अत्यंत प्रीय आहेस. आता तू अश्रु ढाळू नकोस. तुला सद्गुरु येऊन मिळाले आहेत. तू आणि मी वेगळे नाही. आपण दोघ एकचित्त झालो आहोत. वेगळेपणाचा भेद मानू नकोस. जेव्हा माझे दर्शन करण्याची अभिलाषा तुझ्या हृदयात जागेल तेव्हा मी तुला येऊन मिळेल. जुगल, मी तुला सांगतो ज्याच्या हृदयात गुरु पीर अथा महापुरुष व्यापलेला असतो. त्याच्यापासून तो वेगळा कधीच राहात नाही. तू माझ्या हृदयाची गति जाणावी, माझे हृदय तू ओळखायला हवे. मी तुला परमार्थाचा आदेश दिला होता. तो लक्षात घेऊन शेवटच्या घडीपर्यंत तू परहिताच्या कार्यास आपणास वाहून घे. साधु फकिर गरीब भिकारी यांना ईश्वराचे रूप समजून त्यांची मनोभावाने सेवा कर. जुगल आता तू हे विरहाचे अश्रु पुस आणि आपल्या सत्य धर्माला अनुसरून कार्याला सुरुवात कर. आपल्या घरी जा. बनासकाठावर एक धाम निर्माण करून तेथे हे परमार्थाचे कार्य सुरु कर. गरीब नवाज होऊन जनतेत जनार्दनाचे रूप पाहून त्यांच्या सेवा कार्याला वाहून घे. नेकीने व दैवयोगाने तुला जे धन मिळाले आहे त्यायोगे तू सफल कार्यसिध्दी करून घे.

जुगल अपने वतनको जै हो, बनासके तीर देरा लगै हो।।
गरीबनवाज हुईके देखो, साईका रूप सबही मे पेखो।।५६।।
नेकीसे तोहे जो धन पाया, जुगल कर हो सुफल कमाया।।
मेरा जुगल मुजही मे समाये, प्रेमसे गुरुजी हियरा लगाये।।५७।।
खूल गई आखो गुरु लगाये अंगा, पिव मिलनको बरने प्रसंगा।।
धन्य भाग्य तेरा बनझारा, तोसे मिल गये पिवजी पियारा।।५८।।
सायाजी मोहे अपना बनै हो, अंत समै गुरु दर्शन दै हो।।
आज्ञा गुरुकी शिरमें धारे, संग ही संग रहो गुरुजी हमारे।।५९।।
जुगलको अपने हरिपाया, शाणाजीको मंगल गाया।।
धन्य जुगल धन्य प्रेम तिहारा, सायाजीको तुने नैन निहारा।।६०।।

'जुगल, तू माझा आहेस आणि माझ्या हृदयात सामावलेला आहेस.' असे म्हणत गुरुर्जींनीं त्यास अपार प्रेमभावाने हृदयाशी लावले. त्या प्रेमपाशात अटकलेल्या जुगलचे डोळे उघडले. त्याच्या हृदयात आणि रोमरोमात प्रभुमिलनाचा आनंद झगमगाट करीत होता. एके समयी उदास झालेल्या जुगलच्या हृदयात आता आनंदाच्या लहरी उसळत होत्या. प्रात:काळ होण्याच्या आधीच उठून स्वस्थ झाला. प्रसन्न अंत:करणाने शाणाकाका महाराजाजवळ आला आणि रात्री घडलेल्या प्रसंगाचे सद्गुरु मिलनाचे व त्यांने आपल्या हृदयाशी लावून केलेल्या उपदेशाचे वर्णन त्यांना सांगितले. त्याच्या हृदयातला तो हर्ष आणि प्रेमाविष्कार पाहून शाणाजी सुध्दा प्रेमविभोर होऊन गेले. सद्गदीत अंत:करणाने ते म्हणाले, 'जुगल, तुम्ही खरोखर धन्य, भाग्यवान आहात. सद्गुरुंनी प्रत्यक्ष येऊन तुम्हाला प्रेमाने आलिंगन दिले व उपदेश केला. याशिवाय कृपाशिर्वाद देऊन कार्य प्रवृत्त केले याहून आणखी कोणते भाग्य बलवत्तर असू शकेल?' शाणार्जींनी मुक्त हृदयाने त्याचे यश गाईले त्यायोगे जुगलच्या हृदयाला अधिक शांति लाभली. विरहानलाचा दारूण संताप आता पूर्णपणे विलय पावला होता कारण की, सद्गुरुंचे प्रत्यक्ष मिलन झालेले होते. अत्यंत नम्रभावाने गदगदीत कंठाने त्याने सद्गुरुर्जींना याचना केली,'गुरुदेव तुम्ही मलाआपला बनवून घेतले, मला अंतसमयी आपले परमपावन दर्शन द्यावे. आपण करवून दिलेली कर्तव्याची जाणिव मी मनोमन स्विकारली आहे, त्याप्रमाणे या देहात प्राण आहे तोवर मी हे स्विकारीन. फक्त आपण सदैव माझ्या पाठी राहून ते कार्य करवून घ्या हीच माझी विनंती आहे.' अशा रीतीने त्याने गुरुर्जींना आपल्या हृदयातील अंतिम अभिलाषा विदीत केली.

सद्गुरु इमामशाह समाधीस्त झाले तेव्हा त्यांनी आपल्या वंशजापैकी कोणालाही गादीचा अधिकार न देता आपला लाडका परमशिष्य शाणाजीला उत्तराधिकारी केले

ही त्या काळात गुजराथ प्रांतातच काय पण संपूर्ण भारतात गाजलेली अद्‌भूत घटना होती. संपूर्ण संतमंडळीत आणि सांप्रदायीक मजलसीमध्ये त्या अपूर्व घटनेची चर्चा चाललेली असतांनाच हा जुगल बणझाराचा अद्‌भूत पूर्व प्रसंग घडला. त्याला झालेली सद्‌गुरुंची भेट व त्यांच्या मंगलमिलनाचा प्रसंग जाणून शाणाकाकाला अननुभूत आनंद झाला. माझा स्वामी खरोखर प्रत्यक्षपणे या ठिकाणी रमतोआहे असे उद्‌गार शाणाजींच्या मुखातून निघाले. त्यांनी जुगलला धन्यवाद दिला व त्याचे यशोगीत गायन केले. गुरु शाणाजींच्या चरणावर वंदन करून जुगलने त्यांची रजा घेऊन पीराण्याहून प्रयाण केले.

हियरा लगाये तोहे प्रेम प्रसंगा, धन्य सायाजी रखे प्रेमको रंगा॥
शिरनाम चले बनजारा, बनासके तीर आये पियारा॥६१॥
अपनी दोलत परहित खरचैया, जासे रिझे जुगलका सैया॥
जीवनके दिन अैसे बीताये, बनझारा परहित लुभाये॥६२॥
रेनको बैठ अेकान्त आराधे, प्रेम लगन पिवजीसे बांधे॥
बंदगी साईकी निशदिन करैया, कबहु हृदयसे भुले न सैया॥६३॥
बिरध भये जावनकी बेला, गुरूजी कैसे में चलु अकेला॥
हमरी संग रहो गुरू पीरा, कैसे न्यारे रहो गुण गंभीरा ॥६४॥
बनझाराकी सुनी अंतर बानी, सदगुरू आय खडे दिलजानी॥
बनझारा में हुं संग निहारे, कैसे बिकल हुअे हियरा निहारे॥६५॥

'बनसाकाठाला आल्यावर त्याने सदाव्रत जोमाने सुरू केले. पहिल्या पेक्षाही अधिक उत्साहाने त्याने परमार्थ कार्य चालु करून आपली कमावलेली व प्राप्त झालेली दौलत परहिताकरितां वापरण्याचा त्याने निर्धार केला. त्यायोगे त्याचा स्वामी त्याजवर प्रसन्न झाला. राहिलेले सारे आयुष्य त्याने याच कार्यास वाहुन घेतले. दिवसभर तो या परमार्थ विचाराच्या कार्यात मग्न असे तर रात्रभर ईश्वराच्या चिंतनात व आराधनेत मग्न असे. अशा रीतीने भगवंताला व सद्‌गुरूला त्याने प्रेभबंधनाने बांधले होते. त्यांच्या शिवाय तो वेगळा राहूच शकत नव्हता. काळगति बरोबर त्याची वृध्दावस्था झाली व या जगतातुन कायम निघून जाण्याचा त्याचा समय आला तेव्हा त्याने गुरूजींची प्रार्थना केली, 'हे दयानिधी, मी एकटा कसा बरे जाऊ शकेन. माझ्या बरोबर सदैव पाठीशी राहण्याचे वचन आपण दिलेले होते व त्यानुसार आपण राहिलात पण आता या परलोकच्या प्रवासात आपण नाही का माझ्या पाठीशी राहणार?' जुगलची ही आर्त वाणी श्रवन करताच गुरूजी प्रकट झाले आणि म्हणाले,' जुगल, हे बघ मी तुझ्या सोबतच आहे. तरीपण तू एवढा व्याकुळ का होतोस.

भगवान तुझी आठवण करीत आहेत. अगदी हर्षभरीत अंत:करणाने तू त्यांच्या जवळ जा. तू सत्कर्माचा मार्ग स्विकारून खूप चांगली कमाई केलेली आहे, म्हणून तुला पाहून भगवान खरोखर खूषी होतील. आज तुझ्या जीवनातील खरोखरीचा मंगलदिन आहे. भगवंताने तुझी आठवण करून आपल्या अनुजांना तुला सोबत घेऊन येण्यासाठी पाठविलेले आहे. आनंदाने त्यांच्या सोबत जाऊन भगवंताला भेट व त्यांच्यातच सामावला जा. फिरून जन्ममरणाच्या फेऱ्यात तू कधी अडकणारच नाहीस.' सद्गुरुंनी अशा रीतीने त्याला आदेश दिला. जुगल सदगुरूंना शिर नमवून त्वरीत रवाना झाला. परमप्रेमास्पद भगवंताच्या चरणारविंदी पूर्ण विराम प्राप्त करून अंति त्याच्यात अनंत चैतन्य स्वरूपात विलीन झाला.

सायाजीको तोहे याद करैया, हस हस साईसे मिल हो सैया॥
नेकी तुने बहुत कमाया, देखत तोहे रिझे पिवराया॥६६॥
मंगलदिन बुलवा आया, जुगल तोहे बिसरे नही साया॥
अपने पियुको जाय मिलै हो, बहुरी आवागवन नही पै हो॥६७॥
सदगुरु चरणा शिर नाई, जुगल यहाँसे हुवे बिदाई॥
सद्गुरुको बिरद महाना, गुरुकी गति बुझे दिलजाना॥६८॥

सद्गुरुंचा महिमा अगाध आहे. तसेच गुरुची गति कोणी विरलाच जाणू शकतो. सद्गुरु नायाजींनी गुरुचरणी आपले चित्त जोडून आपणास सद्गुरु लीलेचे अपार दर्शन करवून सद्भाग्यवान बनविले.

नायाजीको गुरु लीला बखानी, सद्गुरुके चरणा चित्त ठाणी॥



# २८. भक्त सवदास

सवदास पेटलादसे आये, गुरु चरणोंमें शिर झुकाये।।
स्वामी ता दिन द्रोह करैया, साइको नीके बेन कहैया।।१।।
साईको द्रोह कबहुनही किजे, तासे यारो बहुरी बीजे।।
यहाँसे पहूँचे अपने गामा, दिखे संताप अपने मुकामा।।२।।
बडे पुत्र सोये बिछोना, बहुरी उपाय लगे नही तोना।।
वैद हकीम सबेही हारे, आखिर चल गये पाव पसारे।।३।।
पुत्र मरण हियरा दु:ख पैया, ता पिछे क्या गुजरे ही सैया।।
धनका मद मोहे बहूत सतावे, उर अभिमान मो सम को आवे।।४।।
सो धन छीनमें गये चुराई, देखत धन मद गये बिलाई।।
लगी आग नाराज हुवे धामा, ता दिन साई बिसर गये हामा।।५।।

पेटलादचे खरे नाव पंपावती असे होते. त्या पेटलादहून जात असतांना सद्‌गुरु इमामशाहांचा मुक्काम तेथे झाला. रात्रीच्या वेळी धर्म सभा झाली. त्यात सवदास नावाच्या एका श्रीमंत प्रतिष्ठित सद्‌गृहस्थाने अज्ञानपणाने इमामशाहांची व त्यांच्या प्रचार कार्याची खूप निंदा केली. जातीचे मुसलमान असून एवढ्याशा अल्पवयात लोकांना धर्माचा उपदेश करायला निघाला आहे. त्याला जगाचा काय अनुभव असणार. तो काय सांगेल, वगैरे अशा शब्दात त्याने सद्‌गुरुंची खूपच निर्भत्सना केली. भाविक श्रध्दाळू लोकांनी त्याला समजाविण्याचा प्रयत्न केला. पण व्यर्थ. मदोन्मत्त पणाने त्याने गुरु इमामशाहांच्या शब्दांचा अनादर केला व संत परुषाचा द्रोह केला. त्याचा परिणाम फारच विपरीत झाला.

'संत सताये तीन गये, राज तेज ओर बंश।
तीनो थांभा देखलो, रावण कौरव कंश।।'

संताचा द्रोह करून कोणीच सुखी झाला नाही. सवदासला सुध्दा बऱ्याच उशीराने हे ज्ञान झाले. स्वत: तो खूप अधोगतीला गेला व फटका बसला तेव्हा त्याची शान ठिकाणावर आली. त्याला समजून आले की, त्यादिवशी गुरु इमामशाहांनी मला खूप विनयाने समजाविले होते. पण मी त्यांचे ऐकले नाही. त्याचाच हा परिणाम भोगावा लागत आहे. असे जाणून तो पीराण्यास आला आणि सद्‌गुरुंना वंदन करून विनयाने म्हणाला, 'गुरुदेव, त्या दिवशी मी तुमचा मिथ्या द्रोह केला. तुम्ही मला किती तरी बोध वचनांनी समजाविले कीं, 'सवदास संत पुरुषांचा कधीही द्रोह करू नये. संताशी वागतांना भिऊनच वागावे.' पण मी आपली एक ही गोष्ट

मानली नाही. त्याचा हा परिणाम झाला की मी आपल्या अमृतोपम उपदेशाचा इन्कार करून माझ्या गांवी पेटलादला गेलो. घरी जाऊन पाहतो तो घरी उत्पात माचलेला होता. मोठा मुलगा मृत्यूशय्येवर पडलेला होता. त्याच्यासाठी वैद्य व भगत जमा झाले होते. हकिम वैद्यांचे पण कांही इलाज चालले नाही. सर्वांच्या प्रयत्नांची शर्थ झाली. शेवटी मुलाचे अवसान झाले. त्या दुःखाचा घाला सहन होतो न होतो तोच दुसरी उपाधी येऊन भिडली. मला धनाचा मोठा मद होता. माझ्याजवळ खूप धन होते. म्हणून त्याचा अहंकार माझ्याजवळ कायमचा राहात होता पण दुर्दैवाने तो सुध्दा पार उतरून गेला. माझ्या घरातले सारे धन एका रात्रीत चोरीस गेले. एकाच रात्रीत मी निर्धन झालो. माझा सारा मद-अहंकार पार धुळीस मिळाला. हे सुध्दा दुर्भाग्य कमी पडले की काय म्हणून एके दिवशी घराला अचानक आग लागली आणि सारे घर जळून खाक झाले. ते पाहून माझ्या हृदयाला असा धक्का बसला की ते माझ्या काबूत राहिले नाही.

अविगत कोन गुना हमारा, कैसे कोप करे किरतारा॥
साया याद आपकी आई, ता दिन कछु मोहे समुजाई॥६॥
साईके बेन मैने नही माना, ताथे आफत गिरे हुई हाना॥
समुझ पाई सुमिरे गुरु पीरा, मिल गई शांति गुण गंभीरा॥७॥
सद्‌गुरु मैं आये शरणा, गुरुजी मेरा संकट हरणा॥
अब तो मोहे सुबुध्दि दैहो, ताथे अनर्थ कबहु न कहै हो॥८॥
सवदास सत्कर्म करै हो, दान दया दिलहीमे धरै हो॥
घर आये अभ्यागत पेखो, ताको साईका रूप ही देखो॥९॥
दीनजनोंमें करहु दय्या, ताथे रीझे मेरा साया॥
दीनको घर धंधामे लुभैया, सांज साईको नाम जपैया॥१०॥

जेव्हा संकट येते तेव्हा मनुष्य ईश्वराचे स्मरण करीत असतो. त्याचप्रमाणे मी सुध्दां भगवंताचे स्मरण करूं लागलो. 'हे प्रभु, मी असा कोणता अपराध केला की ज्यायोगे आपण माझ्यावर असे कोपायमान झालात. त्या समयी अचानक आपली आठवण मला झाली आणि मनोमन मी समजून गेलो की त्यादिवशी मी गुरु इमामशाहांचा शब्द मानला नाही. म्हणून आज हा संकटांचा डोंगर आपल्या माझ्यावर तुटून पडला. त्या दिवशी एकांतात बसून मी आपले स्मरण केले. त्यायोगे माझ्या हृदयात शांति प्राप्त झाली. गुरुदेव आता मी आपल्या चरणी आलो आहे. माझे संकट दूर करा. आता तर मला सद्बुध्दि प्राप्त झाली म्हणून अनर्थ करू नये याचे भान मला आले.'

'सवदास, सदैव सत्कर्मे करीत राहावे. सत्कर्मे आपल्या हातून घडत नसतील तरी ठिक पण दुष्कर्म मात्र कदापि करू नये. दान आणि दया यांना सदैव आपल्याहृदयात वास्तव्य द्यावे. अंगणात आलेल्या अभ्यागताला अनादराने वागवू नये. ईश्वरी रूप समजून त्याचा सत्कार करीत जा. त्याचप्रमाणे रंक दिन दु:खी पीडीत लोकावर दया करीत जा. त्यायोगे ईश्वर सदैव प्रसन्न राहातो. दिवसाआपल्या उद्योग धंद्यात मग्न राहा मात्र रात्री शान्त चित्ताने ईश्वराचे स्मरण चिंतन कर. या हरिनामाचा नाते संबंध कधी सोडू नये. सर्व सुखाचे कारण ईश्वराचे नामआहे. त्या सुखसागर श्रीहरीला कधी विसरू नये.' अशा प्रकारे सद्गुरुंनी त्यास निर्मल उपदेश दिला. तो ऐकताच सवदासच्या हृदयातील सर्व क्लेश दूर झाले.

नामसे कबहु न छांडीये नाता, नाम साहिबका सदा सुखदाता।।
सद्गुरु दिये बिमल उपदेशा, सवदासनो मिट्यो क्लेशा।।११।।
जावत उचरे दिल व्यथैया, सायाजी मैं निर्धन हो गैया।।
मेरी पास अब गरथ न रहिया, कैसे दान कर हुं साया।।१२।।
धन मदहीमें धन चुरैया, अब तो ठाले हाथ हो गैया।।
सवदासा मत शोच करैया, तोहे बहुरी धन मिलैया।।१३।।
खेतमे जहा छोटीसी देरी, वहा लगी हे धनकी ढेरी।।
निकटमें खुदवाइके देखो,धन मिले दया दानको पेखो।।१४।।
भली किन्ही इमाम पीराया, सवदासको बहुरी धन पाया।।
दया दान दीनहीको करैया, अभ्यागत नुं आन पोखैया।।१५।।

सद्गुरुंची आज्ञा घेऊन परत जात असता व्यथीत अंत:करणाने सवदास म्हणाला, 'महाराज मी तर आता पूर्ण निर्धन झालो आहे. माझ्याजवळ आता तर एवढे सुध्दा धन नाही की ज्यायोगे मी काही दया दान करू शकेन! धनाचा मद केला आणि आता पूर्ण निर्धन झालो. आता तर खाली हात हलवीत आहे. माझ्या कडून आता काय दीन जनांची सेवा होऊ शकेल बरे?' त्याची ती निराशाजनक वाणी ऐकताच सद्गुरु म्हणाले, 'सवदास हृदय व्यथीत करू नकोस. तुला धन प्राप्त होईल. धीर धर. तुझ्या शेतात जेथे लहान वारूळ आहे तेथे धनाचा मोठा ढिग आहे. त्या वारूळाच्या जवळ खोदल्यास तुला ते धन मिळेल. ते मिळाल्यावर दया आणि दानाचा प्रवाह वाहू दे. अशा रीतीने सद्गुरुंनी त्याला मार्गदर्शन केले. विनयाने झुकून त्याने सद्गुरुंचा निरोप घेतला आणि आपल्या गांवी येऊन सद्गुरुंनी सांगितल्याप्रमाणे धन प्राप्त करून घेतले. एके काळी निर्धन झालेला सवदास पुन्हा धनवान झाला. त्या धनाचा विनियोग त्याने दिन जनांच्या सेवेत आणि संत अभ्यागताच्या सत्कार कार्यात केला.

साधु अतीतका करे सन्मान, सवदास बडे गुणवान॥
गुरुसे लगन दर्शनको जावे, संत चरणमें शिर नमावे॥१६॥
गुरु दर्शन मंगलमय पेखा, गुरुसे अधिक आन नहि देखा॥
सवदास बलिहार जिवैया, साईसे जाको प्रीत करैया॥१७॥

सद्गुरुंच्या समागमाने सवदास आता तर गुणवान झालेला होता. त्याच्या हृदयात सद्गुरु प्रति अनन्य अनुराग जागलेला होता. म्हणून तो सद्गुरु दर्शनास मधून मधून जात असे. संताच्या चरणी शिर नमवून शुभ आशिर्वाद प्राप्त करवून सद्भाग्यवान होत असे. संत सद्गुरु दर्शन मंगलदायक असते त्या शिवाय अन्य काहीच श्रेष्ठ नाही. हे सत्य सवदासला समजून गेले होते. म्हणूनच तर सद्गुरुंच्या आंतरीक प्रेमाचा अनुरागी बनून तो जीवन जगू लागला व अन्य लोक सुध्दा त्याचे मार्गदर्शन घेऊन जीवन यशस्वी जगण्याचा महामंत्र घेऊ लागले. संत नायाजी म्हणतात कीं, तुम्ही पण सदैव संताच्या सान्निध्यात राहा. सद्गुरु आपल्यातून कधीही वेगळा राहात नाही ज्याच्या हृदयात त्यांची स्मृति जागृत असते त्यांच्या जवळच सद्गुरु विराजमान असतात.

नायाजी सदा संत हजुरा, सद्गुरु कबहु रहे न दूरा॥

★ ★ ★

## २९. गायिका मायावती.

मायावती मुरधरकी राणी, बडी सुंदर गायिका बखानी॥
राव जोधाजी ताथे रूठ गैया, मायावतीको परदेश पठैया॥१॥
पालनपुरमें रहे उमंगा, नबाबसे हो गये मन भंगा॥
ता दिन पालनपुरको तजैया, पाटणपुरमें आय रहैया॥२॥
सुबेदारके मन भाया, फिरभी पाटणपूर तजैया॥
आखिर अमदाबादमें आई, गायिका सबके मन भाई॥३॥
ताको देख सबेही लुभाया, कोकिलकंठी गायिका माया॥
महमूदशाह मायाको सुनैया, गायिका देख प्रसन्न हो गैया॥४॥
किन्नरी सचमुच यहाँ आई, अमदाबादमें रहो लुभाई॥
माया हो गई विख्याता, तवायफ दिलमें दुःख पाता॥५॥

गायिका मायावती मारवाड भुमीतील रूपराणी होती. अशा मोहिनीमूर्ति मायावतीवर मारवाड नरेश राव जोधाजी मोहित झाला होता. पण एक प्रसंग असा घडून आला की तो तिच्यावर खूप रागावला व तिला मारवाड देशाची हद्द सोडून जाण्याचा

हुकूम केला. म्लानवदनाने मायावतीने मरू भूमीला अंतिम वंदन करून गुजराथकडे प्रयाण केले. ती पालनपुरला आली परंतु तेथील नबाबाचे रितीरिवाज पाहून तिथे सुध्दा तिचे मन हताश झाले. तेथून सुध्दा मुक्काम हलवून ती आता पाटणला आली. तेथील सुबेदाराने तिचे अनुपम रूप पाहून तिला मान दिला. कांही दिवसानंतर तिने सुबेदाराच्या मनाची मलीनता जाणून तेथून सुध्दा प्रयाण केले. ती शेवटी राजनगर अमदाबादला आली. त्या कोकिलकंठी गायिकेचे आगमन होताच सर्वजण तिच्या मधूर सुस्वर आलापयुक्त गायनाने मंत्रमुग्ध होऊन गेले. सुलतान महंमद बेगडयाने सुध्दा मायावतीच्या किन्नरी आलापाविषयी ऐकले आणि तिला त्याने शाही राजदरबारात बोलाविले. तिच्या गायकी आलापाने सुलतान खरोखरच प्रसन्न झाला आणि राज दरबारातून तिला अमदाबादलाच राहण्याची शाही आज्ञा मिळाली. एवढेच नव्हे तर सुलतानने तिचा शाही सन्मान केला. एके समयी अंध:कारात ठोकरा खाणारी गायिका राजाकडून सन्मानीत होताच ख्यातनाम झाली. हळू हळू तिचा चाहकवर्ग वाढू लागला. तिची ख्याती सर्वत्र होऊ लागली पण तिची ख्याती तिला गिळून टाकण्यास तत्पर झाली. तिच्या हृदयात एक प्रकारची व्यथा ( द्वन्द्व ) जागी झाली.

> ऐसा कुछ करो उपाई, माया यहाँसे जावे बिलाई।।
> हवस अंधे को राहमिलैया, शाहजादाये बाते कहैया।।६।।
> माया घर आये शाह नबीरा, हुस्न देख दिल हुवा अधिरा।।
> हवश देख माया दूर भागे, जाको संगीतसे अनुरागे।।७।।
> आबाखान ताहिपे रूठैया, माया मेरी होके रहैया।।
> मोहे जो इन्कार सुनाये, जिन्दा यहाँ रहने नहि पाये।।८।।
> सुनो में हूं शाह नबीरा, होनहार पतशाह बलबीरा।।
> गायिका हवश नही रहावे, हवश सोही गायिका न रहावे।।९।।
> माया हवशखोर नही मानो, शाहजादा अपने दिल ठानो।।
> याद रखो अबकी बेरा, शिर सलामत रहे न तेरा।।१०।।

मायावतीचे आगमन झाले तेव्हापासून राजनगर अमदाबादच्या गायिकांच्या हृदयात तिच्या विषयी मत्सरभाव जागा झाला. कारण की ती सुलतान शाहच्या मेहेरबानीला पात्र झाली होती व शाही दरबारात सन्मान प्राप्त करून मानीनी झाली होती. म्हणून कोणत्याही उपायाने ती नेस्तनाबूद होईल तर फार बरे होईल असे अन्य गायिका इच्छित होत्या. त्याकरिता त्यांनी एक कट घडवून आणला. त्यानी सुलतान महंमद बेगडयाच्या शाहजाद्याजवळ आपली माणसे पाठवून प्रस्ताव मांडला. ईर्षाळू व द्वेषी आबाखान तत्काळ तयार झाला आणि मायावतीच्या घरी आला. तिचे रूप पाहताच

तो चकित झाला. त्याने मायाला प्राप्त करवून घेण्यासाठी हात लांबविला. जिला केवळ संगिताशीच जिव्हाळा होता ती माया विषारी विषयापासून दूर राहात होती. पण शाहजाद्याला मात्र तीच हवी होती. त्याने तिला साफ सांगून टाकले की, 'मायावती, जर तू माझी होऊन राहशिल तरच या अमदाबादमध्ये सुरक्षित राहू शकशिल, नाही तर माझा विरोध करशिल तर तू कधी जिवंत राहूच शकणार नाही. मी सुलतानाचा मोठा शाहजादा आहे आणि थोड्याच दिवसांनी मी बादशाह होणार आहे. म्हणून या आबाखानला ओळखून त्याचा इन्कार करण्याचे साहस करू नकोस.' अशा रीतीने आपला अंतिम इरादा ऐकवून तो तेथून निघून गेला.

मायाको आखिर सुनाई, आबाखान हुवे बिदाई॥
दिलमे चोट लगी दुःखदाई, किनसे दिलकी कहु सुनाई॥११॥
रोने लगी माया ता दिना, साजिंदा बोले प्रबिना॥
माया काहे नैन बहावे, पीर बडा इमाम कहावे॥१२॥
ताके कदमोमे शिर झुकाई, दिलकी संगी सोही दियो सुनाई॥
मायाको कुछ राही मिलैया, पीर इमामको जाय झुकैया॥१३॥
चरण ग्रहीके नैन बहाये, बेटी तुमी पीदर घर आये॥
किस कारण तुम नैन बहाई, दिलकी व्यथा कही सुनाई॥१४॥
बाबा गायिका बनके आई, अमदाबादमे ठाढी रहाई॥
हवशखोरी मोहे नही भावे, गायिका सोही गायिका रहावे॥१५॥

शाहजादा गेल्यावर मायावती अधिर बनून खूप रडू लागली. कारण ती विषयी वासनेपासून दूर होती आणि आबाखान तर तिला वश करण्यासाठी टपलेला होता. तिच्या रडण्याने तिच्या तैनातीत असलेल्या सेवकाचे हृदय द्रवले. तो म्हणाला, 'मायावती अशा रीतीने नुसत्या रडण्याने कांही वळण्यासारखे नाही. यातून सुटकारा मिळविण्यासाठी कांही तरी उपाय करायलाच हवा. मी सांगतो त्याप्रमाणे जर तू करशिल तर तुझ्या जन्माचे कल्याण होईल. तू पीर इमामशाहांच्या चरणी जा आणि आपल्या हृदयातली सारी व्यथा त्यांना निवेदन कर. ते कांहीतरी मार्ग काढून या संकटातून तुझी सुटका करतील.' दुःखित आणि निराधार झालेल्या मायावतीला मार्गदर्शन मिळाले. ती सरळ पीराण्यास गेली आणि गुरु इमामाशाहांच्या चरणावर झुकून पडली. त्यांचे चरण धरून अनाथ बालकाप्रमाणे स्फुंदून स्फुंदून रडू लागली. तिच्या अश्रुधारांनी सद्गुरुंचे चरण धुतले गेले. तिच्या आक्रंदनाने सद्गुरुंचे हृदय द्रवले. अतिशय वात्सल्याने ते म्हणाले, 'बेटी, तू तुझ्या पित्याच्या घरी आलेली आहेस. तुझे रडण्याचे कारण काय आहे ते खुल्या हृदयाने निवेदन कर. विनाकारण अश्रु ढाळून आत्मक्लेश करून घेऊ नको.' संताने तिला दिलासा दिल्याने थोडी शांत होऊन हळू हळू आपली

हकिकत ती सांगू लागली. 'बाबा, मी एक गायिका मारवाडहून अमदाबादला आलेली आहे. मी राज दरबारी संगीत गायन करते पण विषय भोग विकारापासून दूर राहण्याचा प्रयत्न करते आणि या कारणासाठी मी मारवाडचा त्याग केला. नंतर पालनपूर व पाटणसुध्दा मला याच कारणासाठी सोडावे लागले. राजनगर अमदाबादला आले पण आतां इथे सुध्दां तोच प्रसंग माझ्यावर येऊन गुजरलेला आहे. आता मी कोठे जाऊन राहू. जिथे गेली तिथे इर्षा, द्वेष, मत्सर आणि विषयी किडयांशीच गाठ पडली. भगवंताचा सेवक नेक दिल असा मनुष्य मला दिसलाच नाही. इमानआणि पावित्र्य कसे या जगतातून विदा झाले कीं काय असे वाटते. बाबा, मी इथे कशा रीतीने राहू शकेन. मला कांही तरी उपाय सांगा.'

नेक राह मैने मुरधर तजैया, पालनपूर पाटण दुःख पैया॥
ऐसे ही अमदाबादही जाना, बाबा कहा रह हू दिलजाना॥१६॥
जहाँ देखा वहाँ हवश अंधे, काहु न दिखे साईके बंदे॥
नेकी यहाँसे गई बिलाई, कैसे यहाँ रहु पाक पीराई॥१७॥
आबाखान शाह नबीरा, मोसे रूठ गये येही पीरा॥
हवशखोरीमें नाही रहावु, कैसे अमदाबादमें रहावु॥१८॥
माया मेरी नाही बनै हो, सचमूच तेरा खून करै हो॥
सोही शयतानको मैने पिछाना, शयतानकी सोबत बेगामा॥१९॥
पीर इमामका नाम सुनैया, ताथे चरणोमें आय लुभैया॥
कुछ भी रहम करो पीराई, रहबर मोहे राह दिखाई॥२०॥

'आबाखान खुदपसंद असा शाहजादा आहे. तो माझ्यावर रागावलेला आहे. मला बदफैली करायची नाही तर मग मला अमदाबादला कसे बरे राहता येईल? त्याने मला तर साफ सांगुन टाकले आहे कीं तूं जर मला वश झाली नाही तर तुझा खून होईल. तो सैतान आहे हे मी बरोबर ओळखले आहे. अशा मनुष्याची संगत करणे खरोखर गुन्हा आहे. मी तर अगदी हताश झाली होती पण माझ्या एका विश्वासु साथीदाराने मला आपला रस्ता दाखविला म्हणून आपल्या चरणी आलेली आहे. बाबा माझ्यावर कांही तरी दया करा आणि मला मार्ग दाखवा. मी कोठे जाऊ? आपण सांगाल तर येथून सुध्दा निघून जाईन. फिरून कोणाला तोंड सुध्दा दाखविणार नाही!'

'बेटी, तू कां म्हणून आपल्या हृदयात एवढी भीति बाळगत आहेस? त्या विषयांध शाहजाद्याचा त्याच्याच हातून विनाश होईल. परमकृपाळू परमात्म्याची लीला अतर्क्य आहे. क्षणभर धीर धर म्हणजे तुला त्या विषयांध नरपशूची काय दशा

होते ती दिसेल. अमदाबादचा त्याग करून तुला कोठे जावेच लागणार नाही. तू सुखाने इथेच राहू शकशिल. जी व्यक्ति या पापबुध्दिपासून दूर राहते ती पवित्र हृदयाची व्यक्ति पीराच्या हृदयात जाऊन बसते. तिला दुसरीकडे कोठे जाण्याची गरजच पडत नाही. आता तुला कोणत्याही राक्षसी सैतानापासून त्रास होणार नाही.'

सद्गुरुंची ही अभय वाणी श्रवण करताच मायावती हर्षवेडी झाली. अत्यानंदाने तिने आणखी सद्गुरु चरणावर झुकून प्रणाम केला आणि म्हणाली, 'बाबा, आज मी सनाथ झाली. माझा पिता आज मला मिळाला, मला सर्वकाही मिळाले.' असे म्हणत तिने प्रेमाश्रुंनी सद्गुरुंचे चरण धुतले. त्या निर्मळ हृदयाच्या गायिकेला सद्गुरुंनी बरोबर ओळखले व ते तिला अपार वात्सल्याने म्हणाले, -

साई कहो यहाँसे चलैया, बेर कबहु नहि मुख दिखैया॥
बेटी कैसे दिल डर पावै, हवशखोर सोहि आपे बिलावे॥२१॥
देखो करामत पाक खुदाकी, क्या गति होवतही ताकी॥
अमदाबादमे रहो सुखदाई, दुःख तेराही सबे बिलाई॥२२॥
हवशखोरीसे दूर रहावे, सोही पीराणाके मन भावे॥
हवशखोर तोहे नहि सतावे, हवश तेरी पास भी न आवे॥२३॥
साई के निके बेन सुनैया, माया उठकर लागही पैया॥
आज मोहे पिदर मिलैया, मायाको सब कुछ पैया॥२४॥
बिकल हुईके नीर बहैया, सद्गुरुके चरण भिजैया॥
गायिका सोही गायिका रहावे, पाक दामन पीरा पिछनाये॥२५॥

'माया बेटी! आता तुला रडायला नको. तुला येथे दुःख मिळणार नाही. खुद्द बादशाहाच तुझी काळजी घेईल आणि ईर्षा, द्वेष, मत्सर, विषय हे सर्व तुझ्यापासून दूर होतील. म्हणून तू निर्भय होऊन आता तुझ्या निवासस्थानी जा आणि हृदयातले सारेच दुःख विसरून जा.' सद्गुरुंनी तिला दृढ आश्वासन दिले म्हणून ती शांत झाली. सद्गुरुंचा निरोप घेऊन ती आपल्या निवासस्थानी परत आली.

माया बेटी अब मत रोवे, तोहे दुःख यहाँ नही होवे॥
पतशाह खबरीया लेवे तिहारी, हवशखोरी तोसे रहे न्यारी॥२६॥
निर्भय हुई के धाम चलै हो, दिलका दुःख सबेही भूल जई हो॥
माया साईको शिर झुकाई, निर्भय हुई अपने घर आई॥२७॥
आबाखान फिर नही आया, कुछ दिनमें ताका प्राण बिलाया॥
हवशखोर हवश में सोया, हवशखोरीसे नाम बिगोया॥२८॥

मायावतीका हाल बुझैया, पतशाह अपने महल बुलैया।।
दिलका घाव दिये सुनाई, आबा तोसे क्यों रुठे रहाई।।२९।।
हवशखोरी ताके मन भावे, गायिका हुं मोहे हवश न भावे।।
आबा ता दिन मोसे रूठैया, तोहे मारूंगा कहके चली गैया।।३०।।

सद्गुरु इमामशाहांनी सांगितले होते त्याप्रमाणे मायावतीच्या घरी आबाखानचे फिरून आगमन झालेच नाही. तिची भीति कायमचीच मिटून गेली, कारण की थोड्याच दिवसात त्याच्याविषयी वासनेने त्याचे भक्षण करून टाकले. त्याचा देहांत झाला. त्याने मायावतीला छळल्याबद्दलची वार्ता सुलतानच्या कानावर गेली तेव्हा त्याने तिला आपल्या महालात बोलावून घेतले आणि तिला विचारले की, 'आबाखान तुझ्या येथे आला होता, त्याने तुला काय सांगितले?' मायावतीने घडलेली सर्व हकिकत सांगितली की, 'आबाखान माझ्यावर रागावला होता. तो विषयी होता आणि त्यासाठीच तो मला वश करू इच्छित होता. मला ते मान्य झाले नाही. कारण तशाप्रकारच्या जिण्यात कांही स्वास्थ्य नाही असे मला वाटते म्हणून मी इन्कार केला तर त्याने मला खूनाची धमकी देऊन तो निघून गेला.' 'मायावती, आता तो आबाखान या जगात राहिला नाही तो कायमचाच या जगातून निघून गेला. आतां तू सदैव निर्भयतेने राहू शकशिल. कोणी कोणीही त्रास देणार नाही आणि जो कोणी तुझ्यावर वाईट दृष्टीने नजर फिरविल त्याचे शिर सुरक्षित राहणार नाही.' अशा प्रकारे दृढ आश्वासन देऊन सुलतानने मायावतीची मुक्त कंठाने प्रशंसा केली की, 'तुझ्यासारखी इमानी गायिका पाहून मला खूप आनंद झाला. मायावती हे अमदाबाद तुझे आहे म्हणून तू इथेच सुखाने रहा.' सुलतानने तिला निर्भय बनवून अमदाबादला वास्तव्य करण्यास निर्भय केले. या पाठीमागे सद्गुरु इमामशाहांची मोठी दया होती. त्यांच्यामुळेच सुलतानने मायावतीला निर्भय केले.

आबा अब यहाँ न रहैया, माया नेक हुई के रहैया।।
हवशखोर तोहे कोई सतावे, शिर सलामत ताको न रहावे।।३१।।
बडी तारीफ शाहको किया, बहुत खुश तोहे देखके हुवा।।
माया अमदाबाद है तेरा, ताथे कबहु न छांडे सनेरा।।३२।।
रहम पीर इमामकी जाना, ताये शाहको माया बखाना।।
मायाको गुरु पीरको पेखा, जायके पीरका दिदारा देखा।।३३।।
अमदाबाद रहे सुखदाई, माया गुरुचरणे लुभाई।।
साई चरण लगनी रही ताकी, अब तो कछु रहे नही बाकी।।३४।।

अेकदिन आय गुरु को धाये, बाबा दिल बखान हुं साये॥
चाहु गुरुचरण सुखधामा, बाबा मोहे दैहो विश्रामा॥३५॥

मायावतीने गुरुमहाराजांना बरोबर ओळखले होते. म्हणून तिने पीराण्यास जाऊन त्यांचे दर्शन घेतले. ती अमदाबादला सुखपूर्वक राहू लागली. तिचे सर्वच मनोरथ सिध्द झाले. केवळ एकच आशा अपूर्ण होती. एके दिवशी सद्गुरुंच्या चरणाजवळ बसून तिने आपली ती इच्छा व्यक्त करतांना म्हटले, 'बाबा, आता आपल्या कृपेने मी पूर्ण सुखी आहे. आता मला दुसरे तिसरे काहीही नको. केवळ आपल्या चरणी विश्राम द्यावा, हीच केवळ एक अभिलाषा आहे. माझ्यावर कृपा करून हा एकच आशिर्वाद द्यावा.' अशा रीतीने तिने सद्गुरुजवळ जणू अंतिम इच्छाच व्यक्त केली. ती ऐकताच सद्गुरु महाराज जणू कंपू लागले आणि म्हणाले, 'बेटी माया, तू हे काय मागितलेस. दुसरे कांहीही माग पण हे असले कांही मागू नको.' सद्गुरुंनी तिचा निर्णय बदलण्याचा खूप प्रयत्न केला पण माया आपल्याच इच्छेवर अडग राहिली. तिला तेच हवे होते. ती म्हणाली, 'बाबा, मला तर हेच हवे आहे. दुसरी कोणतीच इच्छा नाही.' सद्गुरु मौन झाले. मायाने पाहिले तो त्यांच्या नेत्रातून जलधारा वहात होत्या. ते पाहून तिचे सुध्दां हृदय द्रवले. ती म्हणाली, 'बाबा तुमच्या डोळ्यात अश्रु कां? वाटलं तर माझा इन्कार करा पण तुम्हाला दुःखीत बनवून मला काहीही प्राप्त करायचे नाही.'

बेटी अस कहा बेन उचारा, ओर ही मंग लीयो दिलदारा॥
बाबा मोहे न आन चहैया, दिल चाहे सोही मंग लैया॥३६॥
ता दिन मौन हो गये साई, दिखे सायाजी नैन बहाई॥
बाबा काहे नैन बहैया, चाहे मोहे इन्कार सुनैया॥३७॥
बेटी मंगे सोही तोहे दिया, मंगनी साई कबूल कर लिया॥
ता दिन गुरु चरण ग्रहैया, बाबा मैने साई पिछनैया॥३८॥
मायाको गुरु दियो बिदाई, चरण कमलमे रह हुं समाई॥
साईको शिरपे हाथ रखैया, माया छीनही मे चली गैया॥३९॥
साईके चरण लगे अनुरागा, माया हो गई बडी सुभागा॥
नायाजी सोही दिलजानी, सद्गुरु चरणा दिल ठानी॥४०॥

'माया बेटी, तू जे मागितलेस ते तुला मिळाले. तुझी मागणी सद्गुरुंनी कबुल केलेली आहे. सद्गुरुंचे चरण पकडून माया म्हणाली 'बाबा, मी आपणास यथार्थतेने ओळखले म्हणूनच आपल्या पावन चरणकमळाशी आले. आता या आपल्या अल्लड लेकीला निरोप द्या. मी आपल्या या पावन चरणातच समावणार आहे.' असे दिनवाणीने

म्हणत तिने सद्गुरु चरणावर मस्तक ठेवले. सद्गुरुंनी तिच्या शिरकमलावर आपला वरदहस्त ठेवला. त्याच क्षणी तिचे प्राणपाखरू तिच्या देहाचा पिंजरा सोडून प्रभुच्या देशात उडून गेले. सद्गुरुंच्या चरणावर तिचा अनन्य अनुराग होता. ती माया खरोखरच महाभाग्यशाली होती म्हणून सद्गुरु चरणावर तिने पूर्णविराम घेतला.

संत नायाजी महाराज सांगतात, 'अनन्य अनुरागी प्रेमिका ज्याप्रमाणे आपल्या प्रेमास्पदाशी तादात्म्य पावते तद्वत महाभाग्यवान माया सद्गुरु चरणावर अनुरक्त होऊन त्या चरणकमळाशी तादात्म्य पावली पूर्ण विराम पावली. धन्य सद्गुरुंचे परमअनुरागी सद्भक्त!'

★ ★ ★

## ३०. बन्नासिंह हाडा.

हाडा बन्नासिंह बलिहारा, साईको देख हुई पतिहारा॥
बाबा हमरे मुकाम सिधारो, रांक देख दया दिल धारो॥१॥
बिमल हिया हाडाकी बानी, कैसे इन्कार करे गुरु ज्ञानी॥
प्रेमसे पिया हाडा घर आये, हाल देख सांया दुःख पावे॥२॥
बडे गरीब ओर दिल अमीरा, देखतही रीझे गुरु पीरा॥
बुंदीसे यहा आप लुभैया, साया चितोडमें फस गैया॥३॥
चहुआणीसे लग गई आखा, राशमति दिन रेन हि झांखा॥
साई लगनमें प्रेमकी फासी, चितोडमे हम तो सुखराशी॥४॥
जगे भाग्य मिले साई दिदारा, दिन मेरा हो गये उजियारा॥
मों पे रहम कर हो पीराई, साई चरणोमे रह हुं लुभाई॥५॥

सद्गुरु इमामशाह महाराज पावन पर्यटन करीत असता चितोडगडला गेले. त्यासमयी बन्ना नावाच्या एका राजपुताने त्यांची यथार्थतेने जाणिव केली आणि त्याने त्यांना आपल्या निवासस्थानी येण्याविषयी खूप आग्रह केला. त्याचा विनय व आग्रह पाहून सद्गुरु त्याच्या घरी गेले. तो अत्यंत गरीब होता. बुंदीहून त्याचे आगमन झाले होते. चितोडला आल्यावर चहुआणि राशमतिवर त्याचा अनुराग झाला व तिच्याबरोबर तो चितोडचाच रहिवाशी झाला. परिस्थितीने तो निर्धन होता पण हृदयाचा अमिर होता. दैव योगाने त्याला सद्गुरुंचे दर्शन घडले आणि त्या भाग्यशाली माणसाने त्यांना आपल्या घरी नेले. यथाशक्ति त्यांचा सत्कार केल्यावर दिनवाणीने तो म्हणाला, 'बाबा माझ्यावर अशी दया करा की माझे हृदय सदैव आपल्या चरणी लीन राहावे. मी आपलाच होऊन राहीन अशी मजवर कृपा करा.'

निर्धनियाको देख दुःख पैया, साईको रेन सुपना दिखेया॥
तिसरे दिन गुरु मांगे बिदाई, झुके दम्पत्ति नैन बहाई॥६॥
ता दिन सदगुरु रहम कराई, तुमपे रिझेरी पाक पीराई॥
घर पिछे आमली गुलजारा, वहा हे पाच चरू निरधारा॥७॥
तिनो तुम्हारे भाग निहारे, रेन खुदावाइके लिजीयो पियारे॥
दान दया अरू जिक्र करैया, तासे तुमपे रिझेरी सैया॥८॥
दोनो साईके चरण झुकैया, शुभाशिष तबही दिये सैया॥
सायाजी जब जावन लागै, हाडा धाय पहूँचे आगे॥९॥
साया दिल दर्शनका प्यासी, कैसे आन मिलो अविनाशी॥
बेर मिलावा कही होवे, देखे बिना मेरा जियरा बिगोवे॥१०॥

गरीब भक्ताचे हृदय अमीर होते. आग्रह करून त्याने सद्‌गुरुंना आपल्या निवासस्थानी उतारा दिलाआणि त्यांचा यथाशक्ति आतिथ्य सत्कार केला. सद्‌गुरु त्याठिकाणी अगदी निःसंकोचपणे राहिले. रात्रीच्या वेळी सद्‌गुरुंना स्वप्नात जाणिव झाली की बन्नाच्या वाड्यात असलेल्या चिंचेच्या झाडाखाली धनाने भरलेले पाच चरू गाडलेले आहेत. त्यातील तीन चरू हाडाच्या नशिबात आहेत. तिसऱ्या दिवशी सद्‌गुरु त्याच्या घरून परत जाण्यास निघाले तेव्हा उभय दंपति त्यांच्या चरणावर शिर नमवून दीनतेने अश्रु ढाळू लागली. संताने त्यांना दिलासा देवून सांगितले की, 'बाळांनो, उदास होऊ नका, तुमची सांपत्तिक स्थिती जरी चांगली नसली तरी हृदयात अपार प्रेम आहे हे मी जाणतो. प्रेमाची अमीरी तुमच्याजवळ आहे. तुमच्या सेवेने मला खरोखर अपार आनंद झाला. तुमच्या वाड्यात चिंचेच्या वृक्षाखाली पाच चरू आहेत. त्यातील तीन चरू तुमच्या नशिबाचे आहेत. त्यातील तीन चरू रात्रीचे समयी काढून घ्या आणि दान, दया व भगवंताची भक्ति करा. या योगे भगवंताची तुमच्यावर कृपा होईल.' असे सांगून सद्‌गुरु जाण्याकरितां निघाले. बन्नाला कांही तरी स्मरण झाले म्हणून तो त्यांच्या मागून पळत गेला आणि सद्‌गुरुंना क्षणभर उभे राहण्याकरितां विनवून म्हणाला, 'बाबा, आपले पुनर्मिलन केव्हा होईल! आपल्या दर्शनाशिवाय माझे हृदय तडपेल. मला परत केव्हा मिळाल? केव्हा मला आपल्या दर्शनाचे सौख्य मिळेल?'

दिलमें जगे दर्शनकी प्यासा, अमदाबाद आइयो सुखराशा॥
धाम पीराणा तोहे मिलै हो, शाहका वहा दिदारा पै हो॥११॥
बेर हाडाको किये प्रणामा, हुवे बिदाई साहिब सुखधामा॥
तीन दिन सायाको रखैया, हाडाको तीन चरू पैया॥१२॥

गरीब नवाज घर आये, बन्नाके सब दु:ख बिलाये।।
बंझाके घर पलना झुलैया, राशमतीको पुत्रही पैया।।१३।।
सुखसागर सद्गुरुको देखा, सुभागी जीयरा साईको पेखा।।
अभागीको गृह लगे अकारा, जाके भावी सदैव दु:खारा।।१४।।
आनंदमे दिन होत पसारा, तीन पुत्र खेले घर बारा।।
साईकी बानी सचही होई, साहिबको पेखलिये सोई।।१५।।

"बेटा बन्ना, जेव्हा तुझ्या हृदयात दर्शनाची अभिलाषा दृढ होईल तेव्हा अमदाबादला या. पीराण्यास तुम्हाला सद्गुरुंचे दर्शन होईल.' सद्गुरुंनी खुलासा केला. हाडाने सद्गुरुंना फिरून एकदा प्रणाम केला. सद्गुरुंनी त्याचा निरोप घेऊन प्रयाण केले. तीन दिवस त्याने सद्गुरु इमामशाह महाराजांना अतिथी म्हणून ठेवून घेतले व मनोभावे सेवा केली. त्याला धनाचे तीन चरू मिळाले. अशा रीतीने गरीबनवाज त्याच्या घरी आले आणि त्याचे सारेच दु:ख दूर झाले. त्याच्या घरात संतती नव्हती, सद्गुरुंच्या कृपाशिर्वादाने त्याच्या घरात पाळणा झुलु लागला. रासमतीला पुत्र प्राप्त झाला. सद्भाग्यवान दंपत्तीने सद्गुरुला ओळखले होते. त्यांची सेवा करून त्यांनी सर्वच मिळविले व त्यांचे भाग्य जागी झाले. त्यांना तीन मुले झाली. घरात आनंदी आनंद झाला. गुरुंची वाणी सत्य झाली. हाडाने या पावन पुरुषाला पूर्णपणे ओळखले होते.

बारा बरस सुखरूप बितैया, दान दया अरू नाम जपैया।।
बारा बरसना पुत्र हो गैया, हाडाको सोही कहने लगैया।।१६।।
साईकी कृपासे हुवा जन्म हमारा, सोही साईका चाहु दिदारा।।
अपने पुत्रकी सुनते बाते, हाडा दिल गुरु यादही ठानी।।१७।।
अब तो गुरुका दर्शन किजे, दुर्लभ लहावा आनही लीजे।।
परिवार संग किये प्रयाणा, चितोडसे आये गुणवाना।।१८।।
अमदाबादसे आये पीराणा, साई चरणा झुके निरबाना।।
चरण ग्रहीके नेत्र बहैया, ता दिन पेखलिये गुरु सैया।।१९।।
चितोडमें जेही हाडा मिलैया, सोही प्यारे मोहे आन मिलैया।।
कर ग्रही साइको हिया लगाया, बन्नासिंह तोहे आन ही पाया।।२०।।

बारा वर्षे सुखपूर्वक व्यतीत झाले. या कालावधीत हाडाने दान, दया आणि नामस्मरण भक्ति करीत करीत दुर्लभ आनंद प्राप्त केला. घरात मुलगा बारा वर्षाचा झाला. तो म्हणायला लागला की 'ज्या महापुरुषाच्या कृपाशिर्वादाने आमचा जन्म झाला त्या पवित्र महात्म्याच्या दर्शनाकरिता आपण गेले पाहिजे.' पुत्र मुखातील

ही वाणी श्रवण करताच बन्नाच्या हृदयात सद्‌गुरु दर्शनाची आठवण जागी झाली. तो आपल्या सर्व परिवारास घेऊन चितोडगडहून अमदाबादला आला. तेथून पीराण्यास येऊन सद्‌गुरुचरणावर झुकून पडला. त्या समयी हाडाच्या नयनातून प्रेमाश्रु वाहू लागले. त्याच्याकडे पाहिल्यावर सद्‌गुरुंना स्मरण झाले की चितोडगडला ज्याच्या घरी तीन दिवस आपण मुक्काम केला व तन मन धनाने ज्याने आपली सेवा केली होती तोच हा बन्नासिंह हाडा आहे. सद्‌गुरुंनी त्याला हृदयाशी लावले व त्याच्या शिरावर वरदहस्त फिरवून म्हणाले, 'बन्ना, तुला पुन्हा दर्शनाचा योग घडून आला.' बन्नासिंह गहीवरून म्हणाला, 'बाबा, आपल्या पवित्र दर्शनाचा फिरून योग आला. आमचे अहोभाग्य उदयास आले.' 'बन्नासिंह जो निरीच्छ बुध्दिने खरोखर गुरुवर प्रेम करतो तो खरोखरच गुरुचा होऊन जातो. यात किंचीतही संशय नाही.' राशमतीने शिर गुरुचरणावर ठेऊन ज्यांच्या कृपाशिर्वादाने संतति झाली ती तीनही मुलं गुरु चरणी वाहिली.

> गुरुको चहे सोही गुरुका होई, तामे संशय रखो मत कोई॥
> राशमतीको शिर झुकाया, गुरुकी दयासे जिन्हे पुत्रही पाया॥२१॥
> बडे पुत्र गरुचरण झुकैया, उनको याद दिलाई सैया॥
> जंभासिंहको याद सताये, ताथे गुरुजी हम मिलनेही आये॥२२॥
> जंभा मेरा बने दिलदारा, साच कहुं सोही साईको प्यारा॥
> जंभाको गुरु गोद बिठाये, बडी ममतासे हियरा लगाये॥२३॥
> बन्ना कहे गुरु पुत्र तुम्हारा, शरणागतका तुम्ही रखवाला॥
> मेरा सोही मेराही रहावे, जंभा मोसे नही रहे जुदाये॥२४॥
> बन्ना कहे सद्‌गुरु दिलजानी, दिलकी बाते कहु बखानी॥
> आन मिलावा कबही होवे, यादही में जियरा बिगोवे॥२५॥

बन्नासिंहाचा मोठा मुलगा उभा राहिला. त्याच्याच हृदयात सद्‌गुरुदर्शनाची स्मृति जागृत झाली होती. आणि त्यानेच सद्‌गुरु दर्शनाची अभिलाषा व्यक्त केली होती. त्या जंभासिंहाने सद्‌गुरुंच्या चरणावर आपले मस्तक अर्पण केले. संताने त्याला उचलले आणि आपल्या मांडीवर घेतले व हृदयाशी लावले. 'बाबा, हा तुमचाच पुत्र आहे. शरणागताचे रक्षण करणारे तुम्ही आहांत!' बन्नासिंह म्हणाला सद्‌गुरुंनी त्याला सांगितले, 'बन्नासिंह, जो माझा आहे तो माझाच होऊन राहतो. जंभा माझा आहे तो माझ्याहून वेगळा राहूच शकणार नाही.' सद्‌गुरुंनी भावी काळाकडे लक्ष देवून जणू भविष्यच वर्तविले. तदनंतर बन्नासिंहाने दुसऱ्याच गोष्टीचा प्रस्ताव सद्‌गुरुंपुढे मांडला. 'बाबा, फिरून आपले मिलन आणखी केव्हा होईल?' त्याचा हा प्रश्न ऐकताच सद्‌गुरु अवाक् बनले. भावी काळाचे दृश्य त्यांच्या मनःचक्षुसमोर तरारले. ते फक्त एवढेच म्हणाले -

बन्ना दिलकी गति पहिचानो, अब तो यहाँसे चले दिलजानो।।
रजपूता सोही रणमें सोवे, आन मिलावा कबहु न होवे।।२६।।
तीन साल है तुमारी पासा, नेकी बंदगी कीजो सुखराशा।।
बन्ना तेरी सुफल कमाई, सद्‌गुरुकी तोहे करूणा पाई।।२७।।
अब तो साइको सुमिरन किजे, दिल चाहे सो ल्हावा लिजे।।
बिधीयनको जेही लेख लखैया, होनहार सोही होवैया।।२८।।
रजपूता क्यों दिलमें डरैया, दिल सफासे सुमिरहो सैया।।
सद्‌गुरुचरणा शिर झुकाई, हाडा वहाँसे हुआ बिदाई।।२९।।
चितोडगडमें पहूँच आई, बन्ना किये भक्ति सवाई।।
सद्‌गुरु जेही मुख भाख्या, तीन साल पिछे सोही दाखा।।३०।।

'बन्नासिंह, हृदयाची गति ओळखून घे. होणारे भावि कोणी समजून घेऊ नये, पण तू विचारल्यावरून तुला जागृति देण्याकरिता फक्त सांगतो की राजपूत रणपूत असतात. ते रणात झुकतात त्याप्रमाणे तुझी सुध्दा रणांगणांत विरगति होईल.' म्हणून फिरून भेट होणे शक्य नाही पण तरी सुध्दा तुझ्याजवळ अजून तीन वर्षाचा अवधी आहे. या कालावधीत नेकी आणि भक्ति साध्य करून घे. हेच सुखदायक आहे. बन्नासिंह, तुझी जन्माची कमाई सफळ आहे. कारण की तू सद्‌गुरुंची करूणा प्राप्त करण्यात भाग्यशाली झालास. आता तर भगवंताचे स्मरण करून दुर्लभ संधी प्राप्त करून घे. विधीने जो लेख लिहिलेला आहे त्यात कोणीही परिवर्तन करू शकत नाही.' सद्‌गुरुंचे हे वचन श्रवण करताच बन्नासिंहाचे मन उदास झाले. हृदय थरथर कापू लागले. त्या समयी सद्‌गुरुंनी त्यास आश्वासन देऊन सांगितले कीं, रजपूत, तू भितोस का? दिल साफ करून भगवंताची भक्ति कर. त्यायोगे तुझ्या हृदयात खरी शांति प्राप्त होईल.' संताने त्यास अंतिम शब्दात समजावले तेव्हा त्यास खरी शांति प्राप्त झाली. तो सद्‌गुरुंच्या चरणावर झुकून पडला त्याच्याबरोबर त्याची पत्नि व मुले पण सद्‌गुरु चरणी लागले व भावपूर्ण हृदयाने त्यांनी परत जाण्यास सद्‌गुरुंची परवानगी मागितली. सद्‌गुरुंनी अभय वरदान देऊन त्यांना रवाना केले. मजल दरमजल करीत ते चितोडगडला येऊन पोहोचले. आपल्या निवासस्थानी आल्यावर त्यांनी दुप्पट जोमाने व अनन्य प्रेमाने भक्ति सुरु केली. समय आल्यावर सद्‌गुरुंनी भाकित केल्याप्रमाणे बन्नासिंह विरगतीस पावला.

युध्दमे बन्ना होवे बिदाई, मुगलओर मेवाडी टकराई।।
रजपूता को खेल रणजंगा, रण मेदानमें सोये उमंगा।।३१।।

मोगलशाह आणि मेवाड यांच्यामध्ये युध्द माजले. त्यात बन्नासिंह युध्दात गेला आणि लढता लढता विरगतीस पावला. हाडा बन्नासिंहाने सद्गुरुंच्या करूणेने सर्व कांही प्राप्त करून घेतले. ज्याच्यावर सद्गुरुंची कृपा होत असते. त्यांचे सारे मनोरथ पूर्ण होत असतात. त्याचप्रमाणे बन्नासिंह हाडाने आपले जीवन धन्य बनविले.

हाडाको सब कुछ ही पाया, नायाजी सद्गुरु सुखदाया॥३२॥

★ ★ ★

## ३१. जंभासिंह हाडा.

जंभासिंह हुवा रणबंका, बहुरी युध्द खेले निःशंका॥
अेक दिना ही युध्दमें मरणा, कल जायगे सद्गुरुका शरणा॥१॥
याद गुरुकी दिलमे सताये, जंभाको कदी चेन न पाये॥
चितोडहीसे पीराणा आये, सद्गुरु चरणमे शिर झुकाये॥२॥
जंभा मेरा तुमी आ गैया, साई तोहे याद करैया॥
साई दिलकी गति हुई घेरी, रेन दिन लगी सुरता मेरी॥३॥
फिर तो आये साईके धामा, आज मोहे मिले सुखधामा॥
कैसे कहहुं जंभा बखानी, साईके हिया याद रही ठानी॥४॥
जंभा बडी आफत शिर तेरे, शिर सलामत नही तेरे॥
साई हिया जगे दुःख तेरे, याद किये री सांज सवेरे॥५॥

बन्नासिंह हाडा निपुत्रिक होता. त्याच्या घरी चहुआणी राशमणी ही सती सन्नारी होती. पण पुत्र संतान नसल्यामुळे ती झुरत होती. सद्गुरुंनी तिच्या हृदयाची गति जाणली आणि तिला तीन पुत्र होतील असा आशिर्वाद दिला. त्या तिघामधील वडिलपुत्र जंभासिंह होता. त्यालाच सद्गुरुंनी आपल्या मांडीवर बसवून हृदयाशी लावले व म्हणाले होते, 'जो माझा आहे तो माझाच होऊन राहिल.' हा जंभासिंह अनेक वेळा युध्दावर जाऊन तलवारीचे खेळ खेळून आला होता. एकदा त्याच्या चित्तात विचार आला की, 'युध्दात एखाद्या दिवशी तर मरणास शरण जावेच लागेल तर मग सद्गुरुंच्या चरणी केव्हा शरण जाणे होईल.' हृदयात अशा रीतीने सद्गुरुंची स्मृति जागृत झाली व तो व्याकूळ झाला. त्वरेने तो चितोडगडहून निघून पिराण्यास आला व दीनेतेने-नम्रतेने सद्गुरुचरणावर झुकून पडला.त्या समयी त्याला पाहताच सदगुरु म्हणाले, 'जंभा तू माझा आहेस म्हणून तुझी आठवण सतत माझ्या हृदयात सलत होती. रात्रंदिवस साईचे डोळे तुझ्याकडे लागले होते. आता तू सद्गुरुंच्या

धामावर आलेला आहेसच म्हणून मला आनंद झाला पण हा आनंद फक्त तुझ्या भेटीचा आहे. 'बेटा जंभा कोणत्या मुखाने तुला सांगू! तुझ्यावर खूप मोठे संकट ओढवणार आहे. त्यांत तू शिर सलामत राहशिल किंवा नाही याची शंका आहे. ही घटना जाणून साईचे हृदय बेचैन झाले व रात्रंदिवस सारखी तुझी आठवण केली. लोखंड लोहचुंबकाकडे आकर्षिले जाते. त्याप्रमाणे तू आज येथे आकर्षिला गेलास हे फार चांगले झाले.

जंभा तुमी यहाँ चली आये, बला तेरी गई बिलाये।।
मरू चाहे गुजरात रहैयो, चितोडमें कबहु नही जैहो।।६।।
यहाँसे जावन दिल नाही चहैया, कायम सद्गुरु मेरा रहैया।।
यहाँ ही रहो जंभा तुमी मेरा, तोसे लग रहे हियरा मेरा।।७।।
जंभा रहे सद्गुरुके धामा, गुरु सेवा करे निष्कामा।।
सोच लिये गुरु अंतर्यामी, जंभा दिखे बडा सुभागी।।८।।
अेक दिन आय ठाढे गुरुचरणा, साया बुझे मेरा कब मरणा।।
मरनेसे क्यों डरे रजपूता, मरना हे तो रहो मजबूता।।९।।
सायाजी मोहे डर कुछ नाही, कबतक यहाँ में ठाढे रहाही।।
जंभा यहाँ रहो खट मासा, फिर होंगे गुरु चरणमें बासा।।१०।।

जंभा तू येथे निघून आलास हे फार चांगले झाले, नाही तर तुझ्यावर राजद्रोहाचा आक्षेप आला असता. त्यायोगे तुझी नाहक बदनामी होऊन वाईट तऱ्हेचे हाल अपेष्टेचे मरण आले असते. तुझे ते संकट आता दूर झाले आहे. आता तुला जर वाटले तर गुजरात मध्ये राहा अथवा मारवाडमध्ये राहा पण चितोडगढला मात्र जाऊ नकोस.' 'बाबा माझे मन तर येथून दूर जायला तयार नाही. वाटते गुरु महाराजांच्या धामावर राहून सेवा करून येथेच विश्राम घ्यावा.' 'जंभा तुझ्या हृदयात जर असे वाटत असेल तर आनंदाने गुरु चरणाजळ राहून खरी शांति प्राप्त करून घे.' सद्गुरुंनी त्याला संमति दिल्याने तो निश्चिंत झाला व सद्गुरुंच्या धामावर आनंदाने राहू लागला. तन, मन, धनाने सद्गुरुंची अनन्य निष्ठेने सेवा करू लागला. अंतर्ज्ञानी सद्गुरुंनी त्याची भाग्यरेषा जाणली होती. त्या भाग्यशाली जिवात्म्यावर त्यांचे अपार प्रेम होते. त्याच्या सेवेने सद्गुरु महाराज प्रसन्न होते. एकेदिवशी जंभासिंह गुरुचरणाजळ आला आणि विनयाने म्हणाला, 'गुरुदेव, माझे मरण केव्हा होईल.' 'अरे, राजपूत असून तू मरणाला का भितोस, मनुष्य मरणधर्मा असल्याने केव्हाही त्याला मरण हे येणारच. फक्त मन खंबीर ठेवावे.' 'बाबा, मला मरणाची बिलकुल भिती नाही. फक्त जाणून घेण्याकरिताच मी तुम्हाला हे विचारले, भिती म्हणून नाही.' 'जंभा, ऐक

तर तुझी ऐकण्याची तयारी आहे. म्हणून सांगतो, आजपासून सहा महिनेपर्यंत तू या भुमीवर राहू शकशिल. तदनंतर सद्गुरुचरणी तू विश्राम घेशील.' सद्गुरुंनी त्वरेने त्याच्या मनातील संशय दूर केला. आपले निश्चित भवितव्य जाणून घेऊन जंभा आता दुप्पट जोमाने काम करू लागला.

साहिब मेरा बडा सुभागा, तासे गुरु चरणमें लागा॥
सद्गुरु जेही बानी भाखा, सोही होनी होकर राखा॥११॥
खटमास छीनमें बीतैया, जंभा बडे सावध हो गैया॥
भोरही साई चरणमे आया, झुक गये परम सुख पाया॥१२॥
साहिब मोहे दैहो बिदाई, जंभा यहाँसे चहे बिदाई॥
मोहे साई मिलनकी आसा, सद्गुरु चरण किया मैने बासा॥१३॥
साई चरणसे दूर न रहैया, आखिर साईका चरण छु वैया॥
सायाजी चरणोमे रखैया, साईको छांड कहा अब जैया॥१४॥
सद्गुरुका चरण ग्रहैया, जंभा लगे साहिबको पैया॥
बडे सुभागी चरणनमे सोया, देखतही गुरु नैना रोया॥१५॥

'गुरुदेव, मी खरोखरच सद्भागी आहे म्हणूनच आपल्या चरणावर माझा अनन्य अनुराग आहे.'सद्गुरुंनी जी वाणी उच्चारली अक्षरश: तीच खरी ठरली. त्यांच्या कथनाप्रमाणेच घटना घडून आली. 'मी आपला आहे म्हणून आपल्याच चरणाजवळ येऊन राहिलो आहे. याहून आणखी कोणते श्रेष्ठ भाग्य असू शकेल.' अतिशय उल्हसीत अंत:करणाने जंभाने आपल्या भाग्याचे यश गायीले. ते ऐकून सद्गुरुंच्या हृदयात सुध्दा खूप आनंद झाला. जंभासिंह खरोखर भाग्यशाली होता. सहा महिन्यांचा कालावधी घडी पळातच संपला. जंभासिंह मात्र पुरेपूर सावध होता. वेळेचे भान त्याने बरोबर ठेवले होते. त्या दिवशी सकाळी स्नान वगैरे सर्व विधी आटोपून सद्गुरुंना प्रणाम करण्यास त्यांच्या चरणाजवळ गेला. अतिशय नम्रतेने प्रणाम करून तो म्हणाला, 'बाबा, आता मला निरोप द्यावा. मला येथून प्रयाण करायचे आहे. सद्गुरु स्वामींना मिळण्याची आशा आहे. सद्गुरुंच्या चरणकमळी मी निवास केलेला आहे. मी आपल्या चरणाहून वेगळा राहिलो नाही आणि अंतिसुध्दा आपल्याच चरणावर राहणार आहे.' असे म्हणून त्याने सदगुरुंचे चरण घट्ट धरले आणि म्हणाला, 'गुरुदेव, मला आपल्या चरणी राखा. आपल्या चरणांचा त्याग करून मी अन्यत्र कोठेही जाणार नाही.' असे म्हणत त्याने सद्गुरुचरणावर विश्राम केला व अखंड शांति प्राप्त करवून घेतली. सद्गुरु चरणांचा परम अनुरागी जंभा सिंहाने आपल्या सद्गुरुंच्या चरणारविंदावर खरोखरच पूर्ण विराम प्राप्त केला. त्याची ती अवस्था पाहून सद्गुरुंच्या नेत्रामधून जलधारा वाहू लागल्या. निर्मोही संताच्या नेत्रामधून अस्खलीत अश्रुमेघ स्त्रवू लागले.

जंभा मेरा मुजहीमें समाया, मेरा था सो मोहे पाया॥
साईका होवे सोही साईको पावे, नायाजी सद्‌गुरुका रहावे॥१६॥

'जंभासिंह, तू माझा होतास आणि शेवटी माझ्यातच सामावला गेलास. मला ज्याची जरूरत होती तो मलाच येऊन मिळाला. सद्‌गुरु इमामशाहांच्या मुखामधून अपार वात्सल्यवाणी श्रवण करून संत नायाकाका म्हणाले, 'अहाहा, सदगुरुनाथ धन्य होय आपले वात्सल्य! जे सद्‌गुरुंचे आहेत तेच सद्‌गुरुंना प्राप्त करवून घेतात. म्हणून आपण ही सद्‌गुरुंचे दासानुदास बनून राहावे.

★ ★ ★

## ३२. सेजलदे.

सेजलदे नटपूर बासी, वणिक ललना सुखराशी॥
यौवन रंग भरे अंग सुगंधा, हसीना देख जिन्नत बंधा॥१॥
पगली घरमें मचावे हाहाकारे, आधी रेन करे चित्कारे॥
सोये लोग सबेही जागे, देखत कोई चले नही आगे॥२॥
सेजलदेकी गति शयतानि, बहुरी आय थके दिलजानी॥
जंतर मंतर भगत अरू भूवा, देख सबे हेरान हुवा॥३॥
सेजलदेकी सुंदर काया, उत्पातमें आखिर कुमळाया॥
काहुको इलम नही चाले, सेजलदेका हुवा बुरा हाले॥४॥
कोऊ कहे अमदाबाद जैहो, पीराणामे साईको झुकै हो॥
सोही साई हे जिन्दा पीरा, सब दुःख तासे भागे दुरा॥५॥

नटपूर नडियादला एक वणिक कन्या सेजलदे अत्यंत स्वरूप सुंदरी होती. तिच्या अंगप्रत्यंगात सौंदर्य आणि सौगंध भरलेला होता. कस्तुरीकूपीप्रमाणे तिच्या अंगाच्या महकणाऱ्या सुगंधाने एक अतृप्त जिवात्मा (प्रेतात्मा) तिच्यावर मुग्ध झाला व त्याने तिच्या शरीरात प्रवेश करून उपद्रव करू लागला. प्रेतात्म्याच्या झपाटण्याने वेडी झालेली सेजलदे घरात उत्पात करू लागली. त्यायोगे घरात हाहाःकार होऊ लागला. ती घरात कोणालाच सुखाने झोपू देत नव्हती. तिच्या उत्पाताने सर्व जण त्रासले. तिच्याजवळ जाण्याची कोणाला हिंमत सुध्दा होत नव्हती. मोठ मोठे मांत्रिक भगत येऊन तिच्यावर इलाज करू लागले पण काही उपयोग होत नव्हता. सर्वजण हताश होऊन परत गेले. कोणाचीही विद्या तिच्यावर असर करीत नव्हती. एका समयीची जी परिसुरत होती त्या सेजलदेचे हाल फार वाईट झाले. कोणी तरी तिच्या घरच्या

लोकांना सल्ला दिली की तुम्ही तिला अमदाबादला घेऊन जा. तेथे पीराण्यास जाऊन सद्गुरु इमामशाहांच्या दरबारात तिला घेऊन जा व त्यांच्या चरणावर तिला वाहा. ते सर्व दु:खितांचे दु:ख दूर करतात अशी त्यांची ख्याती आहे. ते जरूर तुमचे दु:ख दूर करतील.

माता पिताको मन बिचारा, अैसे वलीका करहु दिदारा ॥
पीराणामे आपही आये, पीर इमामको शिर झुकाये ॥६॥
दूर खडी सेजलदे निहारे, यहाँ नही काम शेतान तिहारे ॥
काफिर यहाँसे दूर हो जैहो, आखिर तोहे आग जरै हो ॥७॥
साईके बेन सुनही अभागा, काफिरकेम लडकीसे लागा ॥
तामे बिगाड क्या किया तुम्हारा, कैसे रूठ गये साई हमारा ॥८॥
हिंदु मुस्लीमका यहाँ नही भेदा, यहाँ तो सबहि ठाढे अभेदा ॥
काफिर ओर को काफिर भाखे, अपनी जातको नेकही दाखे ॥९॥
यहाँसे दूर हठो बैगाने, बहुत पछतै हो नादाने ॥
जबलग साई कहे समुझाई, तबलग यहाँ तेरी चतुराई ॥१०॥

सेजलदेच्या माता पित्याने विचार केला की आपण जर आपल्या कन्येला त्या महान वली (महापुरुषा) कडे नेले तर आपल्यालाही त्यांचे दर्शन होईल व आपल्या कन्येचेही काम होईल. असा विचार करून ते पीराण्यास आले आणि सद्गुरु इमामशाहांच्या चरणावर नम्रतेने त्यांनी शिर झुकविले. त्या समयी सेजलदे दूर उभी राहून त्यांची गम्मत पहात होती. तिच्याकडे पाहताच सद्गुरु समजून गेले व आवेशाने म्हणाले, 'काफिर, येथे तुझे काम नाही म्हणून येथून दूर निघून जा. नाहीतर तुला अग्नीमध्ये टाकण्यात येईल. सद्गुरु महाराजांची ही आवेशयुक्त वाणी ऐकताच सेजलदेच्या अंगात प्रवेश केलेल्या जिन्नताने वाणी उच्चारली की, 'बाबा मी काफिरच्या मुलीच्या शरीरात प्रवेश करून राहतो आहे त्यात आपले काय जाते. मी तुमचा तर काहीच अपराध केलेला नाही असे असून मला एवढी शिक्षा का म्हणून देता? आपला माझ्यावर एवढा रोष कां?' जिन्नताने अशा रीतीने सद्गुरुला प्रश्न केला तेव्हा इमामशाह म्हणाले, येथे हिंदु मुसलमान असा कांहीच भेद नाही. येथे तर सर्वच अभेद होऊन येतात आणि मिळून मिसळून राहतात. जो स्वत: काफिर असतो तो दुसऱ्यास काफिर म्हणून ओळखतो आणि स्वत:च्या जातीला मोठा इमानदार समजतो. जोपर्यंत तुला समजावून सांगतो तो पर्यंत मानून घे. तू तुझी चतुराई हुशारी दाखविण्याचा प्रयत्न करशिल तर साई तुझ्यावर रूष्ट होतील आणि त्यांच्यापुढे मग कोणाचाही जोर चालणार नाही व नाहक अश्रु ढाळावे लागतील.' अशा रीतीने

सद्गुरुंनी त्यास समजाविण्याचा खूप प्रयत्न केला पण सैतानाने त्यांचे वचन ऐकले नाही शेवटी सद्गुरु त्याची ही बेअदबी पाहून रूष्ठ झाले.

रूठ गये साई किसका नही होवे, ता दिन शयताना नैनाभर रोवे।।
फिर शयतानको किये मनाई, ताथे कोपे पाक पिराई।।११।।
श्रीफळ उनके शिरपे झाके, फूट गये जल निकसे नीके।।
ताथे कापन लगे शेताना, जिन्नत कहे मैने पीर पहिचाना।।१२।।
अब तो मेरा मिट गये गुमाना, साई रहम रखो दिलजाना।।
पाक खुदाको जहा बनाई, तामे किस मुख पेखो जुदाई।।१३।।
हिंदु कहा इस्लाम बखाना, यार केसे बनो बेईमाना।।
अेक खुदाके दो फरजंदा, तासे कुफ्र करे क्यों बंदा।।१४।।
क्यामत साईको सबही अेका, ता दिनको कुछ बुझो बिवेका।।
साई नेकी बाते सुनाई, ताथे दिल कुछ नेकी बसाई।।१५।।

सदगुरु इमामशाहांनी एक नारळ हातात घेतला आणि जोराने सेजलदेच्या कपाळावर फेकला. नारळ फुटला व त्यातील पवित्र जल तिच्या अंगावर पडताच सैतान जिन्नत थरथर कापू लागला. तो म्हणाला, 'आज मला पवित्र महापुरुषाचे खरोखर दर्शन घडले. आता माझ्या मनात जो गर्व होता-अहंकार होता तो दूर झाला. स्वामी माझ्यावर दया करा.' त्याची दिनता पाहून सद्गुरु म्हणाले, 'जिन्नत ही दुनिया तर पवित्र अशा भगवंताने बनविलेली आहे ना! त्यात तू कोणत्या तोंडातून द्वैताची भाषा बोलत आहेत. हिंदु असो वा मुसलमान दोघही एकाच बापाची संताने वेगवेगळ्या जातीची कशी बरे होऊ शकतील? त्यांच्यात भेद पाडून तू त्यांना वेगवेगळे मानत आहेस. कुफ्र समजत आहेस प्रलयाच्या वेळेस भगवंताच्या दरबारात सर्वच जण एकाच रांगेत उभे राहतील. त्या समयी कोणी लहान मोठा राहणार नाही. कोणी हिंदु मुसलमान राहू शकणार नाही. बाबारे त्या दिवसाची आठवण ठेऊन थोडा तरी विचार करायला शिक आणि परमपवित्र भगवंताचे स्मरण ठेव.' सद्गुरु इमामशाहांचे हे शब्द श्रवण करताच जिन्नतच्या हृदयात एकदम सत्यमार्गाचा प्रकाश पडला. तो एकदम शांत झाला व म्हणाला -

अब तो बदीसे कबहु न लागे, माफी मागता हुं साहिब आगे।।
हुवा चमत्कार जिन्नत भगैया, सेजलदे धरणी मे ढळैया।।१६।।
जळ छांटे शुध्दिमे आई, साईको देखके शिर झुकाई।।
सायाजी मोहे शयतान डरावे, आपको देख मुवा डर पावे।।१७।।

भाग गये सोही बेर न आवे, बाबा मुझपे रहम करवाये॥
बेटी गया सो बेर न आवे, शयतान यहाँ देखन नही पावे॥१८॥
निर्भय हुइके सदा रहैया, अब तोहे न शेतान सतैया॥
साई ईमामकी आन जहाँ आवे, तहाँ कबहु शेतान न आवे॥१९॥
सेजलदे हुई हुल्लासी, साहिब तुमी हो सदा सुखराशी॥
मेरी खबरीया रखीयो साया, चरणकमलमें शिर झुकाया॥२०॥

'बाबा, आता मी अशा दुष्कर्मापासून हमेशा दूर राहिन. मी आपणाजवळ माझ्या अपराधाची क्षमा मागतो.' असे म्हणून तो दीनतेने सद्गुरुंच्या चरणावर झुकून पडला आणि शांत झाला. तेथे एक तेजोवलय निर्माण झाले व विलय पावले. जिन्नत तेथून विलय पावला सेजलदे बेभान झाली व जमिनीवर ढळून पडली. सद्गुरुंनी तिच्या अंगावर थंडगार पाणी शिंपडून तिला शुध्दिवर आणले. समोर सद्गुरु महाराजांना पाहताच तिने विनयाने प्रणाम केला आणि म्हणाली, 'बाबा, हा सैतान मला खूप त्रास देत होता. भिववीत होता. पण आपणास पाहताच तो भिऊन पळून गेला. तो भितीने थरथर कापत होता. मला त्याच्यापासून खूप भिती वाटते. मला भितीमुक्त करा.' 'बेटी, तू भिऊ नको. तो आता परत तुझ्या वाटेला मुळीच येणार नाही. आता तू निर्भय होऊन राहा. तुला तो आता कधीच सतविणार नाही.' सद्गुरुंची ही दृढवाणी श्रवण करून सेजलदेचे हृदय उल्हसीत झाले. ती म्हणाली, 'बाबा आपण तर सदा सुखदातारआहांत. माझ्यावर कृपादृष्टी करून माझा सांभाळ करावा.' असे म्हणून तिने त्यांच्या चरणावर माथा ठेवला. सद्गुरुंनी शुभाशिर्वाद देऊन तिला म्हटले. 'बेटी, आता तुला काहीच त्रास होणार नाही. तू सदैव निर्भयतेने राहा, सुखी हो.' अशाप्रकारे अभय वरदान देऊन संताने तिला निर्भय केले. हर्षभरीत झालेल्या तिच्या माता पित्याने सद्गुरुला वंदन करून निरोप घेतला व ते आपल्या नटपूर नडियादला परत आले. सुखासमाधानाने जीवन कंठू लागले. संत नायाजी म्हणतात सद्गुरुंच्या चरणी शरण गेल्यावर सर्व उपाधी मिटतात आणि सर्व प्रकारच्या सुखांची प्राप्ति होते.

बेटी तोहे कछु नही होवे, तोहे देख शयतानहि रोवे॥
मातापिता अति हरखाये, सद्गुरुको बहुरी शिरनाये॥२१॥
नटपूर पहूँचे आनंदा, बनियाके घर हुवा सुखकंदा॥
सद्गुरु चरण मिटे सब फंदा, नायाजी लहे सुख अखंडा॥२२॥






योगी निरंजननाथ व संत इमामशाहांचा वार्तालाप.

# ३३. काळदूतांशी संवाद

कहो गुरुजी कछु अमृतवाणी, पीरजी मुख बोले गुरु ज्ञानी।।
सद्गुरु संग बैठे मध रेना, ता दिन आय कालकी सेना।।१।।
अति भयानक दिखे बिहाना, देखतही दिल हो गई हाना।।
आये अझल फिरस्ता दाना, कैसे आवन हुवे गुणवाना।।२।।

एकदा गंगासिंह आपल्या गुरुजीजवळ - संत नायाजीजवळ बसून सत्संग-वार्तालाप करीत होता. गंगासिहांनी गुरुलीलेविषयी अभिलाषा व्यक्त केली तेव्हा सद्गुरु नायाजी म्हणाले 'एकदा सद्गुरु इमामशाहांच्या संगतीत पीराण्यास बसलेलो होतो. मध्यरात्रीचा समय होता. अचानक लखख उजेड पडून त्या उजेडातून काळदूत प्रगट होऊन उभे राहिले. या दैवी फिरस्त्यांना पाहून खरोखर हृदय कंपायमानच होत होते असे त्यांचे भयानक स्वरूप होते. सद्गुरुंनी त्यांचा आदरभाव करून हळूच येण्याचे कारण विचारले. तेव्हा त्यांनी शांत चित्ताने सांगितले -

सायाजी तुमी रहमे समंदर, मरते जीवको बखानत सुंदर।।
सजीवन काहे करत हो साया, चेतावन यहा हम आया।।३।।
परहित काहे लुभाई रहैया, मरत जीवकी छांडो बैया।।
औसा ढंग मत छांडे पीराना, चाहे यहाँसे चलू दिलजाना।।४।।

हे सायाजी, तुम्ही तर दयेचे सागरआहात म्हणून मेलेल्या जीवात्म्याला सुध्दा सजीवन करून उठवून बसविण्याचा व्यवसाय मांडून बसलेले आहांत. ही कार्यवाही बंद करा. तुम्हास या बाबतीत सुचविण्याकरीताच आमचे आगमन झालेले आहे. तुम्ही तर दुसऱ्यांच्या कल्याणात दिल लावून बसलेले आहांत, परंतु आमचे तुम्हाला असे सांगणे आहे की ह्या मृत जीवात्म्यास त्यांच्या कर्मगतीवर सोडून द्या आणि तुम्ही ज्याप्रमाणे शांतीने बसलेला आहात तसेच निर्लीप्त होऊन रहा.

सद्गुरु इमामशाह म्हणाले, 'हे देवदूत, हो तुम्ही जे म्हणतात ते कदाचित खरे असेल पण माझ्याने तसे होऊ शकेल असे नाही. पीर आपली पीराई (परपीडा हरण करण्याचे व्रत) सोडण्यास कधीही तयार नाही. वाटलं तर हे जगत सोडून जाण्याचा आदेश मिळाला तर तो स्विकारण्यास मी अगदी आनंदाने तयार आहे. पण पीराईचा त्याग करू शकणार नाही.'

जबतक यहा रहै पीराना, तबलग दीनोंकी पीर बखाना।।
अपनो जान उबारही सोई , कैसे तजे पीराना पीराई।।५।।
आपही अपना कर्म बखानो, हम ही ठाढे रहे दिलजानो।।
नेक नाम इन्सान कहैया, ठाढे पीराना पीर बुझैया।।६।।

'जोपर्यंत आम्ही या धरतीवर राहात आहोत तोपर्यंत दीनजनांचे दुःख दूर करण्यास तत्पर राहू. अशा दुःखितास स्वतःचा जाणून त्याचे रक्षण करण्याची जबाबदारी आमच्या शिरावर आहे. पीर परहितासाठी जन्माला येतात. ते परपीडा मिटविण्याकरिता आपल्या योगशक्तीचा कधीच त्याग करू शकत नाही. ज्याप्रमाणे तुम्ही तुमचे कार्य करीत आहात त्याप्रमाणे आम्हाला आमचे कार्य करू द्या. जोपर्यंत या धरतीवर राहायचे आहे तोपर्यंत दुःखिताचे दुःख दूर करण्याचे पवित्र कार्य मी सोडू शकत नाही.' सद्गुरु ईमामशाहांनी स्पष्ट शब्दांत समजावून दिले. काळदूत पूर्णपणे त्याचा आशय समजून गेले. अत्यंत आनंदाने ते म्हणाले, -

पीराना सोही पीर बुझे, और को यही राह न सुझे।।
पीर इमाम तुम नेकी बखानो, झुके फरिस्ता चले दिलजानो।।७।।
सुनो गंगा यही नैन दिखैया, पीर इमामका जलवा पेखैया।।
जहां में आयके परहित पेखो, औरनकी पीर आपमें देखो।।८।।

पीरजी, तुम्हाला हा सत्याचा मार्ग दिसत आहे म्हणून तुम्ही दुसऱ्यांच्या दुःखाने पीडीत होत आहात. कित्येकांना तर हा मार्ग सुध्दा दिसत नाही. कारण की ते स्वःच्या स्वार्थासाठीच जीवन जगतात. तुम्ही सत्याचे उपासक आहात तर सदैव याच पवित्र मार्गाने वागा.' असे म्हणून झुकून काळदूत विलय पावले.

गंगाजी हा प्रसंग तर गुरुजींच्या संगतीत बसून या डोळ्यांनी आम्ही न्याहाळीला आहे. त्याच दिवशी सद्गुरु पीरांच्या पीराइचे भान मला झाले व समजून आले की दुनियेत आलेलो आहे तर परदुःख जाणून घ्यावे. दुसऱ्यांचे दुःख आपले जाणून त्यांच्या दुःखात सहभागी व्हावे.

दया राखवी दिलसु जाणी, पवित्र दिले रहेवू निर्धार।।
परदुःख जाणीने पाछे रहु, सते चालवू दिवसने रात।।१।।
मरणा मरणा सब जग मरे, साचा मरे ना कोई।।
गुरुज्ञाने वेध्या जे मरे, तेणे फरी मरण ना होय।।२।।

# यमगीता.

श्रीविष्णु पुराणात यमगीता नावाच्या तिसऱ्या अंशाच्या सातव्या अध्यायात यमराज आपल्या दूतांना संबोधून उपदेश करीत असतांना प्रभुच्या भक्तांची महानता आणि त्यांचा महिमा समजावितांना सांगतात की, -

> हरिममरवराचिंताङ्घ्रि पद्मं
> प्रमति यः परमार्थ हि मर्त्यः॥
> तमपगतसमस्त पापबन्धं
> व्रज परिहृत्य यथाग्निमाज्यसिक्तम्॥

वि. पुराण ३/७/१८

एकदा देवा गांवी सद्‌गुरु इमामशाह महाराज आपला परम सेवक हाजरबेगसह मुक्कामास असतांना परमवंदनीय नायाकाका महाराज, भक्तिमति कीकीबाई यांच्या समवेत सतसंग करीत असलेल्या महान योगी भाभाराम महाराज यांनी सद्‌गुरु इमामशाह महाराजांना विचारले की, 'हे महामुने, सातही द्विप, सप्तपाताळ आणि सप्त उर्ध्वलोक ही ब्रह्मांडातील सर्वस्थाने सूक्ष्म, सूक्ष्मतर, सूक्ष्मातिसूक्ष्म तसेच स्थूल आणि स्थूलतर जीवात्म्यांनी भरलेली आहेत. एकबोटाचा आठवा भाग सुध्दा असा रिकामा नाही की जिथे कर्मबंधाने बांधलेले जीव राहू शकत नसतील, तरी सुध्दा हे स्वामीन् आयुष्याच्या समाप्तीनंतर हे सर्व यमराजांच्या स्वाधीन होऊन जातात. म्हणून हे नाथ, आपण मला ती कर्मे सांगा कीं जी केल्याने मनुष्य यमराजाच्या वशिभूत होऊ शकणार नाही.'

सद्‌गुरु इमामशाह महाराज म्हणाले, 'हे योगीवर भाभाराम, तुला मी यम आणि त्यांच्या दूतांचा या बाबतीत जो संवाद झाला तो अत्यंत गुढ रहस्यमय संवाद सांगतो तो ऐक.'

आपल्या अनुचरांच्या हातात पाश घेतलेला पाहून यमराजांनी त्यांच्या कानात सांगितले, कीं, 'हे पार्षदांनो भगवान मधुसुदनाचा जो शरणागत असेल अशा व्यक्तींना सोडून द्यावे. कारण की जो विष्णुभक्त नाही अशाच अन्य पुरुषांचा मी स्वामी आहे. देवांना पूज्य अशा विधात्याने मला यम नावाने लोकांच्या पापपुण्याचा विचार करण्याकरितां नियुक्त केले आहे. मी आपले गुरु श्रीहरीच्या वशिभूत आहे, स्वतंत्र नाही. भगवान विष्णु माझेही नियंत्रण करण्यास समर्थ आहे. जे भगवंताच्या चरण कमलांचे परमार्थ बुध्दिने वंदन करतात ते घृताहूतीने प्रज्वलीत अग्नीसमान तेजस्वी, समस्त पाप-बंधनांनी मुक्त जाणून तशा पुरुषाला तुम्ही दुरुनच सोडून निघून जावे.'

यमराजांचे असे वचन ऐकून हातात पाश घेतलेल्या दूतांनी विचारले कीं, 'हे प्रभो, भगवान श्रीहरीचा भक्त कसा असतो ते तुम्ही आम्हाला सांगावे.'

श्लोक : कलिकलुषमलेन यस्यनात्मा विमल मतेर्मलिनीकृतस्तमेनम् ।।
मनसि कृतजनार्दनं मनुष्यं सततमवेहि हरेरतीव भक्तम् ।।

वि. पु. ३/७/२१

## ★ पद ★

यमराजा कहे निज दूतने, तमे सांभळोने मारी वात ।।
हरिचरणमां जे रह्या, अेथी दूर रहेजो भली भात ।।टेक ।।
सर्व जीवोनो स्वामी हुं छुं, प्रभु भक्तो परिहतकार ।।
भक्त जनोनी उपरे, यमराजनो नही अधिकार ।।१।।
गुरुस्वरूप आधीन रहुं, विभुथी सदा आधीन ।।
शिक्षा सर्वने हुं करूं, विभु मुजने दंडे ता दिन ।।२।।
सुवर्ण अेक अेना घाट अनेक, विभु अेक पण दिशे अनेक ।।
देव दानव मनुज पशु, सहु आखरे थई जशे अेक ।।३।।
मुनिवरो जेना चरणनी, निशदिन करता सेप ।।
आत्मा सर्वनो अेक छे, कही वंदना करे ततखेव ।।४।।
हरिपदने जे ओळखे, अेनी करी लेजो ओळखाण ।।
अग्निज्वाळा सम पेखीने, सदा अळगा रहेजो निरवाण ।।५।।
यमराये संभळावीयो, रूडो भक्तजननो महिमाय ।।
सुणता सहु थंभीगयो, यमना दूतो त्यांय ।।६।।
प्रभु भक्ति महान छे, प्रभु भक्त अधिक महान ।।
भणे इमामशाह भाभाराम सुणो, हरिभक्त हरीना दिलजान ।।७।।

जो पुरुष आपल्या वर्णधर्माशी एकनिष्ठ राहून विचलीत होत नाही, आपले सुहृद व विपक्षीयांचे प्रति समान भाव ठेवितो. बलात्काराने कोणाचेही धन हरण करीत नाही. आणि कोण्याही प्राण्याची हिंसा करीत नाही, त्या निर्मलचित्त व्यक्तीस भगवान विष्णुचा भक्त जाणावा. ज्या निर्मलमति व्यक्तीचे चित्त कलिमलाने मलीन होत नाही, आणि ज्याने आपल्या हृदयात निरंतर श्री जनार्दनास बसविले आहे, त्या मनुष्यास भगवंताच्या अतीवभक्त जाणावा. जो एकान्तात जरी दुसऱ्याचे पडलेले सोने पाहून आपल्या बुध्दिद्वारा तृणासमान मानतो आणि निरंतर भगवंतांचे अनन्य भावाने चिंतन करतो त्या नरश्रेष्ठास विष्णुचा भक्त जाणावा.

श्लोक : कनकमपि रहस्यवेक्ष्य बुध्दया तृणमिव य: समवैति वै परस्वम्॥
भवतिच भगवत्यनन्यचेता: पुरुषवरं तमवेहि विष्णु भक्तम्॥
वि. पु. ३/७/२२

## ★ पद ★

मुनिवर मोंघा मूलना, हरीथी सदा हजूर॥
निजिया धर्म निभावता, समदर्शी शील भरपूर॥टेक॥
राग द्वेष उरमा नही, विमळ जेना मन॥
कलिमल कदी व्यापे नही, अेवा भक्तोजन पावन॥१॥
निर्जनस्थाने धन पड्यु, अेनी उरमा करे नही आश॥
निरुपाधी थई हरीमा रमे, अेने कहिये हरीना दास॥२॥
स्फटीकमणी सम निर्मळ, अविगत रूप अविनाश॥
चन्द्रकिरण शितल सदा, हरी भक्त हरीना दास॥३॥
मद मत्सर भर्या मानवी, राग द्रेषादि उर प्रज्वळाय॥
अेवाथी भक्ति बने नही, हरी भक्त नही कहेवाय॥४॥
अंत:करण जेना शुध्द छे, शान्त पवित्र वहेवार॥
प्राणिमात्रने प्रिय गणे, जेनी वाणी मधूर सुविचार॥५॥
निराभिमान माया रहित, असत्यथी रहे सदा दूर॥
साई मारो अेनी पासे वसे, हरदम हाल हजुर॥६॥
यमराय पोकारी कहे, अेवा भक्तोथी तमे भागी जाव॥
भणे इमामशाह भाभाराम सुणो, हरिभक्त तणो महिमाय॥७॥

जो मनुष्य निर्मलचित्त, मात्सर्यरहित, प्रशान्त, शुध्दचरित्र समस्तजीवांचा सुहृद, प्रिय, हितवादी, अभिमान मायारहित असतो, त्याचे हृदयात भगवान श्री हरी सदैव विराजमान असतात. त्या सनातन भगवंताच्या हृदयात विराजमान होण्याने पुरुष या जगताविषयी सौम्यरूप शांत होऊन जातो. हे दूतांनो, यम आणि नियमांच्या पालनाने ज्यांची पापराशी नष्ट होऊन गेलेली आहे, ज्यांचे हृदय निरंतर श्री परमात्म्यातच आसक्त झालेले आहे, ज्याच्या चित्तात गर्व अभिमान आणि मात्सर्याचा लेश सुध्दा नाही. तशा मनुष्यास तुम्ही दुरुनच सोडून द्यावे. शंख, खड्ग, गदाधारी अव्ययात्मा भगवान हरी ज्याच्या हृदयात विराजमान आहे त्याचे सर्व पाप नष्ट होऊन जाते. सूर्य असला म्हणजे अंध:कार तेथे राहूच शकत नाही. जो मनुष्य दुसऱ्याचे धन हरण करणारा आहे, जीवाची हिंसा करणारा आहे, तसेच मिथ्या व कटू भाषण करतो, त्या अशुभ कर्मोन्मत्त दुष्टबुध्दीच्या हृदयात भगवान अनन्त राहातच नाही.

जो कुमति दुसऱ्यांचे वैभव पाहू शकत नाही, जो दुसऱ्यांची निंदा करतो, साधुजनांची निंदा व चोरी करतो, तसेच संपन्न असूनही भगवंताची पूजा अर्चा करीत नाही अथवा त्याच्या भक्तांना दान धर्म करीत नाही त्या अधमाधम पाप्याच्या हृदयात भगवंताचे वास्तव्य केव्हाही असत नाही. तो मनुष्य पशुरुप असतो. ज्यापुरुष श्रेष्ठाच्या अंत:करणात तो अव्ययात्मा भगवंत विराजमान असतो. त्याचा दृष्टिपात जेथे जेथे होतो तेथपर्यंत भगवंताच्या सुदर्शन चक्राचा प्रभाव असतो तेथे तुमचीच काय पण माझी सुध्दा गति चालत नाही. तो महापुरुष वैकुंठ लोकाचा पात्र असतो, त्याच्याजवळ तुम्ही जायचेही नाही. अशा प्रकारे यमराजाने आपल्या दूतांना सक्त ताकिद दिली.

श्लोक : विमलमतिरमत्सर: प्रशान्तश्शुचिचरितोऽखिल सत्त्वमित्रभूत: ।
प्रियहितवचनोऽस्तमानमायो वसतिसदाहृदि तस्य वासुदेव: ॥
वि. पु. ३/७/२४

★ पद ★

यमराज वाणी ओचरे, यमकिंकर सुणी ल्यो ने आज ॥
विभु जेना हृदये वसे, अेवा भक्तो सदा शिरताज ॥टेक॥
अनुचर मारा सांभळो, यम नियमथी पाप भागी जाय ॥
मद मत्सर नही उरमां, आसक्त रहे हरीमांय ॥१॥
आवा भक्तोने निरखता, तमे भांगी जाजो नि:शंक ॥
पतीत पावन अेवा भक्तना, दरशनथी टळे भवबंध ॥२॥
सूरज उग्याने अजवाळा थया, मटी गई अंधारी रात ॥
साचु कहु हरी भक्त जन, हरि रूप निरखो साक्षात ॥३॥
परम पुरुष अेक छे, अेना सरखो बीजो नही कोई ॥
वसुदेव मां वसी रहे, जगत हरिमय जोई ॥४॥
रक्षा करो हरी माहरा, हरी हरी साद संभळाय ॥
यमनादूत अलगा रहे, अेनु पराक्रम नष्ट थई जाय ॥५॥
हरी जेना हिरदे वसे, अेनी द्रष्टि करे जे स्थान ॥
जोर नही त्या यमदूतनुं, अेनु उतरी गया अभिमान ॥६॥
वारी वारी विनवु तमने, नही जावो पुण्यशाली पास ॥
भणे इमामशाह भाभाराम सुणो, अेवा भक्तोना वैकुंठमा वास ॥७॥

यमराज म्हणाले, 'हे दूतांनो, भगवंत ज्याच्या हृदयात रोमरोमी वसलेला आहे तो तर भगवंताचा अत्यंत आवडता भक्त जाणावा. भगवंत त्याच्याहून वेगळा नाही व तो भगवंताहून वेगळा नाही. यम नियमांच्या पालनाने जन्ममृत्यूचे संपूर्ण पाप

नाहीसे होतात. त्याच्या चित्तात मद मत्सराचा अंश सुध्दा राहात नाही, त्याची कशातही आसक्ति नसल्याने, परोपकाराकरिता, परहिताकरिता ज्याने संपूर्ण जीवन अर्पण केले अशा महाभाग्यशाली महापुरुषांच्या दर्शनाने तुम्ही सुध्दा पावन व्हावे. सूर्य उगवल्याने संपूर्ण अंध:काराचा नाश होतो तद्वत महापुरुष या जगताचे आधारस्तंभ असतात. त्यांच्या वाटेला न जाता आपण त्यांचे दर्शन घेऊन त्यांचा आशिर्वाद घेऊन परत यावे. अशा महापुरुषांच्या पुढे आपला पराक्रम काहीच चालत नाही. श्रीहरी श्रीहरी करीत करीत ज्यांची दृष्टि निर्मल झाली ते या भवसागराच्या पार उतरून गेले तेथेआपले बळ काय चालणार. हे सर्व जाणून हे दूतांनो, तुम्ही जगतात विचरण करावे व तशा महापुरुषांच्या दर्शनाने परम पावन व्हावे.'

★ ★ ★

## ३४. दिव्यत्वाची जेथ प्रचिती.

अेक दिन शाह महेमूद आये, बैठे पीराना शिर झुकाये।।
कहोजी कैसे आवन हुवा, हमरे मनका संशय खुवा।।१।।
पीराना पुछु अेक बाते, दीन को देख क्यों मुँह फिराते।।
हिंदवाको मुरीद बनावो, दीन से अैसो कांहे अभावो।।२।।

एके दिवशी अमदाबादहून सुलतान महेमुदाचे आगमन झाले. गुरुजींच्या चरणावर झुकून खाली बसला. सद्गुरुंनी विचारले - 'पातशाहजी, आपले आगमन कशाकरिता झाले हे समजले तर माझ्या मनाचा संशय दूर होईल.' सुलतान म्हणाला, 'पीराना, आपणास एक प्रश्न विचारायचा आहे. तो असा कीं, तुम्ही दीनच्या बंद्याविषयी नाराज कां? तुम्ही केवळ हिंदुंनाच शिष्य बनवितात पण मुसलमानांना जवळ सुध्दा बसू देत नाहीत. मला ही गोष्ट फार खटकते. तुमच्या हृदयात 'दीन' च्या बंद्याविषयी असा अभाव कां उत्पन्न होतो.'

असली बात हो गई मुलताना, ता दिन प्रतिज्ञा किनी दिलजाना।।
में हिंदवाका होई रहेवु, मोमिनको मुरीद नाही बनाऊ।।३।।
सुनो शाह प्रतिज्ञा मेरी, ताको कबहु न भंग हुवेरी।।
फकीरा अपनी राह चलैया, शाह काहे को पुछन अैया।।४।।

'खरी गोष्ट अशी आहे की मुलतानला मी प्रतिज्ञा केलेली आहे, की आजपासून मी कधीही मुसलमानांना शिष्य बनविणार नाही. केवळ हिंदुच माझे शिष्य होतील. मी हिंदुंनाच उपदेश करीन. या प्रतिज्ञेनुसार मी पालन करीत आहे. माझी ही प्रतिज्ञा कधीच भंग होणार नाही. पण सुलतानजी आपणास या बाबतीत शाहानिशा करून-हटकून विचारपूस करीत आहात?'

सारे शहरमें चर्चा होवे, नाम आपका बहुरी बिगोये॥
शोचा यह कैसी है बानी, जाई बुझे पीरा गुणखाणी॥५॥
ताथे साई कदमोमें आये, पुछे बात अरू भेद बुझाये॥
सायाजी कुछ रहम करै हो, दीनसे मुँह कब हु न फिरैयो॥६॥

सुलतान महेमूद म्हणाले, 'हे सायाजी, साऱ्या शहरात चर्चेचा विषय झाला आहे. लोक आपल्या नावाला कलंकित करीत आहेत. जेव्हापासून मी आपली निंदा ऐकली तेव्हापासून हृदयात एक व्यथा जागृत झाली की हा काय अपप्रचार होत आहे. पीर इमाम विषयी लोक हा काय निंदास्पद अपप्रचार करीत आहेत. जो पर्यंत खरी हकिकत समजू शकणार नाही तो पर्यंत मन स्वस्थ होणार नाही. म्हणून आपल्याकडे आलो आहे आणि खरी गोष्ट समजावून घ्यायची आहे. म्हणजे माझ्या मनातील शंका दूर होईल. शाहसाहेब माझी तुम्हाला एक प्रार्थना आहे की तुम्ही 'दीन' पासून कधीहि मुख फिरवू नका. एवढी कृपा तर जरूर करावी लागेल.'

पतशाह लगेरी अचरज बानी, दीनसे न्यारे नही अजानी॥
फिरभी मुरीद दीनको नही चाहु, माथे मेरी लगै तौ बाहु॥७॥
क्या करे हम शब्दके मारे, पीराना जिस मुख उचारे॥
आखिर दमतक याद रखैयो, हिंदवा मेरा में हिंदवा कहैयो॥८॥

पातशाह आपण जे बोलत आहांत त्यावरून मला आश्चर्य वाटत आहे की आपण हे काय सांगतात? मी दीनशी मुख फिरविलेले नाही. सदा सर्वदा 'दीन' चाच बनून राहिलेलो आहे. आपण म्हणतात की मी दीन पासून वेगळा बनून वागत आहे हे बरोबर नाही. हां एक गोष्ट मात्र नक्की आहे की मी 'दीन' जनांना म्हणजे मुसलमानांना शिष्य बनण्यासाठी साफ इन्कार करतो, कारण मी जी शिकवण देतो ते त्यांना मान्य नाही. एवढ्या कारणावरून माझी निंदा होत असेल आणि 'दीन' चे लोक मला गुन्हेगार अथवा काफर म्हणून ओळखत असतील तर ती त्यांची महान चूक आहे. मी शब्दाला मान देणारा आहे, कारण वाणी वारंवार बदलायची नसते. माझ्या अनुभूतीतून ईश्वर स्वरूप साक्षात्काराचा सनातन वैदिक तत्त्वज्ञानाचा मार्ग मी चोखाळलेला आहे. त्याचाच उपदेश मी मानवमात्रास करणार आहे. ज्यास हे मान्य असेल त्यांनी हे स्विकारावे अन्यथा त्यांना त्यांचा मार्ग मोकळा आहे. शब्द हे ब्रह्म आहे त्या शब्दब्रह्मांचे उच्चारण व आचरण करणे माझे कर्तव्य आहे. मी यथार्थतेने पालन केलेले आहे. शेवटच्या दमापर्यंत मी त्याचे पालन करणार आहे. दीनला माझा विरोध नाही पण सनातन वैदिक धर्म हाच माझा सतपंथ आहे. त्याचाच मी पाईक आहे. माझा हा निश्चय कधीहि ढळणार नाही.'

मतवाला बनी रहो साई, मोहे लगे नही लेश जुदाई ॥
लोगनको जैसी दरशाये, समझ पाय सोही बाते बताये ॥९॥
हम तो साई दिखे शाहनूरा, कायम कदमों में रह हु हजुरा ॥
मिलन पीराना शांति पाई, गंगाको गुरु ज्ञान लिखाई ॥१०॥

सद्गुरु इमामशाहांचे हे स्पष्ट वचन श्रवण करताच सुलतान खरोखर शांत झाला. त्याच्या हृदयात जी पीडा होती ती मिटली, त्याचा संशय फिटला व त्यास समाधान झाले. तो म्हणाला, 'हे साई तुम्ही निर्भय होऊन आत्मानंदात निमग्न होऊन रहा. मला तर आपले विरोधी लोक जी आपली विटंबना करीत होते ते ऐकून सहन होत नव्हते. म्हणून सत्य जाणून घेण्याकरीतां मी आलो. माझ्या मनाचे समाधान झाले. आपण आपले कार्य जोमाने करा. विरोधकांची शक्ति आपणास नेस्तनाबूद करू शकेल येथपर्यंत पोहोचू शकणारच नाही. पण शाहसाहेब मला खरोखर आपले दिव्यतेजस्वी-नूरस्वरूप पाहून आपल्या चरणापासून वेगळे होण्यास मनच होत नाही. आपल्या मिलनाने माझ्या हृदयात खरी शांति प्राप्त झाली.' असे म्हणून विनयाने झुकून पातशाह मेहमूद परत फिरला. या प्रसंगाचे वर्णन करीत असता संत नायाजींचा पट्टशिष्य गंगासिंह गोहिल म्हणतो की हा प्रसंग मला माझ्या सद्गुरु नायाजींनी सागितला. अशाच अनेक प्रसंगाचे वर्णन माझ्या सद्गुरुंनी मला सांगितले.

★ ★ ★

# ३५. पातशाही तुला मिळूच शकणार नाही.

महेमूद शाहके बडे शाहजादा, आबाखान लिखे आबादा ॥
ताके दिलमें खाहिस आई, कब मोहे पतशाही पाई ॥१॥
पीर इमामसे बातेही बुझे, काहुसे नेक बाते बुझे ॥
किसीने नीके बेन सुनाये, पीर इमामसे मिलीयो जाये ॥२॥
आबाखान तुरतही धाये, पीर इमामको शिर झुकाये ॥
साई मेरे दिलकी जानो, पतशाही कब पावे दानो ॥३॥
मोरे मन अेही अभिलाषा, साई सुनाइयो सच भाषा ॥
शाहजादाकी सुनी बानी, बोले सद्गुरु पीर बखानी ॥४॥
आबाखान पतशाही चहैया, फिरभी हवश दिलको न बिलैया ॥
हवशमें बहुरी जन हारे, कितने सपने हो गये ख्वारे ॥५॥

सुलतान महम्मद बेगडच्यास चार मुले होती, महंमदकाला, आबाखान, अहमदखान व चौथा खलीलखान. खलीलखानला सुलतानने गादीचा वारस जाहिर केलेले होते.

त्याला सुलतान मुझफर असा किताब दिला होता. सुलतानचा दुसरा शाहजादा आबाखान तारूण्यात आला तेव्हापासून त्याला दुष्ट साथीदार मिळाले. म्हणून तो कूमार्गाकडे वळला. कूकर्मी लोकांच्या संगतीने त्याच्यात अनेक प्रकारचे खोटेनाटे दुर्गुण शिरले. हाजीखोर लोक त्याच्या सभोवती गराडा घालून राहात आणि म्हणत की, 'हुजुर, एक न एक दिवस असा उगवेल की आपण अमदाबादचे सुलतान व्हाल? अशा रीतीने त्याला बहकवून अशा उंचीवर घेऊन जात की तो स्वत:ला सुलतानच समजायला लागत असे व त्याच मनस्थितीत असे काही कूकर्म करीत असे की त्यास पारावार नसे. हाजीखोर लोकांच्या बहकाव्याने तो ईर्षा, द्वेष, मत्सर, दुर्व्यसन, बदनीती, बदफैलीपणा करीत असे. सुलतान महंमद बेगड्याच्या कानावर या गोष्टी जात त्यामुळे तो वेळोवेळी त्याची कानउघाडणी करी.

आबाखानला सुलतान बनायचे होते पण महंमद बेगडा धट्टाकट्टा विद्यमान सुलतान असल्याने त्याच्या हयातीत तर तो सुलतान होऊच शकणार नव्हता. महंमद बेगडा सिंहासनावरून दूर होईल अथवा मरण पावेल तरच ना तो सुलतान होईल पण असा दिवस येईल केव्हा? आबाखानच्या हृदयात या गोष्टीची खंत लागली. 'मी अमदाबादचा सुलतान केव्हा होईन.' या बाबतीत अमदाबादमधील मोठ मोठ्या भविष्यवेत्त्यांना तो भेटला. अनेक उपाय करणाऱ्यांना भेटला पण त्यांच्याकडून त्याच्या मनाचे समाधान झाले नाही. त्याने खूप विचार केला, अनेक उपाय केले पण उपयोग होईना. अचानक एके दिवशी एका अनुभवी मित्राने त्याला सांगितले की, 'आबाखान, या बाबतचा उपाय कोणीही करू शकणार नाही. फक्त एकच महापुरुष आहे. तू त्याच्याजवळ जा म्हणजे तुला सत्य काय त्याचा जबाब मिळेल. तो महापुरुष म्हणजे पीर इमामशाहा, जे पीराण्यास विराजमान आहेत त्यांच्या चरणाजवळ जा. तेथे शिर झुकव व तुला जो काही प्रश्न करायचा असेल तो निशंक मनाने सांग. तो महापुरुष तुला योग्य प्रत्युत्तर देईल व तुझ्या मनाचे समाधान करील.' अशा रीतीने आबाखानला मार्गदर्शन मिळाले.

तो तसाच पीराण्यास गेला आणि गुरु इमामशाहांच्या चरणावर झुकून शांत चित्ताने बसला. थोड्या वेळाने त्याने आपल्या हृदयातली व्यथा व्यक्त केली. 'बाबा, मी सुलतान महंमद बेगड्याचा शाहजादा आबाखान आहे. पित्यानंतर मी अमदाबादचा सुलतान होणार आहे, पण तो दिवस केव्हा उगवेल? मला ही पादशाही कधी प्राप्त होईल? या बाबतीत भविष्य जाणून घेण्याची उत्कंठा लागल्याने मी अमदाबाद मध्ये सर्वत्र फिरलो पण कोणीच माझ्या मनाचे समाधान करू शकला नाही. चांगल्या अनुभवी व्यक्तिकडून आपला तपास लागल्याने आपण माझ्या मनाचे समाधान कराल

अशी अभिलाषा बाळगून आपल्या चरणाजवळ आलो आहे तर माझ्या मनाचे संशय दूर करून तो दिवस कधी उगवेल ते सांगावे.' अधीर झालेल्या आबाखानने जे विचारायचे होते ते अत्यंत उताविळीने विचारून टाकले. त्याच्या मनाची उताविळता आणि सुलतान बनण्याचा आतताईपणा जाणून सद्गुरु इमामशाह खरोखरच अवाक् व विचारमग्न झाले. हे पाहून त्याची व्याकुळता अधिक वाढली. तो म्हणाला, 'हुजूर, असे मौन कां झालात? माझ्या प्रश्नाचे उत्तर कां देत नाहीत?' अशारीतीने त्याने वारंवार प्रश्न केले. शेवटी सद्गुरु इमामशाह म्हणाले, 'बेटा आबाखान, तुझ्या मनात पादशाही प्राप्त करण्याचे कोड जागले आहे, ही तर चांगली गोष्ट आहे परंतु जी पादशाही प्राप्त करायची आहे ती सांभाळण्याची लायकी पण असायला हवी आहे. ज्यायोगे राज्य कारभार चांगला चालू शकेल. तुझ्यातून अजुनही हवशखोरी (बदचाल) गेली नाही. या बदचालीने मोठमोठे पराक्रमी वीरही पराजय पावलेले आहेत. एवढेच नव्हे तर त्यांचा विनाश सर्वनाशच झाला आहे. याकरितां तुला माझी शिकवण आहे की तू या बदचालीचा त्याग करावास. तू कायमचा सुखी होशील.'

तुमको मेरी शिकायत मानो, हवशखोरीथी हटो दिलजानो।।
साईको सुनाई दिये सच बाता, आबाखान क्यो दिल दुःखाता।।६।।
असल बाते अजहु नही पाई, किसीने तुमीको सच न सुनाई।।
कहहु आबा हमारी मानो, यहासे चलना आखिर जमानो।।७।।
पतशाही दूर ही रह जावे, हवश ढंग बहुरी पछतावे।।
मुराद हासल सबकी न होवे, आबाखान अंतमे रोवे।।८।।
साई अैसी क्यों बाते सुनाये, शाहजादाके मन नही भावे।।
आबाखान सुनो अेक बानी, तुमरे हियामे बिखकी खानी।।९।।
आखिर विषही बिष रहेगा, अेक दिन विषसे सोही मरेगा।।
मोहे लग रहे तुमरे भावि, सोही बरते साई दिये बताई।।१०।।

सद्गुरु इमामशाहांनी आबाखानला जे सांगायचे होते ते कोणताही आडपडदा न ठेवता साफ साफ सांगून टाकले. परंतु त्यांच्या त्या शब्दांनी त्याचे मन दुखावले. एकतर त्याच्या मनात बदचालीचा अवगुण होताच. त्याला बदचालीचा म्हटल्यावर दुःख तर होणार होते पण स्पष्टवक्त्या सद्गुरुंना त्याची काय भीति असणार? स्वतः आबाखान जी गोष्ट जाणून घेण्याकरिता साई जवळ आला होता. त्याबाबतीत तर त्यांनीकाहीच सांगितले नाही. उलट दुसरीच गोष्ट त्यांनी छेडली म्हणून आबाखान म्हणाला, 'बाबा मी जे जाणून घेण्यासाठी आपणाजवळ आलो होतो त्याबद्दल तर आपण कांहीच बोलत नाही. त्या गोष्टीचा निर्णय आधी द्या नंतर बाकीच्या गोष्टी.'

सद्गुरु म्हणाले, 'आबाखान, जी खास गोष्ट आहे तिचाच निर्णय मी तुला देत आहे. आतापर्यंत तुझ्या दहशतीने स्पष्ट बोलणारा तुला कोणी मिळाला नसेल. परंतु साई तुला स्पष्ट शब्दात सांगत आहेत की आता तरी तू सत्य काय ते ओळख. कारण की या दुनियेतून प्रत्येकाला एखाद्या दिवशी निरोप द्यायचा आहे जी पादशाही प्राप्त करून घेण्याचा विचार तू करीत आहेस ती हृदयाची धावपळ उमेद हृदयातच राहून जाईल आणि आताच्या बदचालीचा तुला खूपच पस्तावा करावा लागेल. दुनियेत आलेल्यांच्या सर्वांच्याच मनातील इच्छा सर्वच मनसुबे पूर्ण होतात असे कोणाच्याही बाबतीत ऐकले नाही. कित्येक जीव तर आशा आणि उमेद बरोबरच घेऊन अश्रु वाहात वाहात या जगातून पार निघून गेलेले आहेत. कदाचित तू सुध्दां तुझे मनसुबे पूर्ण न झाल्याने मनोभंग झाल्याने या जगातून निघून जाशील असे सुध्दा होऊ शकेल. या बाबतीत कोणी काय सांगावे?' सद्गुरुंनी स्पष्ट शब्दात सांगून टाकल्यावर सुध्दा आबाखानला त्याची बरोबर समज पडली नाही. म्हणून तो आवेशाने म्हणाला, 'साई, तुम्ही मला अशा गोष्टी ऐकवीत आहात की ज्यायोगे या शाहजाद्याच्या हृदयाला दुःख होत आहे.' सद्गुरु म्हणाले, 'शाहजादा, एक तर जे स्वार्थी असतात ते गोडगोड बोलून आपला अर्थ साध्य करतात. साईला कोणताच स्वार्थ नाही म्हणून अर्थाचीही गरज नाही. जे सांगायचे होते ते स्पष्ट करून तुला सांगितले तुझ्या रोमरोमात ईर्षा व विषयाचे विष व्यापले आहे. विष ते विषच होईल आणि या विषानेच तुझे अवसान होणार आहे. आबाखान मला तुझ्या भविष्याविषयी जे दृश्य दिसले तेच मी तुला सांगितले.' सद्गुरु इमामशाहांच्या शब्दांनी आबाखानच्या रोम रोमात आवेश चढला. त्याला हा आपला धडधडीत अपमान झाला असे वाटले. सद्गुरुंच्या ठिकाणी दुसरा कोणी असता तर आबाखानने तिथेच त्याची शान उतरली असती. पण येथे तर पीर-वलीशी गाठ होती. त्यांना तो काय करू शकणार होता?

लगे आवेश रूठे शाहजादा, साई की बाता सुनहु नही जादा॥
उठकर चले हुई असवारा, अमदाबादको पंथ निहारा॥११॥

आबाखान आवेशाने तेथून उठून उभा राहिला. त्याला वाटले की आता आणखी या पीराचे शब्द श्रवण करण्यासारखे नाही. म्हणून तो तेथून चालता झाला. बाहेर आल्यावर आपल्या घोड्यावर स्वार होऊन अमदाबादला आला. सद्गुरुंनी त्याला आपली बदचाल सुधारण्याविषयी शिकवण दिली, पण केवळ अशा शिकवण्याने असे बदनीतीचे लोक सुधारले असते तर त्यांचे भवितव्यच बदलून गेले असते. ज्याच्या भाग्यात विषाचा प्याला घोटण्याचे भावी नियत असेल तो सत्यमार्गावर

येऊच शकत नाही. अखेर तो अधमतेच्या मार्गानेच जातो. आबाखानचे मन परिसुरत सुंदरींच्या शोधात होते. भोगी भ्रमराप्रमाणे तो फुलांचा उपभोग घेतल्यावर दुसऱ्या फुलावर भटकत होता. एका अमीरकन्येवर आसक्त होऊन भर दिवसा त्याच्या घरात घुसून तो धिंगामस्ती करू लागला. शेवटी तो पकडला गेला. त्याला लोकांनी खूप मारले व शेवटी राजदरबारात खबर दिली. दरबारी शिपायांनी त्याला पकडून आणले. सुलतान महेमूद बेगडयाला समजले त्या समयी सुलतान तख्तावर बसून खाली पाहू लागला. तो महालयात आला. सरबताचा प्याला तयार करायला लावला. त्यात हलाहल विष घालून आबाखानला पाजण्यात आले. त्याचे अवसान झाले. संत नायाजी म्हणतात की सद्गुरु इमामशाहांनी जी भविष्यवाणी त्याला सांगितली होती त्या प्रमाणेच विषयी आबाखान विषाच्या ज्वाळेत खाक झाला. त्याला विषपान करायची वेळ आली व त्यातच तो मरण पावला. विषयविषानेच खरोखर त्याचा विनाश झाला.

साईको जेही बानी सुनाई, काल बीते होनी होई रहाई॥
नायाजी कहे गुरु मुखबानी, दिल सफासे बुझो दिल निरवाणी॥१२॥

★ ★ ★

## ३६. साध्वी हिराबाई.

महेमूदको लगी साईसे यारी, मिलने आये कभी शाहकी सवारी॥
अेकदिन आये मलिका संगा, साई इमामसे मिले उमंगा॥१॥

सुलतान महेमूद बेगडयाची हिंदुजातीची बेगम हिराबाई ही महि नदीतिरावरील राजपूत जमिनदार नागाराणाची मुलगी होती. सुलतानाचा या रूपवति बेगमवर अपार अनुराग होता. हजरत शाह आलमच्या चरणाजवळ राहून ज्याने आपला बाल्यकाळ व्यतीत केला होता तो सुलतान पीर आणि वलींच्या समागमात खरोखर मग्न राहात होता. महापुरुषांच्या समागमाने त्याचे हृदय खरोखरच सत्संगी झाले होते. सद्गुरु इमामशाहांच्या कसोटीनंतर त्याने आपल्या डोळ्याने पाहिले होते की ते महान करामती औलीया आहेत. त्या दिवसापासून अवकाश मिळेल तेव्हा तो पीराण्यास जाई. इमामशाहांच्या समागमात बसत असे व खरी मानसिक शांति प्राप्त करीत असे.

एकदा तो पीराण्यास गुरु इमामशाहांच्या मुलाखतीस जाण्याची तयारी करीत असता मलिका हिराबाईने सुध्दा इमामशाहांच्या दर्शनास येण्याची इच्छा व्यक्त केली. सुलतान तिचा प्रेमाग्रह टाळू शकला नाही. तिला बरोबर घेऊन तो पीराण्यास गुरु इमामशाहांच्या दर्शनास त्यांच्या दरबारात दाखल झाला. गुरु महाराजांना कुर्निसात

करून शांतचित्ताने त्यांच्या चरणाजवळ ते बसले. सुलतानाने दिलखुलासपणाने अनेकानेक बाबतीत चर्चा करून आपल्या हृदयातील व्यथा मोकळी केली. इमामशाहांनी सुध्दा शांत चित्ताने त्याला जबाब देऊन त्याच्या मनाचे समाधान केले. त्याचे चित्त शांत झाले.

मलिकाको ग्रहे साईका चरणा, बाबा मेरा मिटा दियो मरणा।।
उलटी बानी मलिकाकी पहिचानी, साई बोले कुछ आगमबानी।।२।।
उरमे जेही तेही अभिलाषा, होयगे सोही बीते पंच मासा।।
राजपुताणी हिराबाई नामा, नागा राणा महि किनारा।।३।।
ताकी दुहिता महेमुदको पाया, पराधीन जहा तहा पठाया।।
राजपुती गौरव दिल गुंजे, ताथे साईसे आगम बुझे।।४।।

शेवटी घरी परत जात असतांना मलिका हिराबाईने गुरु इमामशाहांना नमन करून आपल्या हृदयातील व्यथा सांगितली व म्हणाली, बाबा, मी आलीजहांना मिळण्याची इच्छा करीत आहे. त्या परवर दिगारला मिळण्याकरीता मी काय करावे व तो केव्हा मिळू शकेल? मला तर वाटते की तुम्ही मला असा काही उपाय सांगा की लवकरात लवकर तो भगवंत मला मिळेल व मला येथून आपल्या स्थानात घेऊन जाईल.

साया कहे सुनो हिराबाई, मनकी आश पुरण हो जाई।।
दिल चाहे सो पावही गवना, नाम तेरा यहाही रहे भवना।।५।।
मलिकाको गुढ बानी चाचे, साईसे दिये सोही हुई साचे।।
महमदशाह की निगाह कुछ ओरा, उनकी बाते बुझेही थोडा।।६।।

'बेटी, भगवंताला प्राप्त करायचे असेल तर त्याच्या मार्गाप्रमाणे वाग. अगदी खुशीने त्याची प्राप्ति होईल. त्या मार्गाचे अनुसरण करीत असता आज नाही उद्या परवा केव्हा तरी तो मिळेलच. तुझ्या प्राक्तनावरून समजून येत आहे की तू कांही दिवस त्याची स्मरणभक्ति कर तो दिवस ही उगवेल की, भगवंताची व तुझी भेट होऊन तो तुला घेऊन जाईन.' 'बाबा, तो परमभाग्याचा दिवस कधी उगवेल?' अधिरतेने तिने विचारले, 'बेटी, पाच महिने पर्यंत थांब नंतर भगवंताचे आमंत्रण येईल तेव्हा खूशीने जा.' सद्गुरु इमामशहांनी तिला सत्य सांगून टाकले आणि मलिकाने पण ते लक्षात घेऊन दृढ मानले. नंतर तिने सद्गुरु चरणावर शिर झुकविले. सद्गुरुंनी आपला वरदहस्त तिच्या शिरावर ठेवून शुभाशिर्वाद दिला. सुलतानने सुध्दा सद्गुरुंना नमस्कार करून मलिकाला बरोबर घेऊन त्यांचा निरोप घेतला.

साईको झुक झुक हुवे बिदाई, महमदशाह अमदाबाद आई।।
पंचमास छीनहीमे बितैया, साई कहे सोही होनी होवैया।।७।।
गर्भवती थी मलिका हिराबाई, दशमासे पुत्र प्रगटाई।।
महमदशाह मन अति उमंगा, पुत्र जन्मका बडा प्रसंगा।८।।
बहुत खेरात किये तेही जामा, दिन फकीर पोखे सुखधामा।।
तीन दिन बीते मंगलकारी, चोथे दिनकी हुई सवारी।।९।।
भोर बिकल हुई हिराबाई, महमदको निज पास बुलाई।।
खाविंद मोहे माफ करै हो, जावन चहु बिदा मोहे दैहो।।१०।।
बिकल हुई महमद पुकारे, मलिका कैसे बेन उचारे।।
पतशाह मे हुं राजपुती नारी, भाविसे हो गई तुम्हारी।।११।।
मन बानी कर्म से आपको साया, मैने मान लीया पिवराया।।
हिंदवाणी कभी जुठ न भाखे, स्वामी मेरा तुमी शास्त्रकी शाखे।।१२।।

सद्गुरु इमामशाहांनी पाच महिन्याची मुदत सांगितली होती त्याचे कारण असे की त्या समयी हिराबाई गर्भवती होती. तिच्या पोटात सहा महिन्याचा गर्भ होता म्हणूनच त्यांनी तिला पाच महिन्याच्या बंधनात अडकाविले. बरोबर दहा महिने पूर्ण झाले आणि मलिका हिराबाईच्या उदरी एक सुंदर पुत्ररत्न जन्माला आले. त्याचे नांव 'खलीजखान' असे ठेवण्यात आले. त्याचा जन्म हिजरी सन ८८० (इ. स. १४७५) च्या शाबान महिन्याच्या ६ तारखेस बुधवार सकाळी प्रभा फाकण्याच्या वेळेस झाला होता.

पुत्र जन्माच्या मंगल समयी सुलतानने खूप आनंद उत्सव मानायला लावून मिठाईची खैरात केली. आनंदी आनंदात तीन दिवस निघून गेले. चौथ्या दिवसाच्या प्रात:काळी मलिकाने सुलतानला जवळ बोलाविले आणि नम्रतेने त्याची क्षमा मागून म्हणाली,

खाविंद, मला माफ करा. मी आता येथून आपला निरोप घेत आहे. तर मला जाण्याची परवानगी द्यावी.' मलिकाचे हे शब्द श्रवण करताच सुलतान व्याकुळतेने म्हणाला, 'मलिका, तू हे काय बोलत आहेस. तुला कोठे जायचे आहे.' 'स्वामी, मी एक राजपूत नारी आहे. माझ्या प्राक्तनात लिहीलेले होते, त्याप्रमाणे मी आपल्या घरी आपली एक सन्नारी म्हणून आली आणि केवल एवढेच नव्हे तर पवित्र हृदयाची पतिव्रता स्त्री ज्या एकनिष्ठेने आपल्या पतीशी एकरूप होते त्याच पावित्र्याने मी आपली तन, मन, वाणी आणि कर्माने सेवा केली, मी आपला स्वामी म्हणूनच

आपणाला या हृदयसिंहासनावर बसविलेले आहे. माझ्या हृदयात आपल्या हृदयात असलेल्या भगवंताच्या साक्षीने मी हे बोलत आहे. आणखी आपली सेवा करावी असे वाटते पण ---

लेण देण खतम हो गैया, यहांसे मेरा वतन चलैया ।।
मोहे बिदाई दियो पिवराया, आखिर मेरा मानो जुहारा ।।१३।।
खाविंदके चरण ग्रहैया, सचमूच हिराबाई सो गैया ।।
महमदशाह रोया दिल ठानी, सचमुच आन दिखे हिंदवाणी ।।१४।।
मलिका मोसे मुख फिरैया, मेरी कसूर माफ करैया ।।
ता दिन झुक गये महमदशाह, सारे महल झुके तेही ठाये ।।१५।।
पीर इमाम जेही मुख भाखा, संत बचन सत्य कही राखा ।।
महमदशाहको हो गये ख्याला, इमामशाह बोले मतवाला ।।१६।।
कुछ दिन पिछे महमद आया, साई कदमोमें शिर झुकाया।।
सबे बात बखानी साई, मलिकाको क्या मंगे पीराई ।।१७।।

'- खाविंद आपल्या सोबत माझा जेवढा देण्याघेण्याचा ऋणानुबंधाचा संबंध होता तेवढा पूर्ण झाला आहे. आता मला हे जगत् सोडून स्वधामाला जायचे आहे. आता या शेवटच्या घडीला मला विदा (निरोप) द्या आणि माझा अंतिम प्रणाम स्विकारा.' असे म्हणत हिराबाईने आपल्या स्वामीचे चरण घट्ट धरले आणि तिने तेथेच चिरविश्रांती घेतली. स्वामी चरणावरच ती पूर्ण विराम पावली. त्या समयी तिचा हात धरून उठवत सुलतानने टाहो फोडला 'मलिका --- मलिका ---' म्हणत जोरजोराने हाक मारल्या पण हिराबाई तेथे जिवंत असेल तेव्हाना होकार देणार! ती तर केव्हाच स्वधामाला निघून गेली होती. पहाडाप्रमाणे कलेजा असलेला सुलतान त्यासमयी बालकाप्रमाणे अधीर होऊन ओक्साबोक्सी रडू लागला. त्याला खऱ्या हिंदवी सतीचे दर्शन घडून आले. त्याचे हृदय पाझरले. एखाद्या दासाप्रमाणे तो मलिकाच्या चरणावर झुकून पडला व म्हणाला - 'मलिका, माझ्याकडून काही कसूर झाली असेल तर मला माफ कर. मी खरोखरच गुन्हेगार आहे.' असे म्हणत सुलतान आणखी तिच्या चरणावर झुकला ते पाहून शाही महालातील सर्वच जण तिच्या चरणावर झुकले. दिल घट्ट करून बादशाहाने शाही इतमामाने तिच्या स्थूल शरीराला मूठमाती दिली. पुत्र जन्माच्या सहाव्या दिवशी छट्टी (सटी) च्या दिवशीच ही घटना घडली. बालकाचे धारण पोषण दाईने केले. बालक दिसायला सुंदर होते आणि स्वभावाने सुध्दा चांगले असल्याने त्याचे नाव 'खलीजखान' ठेवण्यात आले.

चार पाच दिवसाच्या बालकाला मातेने अपार वात्सल्याने हृदयाशी लावले आणि या नश्वर दुनियेचा मोह त्यागून मलिका हिराबाईने या जगताचा कायमचा निरोप घेतला.

सद्गुरु इमामशाहांनी सांगितले होते त्याप्रमाणे पाच महिने पूर्ण होताच मलिकाला काळाचे बोलावणे आले. मलिकाच्या स्मरणातच असल्याने ती तत्परच होती. काळाचे निमंत्रण येताच सुहास्य वदनाने ती त्याला सामोरी गेली, पण तिच्या जाण्याने सुलतानच्या हृदयाला मात्र जोराचा धक्का बसला. त्याला पाच महिन्यापूर्वीचा प्रसंग आठवला. सद्गुरु इमामशहांच्या चरणाजवळ बसून मलिकाने जी मागणी केली होती. त्याची त्याला आठवण झाली. थोडा स्वस्थ झाल्यावर अश्वारूढ होऊन सुलतान सद्गुरु इमामशहाजवळ आला. झुकून प्रणाम करून त्यांच्याच चरणाजवळ बसला. साश्रुनयनाने त्याने झालेली सारी हकिकत सद्गुरुंना निवेदन केली. तो म्हणाला - 'बाबा, मलिका हिराबाई या जगतातून कायमची निघून गेली. पुत्र संतान झाल्यानंतर चौथ्याच दिवशी ती येथून निघून गेली. हुजूर, त्या दिवशी आपल्या चरणाजवळ बसून तिने काय मागणी केली होती?'

वो दिनकी बाते भूल जै हो, मलिका साईके धाम पठै हो॥
बडी सुभागीन थी सन्नारी, धन्य धन्य रजपूती नारी॥१८॥
सहज बडे हम द्वन्द्व फसैया, काहु को नही पाये सैया॥
राजपुतीको पीवको पेखा, हर महजबमे साईको देखा॥१९॥
मलिका हुई फिरमन विरागा, साईसे लगे जाका अनुरागा॥
साईसे मिलन बिकल मन जाके, तासे समय साईसे ताके॥२०॥
मन बांछित उनहीको पाया, मलिका साई से जाई समाया॥
पतशाह अज हु रहे अज्ञानी, हिराबाई कबहु न पहिचानी॥२१॥

'सुलतान, मलिका हिराबाईने जे कांही मागितले होते ते खरोखरच प्राप्त करून घेतले. राजन्, नश्वर दुनियेतील आणि विशेषत: तुमच्या जनानखान्यातील द्वेष, मत्सर, हेवा, दावा वगैरे खेळ पाहून ती या जगतास उबगली होती. आपला खरा मालक परमपिता परमेश्वराच्या दर्शनास ती स्वर्गात निघून गेली. तुमच्या हृदयाला प्रेमभावाचा चटका लावून ती गेली. तुम्ही स्वत:ला खूप हुशार, चतुर व शूरवीर समजता पण जीवनाच्या बाजीत ती आपणाला हरवून व प्रेमाचा पाठ शिकवून गेली. सुलतान, आपण त्या हिंदु राजपूत स्त्रीला ओळखू शकला नाही. मन, वाणी आणि कर्माने ती आपणास पति परमेश्वरच समजत होती. ती एक पतिव्रता सन्नारी होती. राजकारणाच्या संग्रामात जीवाची बाजी लावून लढणे हे तुमचे काम, पण तुमच्या स्वत:च्या जीवनसंग्रामात

प्रेमाचा वर्षाव करून आपल्या स्वामीचे मन न दुखविता सुख कशा रीतीने मिळेल त्या करिता जीवाचा मनाचा आटा पिटा करून एवढेच काय पण स्वत:च्या भावनांना तिलांजली देऊन आत्मसमर्पण करणे हे एखादी सन्नारीच करू शकते व मलिका हिराबाई त्यातीलच एक सती स्त्री होती. तिच्या शरीरसुखाचा आपण उपभोग घेतला पण त्यात बसलेल्या हृदयाला आपण जाणू शकला नाही.' सदगुरु इमामशाहांच्या शब्दांनी सुलतान अवाक् बनला त्याच्या नयनातून अश्रु प्रवाह सुरु झाला.

> ऐसी दामिनी आन कहा पावै, महमद बिरथ उमर गमावै॥
> चल गये सो बेर नही आवे, महमद काहे नैन बहावे॥२२॥
> बैठके यहाँ में सुखा बिगोई, कुछ भी समुझ न पाया मोई॥
> दिलजानीको मे नही पेखा, आज ही मैने जल्वा देखा॥२३॥
> साई मोहे माफ कराई, साया तुमी हो पाक पीराई॥
> बहुरी रोये महमद शाहे, पतशाह नीर बहावत काहे॥२४॥

'सुलतान, मलिका हिराबाई सारखी सती स्त्री मिळणे फार दुर्लभ आहे. तुझी सर्व उमर निघून जाईल पण अशी स्त्री मिळणार नाही. तिच्या आठवणीत तू आता रात्रंदिवस जरी अश्रु गाळीत बसला तरी काही उपयोग नाही. कारण की तू तिचे हृदय जाणू शकला नाही. 'बाबा, त्या दिवशी मलिकाने आपल्या चरणाजवळ बसून काय मागितले? त्या दिवशी मी त्या गोष्टीत ध्यान दिले नाही पण आज मला कांही तरी विशेष गोष्ट असल्याचे समजते. त्यात कांही तरी गूढ अगम्य असावे असे मला वाटते. बाबा, मला या बाबतीत खरोखर काहीच समजत नाही. मला माफ करा. आपण परम पवित्र हृदयाचे पीर आहात. माझ्या हृदयातील पीडा दूर करा.' साश्रुनयनाने सुलतानने इमामशाह महाराजांना विनंती केली.

> होनहार सोही मिटत कैसे, सबेही जायेगे आये ऐसे॥
> नेकी बंदगीमें दिल दैहो, कुफ्र देखके दिल डरै हो॥२५॥
> पीर इमामको बहुरी झुकैया, शाह महमद झुक चलैया॥
> नायाजीको बेर कहैया, सद्गुरु संग गाफिल मत रहैया॥१६॥

'सुलतान, तुम्हाला, मला, या नश्वर दुनियेला एके दिवशी हे जग सोडून जायचे आहे. राजा असो, योगी असो अथवा भिकारी जे प्राक्तनात लिहीलेले असेल हे हरघडी हरसमयी होत असते.'

> लिखा लेख सो नही मिटनेका, क्या मरता झूर झूर॥
> खबरबीना नर केते खप गये, मायाके हो मजूर॥"

'ललाट रेषा मिटविण्यास कोणीही समर्थ नाही. पण एक गोष्ट नेहमी लक्षात ठेवण्यासारखी आहे ती म्हणजे जगताच्या मायामोहाच्या आसक्ति पासून सदैव दूर रहायला पाहिजे. भगवंताची भक्ति आणि त्याचे निरागस प्रेम प्राप्त करून घेण्यासाठी निरिच्छ बुध्दिने त्यांची म्हणजे रंजल्या गांजल्यांची सेवा करायला हवी आहे. हेच माझे आपणास खास सांगणे आहे.'

सदगुरु इमामशाहांना जे सांगायचे होते ते स्पष्ट शब्दात त्यांनी सांगून टाकले. ते श्रवण करून सुलतानने दिनतेने झुकून व म्लान वदनाने उठून सद्गुरुंचा निरोप घेतला व अश्वारूढ होऊन अमदाबादला परत आला. त्या दिवसापासून सुलतान उदास होऊन गेला. क्षणोक्षणी त्याला मलिका हिराबाईची आठवण येत असे व आपल्या नयनातील अश्रुंनी तो तिला तर्पण करी.

याकरिता सद्भक्तांनो सद्गुरुंच्या संगतीत गाफिल पणाने अज्ञानपणात राहू नका. त्यांचा विमल ज्ञानोपदेश ऐकून आपल्या चित्तात ठसवा, असे परभक्त नायाकाका महाराज वारंवार सांगतात.

★ ★ ★

# ३७. रणांगणात शौर्य गाजविणारा तोच गाजी.

महमद शाहकी फोज महाना, तामे फौजी जुम्मा खुराशाना॥
पीर इमामको नाम सुनाया, ताथे साही पीराणा आया॥१॥
झुके साईको करे बखाना, में हूं गाजी जुम्मा खुराशाना॥
साई कहे सुनौ फौजी जवाना, कैसे गाजी हुवे दिलजाना॥२॥
शाही फोजमे सोरठ गैया, जुनागढमें बहुरी कतैया॥
शंखोध्दारमें हिंदवा अपारा, मार मार करे दिये ठारा॥३॥
बालक बूढा कहा जवाना, सबको कतल किये दिलठाना॥
दामन हुश्न परिकाठ लुटैया, ओरही ओरत कतल करैया॥४॥
बहुरी हिंदवा मैने कतल कियेरी, ताथे जुम्मा गाजी भयेरी॥
जुम्मा तेरी यह फिकी बानी, कतलसे गाजी कैसे बखानी॥५॥

सुलतान महंमद बेगडयाची फौज खूप मोठी होती. त्यात जुम्मा नावाचा एक शिपाई होता. तो खुरासानचा मुळ वतनी होता म्हणून जुम्मा खुरासानी या नावाने तो ओळखला जाई. अमदाबादला आल्यावर त्याने सद्गुरु इमामशाहांचा महिमा श्रवण केला म्हणून त्याला वाटले की एकदा अशा करामती औलीयाचे दर्शन घ्यायला हवे. असे सहज वाटल्यावरून एका तो पीराण्यास आला. साईचे दर्शन घेऊन त्यांच्याजवळ आपल्या पराक्रमाची वाखाणणी करू लागला. 'बाबा, मी जुम्मा खुराशानी आहे.

मला लोक 'गाजी' या बहुमानाने सुध्दा संबोधतात. मी जुम्मा खुराशानी गाजी आहे.' त्याच्या मुखातून ही वाणी श्रवण करताच सद्गुरुंना आश्चर्य वाटले. कारण की तो आपणच आपली प्रौढी मिरवत होता. म्हणून संतांनी त्याला विचारलें, 'जुम्मा, तू गाजी कसा झालास?'' तो म्हणाला, 'बाबा, मी शाही फौजेबरोबर सोरठला गेलो होतो. जुनागढला मी अनेक माणसांना मारले. एवढेच नव्हे तर शंखोध्दार बेटावर जाऊन अनेक हिंदुची कत्तल मी केली. बालक, वृध्द, तरूण वगैरेंचा काहीही विचार न करता मार मार मारून सर्वांना जमिनीत लोळविले. अनेक रूपसुंदरींच्या तारूण्याचा मद लुटला आणि ज्या स्त्रिया कामाच्या नव्हत्या त्यांची सुध्दा कत्तल करून टाकली. बाबा, मी अनेक हिंदुंची कत्तल केली म्हणून मला गाजी म्हणतात.' त्याचे ते शब्द ऐकताच खडखडाट हसले व म्हणाले, 'जुम्मा, तुझे मुख तर मला कसे फिक्के-निरस दिसत आहे. निरपराध लोकांची जास्तीत जास्त कत्तल केली म्हणजे तो गाजी गणला जातो हे तुला कोणी सांगितलें? गाजी म्हणजे रणांगणांत पराक्रम गाजविणारा. तू असा कसायाचे काम करून स्वत:ला मोठा गाजी समजतोस धीक्कार असो तुझ्या कृतकर्माला. तू मानव मात्राचा मोठा अपराधी आहेस. मानव जातीला तूं कलंक आहेस.'

नेकी बदीका होवे हिसाबा, तबही तू क्या देवे जबाबा।।
पाप पुण्यकी मत करो बाता, गाजी हे सोही गाजी कहाता।।६।।
नेकी बदी गाजीको नही, साहिब सबही माफ कराही।।
साई कहे सुनो खुराशानी, बूरे हाल आखिर जमानी।।७।।
जोर जुलम यहा करवाये, गाजी हुई तुने तेग चलाये।।
वहा नही पोंपाबाईको राजा, कांपे साईकी सुनी अवाजा।।८।।
मीर उमरावका वहा नही भेदा, साई दरबार वहा होवे निवाडा।।
रोजे कयामत यहां ही आवे, जुम्मा तुझे कुछ दिनमे दिखावे।।९।।
साई अैसी मत बोलिये बानी, मै हूँ जुम्मा खुराशानी।।
दीनका बंदा मोहे कुछ नही होवे, नाहक साईका नाम बिगोवे।।१०।।

'जुम्मा, तू स्वत:ला गाजी समजून घेत आहेस, कारण तू अनेक जीवांची हत्या केलेली आहेस म्हणून!' 'अरे बाबा, मी ज्यांची हत्या केली ते विधर्मी होते. त्या काफिरांची मी कत्तल केली आणि एवढे दीनचे काम करून तुम्ही मला निष्कारण दोष देता हे बरोबर नाही. 'जुम्मा, अरे तू हे काम चांगले समजतोस! विचार कर, नेकी बदीचा जेव्हा हिशेब होईल तेव्हा तू काय जबाब देशिल?' 'बाबा, तुम्ही अशी गोष्ट करून नाहक मला नाराज करीत आहांत. नेकी बदीची

ही गोष्ट गाजीला स्पर्शू शकत नाही. ते नियम गाजी करिता नाही मालिक तर त्याला सर्वच गोष्ट माफ करीत असतो. गाजी करितां ही गुन्हयाची गोष्ट नाही.' 'खुरासानी तू जे बोलत आहेस ते सर्व खोटे आहे. त्याचा परिणाम शेवटी फार वाईट होणार आहे. तू येथे जोर जुलूम करून धर्माच्या नावाखाली जीव हत्या करशिल, गाजी बनून तलवार चालवून अनेक निष्पाप लोकांची हत्या करशिल आणि एवढ्या गोष्टींवरून तू स्वत:ला महान पराक्रमी समजशील तर ती तुझी चूक आहे. ते महान पाप आहे. येथे कदाचित राजदरबारात तुला या गोष्टीने मान मरातब मिळेल पण भगवंताचा दरबार म्हणजे कांही पोपाबाईचे राज्य नाही. भगवंत म्हणजे कांही कोणाचा काका, मामा नव्हे की तुझ्यासारख्या या महान अपराध्याला क्षमा करेल. त्याच्या समोर जायला महान महान महारथी सुध्दा थर थर कापतात. त्याच्याजवळ अमीर-उमराव-फकीर असा कोणताच भेद नाही. त्याच्याजवळ सर्वच सारखे आहेत. त्या न्यायासनासमोर सर्वांचा न्याय व्हायचा आहे. आपण रोज कयामतचा विचार करतो तो दिवस तर येईल तेव्हा येईल पण त्या आधी इथेच या लोकातच रोज कयामतचा भोग भोगावा लागतो हे तू विसरलास काय? जुम्मा आपल्या कर्माचा भोग इथेच इहलोकातच भोगावा लागतो. हे कलजुग आहे, नव्हे करजुग आहे. येथे या हाताने घे तर त्या हाताने दे अशा प्रकारचा रोखठोक व्यवहार आहे. याच जन्मात तुला या तकर्माचे फळ भोगावे लागेल तेव्हा तुझा गाजी पणा कांही कामाचा राहणार नाही.' तुला तुझ्या बेअदबीच्या आणि अधमतेचा हिशेब इथेच चुकवावा लागले.' बाबा तुम्ही जे कांही म्हणतात ते बरोबर नाही. मी दीनचा बंदा आहे. मला कांहीएक होणार नाही. तुम्ही तर नाहक साईचे नांव धारण करून लोकांना ठकवित आहांत.'

दिन थोडे खामोश रहैयो, जुम्मा होनीनैन दिखैयो ।।
कैसा न्याय करे किरतारा, गाजी देख रहे जग सारा ।।११।।
साई मुजमे दिखेरी खामी, गाजीकी मत करो बदनामी ।।
गाजीको हे यश महाना, मत करै हो गाजीका बहाना ।।१२।।
जुम्मा वहासे चली गैया, मानो कुछ ही दीन बितैया ।।
सोये बिछोना हालत बूरी, याद किये तब साहिब नूरी ।।१३।।
ता दिन उनका कोई न साथी, छुट गये सबही संगाथी ।।
कहर किये बहु कहर कियेरी, अझल बिछोना देख डरेही ।।१४।।
देहीसे दुर्गंध निकसे अपारा, रोम ही रोम कीट निहारा ।।
हाय हाय फुकार करैया, मोहे उबारन आइये सैया ।।१५।।

'जुम्मा, साईंचा कोणाशीच वैरभाव द्वेषभाव नाही. त्यांच्या दृष्टीला जे सत्य दिसते ते सांगतात. तू थोडे दिवस आनंद मौज उपभोगून घे पण मग नंतर काय बनाव बनतो ते पाहा. कुदरत काय न्याय करते तू कोणत्या प्रकारचा गाजी आहेस. ही दुनिया सुध्दा उघडचा डोळ्याने तो न्याय पाहिल.' एवढे सांगून सुध्दा गाजीला ते पटले नाही. तो म्हणाला, 'बाबा माझ्या कृत्यात तुम्हाला काय कमीपणा दिसला अशा रीतीने या गाजीची बदनामी करणे तुम्हाला शोभत नाही.' 'जुम्मा, तुला भान नाही. तू आपल्या बदकरणीच्या कर्तृत्वात स्वत:ला मोठा पराक्रमी वीर समजत आहेस. खऱ्या गाजीचे यश फार वेगळे आणि मोठे आहे. तू तर केवळ गाजी होण्याचा बहाणा करीत आहेस. खरे पाहता तू गाजी नाहीस' सद्गुरुंनी त्याला सत्य सत्य सांगून टाकले म्हणून त्याच्या हृदयात मोठा अहंकार निर्माण झाला. तो मोठा तोऱ्याने आवेशाने उठून सद्गुरुकडे रागारागाने पाहात निघून गेला. थोडे दिवस मजेत गेले हळूहळू गाजीला एक दुर्धर रोग लागला. तो बिछान्यावर पडून राहू लागला. भावी कोणाला समजत नाही. कोणी सांगितले तरी एकदम विश्वास बसत नाही. पण भावीला मान्य असते तेच घडत राहते. थोडचाच दिवसात गाजी बिछान्याला असा भिडला की त्याला उठता बसताही येत नव्हते. शरीर दुर्गंधी करू लागले. हाजी हाजी करणारे सेवक सर्व त्याला सोडून निघून गेले. रोम रोमात किडे वळवळू लागले. त्या जिवंत नरकवासात राहणे त्यालाच दुस्तर वाटू लागले. साईचे शब्द त्याला आठवू लागले. मोठ मोठचाने चित्कार करून मालिकला बोलावू लागला. मला कोणीतरी येथून उचलून दूर न्या म्हणून सर्वांची करूणा भाकू लागला. पण तशा अवस्थेत त्याच्याजवळ जायलाच कोणी तयार नव्हते. त्याला पाहताबरोबर एक फर्लांगावरूनच लोक दूर पळून जात असत.

गाजी तोहे सब देख डरैया, कयामत देख तू क्यो तडपैया॥
बूरे मोतसे मर गये गाजी, कहा गई तेरी इतराजी॥१६॥
क्रूर कतल निर्दोष कतैया, साईको येही जहा उपैया॥
तामे तक्का ही हे तेरा, काहे बडाई कहेतु मेरा॥१७॥
देख तेरा यहां नही कोई, गाजी अंत नैना भर रोई॥
पीर इमामको साच कहैया, ता दिन गाजी मुख फिरैया॥१८॥
बूरे हाल मर गयो नादानी, देखोरी जुम्मा खुराशानी॥
गाजी तुमी मत करो बडाई, नेकी बंदगीसे रीझे साई॥१९॥

जो कयामतचा दिवस कित्त्येक वर्षांनी येणार होता तो थोडचाच दिवसात प्राप्त झाला आणि ते दृश्य पाहताच खुरासानी भयभीत झाला. भयानक चित्कार

करीत त्या जिवंत नरकवासात लडबडू लागला. भगवंताने निर्माण केलेली ही सृष्टी आहे त्यात राहण्याचा जीवन जगण्याचा प्रत्येकाला हक्क आहे. त्यातील प्राणिमात्रांची क्रूरतेने कत्तल करण्याचा तुम्हाला काय अधिकार आहे. या जगतावर ज्याची सत्ता आहे. तो मालिक तुमच्या या घोर कृत्याला खपवून घेणार नाही. जुम्मा खुरासानीने अनेक निष्पाप निरागस जीवने तलवारीच्या बळाने धुळीस मिळविले. पण शेवटी त्याचेही जीवन वाईट हालतने धूळ चाटू लागले व शेवटी काळाच्या आधीन झाले.

सदगुरुंनी त्यास सत्य सांगून टाकले होते. त्या दिवशी तर मोठ्या दिमाखाने तो तोंड मुरडून परत आला होता. आणि शेवटी आपल्या नादान पणाने वाईट हालतने मृत्यूच्या आधीन झाला. त्याची ती दशा पाहूनच लोकांच्या अंगावर भीतीचा काटा उभा राही. अशा प्रकारची दुर्दशा त्याची झाली होती. जर तुम्हाला खऱ्या अर्थाने गाजी व्हायचे असेल तर शूर वीराप्रमाणे रणांगणात आपला पराक्रम दाखवा. एखाद्या हत्याराप्रमाणे लोकांना अडचणीत टाकून क्रूर कत्तल करणे व स्त्रियांची अब्रु लुटणे याला गाजी म्हणत नाही. भगवंताला तर सत्य आणि प्रेमभक्तीच प्रीय असते. संत नायाजीने हा एक महान धडा शिकविला आहे की, 'या नश्वर दुनियेत नश्वर जीवन घेऊन आलेला आहेस पण शाश्वत ईश्वराची प्राप्ती करून घेण्यासाठी सत्यनिष्ठा आणि प्रेमभक्तीचीच गरज आहे. बाकी अन्य अहंभावाची आवश्यकता नाही.'

**नायाजीको येही सबक सुनाया, आया हे तो कछु करले कमाया।।**



# ३८. जाको राखे साईया मार सकैना कोई.

मलिक महंमद लिखे नेका, अैसे उमराव लाखनमें अेका॥
महंमद शाहको मलिक पियारा, लग रही शाहको मलिकसे यारा॥१॥
मलिक पीर फकिरको चाहे, साईको खोजत उनकी निगाहे॥
हजरत शाह आलमसे यारी, शाहकी सेवा मलिकको प्यारी॥२॥
पीर वलीका पेखत नामा, जाय पहूँचे मलिक तेही ठामा॥
पाक दिदार जबेही पावै, मलिकका हियरा हरखावै॥३॥
पीर इमामका परचा सुनैया, ता दिनसे यारी लग गैया॥
बेर ही बेर पीराणा जावे, साई दिदार मलिक सुख पावे॥४॥
दिलकी गुंज मलिक सुनावे, साई ताहिका जवाब सुनावे॥
मलिक बूझे दिलकी बाता, साई दोलत मिले बहु भाता॥५॥

सुलतान महंमद बेगडयाच्या दरबारात असे उमराव भाग्यानेच मिळालेले होते. मलिक महंमद नावाच्या उमरावावर त्याचे अपार प्रेम होते. तो पीर आणि फकीरांचा चाहक होता. त्यांच्याच संगतीत राहात असल्याने त्याची वृत्ती पण चांगली होती. त्याचे डोळे नेहमी चांगल्या सद्भक्तांला शोधत असत. त्याच्याविषयी 'मिराते सिकंदरी' मध्ये उल्लेख आढळतो तो असा -

सुलतानच्या धार्मिक उमरावात दुसरा उमराव मलिक दावर उल्कमुल्क ज्याचे संपूर्ण नाव अब्दुल लतिफ बीन मलिक महंमद होते. तो कुरेशी वंशाचा होता. हजरत महंमद पैगंबर ज्या वंशाचे होते. त्याला कुरेशी वंश म्हणतात. मलिक दुनियादारीहून फार वेगळा राही. धर्माकडे त्याचे विशेष लक्ष राहात असे. जेव्हा सुलतानच्या मेहेरबानीने त्याला मान्यवर पद मिळाले तेव्हा त्याला दावर-उल्-मुल्क हा किताब मिळाला. त्याचा मानसन्मान व लवाजमासुध्दा वाढला. अनेक शिपाई आणि आश्रीत त्याच्या तैनातीत ठेवले गेले. त्यांची गर्दी इतकी होऊ लागली की त्याच्या घरासमोर असलेल्या गल्लीत सुध्दा जाण्यास जागा नसे. त्याने पहिल्या शेजाऱ्यांना बोलावून सांगितले की मी हे घर विकण्याचा विचार करीत आहे. जर तुमच्यापैकी कोणाला विकत घ्यायचे असेल तर घ्यावे. ते सर्व लोक आश्चर्यचकित होऊन म्हणाले, 'तुम्ही तुमच्या घराची व्यवस्था चांगली ठेवू शकता अशी संपत्ति तुमच्याजवळ आहे. मनात घेतले तर तुम्ही आणखी बरीच घरे घेऊ शकाल असे असून तुम्ही घर कां विकत आहांत!' शेवटी मलिक त्या मोहल्यातून निघून गेला व त्याने शहराबाहेर मोठे घर बांधून त्यात राहू लागला याचे कारण असे होते की त्याच्या दरवाज्याबाहेर बरेच

लोक उभे राहात आणि बरेच घोडे हत्ती यांची ये-जा चालत असे. शेजाऱ्या पाजाऱ्यांना या पासून त्रास होऊ नये म्हणून त्याने गांवाबाहेर आपली व्यवस्था करून घेतली.

एकदा सुलतान महंमद बेगडयाच्या जावयाने त्याला मारून टाकण्याचा घाट घातला. मारेकऱ्यांनी त्याच्यावर अचानक हल्ला केला पण दैव योगाने तो त्यातून वाचला. मारेकरी पकडले गेले. त्यांनी खुलासा केला की आमच्या घरी मोठ मोठ्या वयस्कर तरूण मुली आहेत. त्यांच्या लग्नाकरिता पाहिजे तेवढा पैसा आमच्याजळ नाही. पैशाअभावी त्यांची लग्ने अडून राहिली. सुलतानच्या जावयाने त्यांच्या विवाहाकरितां पैशांची मदत देण्याचे वचन दिले होते म्हणून हे काम करण्यास आम्ही तयार झालो, आम्ही बेकसूर आहोत.' मलिक म्हणाला, 'खरे आहे, आर्थिक तंगी अशी एक चिज आहे की जे करू नये ते कृत्य ती माणसाला करायला भाग पाडते.' अशा रीतीने आपल्यावर प्राण घातक हल्ला करणारांचे म्हणणे ऐकून मलिकने त्यांना आवश्यक तेवढा पैसा देऊन सोडून देण्याचा हुकूम केला. अशा स्वभावाचा तो असल्याने व वरपासून खालपर्यंतच्या आम जनतेत तो प्रीय असल्याने सर्वांनी त्याला संताच्या पदवीत पोहोचविले होते. हा मलिक पीर फकिरांचा एवढा अनुरागी होता की जेथे त्यांचे आगमन होई तेथे तो दौडत जाऊन त्यांचे दर्शन घेत होता व त्यांच्याशी सत्संग चर्चा करीत होता.

सद्गुरु इमामशाह महाराजांच्या चमत्काराविषयी त्याने बरेच काही ऐकले होते, म्हणून त्यांच्या दर्शनाकरिता तो पीराणा येथे जात असे. तेथे गेल्यावर त्याच्या मनाला खरोखरच शांति प्राप्त होई. कित्येक वेळा तो आपल्या मनातील शंकाकुशंका सद्गुरु समोर व्यक्त करी तर सद्गुरु त्याला प्रत्युत्तर देऊन त्याच्या साऱ्या शंकांचे समाधान करीत त्याच्या हृदयाला संतोष होई. एकदा इमामशाहांच्या चरणाजवळ बसून त्याने आपल्या हृदयातली सदिच्छा व्यक्त केली.

दिलमे फकिरी रंग ही छाया, तासे दोलत लगे दुःखदाया।।
फिरभी नेक दिल रखे पियारा, साईसे कबहु न रहे नियारा।।६।।
मालिकको यहा चेन ही पावे, अमदाबादसे दूर न जावे।।
अमदाबादही रहे मुकामा, मलिक उरमे रही यही हामा।।७।।
सुनत पीर इमाम उचारे, मलिक दिल अरमान हे न्यारे।।
दिलकी बाते सोही दिलही बखाने, साई मेरा कछु ओरही ठाने।।८।।
मलिक मोहे कछु ओरही सुझे, बाते तिहारी लगे अबुझे।।
पीर इमामके बेन सुनैया, मलिक साई को आन झुकैया।।९।।
में हूं अबुज ओर कहा जानू, दिल चाहे सोही दिलकी बखानू।।
साया मेरा सब कुछ जानो, होन हार अविगत बखानो।।१०।।

'हजरत साहेब, माझ्या मनात फकिरी रंग जम बसवित आहे. म्हणून दौलतीचा मोह मला राहिलेला नाही. असे वाटते की मालिकच्या शिवाय कधी राहूच नये. या मलिकला येथेच चैन पडते. म्हणून अमदाबाद पासून दूर होण्याचे मनच होत नाही. माझा मुक्काम अमदाबादलाच राहावा म्हणजे हरघडी आपल्या समागमाला येता येईल अशी हृदयात महद् इच्छा आहे.' मलिकचे हे शब्द ऐकताच सद्‌गुरु इमामशाह खडखडाट हसले. ते पाहून खिन्न वदन झालेल्या मलिकने हसण्याचे कारण विचारले, म्हणून गुरुजींनी खुलासा केला. विचार करवून ते म्हणाले, 'मलिक, तुझ्या मनात जी महदीच्छा आहे ती पूर्ण होईलच हे सांगता येत नाही. कारण, तुझे भवितव्य वेगळेच वाटते आहे. तुझ्या मनात जी इच्छा आहे ती मनातच राहिल. भगवंताला जे करायचे असेल तेच होईल. मलिक मला तर स्पष्टच दिसत आहे की तुझी इच्छा अबुज सारखी आहे. म्हणून तू आपल्या धारणेवर मदार बांधत आहेस असे वाटते. पण तुझ्या नशिबाचा खेळ वेगळाच दिसतो.' मलिक म्हणाला, 'बाबा, माझे मन काहीही भविष्य ऐकण्यास खंबीर आहे. भगवंताला काय मंजूर आहे ते जरी मला आपणाकडून समजले तरी मी धीर खचू देणार नाही. आपण स्पष्ट रीतीने खुलासा करावा. माझ्या भगवंताला काय हवे आहे ते जर मला समजले तर आनंदाने त्या गोष्टीला सामोरे जाईन म्हणून आपण निःसंकोचपणाने सांगावे.'

मलिकको वाकिफ करै हो, साई दिलकी तपत बूझै हो॥
मलिक जो तेरे मन भाये, तू चाहे मै यहाही रहाये॥११॥
यहाँ तोहे रहने न पावे, साई तोहे सोरढ पठावे॥
वहाँ जायके तुमही रहैया, कुछ दगा के भोग हो सैया॥१२॥
वहाँ तुमारी कब्रही होवे, अमदाबाद तुम काहे बिगोवे॥
मलिक यहाँकी आशा तजैया, दिल चाहे ले जावे सैया॥१३॥
साईकी मरजी सोही तेरी बखानो, साई चहेसो चहो दिलजानो॥
होनहार सोही साईके हाथा, मलिक सदा रहो संग संगाथा॥१४॥
पीर इमामको आगम जाना, मलिक अजहु बडा अजाना॥
साई जेही निश्चे कर राखा, सोही पीर इमामको भाखा॥१५॥

'मलिक, तुझ्या मनात तू जे धारलेले आहे ते होऊ शकण्यासारखे नाही. तुझे मन म्हणत आहे की सदा सर्वदा आपण येथेच राहून काळ निर्गमन करावे. पण तसे होणार नाही कारण भगवंताच्या मनात तुला सोरठला पाठवायचे आहे. तेथेच तुला निवास करावे लागेल. तेथे गेल्यावर तुझ्यावर दगा फटका होईल आणि त्या भुमिवर तुला कायमचे झोपावे लागेल. तुझी कबर तेथेच होईल. म्हणून अमदाबादमध्ये राहण्याचे स्वप्न तुम्ही रंगवू नका. अमदाबाद तुमच्याकरिता नाही म्हणून येथील आशा

सोडून द्या. भगवंताला जे मंजूर आहे तेच आपणाला मानावे लागते. कारण भावी होणारा भविष्यकाळ भगवंताच्या हातात आहे. म्हणून आपण नेहमी त्याच्याच संगतीत राहावे.' सद्गुरु इमामशहांच्या मुखातून ही स्पष्ट वाणी ऐकताच मलिक खरोखरच उदास बनला आणि म्हणाला, 'हझरत, आपण मला भविष्याचा भेद सांगितला त्या विषयी माझ्या मनात थोडीशीही जाण नव्हती. ते भविष्य आपण मला समजावून सांगितले. आपण खरोखर महान आहात.' असे म्हणत मलिक सद्गुरुचरणावर झुकून पडला. त्यांला उठवून सद्गुरु म्हणाले 'मलिक, भगवंताने जे मंजूर करून ठेवले आहे आणि तुझ्या प्राक्तनात जे लिहून ठेवले आहे तेच मी सांगू शकतो. या शिवाय मी दुसरे करू ही काय शकणार!' मलिक म्हणाला, 'बाबा, आपल्या कृपेने आता माझा राहिला साहिलेला मोह सुध्दा नष्ट झाला. अमदाबादला राहण्याचा माझा जो मोह होता तो निघून गेला. आता मी थोडया दिवसाचा मेहेमान म्हणून अमदाबादला राहून भगवंताने नियत केलेल्या स्थळी निघून जाईन. अमदाबादला राहण्याची खोटी आशा उराशी बाळगून मोह ममतेत राहण्यात काय अर्थ?'

अब तो मोहे हो गये यकीना, अमदाबाद रहना दिन छीना॥
अेक दिन यहाँसे दूर हे जाना, मलिक काहे बगावे बहाना॥१६॥
महंमद मलिक क्यो भये निराशा, वे दिन दूर रखो कुछ आशा॥
अब तो यहाँ तुम ठाढे रहैया, जबतक तोहे पठावे न सैया॥१७॥
साया आज हम अेसी जानी, अबतक फिरे नाहक गुमानी॥
पीर इमामको परदा उठा, मलिकको निजवतन पिछनाया॥१८॥
अमदाबादसे लग रही यारी, यहाँकी यहाँ रहे दुनियादारी॥
सोरठकी कर हुं तैयारी, मिजमाना ठाढे दिन चारी॥१९॥
मलिक दिलमें क्यों दुःख लाया, बूझे सोही साई सुनाया॥
महंमद मलिक बाते भूल जैहो, साईकी रहम सदा सुख पैहो॥२०॥

मलिकच्या चित्ताची व्यथा जाणून सदगुरुंचेही हृदय खिन्न झाले. ते त्याच्या मनाचे समाधान करण्याकरिता म्हणाले, 'मलिक, तू एवढा निराश कां बरे होतोस. मनात कांहीतरी आशा आणि उमेद ठेव. जोपर्यंत भगवंताचा आदेश येत नाही तो पर्यंत तर तू येथे शांत चित्ताने राहा.' 'बाबा, तुम्ही म्हणता ते सत्य आहे. पण अद्याप पावेतो माझ्या मनात जो एक प्रकारचा अभिमान होता तो आपल्या या स्पष्टीकरणाने समूळ नाहिसा झाला. त्यायोगे माझ्या मनाची भ्रांति व भटकंती दूर झाली. भूतकाळाचा पडदा आपण हटविला. आणि भविष्य काळाचे यथार्थ दिग्दर्शन आपण करवून दिले म्हणून या मलिकला आता आपल्या कार्यक्षेत्राची जाणिव झाली. अद्यापपावेतो मला जी एक प्रकारची ओढ अमदाबाद विषयी लागली होती ती

इथल्या इथेच राहिल आणि आता सोरठला जाण्याची तयारी करावी लागेल.' त्याचे बोलणे ऐकून सद्गुरु म्हणाले, 'मलिक, आपल्या हृदयात तू अशा प्रकारचे दुःख का बरे आणीत आहेस? तू जाणण्याची इच्छा व्यक्त केलीस म्हणून मी भावीचा भेद तुला समजावून दिला जे झाले आणि जे व्हायचे असेल ते सर्व विसरून जा. सदासर्वदा ईश्वराच्या दयेचा विचार करीत जा. त्यायोगेच तुझ्या हृदयाला खरी शांति प्राप्त होईल.

पीर इमामको बहुरी झुकैया, मलिक अपने धाम चलैया॥
बीत गये दिन कही नही जाना, याद नही कहा होंगे गवाना॥२१॥
काळ बीते जिन्दा हुई कहानी, महंमद शाह हुकम दिलजानी॥
मलिक झालाबाडमें जै हो, जाणदार अमरून मे रहैया॥२२॥
शाही हुकम थे शिर झुकैया, मलिक सोरठ देश चलैया॥
अमरूनमें कुछ दिन बिताया, होन हार हुई लिखे साया।२३॥
महमंद मलिक दगासे मरैया, आरामगाह अमरून हो गैया॥
मलिककी वहाँ कब्र बनाई, पीर इमामको आगे लिखाई॥२४॥

जे जाणावयाचे होते ते इमामशाहांनी खुल्या रीतीने समजावून दिले. मलिकला भविष्यकाळ समजून चुकला म्हणून तो स्वस्थ झाला. तो शांत चित्ताने उभा राहून सद्गुरु चरणाला वंदन करून तेथून निघून गेला. तो आपल्या घरी आला. बरेच दिवस व्यतीत झाले. एके दिवशी अचानक सुलतान महंमद बेगड्याचा हुकूम आला आणि त्याला अमदाबाद सोडून सोरठला जाण्याचा आदेश मिळाला. ही घटना ऐतिहासिक ग्रंथ 'मिराते सिकंदरी' या पुस्तकात अशा रीतीने आलेखित केलेली आहे.

थोड्या दिवसांनी सुलतानने मलिका अमरून याठिकाणी जे गुजरातच्या सरहद्दीवर आहे आणि मोरबीहून दहा कोस दूर झालावाड प्रान्ताच्या हद्दीवर आहे. तेथील ठाणेदार म्हणून नेमले व रवाना केले. ते मूर्तिपूजकांचे मुख्य स्थान होते आणि मतांध लोकांचे वास्तवस्थान होते. जेव्हापासून त्याने त्या इलाख्यात पाय ठेवला तेव्हापासून तेथील मूर्तिपूजकांशी लढाई झगड्यात तो उतरला. एके दिवशी भूज येथे जी कच्छची राजधानी आहे तेथील मूर्तिपूजकांशी लढाई करण्यास तयार झाला. त्यांनी मलिकला पळवून लावले. तीन दिवसपर्यंत सागरी रणातून पळ काढून तो वस्तीच्या भागात आला आणि विश्रांतीसाठी एका झाडाखाली बसला. बसताबरोबर त्याला झोप लागली. जेव्हा तो जागा झाला तेव्हा त्याने पाहिले कीं आपल्या बरोबरच्या शिपायांनी त्यांचे घोडे जवळच्या ज्वारीच्या शेतात चरावयास सोडलेले आहेत. त्याने त्यांना बोलाविले आणि म्हटले, 'मित्रांनो, परमेश्वराचेही तुम्हाला भय नाही?

परक्याचा माल तुम्ही हस्तगत करीत आहांत!' शिपाई म्हणाले, 'अहो साहेब, आज बरोबर तीन दिवस झाले माणसांनाच काय पण घोड्यांना सुध्दा खाण्याची चिज नजरेस पडली नाही. आम्ही तर खुदाचे भय बाळगतो पण आमच्या या घोड्यांना एवढी समज कोठून असणार?' मलिक म्हणाला, 'परमेश्वराच्या भयाने जर तुम्ही एवढी सहनशिलता बाळगता तर तुमच्या घोड्यांनी सुध्दा ती बाळगायला हवी.' असे म्हणून त्याने आपल्या घोड्याच्या लगाम काढला व एका हिरव्यागार शेतात त्याला सोडून दिला तो काय चमत्कार एका काडीलाही घोड्याने तोंड लावीले नाही. शिर झुकवून तो तसाच उभा राहिला. तेथील हिंदु लोकांनी सुध्दा स्वत: नजरेने तो चमत्कार पाहिला व ते लोक मलिकच्या स्वाधिन झाले. अमरूनच्या जमिनदाराने सुध्दा त्यांच्या राहण्याची, खाण्यापिण्याची जबाबदारी स्विकारून त्याच्या सेवेत जोडला गेला.

जमिनदारामध्ये एक सैतानी महत्वाकांक्षी स्वभावाचा मनुष्य होता. त्याने मलिकला म्हटले की, 'आमच्यामध्ये अमुक अमुक एक असा लढवय्या शूर गरासिया आहे व त्याच्याजवळ एक पाणीदार तलवार आहे की त्याला किंवा त्याच्या तलवारीला जोडच मिळणार नाही. जेव्हा तो येईल तेव्हा त्याच्या म्यानेतून ती तलवार खेचून दाखवा आणि पाहा. कारण ती तलवार पाहण्यालायक आहे.' त्या विघ्नसंतोषी मनुष्याने गरासीयाला सुध्दा चिटकवून दिले की मलिकने दगा करून तुला मारून टाकण्यासाठी एक घाट घातला आहे जर तुला खोटे वाटत असेल तर तपासून पहा मलिक तुझ्या हातातून तलवार हिसकावून म्यानातून बाहेर काढेल ती तुला मारून टाकण्याची निशाणी राहिल असे त्याने अगोदरच ठरवून ठेवले आहे. ती इशारा देण्यासाठी तुझी तलवार बाहेर काढून दाखवील सावध राहा.' गरासीयाला त्या धूर्त माणसाचे म्हणणे खरेच वाटले. त्याने आपल्या हाताखालील नोकरांना सुध्दा सचेत केले व सांगितलें की माझ्या हातातून मलिक तलवार घेऊन म्यानाबाहेर काढिल तेव्हाच सर्वांनी पुढे होऊन त्याला ठार मारून टाकावे. जेव्हा गरासीया मजलस मध्ये आला तेव्हा मलिकला एवढ्यामोठ्या कारस्थानाची खबर नसल्याने त्याने सहजतेने गरासीयाच्या हातून तलवार घेऊन पाहण्यासाठी म्यानबाहेर काढली तेवढ्यात गरासीयाच्या सोबत्यांनी एकदम तुटून पडून मलिकला ठार केले.

मलिकच्या चरित्रावरून त्याच्या शत्रुपेक्षा चाहत्यांचीच संख्या अधिक होती. त्याच्या सर्व सोबत्यांनी त्याची कबर बांधली व जवळचे अथवा दूरच्या लोकांनी सुध्दा त्याचा वार्षिकोत्सव उजवून मानमान्यता सुरु केली. लोक अनेक आशा इच्छा कामना मनात बाळगून त्याच्या कबरेची पूजा करीत व आजही करीत आहेत. त्याच्या मरणानंतर

त्याचे बरेच चमत्कार बाहेर प्रसिध्दिस आले. अशा रीतीने मलिक महंमदची कबर सोरठच्या धरतीवर बांधली गेली. ती बाबत सद्‌गुरु इमामशाहांनी त्याला आधीच समजावून सांगितली होती त्या प्रमाणेच घटना घडून आली.

संत नायाजी म्हणतात की, 'गुरुजी आपण तर सर्व काही आगम निगम जाणणारे आहात तर आमचा सुध्दा कांही तरी विचार करा. आम्हाला पण कांही तरी आगम चेतावणी द्या व सावध करून या भवसागरातून पार उतरवून न्या!'

नायाजी गुरु जाणनहारा, साई हमरा कुछ करो हो विचारा।२५।।

★ ★ ★

# ३९. साईको चहे सोही साईका कहावे.

साफ ही साफ कहो मुख शाही, फकिरासे रूठे फकिरा सोही नाही।।
इमामहीसे जाय मिलैया, ताथे इमामके सहारे गैया।।१।।
फकिरा फिरभी किये बिचारा, बडी हिम्मतहीसे पग धारा।।
याकुतशाह फकिराको हामा, जाय पहूँचे इमामके धामा।।२।।
सायाजी बहु दूरसे आया, ख्याती इमामकी सुनकर आया।।
साईको कदमोमे मोहे रखैया, अपना जान मोहे सुख पैया।।३।।
जूठ बात कैसे बताये, फकिराकी मिजलससे आये।।
रमजूकी गत देखके धाये, कसाई कैसे कुफराना दिखाये।।४।।
छूरी उठाई किस्तमे धाये, तौहिद उनकी उनको सताये।।
तमे फकिरा क्यो हुवे संगा, फकीराको नही हे यही ढंगा।।५।।

सद्‌गुरु इमामशाहांनी स्पष्ट शब्दांत सांगितले होते कीं, 'जे फकिरांशी रूसून वागतील, जे फकिरांचा द्वेष करतील ते खरे फकिर नव्हेत.' या गोष्टीची फकिरांच्या मिजलसमध्ये खूप चर्चा झाली. खूप विचार केल्यानंतर अमदाबादमधिल फकिर शांत झाले. कारण खुल्या रीतीने द्वेष केला तर आपण खरे फकिर नाही, खोटे आहोत अशी लोकांची खात्री होईल म्हणून उघड द्वेष न करता पडद्याआड मात्र बुराईचा उपयोग करू लागले. याकुतशाह नावाच्या एका फकिराने हिंमत करून सद्‌गुरु इमामशाहाजवळ येण्याचे धैर्य केले. पीराण्यास येऊन सद्‌गुरु इमामशाहांच्या चरणी झुकून तो म्हणाला, 'बाबा, मी फार लांबून आलेलो आहे. आपली ख्याती ऐकली म्हणून आपल्या चरणी आलो आहे. मला आपला जाणून या चरणाजवळ ठेवून घ्या.' त्याचे हे शब्द श्रवण करताच इमामशाह म्हणाले, 'फकिरा, परमेश्वर भक्तीत आपल्या जीवीताचे कल्याण मानणारा असून तू एवढे खोटे बोलणे कोठून शिकलास. तू अमदाबादहून फकिरांच्या मिजलसमधून आलास. रमजूची गति जाणून तर आला नाही ना! पण

त्या कसायाने क्रुरता दाखविली याचा तुम्ही विचार केला नाही. सुरा उचलून तो अंगावर धावून आला. त्या गुन्हयाची शिक्षा तो भोगत आहे. हे जाणून सुध्दा तुमच्या मनातील द्वेष अजून कमी होत नाही ही शरमेची गोष्ट आहे. फकिरीला लाजविणारी ही गोष्ट आहे.

इमामसे चाहे रहो दूरा, साहिबसे रहो हाल हजूरा ॥
मे तो हुं साहिबका प्यारा, फकिराको जेही साई पियारा ।६॥
याकुतशाह कपट दिलठानी, साई मुखसे कह्यो बखानी ॥
शरमिंदा हो गये फकिरा, झुक गये सच हो तुमी पीरा ॥७॥
पाक दिदार आजही पाये, फकिराकी हुई सुफळ कमाये ॥
फिरे बहुरी हाल फकिरा, आज़ ही नैन दिखेरी पीरा ॥८॥
याकुत मैं हूं दीनका बंदा, दीनको मैने कबहु न छंदा ॥
फिरभी कसम लिये मुलताना, ताथे दीन मुरीद नही माना ॥९॥
हिंदवा को मैने मुरीद करैया, फकिरा कहे क्यो मुख फिरैया ॥
दीनंसे रूठ गये पीर इमामा, झुठ ही बात किये किस कामा ॥१०॥

'सदगुरु इमामशहापासून वाटले तर दूर रहा पण भगवंताच्या सदैव निकट राहा, मी भगवंताचा प्रीय आहे. भगवंताला फकिरी प्रीय आहे म्हणून मी सुध्दा फकिरांचा प्रीय आहे. मग वेगळेपणाची गोष्टच काय! याकुतशाह, साईची केवळ परिक्षा पाहाण्याकरितां आपण कमर कसलेली आहे.' इमामशाहांच्या मुखातून ही गोष्ट ऐकताच याकुतशाह शरमिंदा झाला आणि दीनतेने झुकून पडला. तो म्हणाला, 'हुजूर तुम्ही खरोखरच पवित्र हृदयाचे पीर आहात. आज मला परमपवित्र महात्म्याचे दर्शन घडले. माझ्या जन्माचे सार्थक झाले. कित्येक वर्षापासून मी फकिरीत फिरत आहे पण आज मला खऱ्या फकिरीचा जल्वा दिसून आला.' सद्गुरु म्हणाले, -याकुत, मी खरोखरच दीनचा (धर्माचा) बंदा आहे आणि दीनहून मी कधीच मुख मोडणार नाही पण मुलतानला प्रतिज्ञा केल्याप्रमाणे दीन मधिल लोकांना मी शिष्य बनवू शकणार नाही त्यांना मार्गदर्शन अवश्य करीन पण दीक्षा देऊ शकणार नाही याचा अर्थ असा नव्हे की मी फकिरीच्या विरूध्द आहे! मी अमलात आणावयास लावणारी धर्मतत्वे दीनचे लोक मानत नाही. हे मुख्य कारण आहे. लोक माझ्या नावाने अपप्रचार करतात की इमामशाह दीनवर रूसले आहे. पण वस्तूत: तसे नाही. माझे हृदय दीन दु:खी यांच्या सेवेकरीतां तळपते हे तुम्हाला कसे दाखवून देऊ!'

इमामको सबही हे अेका, कहां हिंदवा कहां दीन बिवेका ॥
कैसे पीराणा टेक छुडावे, फकिरा तामे नफा नही पावे ॥११॥

तुमभी फकिरा हमभी फकीरा, साहिब मेरा हाल फकीरा॥
फकिरासे हिलमिल रहैया, तामे रीझे मेरा सैया॥१२॥
याकुतको बडा सुख पाया, झुक झुक साईको हुवे बिदाया॥
बेर बेर चहे पीर दीदारा, याकुतको लगे साई पियारा॥१३॥

'गुरु इमामशाहाला सर्वच एक आहे. कोणी हिंदु असो अथवा दीनचा बंदा असो. तरीपण तुम्ही माझी प्रतिज्ञा मोडण्याकरितां जे प्रयास करीत आहांत त्यात तुमचा फायदा होईल असे वाटत नाही. तुम्ही फकिर आहांत. इमामशाह सुध्दां फकीरच आहे. भगवान पण फकिरीतच प्राप्त होणारा आहे. हे जाणल्यानंतर फकिराशी फकिराप्रमाणे चालण्यात वागण्यातच आपले हित आहे. ज्यायोगे माझ्या हृदयाला सुध्दा आनंद होईल.' सद्गुरु इमामशाहांचा हा उपदेश ऐकून याकुतशाहच्या हृदयात खरोखर शांति प्राप्त झाली. त्याने विनम्रभावाने सद्गुरुंना प्रणाम करून त्यांचा निरोप घेतला. त्यानंतर तो बऱ्याच वेळा पीराण्यास आला आणि सद्गुरु इमामशाहांचे दर्शन करून खरी शांति प्राप्त करू लागला. संत नायाजी म्हणतात जे साईला चाहतात ते भगवंताचेच होऊन राहतात.

नायाजी सद्गुरुको चहावे, साईको चहे सोही साईका कहावे॥१४॥

★ ★ ★

## ४०. काळूपूरची स्थापना.

महंमदशाह इमामकी यारी, साई मिलन चहे दिलदारी॥
पीर इमामको मिलनेही आया, ता दिन कालु गुलाम संग लाया॥१॥
कालु गुलाम तेरे मन भावे, कालु बीना मोहे चेन न आवे॥
कालु सदा रहे मुज संगा, कालुसे कुछ नही छिपैया॥२॥
कालु बडा लगे गुण ग्राही, बेवफाई कब हु न करही॥
साई कहे पतशाही सुनैया, अैसे नेक बहुरी न मिलैया॥३॥
साई गेबकी बाते सुनाई, शाहका दिल गये लुभाई॥
मोहे आज मिल गये पीराना, सुफळ हो गये दिदारका बहाना॥४॥
महंमदशाह झुक झुक चलैया, कालू ता दिनसे सुख पैया॥
साई इमामका चहे दिदारा, कालू हो गये साईका प्यारा॥५॥

सुलतान महंमद बेगडयाची सद्गुरु इमामशहावर निष्ठा होती आणि त्यायोगे त्यांची चांगली गट्टी जमली होती. बऱ्याच वेळा अमदाबादहून तो पीराण्यास येत

असे. एकदा त्याच्या सोबत त्याचा एक गुलाम कालू सुध्दा आला होता. सुलतानबरोबर तो सुध्दा गुरु इमामशहांचे दर्शन घेण्यास त्यांच्या समोर गेला असता सुलतान ने त्याजविषयी सद्गुरुंना दिलखुलास पणाने सांगितले कीं, 'हुजूर हा कालू माझा गुलाम आहे पण गुलाम म्हणून मी याला वागवत नाही. कारण, तो माझा खास दिलजान आणि प्रिय आहे. मला त्याच्याशिवाय चैन पडत नाही, मी ज्या ठिकाणी जातो तेथे माझ्याबरोबर कालू असतो एवढेच काय पण माझी कोणतीही गुप्त का गोष्ट असेना कालू ती सुध्दा जाणून असतो. माझ्या त्याच्यावर एवढा विश्वास आहे की तो कधीच बेईमान होणार नाही.' अशा रीतीने सुलतानने आपल्या नोकराची तोंड भरून स्तुति केली. ते ऐकून सद्गुरु म्हणाले - 'सुलतान साहेब, आपल्या नोकराची आपण एवढी वाखाणणी केली ती बरोबरच आहे. असा विश्वासु मनुष्य आपणास दुसरा कोणीही मिळणार नाही. त्याच्यात खरोखरच सत्य आणि सचोटीची भावना आहे.' सद्गुरुंनी सुध्दां कालू विषयी आपला दृढ अभिप्राय व्यक्त केला. ते ऐकताच सुलतान म्हणाला, 'बाबा, आतापर्यंत ही गोष्ट माझ्या मनात ठसली होती. माझ्या अंतर्मनात कालूंच्या भावनेविषयी थोडीशी शंका होती पण आपण जेव्हा दृढतेने त्याच्या निष्ठेबद्दल सांगितले तेव्हा सर्व सत्य गोष्ट समजून आली. आज माझ्यावर आपली खरोखरच मोठी कृपा झाली. दर्शनाकरिता येण्याच्या हेतुने आज माझे महत्कार्य झाले. अशा रीतीने खुल्या दिलाने खुलासा करून सुलतान महंमदशाह सद्गुरुंना नमन करून जायला लागला त्याच्या बरोबर कालूने सुध्दा सद्गुरुंच्या चरणावर शिर झुकविले व तेथून ते रवाना झाले.

कालूच्या हृदयात आता ठाम मत झाले की सद्गुरु इमामशाह हे खरोखरच नेकीचे चाहक आहेत. सत्य ओळखणारे आहेत. जर असे नसते तर आपल्या हृदयाची निर्मळता त्यांनी जाणलीच नसती. अशा रीतीने वर्णन करणे हे सत्य निस्पृह निरपेक्ष ज्ञानाशिवाय शक्य नाही. या वरूनच स्पष्ट होते की सद्गुरु इमामशाह हे केवळ सामान्य पीर फकिर नाही तर आगम-निगम जाणणारे महापुरुष आहेत.' कालूच्या हृदयात सद्गुरु इमामशाहविषयी अशा प्रकारचा अनुराग जागृत झाला. तो त्यांच्या दर्शनाकरितां हरदम पीराण्यास येऊ लागला. सद्गुरुंना नमन करून त्यांचा चरणाजवळ घडी दोन घडी बसू लागला. सद्गुरुंच्या मुखातून विमल उपदेश ऐकून मानसिक शांति तो अनुभवू लागला.

कालूच्या या अनुरागाने सद्गुरुंच्या हृदयात त्याच्याबद्दल खरोखरच दयाभाव प्रगट झाला. एकेदिवशी आनंदाच्या भरात असता सद्गुरुंनी त्याला आशिर्वाद दिला. ते म्हणाले - 'कालू, एक समय असा येईल की तू खरा अमीर होशिल!' कालू म्हणाला,

'बाबा, हे तुम्ही काय सांगता? आपण म्हणता तसा योग या जन्मी तरी येणे शक्य नाही. अहो गुरुजी, काही एक भवितव्य नसलेला मी एक गुलाम मनुष्य अमीर कसा बरे होऊ शकेल'. 'कालू, वाटेल ते असो पण काही काळानंतरच तू अमीर होशील हे निश्चित आहे. यात तिळमात्र फरक होणार नाही.' अशा रीतीने संताने दृढतेने त्याला सांगितले ते ऐकताच काळूच्या हृदयात दृढ अनुमान झाले कीं, 'संताचे वचन आजपर्यंत असत्य झाले नाही आणि असत्य बोलून त्यांना काय मिळवायचे आहे. सद्गुरु महाराज सांगतात ते सत्य झाले तर खरोखर आपला भाग्योदय होईल.'

रहम खुदाकी दुवा करे पीरा, कालू हो गये बडे अमीरा।।
फिर भी संत दिदारको चहावे, पीर कदमोमे शिर झुकावे।।६।।
दोलत मिली तो क्या हो गैया, दिलसे कबहु न साई भूलैया।।
हाजी कालू पतशाहका प्यारा, कालू नाम साईको प्यारा।।७।।

काही काळ लोटला आणि भगवंताच्या दयेने व सद्गुरुंच्या आशिर्वादाने कालूचा भाग्योदय झाला. एके काळचा गुलाम हाजी कालू आज खरोखर धनाढ्य अमीर झाला. सुलतानने प्रसन्न होऊन त्याला काही जहागीर दिली पण सचोटीची व सद्भावनेची गोष्ट अशी की जरी तो अमीर झाला-दौलतगीर जरी झाला तरी पण सद्गुरुंच्या स्मृतीला तो विसरला नाही. सद्गुरुंच्या दर्शनास तो पीराण्यास येई शांत चित्ताने त्यांच्या चरणाजवळ बसून त्यांच्या उपदेशाचे २-४ वाक्ये ऐकून त्याच्यावर मनन व चिंतन करून मानसिक शांति अनुभवीत असे. घडी दोन घडी त्या महापुरुषाजवळ बसून मायिक उपाधीतून मुक्त होण्याचा प्रयत्न करून चित्तशांतीचा आस्वाद घेऊन त्यांचा निरोप घेई. नित्यक्रमाने हा त्याचा नेम असे.

एके दिवशी सद्गुरुसमोर त्याने आपल्या हृदयातली भावना व्यक्त केली. तो म्हणाला, 'बाबा, एके काळी मी एक पामर गुलाम होतो. दैवयोगाने आपल्या सारख्या महापुरुषांच्या कृपा आशिर्वादाने हे अढळक धन मिळाले आहे. माझी पूर्ण खात्री आहे की हे धन माझे नव्हते व पुढेही याचा मला काही उपयोग नाही. माझी बरी वाईट करणी हेच माझे खरे धन आहे. पण हे जड द्रव्य मिळाले आहे त्याचा योग्य सदुपयोग करून योग्य ठिकाणीच त्याचा व्यय करावा असे मला वाटते तर काय करावे हे आपण मला सांगावे.' 'शाबास काळू शाबास, धन्य आहे तुझे विचार तू खरोखर आपल्या जन्माचे सार्थक केलेस. साईच्या मार्गदर्शनाने तुला यथार्थ ज्ञान समजले. तू आपल्या धनाचा सदुपयोग अशा रीतीने कर की ज्यायोगे गोर गरिबांची सेवा घडेल. तुझे नावही आजरामर होईल व गरीब जनतेचे

सुध्दा कार्य होईल. यासाठी तू निवासस्थान बांधून दे.' संताने सत्कार्यास संमति दर्शवून मार्गदर्शन ही केले. त्याप्रमाणे हर्षोल्हास अंत:करणाने काळू आपल्या धनाचा सदुपयोग करण्याच्या कामात गढून गेला. अमदाबादमध्ये एके ठिकाणी कोटाच्या पूर्व बाजूला त्याने एक वसाहत बांधली. त्याने हा जो एक मोठा लत्ता बांधला त्यालाच काळूपूर नांव पडले. त्याच्या उदारतेने एकेवेळेस ओसाड निर्जन असलेला भाग माणसांच्या हालचालीने गजबजला, या भागात माणसांची वर्दळ सुरु झाली. तो भाग हल्ली सुध्दा खूप गजबजलेला व प्रख्यात आहे. पण त्याचा मूळ इतिहास फारच क्वचित लोकांना माहित आहे. जनता कदाचित काळूला विसरतील पण त्यांने निर्माण केलेल्या काळूपूरला कोण विसरेल! त्या रूपाने हाजी काळू अमर झाला.

सोही काळूके उरमे भाया, काळूपूर उनहीमें बसाया।।
साई रहमसे सब कुछ पावे, नाया साईको शिर झुकावे।।८।।

सद्‌गुरु इमामशाहांच्या दयेने आणि कृपेने जे कांही प्राप्त होते ते जीवीताचे सार्थक करणारे- असते हे काळूला पूर्णपणे समजले म्हणून संत नायाजी सद्भक्तांना सांगतात की, 'हे दिनदयाळू कनवाळू गुरु महाराज मला आपल्या चरणारविंदी असे स्थान द्या व माझी मति, बुध्दि अशी प्रकाशित करा की ज्यायोगे आमच्या जन्माचे सार्थक होऊ शकेल!'

★ ★ ★

## ४१. मनखाजी आहिर.

मनखाजी आहिर सुजाना, सद्‌गुरुके चरण चित्त ठाणा।।
विसनगर ठाये मुकामा, अमदाबाद आये गुणवाना।।१।।
पीराणासे पीरको पेखे, साई इमामका दर्शन लेखे।।
सद्‌गुरुको बुझे महाना, तासे कबहु न होवे हाना।।२।।
बडी कृपा गुरुदेवकी सहाया, मनखाजीको बहूत धन पाया।।
सुखमे दिन संसार बीतैया, अेक दिन रैनको धन चुरैया।।३।।
भोरही दिखे धन रहैया, हाय हाय मेरा सबही बिलैया।।
रोने लगे घरके सब साथा, मनखाजी कुटने लगे माथा।।४।।
अब तो मेरी गती कहा होई, बिरध उमर अब कैसे जीवाई।।।
पासमें कुछ रही नही पुंजी, और गरथ कछु नाही दुजी।।५।।

मनखाजी नावाचा एक आहिर भक्त बिसनगरात राहात होता. सद्गुरुंच्या चरणी त्याचा अनन्य अनुराग होता. सद्गुरु दर्शनाकरिता एकदा तो अमदाबादला आला आणि पीराण्यास जाऊन सद्गुरुंचे दर्शन घेतले. सद्गुरुंच्या यथार्थ स्वरूपास ओळखून त्याने सद्गुरुंची अनन्य भावे सेवा पूजा केली होती. त्याची हानी कधीच झाली नाही. सद्गुरुंच्या कृपादृष्टीनेच तो सद्भागी बनला होता. एके समयीचा गरीब मनखाजी सद्गुरुंच्या कृपेने हळू हळू धनवान झाला.

बराच काळ सुख समाधान आनंदात गेल्यानंतर एके दिवशी अचानक एक दुर्दैवी घटना घडली. रात्रीच्या वेळी चोरांनी त्याच्या घरात घुसून सर्व धन गोळा करून सकाळ होण्याच्या आत धन घेऊन पसार झाले. सकाळी मनखाजी जागा झाला. पाहतो तो आपले सर्व धन चोरीला गेलेले त्यास आढळून आले. धन गेले म्हणून घरातील सर्वच जण मोठमोठ्याने रडून विलाप करू लागले. मनखाजी पण अधिर बनून शिर बडवू लागला. आपल्या वृध्दावस्थेत आता आपले कसे होईल. आता आपल्याला कोण साहाय्य करील. आता हे दुःखाचे दिवस कसे कंठावे? आपल्या जवळ तर आता दुसरी पुंजी सुध्दा नाही. शेती नाही की त्याच्या सहाय्याने जीवन कंठता येईल. अशा रीतीने एकाच रात्रीत तो पूर्ण निर्धन बनून गेला आणि अत्यंत अधिर बनून अश्रुपात करू लागला.

बिकल हुई के खोज लगाये, चोरका काहु पता नही पाये।।
उरमे गुरुका बडा विश्वास, मनखाजीको गुरुदेवकी आस।।६।।
सोचके अमदाबाद चलैया, प्रगट पीराणा धाममे सैया।।
विनयसे गुरुको शिर झुकाये, मनखाजी कैसे मुरझाये।।७।।
दिलकी गति गुरुदेवको जानी, देखतही सोही किये बखानी।।
मनखाजी तुने धनको खोया, धनके लिये तुम बहुतही रोया।।८।।
रेनको चोरी करे किराता, जेठीया नाम सोही विख्याता।।
जेठिया मुझसे आय मिलैया, साई मैने खूब चोरी करैया।।९।।
मनखाजीके घर मैने फोडे, धन पाया पहूँचे मन कोडे।।
ता दिन मैने दिया उपदेशा, भक्तनके धनसे जगे क्लेशा।।१०।।

मनखाजी अत्यंत व्याकुळ होऊन खूप शोध तपास करू लागला. पण चोराचा पत्ता लागला नाही म्हणून तो अत्यंत निराश झाला. हताश होऊन तो एकांतात जाऊन बसला. इतक्यात त्याच्या हृदयात एकाएकी सद्गुरुंचे स्मरण झाले. अशा कठिण समयी केवळ सद्गुरुशिवाय सहाय्य करू शकेल असे कोणीही नाही. गुरुदेवच दुःखभंजनहार आणि सुखाचा दाता आहे. त्यांचीच आशा राखली तर कधीच निराश

होण्याचा प्रसंग येत नाही. या गुरुदेवांच्या चरणी जाऊन हृदयाची सर्वच व्यथा सांगून दु:खातून मुक्त होऊन जावे.' असा दृढविचार करून तो विसनगरहून प्रयाण करून अमदाबादला आला. पीराणा धामात येऊन सद्गुरुंच्या चरणी झुकून पडला. त्या समयी त्याचे म्लान झालेले वदन पाहून सद्गुरुंनी हळूच विचारले - 'मनखा, तुझे मुख असे म्लान कां बरे दिसत आहे. एवढी उदासिनता तुझ्या मुखावर कां बरे दिसत आहे!' त्याच्या हृदयाला एक प्रकारचा धक्का पडला होता मनखाजी कांहीच बोलू शकला नाही. परंतु गुरुदेव अंतर्यामी त्याची गति समजूनच गेले होते. ते म्हणाले - 'मनखाजी तुम्ही धन गमावलेले दिसत आहे. त्यासाठी तू रडत आहेस आणि रडून रडून डोळ्यांचे तेजही गमावले आहे. तुझ्या घरात एका किराताने चोरी केलेली आहे. त्या जेठियाचे नाव तर तू ऐकलेलेच आहेस त्याच जेठिया किराताने तुझ्या घरात चोरी केलेली आहे. तू येण्याच्या आधीच तो जेठिया मज कडे आला व त्यानेच मला सांगितले की - 'गुरुदेव मी खूपच मोठी चोरी केली. बरेचसे धन चोरून आणले. मनखाजी आहिरचे घर फोडले तेथे मला एवढे धन मिळाले की माझ्या मनाची आशा सर्व पूर्ण झाली.' त्याचे ते वर्णन ऐकून मी त्याला म्हटले - 'जेठिया, तू हे काय केलेस? अरे तू एका भक्ताचे घर पार धुऊन टाकले हे काही चांगले केले नाही. भक्ताच्या घरी चोरी करून त्याचे सर्वस्व लुटले पण त्याच्याने तुझे जीवन सुखदायक होणार नाही. तुला त्या पासून अपार दु:ख, त्रास, क्लेश भोगावा लागेल. तुझ्या हृदयात खरी शांति लाभणार नाही. तू भक्ताला रडविले आहेस हे फारच वाईट केले आहेस.'

भक्तनके आधिन भगवाना, जेठिया तेरी होयेगे हाना॥
गुरुजी मोहे दियो उपदेशा, कैसे मिटे यह कठिन क्लेशा॥११॥
भक्तनके घरकी यह माया, वापस करदो होवे सुखदाया॥
तासे ताको सुखचेन मिलै हो, जेठिया भक्तनको माहि संतै हो॥१२॥
सद्गुरुको शिर नमाई, जेठिया यहाँसे हुवे बिदाई॥
मनखाजी दिल धीर धरैया, धन तुम्हारा घर पहूचैया॥१३॥
जिनको हे सद्गुरुकी आश, सोही सुभाग मत होवे निराश॥
जिनके हिय गुरुका अनुरागा, सोही जियरा हुवा सुभागा॥१४॥
गुरुजी मेरा गरीब नवाजा, रंक जानके रखे मेरी लाजा॥
मोहे भवमे लियो उबारी, गुरु बीन कैसे गति हमारी॥१५॥

'जेठिया, भक्ताच्या आधिन तो भगवान आहे. तू अशा भक्ताला सताविले आहे की त्यायोगे तुझ्यावर खरोखरच संकटे येतील. तू दु:खी होशिल.' गुरुचे वचन

मानणारा जेठिया त्यांच्या मुखातील शब्द ऐकताच स्तंभीत झाला. त्याला खूप वाईट वाटले. क्षणात त्याच्या हृदयाचे परिवर्तन झाले. तो म्हणाला - 'बाबा, जे झाले ते तर होऊन गेले. आता मी काय करू? मला उपदेश द्या. माझ्यावर अनुग्रह करा की ज्यायोगे माझे हातून असे अन्यायी कृत्ये होणार नाही. ह्या भवसंसाराचे सारे क्लेश, कष्ट, चिंता मिटेल अशी मजवर कृपा करा.' 'जेठिया' प्रथम तर एक काम कर. तू ज्या भक्ताच्या घरातून धन चोरून आणले ते तेथे जाऊन त्यास परत कर. जो पर्यंत तू ही माया भक्ताला परत करणार नाहीस तो पर्यंत तुझ्या आत्म्याला खरी शांति मिळणार नाही. तू त्या भक्ताला त्याची माया परत करशिल तेव्हाच तुझे दु:ख दूर होईल. शिवाय हे जेठिया, तू निश्चित हे लक्षात घे की जीवनात तू कोण्याही भक्ताला सतावू नकोस. जर तू भक्ताला त्रास दिलास तर आपल्याच हाताने तूं संकटे ओढवून घेशिल म्हणून कोणालाही हानी पोहोचेल असे वागू नकोस. भक्त हे भगवंताचे सेवक असतात त्यांना सतावून कोणीही सुखी होत नाही.' अशा रीतीने सद्गुरुंनी त्यास उपदेश केला. तो ऐकून विनयाने झुकून जेठिया तेथून निघून गेला. 'मनखाजी तू हृदयात धीर धारण कर. तुझं गेलेलं धन तुला घरबसल्या प्राप्त होईल. जेठिया येथून गेलेला आहे तो आधी तुझ्या घरी जाईल व तुझे नेलेले सर्व धन परत करून शांति पावेल.' सद्गुरुंनी अशाप्रकारे दृढ सांत्वन केले म्हणून मनखाजीचे हृदय सुध्दां शांत झाले. त्याच्या हृदयात सद्गुरु बद्दलचा जो दृढ विश्वास होता तो सत्यच फळला. 'ज्याला सद्गुरु घरची आशा आहे तो कधीच निराश होत नाही. ज्याच्या हृदयात सद्गुरु प्रति खरा अनुराग प्रेम असते तो भक्त खरोखर सद्भागी बनून जातो. गुरुदेव आपण खरोखर गरीबांचे बेली बनून लाज राखली अशाच रीतीने बुडत असलेल्या मला या बिकट भवसागरातून तारून न्या. आपल्याशिवाय आम्हाला उध्दरण्याची दुसरी गतीच नाही म्हणून आमचे तारणहार व्हावे.'

> सद्गुरुकी आज्ञा पाई, मनखाजी निज घर आई।।
> गया धन वापस घर आया, सबहीके ऊर आनंद छाया।।१६।।
> नाम सद्गुरुका मंगलकारी, निश्चे नाम जपो निरधारी।।
> सद्गुरुसे रहो हजुरा, कबहु गुरुसे न रहियो दूरा।।१७।।

सद्गुरुंच्या चरणी विनयाने शिर नमवून शांतीने बसलेल्या मननखाजीला सद्गुरुंनी आपल्या गावी जाण्यास सांगितले. शांत चित्ताने प्रणाम करून तो आपल्या गावी विसनगरला आला. आपल्या घरी येऊन पाहतो तो आपले चोरीस गेलेले सर्व धन जसेच्या तसेच येऊन राहिलेले होते. आणखी विशेष म्हणजे ज्याने चोरी केलेली

होती तो जेठिया किरात हे सुध्दां सांगून गेला होता की, 'मनखाजी भगवंताचा सच्चा भक्त आहे. त्याच्या घरचे धन मला पचविता येणार नाही. मी पीराण्यास गेलो होतो. तेथे गुरु महाराजांनी मला सत्य समजाविले आणि सांगितले कीं अशा भक्ताला सतावण्याने बरबाद होशिल.' 'अशी गोष्ट गुरु मुखातून ऐकल्यामुळे माझ्या हृदयात थोडा ज्ञानप्रकाश पडला आणि मनखाजीची मायापुंजी परत देण्याकरितां आलो आहे. मनखाजी घरी आल्यावर त्याला माझा प्रणाम सांगावा, जेठिया किरात वारंवार प्रणाम सांगून गेलेला आहे असे जरूर सांगा.' असे सांगून तो निघून गेला. मनखाजीने हे सर्व ऐकले. त्याच्या मनात दृढ निश्चय झाला की सद्गुरुचे नाव खरोखरच मंगलमय आहे. त्या नांवाचे नित्य स्मरण करायला हवे. अशा दिनदयाळू सद्गुरुंच्या सदैव सन्निध राहावे. त्यांच्यापासून कधीच दूर राहू नये आणि त्यांच्या नामावाचून कधीही अंतराय पडू देऊ नये. भक्त मनखाजीच्या हृदयात सदैव ही भावना दृढ झाली. तो सजाग झाला. त्याने आपल्या धनाचा उपयोग गोरगरीबांच्या मुलाबाळांना शिक्षण, कपडालत्ता, अन्नदान व औषधोपचाराकरिता स्थाई रूपाने केला व नंतर सर्वसंगपरित्याग करून सद्गुरुंच्या सेवेत जोडला गेला. संत नायाजी पण आपणास हाच उपदेश देतांना सांगतात की सद्गुरुंचे यशोगान करा. त्यांच्यामुळेच तुम्ही या लोकी व परलोकीही सुखी व्हाल.

नायाजी कहे गुरुका यश गाओ, तासे तुम जीयरा सुख पावो ॥१८॥

★ ★ ★

# ४२. गोजारी आहिरण.

माकोजी आहिर सुखराशी, सद्गुरु दर्शनका प्यासी ॥
असारवासे पीराणा आये, सद्गुरुके चरण शिर नाये ॥१॥
गोजारी आहिरकी नारी, माकोजी घर सती सन्नारी ॥
दंपति गुरु दर्शनकी प्यासी, गुरु बीन नही औरनकी आशीक ॥२॥
गुरुमे दिल लग गये नीके, आन जगत सब लागै फिके ॥
तीन पुत्र घर दिशे गुलजारा, लक्ष्मी देवीकी करूणा अपारा ॥३॥
सुख शांतीमे दिन गुजारे, स्वर्गसमान लगे संसारे ॥
आन अचानक भावी कोपे, लक्ष्मी चला हो गई लोपे ॥४॥
बडे पुत्र बिछाना सोया, देखत उनके आयु बिलोया ॥
पुत्र मरण महा दुःखकारी, भवमें सचमुच गै हो हारी ॥५॥

माकोजी नावाच्या आहिर भक्ताचा सद्गुरू इमामशाहावर अनन्य अनुराग होता. असारवा गावाहून तो पीराण्यास गुरू दर्शनास येत असे. गोजारीबाई ही आहिराची पत्नि खरोखरच सती सन्नारी होती. ह्या दोघांचा गुरू इमामशाहावर असा दृढभाव होता की त्यांच्याशिवाय ते कोणाची आशाच करीत नव्हते. सद्गुरूंच्या चरणी त्यांचे अशारीतीने प्रेम जडले होते की त्यांच्याशिवाय सारे जगत त्यांना फिके लागत असे. रात्र दोन रात्री गुरूसेवेत राहून गुरू मुखातून स्त्रवणारा अमुल्य ज्ञानोपदेश ऐकत असत. ज्ञानामृत प्राशनाने तृप्त झाल्यावर गुरूंचा निरोप घेऊन घरी जात असत. अशा प्रकारचा गृहस्थाश्रम आचरीत असता दैवयोगाने त्यांना क्रमाक्रमाने ३ मुले झाली. घरात लक्ष्मीदेवीचा सुध्दा वास होता. सुख शांति आनंदात दिवस व्यतीत होत होते. संसार स्वर्गमय दिसत होता. पण ही स्थिती जास्त दिवसपर्यंत राहू शकली नाही. दुष्काळ आणि रोगराई साथीमुळे दैववशात काळाचा अचानक घाला पडून त्यांचा मोठा मुलगा आजारी पडला. त्यावर औषधोपचार इलाज करण्याच्या आधीच तो मरण पावला. अत्यंत शोकाकुल होऊन ते विलाप करू लागले. आपला जीवनवेलच तुटून पडला असे वाटून ते अपार दुःख करूं लागले.

दुजा पुत्रकी हालत हुई, चल बसे रही जिंदगी अधुरी ॥<br>
दिलकी जखम सह्या नही जावे, रोवत दोनो दिन बीतावे ॥६॥<br>
मानो कोपे काळ कराळा, झपट लगाई रहे ज्यों व्याळा॥<br>
तिसरे पुत्रको अैसे ग्रहैया, देखत छीनमें देह तजैया॥७॥<br>
भक्तनके घर भीड पडैया, अैसी दशा कही सद्गुरू सैया ॥<br>
कोन अपराध किये किरताया, मोरे तीनो पुत्र संहारा ॥८॥<br>
किस पापनकी सजा मोहे दिया, जगमे जीया सो ना जीया ॥<br>
बुरे हाल कर दिये हमारे, दुःखकी कहानी सुनो गुरू प्यारे ॥९॥<br>
रोवत दोनो पीराणा आये, गुरू को दिलकी व्यथा सुनाये ॥<br>
साई मेरा संसार बिलैया, तीनो पुत्र परलोक सिधैया ॥१०॥

कोपलेल्या काळाने अजून त्याचा पिच्छा सोडला नाही. साथीच्या लागणीत त्याचा दुसरा मुलगा सुध्दा पछाडला गेला. औषधोपचार करूनही अधुरीजिंदगी सोडून तो सुध्दा इहलोक सोडून गेला. हृदयाची जखम भरण्यासारखी नव्हती. रडून रडून त्यांचे डोळे कोरडे पडले. कसे तरी दिवस निघत होते पण रात्री तर जणू त्यांना खायला उठत पण त्यांच्यावर जणू विक्राळ काळ पूर्ण कोपला असावा त्याप्रमाणे वाघाने भक्ष्यावर झडप घालावी तशी काळाने त्याच्या तिसऱ्या मुलावर सुध्दा झडप घालून गडप केले. तिसऱ्या मुलाचे मरण होताच दोघ पति-पत्नि मूर्छित होऊन

पडले. अपार शोक संतप्त होऊन त्यांना वेड लागण्याची पाळी आली. लोकांनी त्यांना खूप समजाविले पण समज पडण्याच्या पलिकडे त्यांच्या दु:खाच्या सीमा पसरल्या होत्या. भक्ताच्या घरावर हा काळाचा घाला असह्य होता. गुरूदेव आमची अशी स्थिती कां झाली. असा आम्ही काय अपराध केला की काळाने माझ्या तीनही मुलांचा संहार केला. आम्हाला कोणत्या पापाची ही सजा दिली गेली. हे असह्य दु:ख सहन करण्यासाठीच काय आम्हाला जिवंत ठेवले? आता आमच्या जगण्यास काय अर्थ आहे? मरून संपणाऱ्या क्लेशापेक्षा जिवंतपणीच आम्हाला ही शिक्षा कोणत्या कर्माची दिली गेली? हे गुरूदेव हे करूणासागर माझ्या दु:खाची कहाणी आपण ऐकावी? अशा प्रकारे करूण विलाप करून रडत ते दोघे पीराण्यास गुरू दरबारी आले. गुरूचरणाजवळ बसून व्यथीत अंत:करणाने त्यांनी आपली करूण कहानी गुरूजींना सांगितली 'गुरूदेव आमच्या संसारात दावानल पेटला. तीनही मुले एकामागोमाग परलोकी निघून गेली. त्यांच्या वियोगानलाचे चटके असह्य झाले आम्ही परभवी असे कोणते पाप केलेले होते की त्याची सजा ही आम्हाला मिळाली.'

अब तो घर भयावन लागे, दिलकी गति कहु किसे आगे ॥
लोगन हमरा मुख नही देखे, वंझा अपशकुनिया पेखे ॥११॥
भोरही कोई सन्मुख न आवे, वंझा कहकर मुख फिरावे ॥
साई कोन करमकी घाता, देखतही हो गये उत्पाता ॥१२ ॥
सद्‌गुरूदेव दयानिधी जाना, किरपा करो साहिब दिलठाना ॥
सेवक जनके हो रखवाला, शरणागतकी करो प्रतिपाळा ॥१३॥
जग महेणा अब सह्या न जावे, पुत्र गये हम कहासे लावे ॥
दुनिया मुख बोले दोरंगा, सुनत बेन होवे मन भंगा ॥१४॥
सद्‌गुरू तुमी हो कृपानाथा, भवसागरमे ग्रहोरी हाथा ॥
गुरूबीन किनसे गति सुनाऊ, रोई रोई दु:ख किसको सुनाऊ ॥१५॥

गुरुदेव आमचं भरलेलं, फुललेल घर आता कसे खायला धावते आहे. हृदयाची गति कोणाजवळ जाऊन ऐकवूं. लोक आता तर आमचे मुखही पाहात नाही. म्हणतात की, 'अरे, हे तर निपुत्रिक अपशकुनि आहेत. सकाळी कोणी सन्मुख येऊन प्रेमाने बोलत नाहीत आणि आलेच तर म्हणतात आज या निपुत्रिकाचे तोंड दिसले आपले काम होणार नाही.' असे म्हणून तोंड बाजूस करून निघून जातात. गुरुदेव आमच्या कोणत्या कर्मदशेमुळे पाहता पाहता असा उत्पात घडून आला. या दु:खाचा परिहार करण्यासाठीच आम्ही आपल्या चरणी आलेलो आहोत. कारण आपणच भक्तांचे रक्षण आणि प्रतिपालन करणारे आहांत. आता तर आमच्याने लोकांचे टोचून बोलणे

सहन होत नाही. आम्हाला मुलेबाळे होती पण ती काळाच्या स्वाधिन झाली त्यात आमचा काय दोष? काळाच्या सत्तेपुढे कोणाचेच काहीच चालत नाही. दुनिया जसे फावेल तसे बोलून एकतर आधीच भंगलेले आमचे मन अधिक भंगवून भूगा करून टाकते. गुरुदेव आपणच केवळ एकमेव कृपासागर आहांत. या भवसागरात आम्ही डुबून जात आहोत. आमचा हात धरून वर काढा. आपणाशिवाय आमच्या दुःखाची ही करूण वार्ता कोणाला सांगु? आपणाशिवाय भक्ताची दुःख वार्ता ऐकणारे तरी कोण आहे? गुरुदेवा, आपण आमचा सहारा व रक्षणकर्ता आहांत. आमच्यावर कृपा करा!'

साया मेरी सुरतको देखो, रोवत नैना नीर नही पेखो।।
अपने भक्तकी यही गती जानी, सदगुरु बोले दिलजानी।।१६।।
होनहार कैसे मिटैया, साईको प्यारा सोही चली गैया।।
उनकी करामत कोई नही जाने, हम तो साईकी बंदगी बखाने।।१७।।
तीनो पुत्र तुमरे चल गैया, फिरभी तीनो पुत्र मिलैया।।
खोया सोही बेर ही पावै, आहिर अब कयों नैन बहावै।।१८।।
हारजित संसारकी बाजी, ताको देख बनो मत राजी।।
उज्वल रेन होत अंधियारा, रेन पिछे दिन उजीयारा।।१९।।
अैसी मति संसारकी जानो, सुख दुःखामा संयोग बखानो।।
गोजारी तुमी अब मत रोये, तीन पुत्र ताहिको होवे।।२०।

'गुरुदेव आता मला हे मुख सुध्दा दाखवावेसे वाटत नाही. रडून रडून माझे डोळ्यांचे नूर सुध्दा आटले गेले. हृदय स्थिर रहात नाही. आपल्या भक्ताची अशी स्थिती जाणून दयानिधी सद्‌गुरु महाराज त्याला म्हणाले- 'माकोजी होणारी भावी अवस्था कधीच मिथ्या होत नाही. जे व्हायचे नसते ते होतच नाही. भगवंताला जे प्रेमी वाटले त्यांना त्यांनी बोलावून घेतले. त्या अविगत भगवंताची कळा आम्हीच काय पण कोणीही जाणू शकत नाही. फक्त त्याची भक्ति करण्याचा मार्ग आम्ही जाणू शकतो. अन्य जनास त्याच भक्तिमार्गाने चालण्याचा उपदेश करीत असतो. तुमचे तीन पुत्र काळाच्या स्वाधिन झाले त्या व्यथेने तुमचे मन दुःखीत झालेले आहे. परंतु भगवंताची तुमच्यावर कृपादृष्टी होईल कारण तुमच्या नशिबी पुत्र सुख आहे आणि तेही एक दोन नव्हे तर तीन पुत्रांचे सुख तुमच्या नशिबी आहे. ती तीनही बाळे आपले घरात खेळतांना मला दिसत आहे. भगवंताचा संकेत काय आहे ते आम्ही सांगू शकत नाही पण तुमच्या ललाटाची वाणी मात्र मिथ्या होऊ शकणार नाही. तुम्ही लोक संताप आवरा. शांतचित्ताने कालक्रमणा करून भगवंताचे स्मरण करीत राहा. तुमची मनोकामना ईश्वर पूर्ण करीन. हार जित हा तर संसाराचा

नियमच आहे. उज्वल रात्री आनंददायक सुखदायक लागतात पण उज्वल रात्र कायमची राहात नाही नंतर काळोखी रात्र ही येतच असते. म्हणून तिला भिण्याचे कारण नाही. रात्रीचा गडद अंध:कार संपल्यावर उज्वल प्रकाशाचा दिवस उदय पावतोच संसाराची हीच गति आहे. सुख आणि दु:ख यांचा संयोग कधीच होऊ शकत नाही. सदैव कोणाला सुख मिळू शकत नाही किंवा सदैव कोणाला दु:ख मिळत नाही. दु:खाचा पण अंत होतो. जीवनाचे वस्त्र सुखाच्या आणि दु:खाच्या आडव्या उभ्या धाग्यांनी गुंफलेले आहे. हे गोजारीबाई, आता तू रडण्याचे सोडून दे. आणखी तीन पुत्रांची माता होण्याचे भाग्य तुझ्या नशिबी आहे. भगवंताचे स्मरण करून आराधन कर, शोक संताप सोड. ईश्वर तुमच्यावर कृपा करील.

सुना घर मंगल होई जावे, संत कृपासे सब कुछ पावे॥
सद्‌गुरुके शुभ आशिष पाया, दंपत्ति गुरुको शिर पाया॥२१॥
आय पहूँचे अपने मुकामा, दिन बीते हियरा गुरु हामा॥
प्रथम पुत्र गोजारी पाया, माकोजी मनमें हरखाया॥२२॥
सुनाधाम अब लगे सुखदाई, आहिरके घर बाजै बधाई॥
कई दिनसे रोना रोया, आज उसीको मंगल मोया॥२३॥
पुत्र पायके भये उमंगा, सद्‌गुरु धाम गये दो संगा॥
गुरुजी हमारी गति सुधारी, घरमे हो गये मंगलकारी॥२४॥
वंझाके घर पलना झुलाये, सद्‌गुरुकी गतीको मुख गाये॥
दयानिधी गई लक्ष्मी हेरी, सोभी आने लगी घर बेरी॥२५॥

सद्‌गुरुंच्या कृपेने सर्व काही प्राप्त होत असते. लौकिक दृष्टीने अथवा ऐहिक कामनेकरिता जरी सद्‌गुरुंची उपासना केली गेली तरी ती ऐच्छिक हेतु पूर्ण करीत असते. प्राकृत लोक ऐहिकतेतूनच त्यांची भक्ति करतात. त्यांच्या कृपा दृष्टीने एके काळचे सुने पडलेले ओसाड झालेले घर सुध्दा मंगलमय बनून जाते. सद्‌गुरुंचा आशिर्वाद प्राप्त करून उभय पतिपत्निंनी नम्रतेने वंदन करून ते आपल्या असारवा गावी परत आले. मानसिक सुखा समाधानाने पण बाह्य जगताच्या जाचाला धैर्याने तोंड देत ते कालक्रमणा करू लागले. सद्‌गुरुंच्या शब्दावर त्यांची दृढश्रध्दा होती आणि कालान्तराने ती श्रध्दा फलीभूत झाली. आहिराणीला गर्भ राहिला. यथावकाश त्यांना पुत्रप्राप्ती झाली. त्यांचे उदासीन हृदय पुलकित झाले. कित्येक दिवसांच्या शोक संतापाची समाप्ति झाली. घरात आनंदी आनंद झाला. लक्ष्मी देवीची सुध्दा कृपावृष्टी होऊ लागली. आनंदमय उत्साही अंत:करणाने बाळाला घेऊन ते पीराण्यास आले. सद्‌गुरुंच्या चरणी वंदन करून म्हणाले, 'गुरुदेव, आपण आमची गती सुधारली.

निपुत्रीक झालेल्या आमच्यावर कृपादृष्टी करून अनहद ऋणी केलेले आहे. आपल्या या गतीचे वर्णन करणे आमच्या आवाक्याबाहेरचे आहे. आपल्या कृपादृष्टीने काळाबरोबरच रूसलेल्या लक्ष्मीमातेने सुध्दा आमच्यावर कृपा केलेली आहे. महन्मंगलदायी लक्ष्मीमाता पण या बालकावर अनहद उपकार करण्याकरीतां येऊन स्थिर झालेली आहे. या सर्वऋणातून उतराई होणे माझ्या शक्ति पलिकडचे आहे.'

संतकृपा जाहिपे होवे, ताहिका सब दुःख बिगोवे॥
हमकी लाज रखी गुरूदेवा, कैसे बखानहु साहिब भेवा॥२६॥
सद्‌गुरु शुभ बेन बखानो, भक्त दंपति अपने घर ठाने॥
काळ जिते मंगल दिन आया, दुसरा पुत्रकी बांधे बंधाया॥२७॥
संत बचन निकसे गजदंता, सत्य बचन बखानही संता॥
संतना मुख उचरे बानी, ताको सत्य मानो दिल ठानी॥२८॥
गुरुजी कहे तीन पुत्रही होवे, गोजारीको अैसेही होवे॥
तीन खोया तीनोही पाया, सद्‌गुरुकी करूणा सुखदाया॥२९॥
तीन पुत्र लिये अपनी संगा, सदगुरुधाम आये उमंगा॥
गुरुजी कृपा बहुरी किन्हा, तीनो पुत्र मोहे वापस दिन्हा॥३०॥

ज्याच्यावर खऱ्या संत पुरुषाची कृपा होते त्याची सर्वच दुःखे दूर होत असतात. गुरुदेवांनी खरोखर आमची लज्जा रक्षण केली. या अलौकिक दिव्य महापुरुषाचा भ्रेद आमच्या सारख्या पामर जीवात्म्यांना समजणेच कठिण आहे. गुरुदेवांचे यशोगान करीत त्यांनी त्यांना अत्यंत नम्रभावाने वंदन केले. सद्‌गुरुंनी त्यांना शुभ आशिर्वाद दिला. आनंदमग्न होऊन उभयता आपल्या गांवी आले. सुखात रममाण झाले. काही समयाने त्यांना दुसऱ्या व तिसऱ्या पुत्र रत्नांची प्राप्ति झाली. संत पुरुषाची वाणी गजदंताप्रमाणे सत्य झाली. महापुरुषांचे वचन केव्हाच मिथ्या होत नाही. सद्‌गुरुंनी गोजारी बाईला तीन मुले होण्याचा आशिर्वाद दिला होता तो सफळ झाला. तीन मुलें काळाच्या प्रवाहाने गमाविली होती पण सद्‌गुरुंच्या आशिर्वादाने तीनही मुले परत आली होती. तीन्ही मुलांना बरोबर घेऊन ते सद्‌गुरुंच्या धामावर आले. नम्रतेने गुरु चरणावर प्रणाम करून म्हणायला लागले, 'गुरुदेवा, आपण आमच्यावर अपार कृपा केली. आमची तीनही मुले हरपून गेली होती पण आपल्या कृपाशिर्वादाने ते परत मिळाली, आम्ही कृतार्थ झालो. धन्य धन्य आपल्या कृपादृष्टीची!'

निराधारके तुमी आधारा, दुःखियनको गुरुदेव पियारा॥
नाथ मेरा बनी रहो संगा, तुमबीन कोन रखे गुरु रंगा॥३१॥

यह संसार भयावन लागै, गुरु बीन दु:ख कोनही भांगै।।
अैसी करूणा करो गुरुदेवा, हमरा चित्त तुमसे रहे लहेया।।३२।।
गुरुका नाम कबहु नही भुले, ज्ञान ध्यान सद्गुरु अमुले।।
बिमल बानी उचरे गुरुदेवा, सदा किनो संतनकी सेवा।।३३।।
माधुकरी साहिबका रूपा, ताको बुझेरी अेक अनूपा।।
दु:खियनको दिजे सहारा, तासे रीझे साहिब हमारा।।३४।।
बंदगी साईको लगे पियारी, तासे कबहु न रहैया न्यारी।।
जैसा है उरमे अनुरागा, अैसे ही तुम रहो सुभागा।।३५।।

'गुरुदेव, आपण निराधाराचे आधार आहात. दु:खियास आपल्या विना अन्य कोण प्रिय वाटेल. गुरुदेव आपण आमचे सहाय्यक बनून पाठीशी आहेत. तुमच्या शिवाय आमचे रक्षण कोण करील? हा संसार म्हणजे जगतातील मिथ्याचरण आम्हाला भयावह वाटत आहे. त्यात आपणाशिवाय आमचे भवदु:ख कोण दूर करील? गुरुदेव, आपण आमच्यावर आणखी एक करूणा करा की आमचे चित्त सदैव आपल्याच चरणारविंदी राहिल. आपल्या नामाची आमच्याकडून कधीहि विस्मृती होऊ नये. ज्ञान आणि ध्यान धरण्यायोग्य केवळ आपण एकमेव आहात!' अशा प्रकारे दीनतेने नम्र वाणी उच्चारताच सद्गुरु म्हणाले - 'भक्तांनो, तुम्ही सदैव संतांची सेवा करा. संतसेवा हीच ईश्वराची सेवा आहे. संत हेच ईश्वराचे स्वरूप आहेत. दु:खी प्राण्यांना सहारा द्यावा. पीडीतांची रंजलेल्या गांजलेल्याची सेवा करावी. त्यावरच भगवंत कृपा करीत असतो. ईश्वर नाव गरीब नवाज म्हणजे दिनबंधु आहे. तो तुमच्यावर राजी होईल. दया व भक्तीच भगवंताला अत्यंत प्रीय आहे. त्याहून तुम्ही वेगळे राहू नका. जसा सद्गुरुवर तुमचा अनुराग आहे तसा दया भक्तीवर भाव ठेवून तसे वागा म्हणजे तुम्ही भाग्यशाली व्हाल.

गुरु दर्शनको दिलमे ठानो, तासे सुख पावे दिलजानो।
गुरुका तुमी थे गुरु हे तुम्हारा, अरस परसका नाता हमारा।।३६।।
असल नाता कबहु नहि तुटे, प्रेमकी दोर बंधे मजबूते।।
सदा गुरुके नामको गावो, तासे सुख संसारमें पावो।।३७।।
माकोजी अरू गोजारी बाई, सद्गुरुको लागै पाई।।
तीनो पुत्र गुरुजीको वंदे, तुमी होयगे साहिबके बंदे।।३८।।
साहिबको शुभ बेत उचारे, आय पहूँचे सबही नीजद्वारे।।
मंगलमय हो गये संसारा, जिनके हियामें सद्गुरु प्यारा।।३९।।
सद्गुरुको सेवो सद्गुरुको बुझो, सद्गुरुदेव संतको पूजो।।
सद्गुरुबिन नही निस्तारो, भवसागर उबारनको आरो।।४०।।

सद्गुरुंच्या दर्शनाचा हृदयात आनंद आहे. उमंग, उत्साह आहे, तो सदैव टिकून राहावा म्हणून तुम्ही सदैव गुरुंचे होऊन राहा म्हणजे गुरु तुमचे होतील. हा तर परस्पर संबंध आहे. 'तुम हमारे तो हम तुम्हारे' यात तर काहीच फरक पडेल असे नाही. हे जूने नाते कधीच तुटू शकणार नाही. कारण प्रेमरज्जू अशा रीतीने बांधला गेला आहे की एक दुसऱ्या पासून कधीही दूर राहू शकणार नाही. म्हणून बाळांनो, सदैव सद्गुरुंचे अनुसंधान राखून नामस्मरण करीत राहा. गुरु गुणगान करीत राहा. त्यायोगे तुमचा संसार सुखमय होईल तुमचेही सर्वच दुःखे दूर पळतील व तुम्ही सुखी व्हाल.' सद्गुरुंनी अशा रीतीने त्यांना सदुपदेश केला तो हृदयात धारण करून माकोजी आणि गोजारीबाई सद्गुरुंच्या चरणावर झुकून पडले. अति विनम्र भावाने सद्गुरु चरण सरोजावर ते दंडवत पडून प्रणाम करू लागले. त्यांची तीनही मुले सद्गुरु चरणी दंडवत पडली. त्यांच्या शिरावर वरदहस्त ठेवीत सद्गुरु म्हणाले, 'बाळांनो, तुम्ही तिघे भगवंताचे सेवक व्हाल. भगवंताचे कार्य व स्मरण सेवा करीत करीत हा संसार सागर सुखाने तरून जा.' सद्गुरुंचा आशिर्वाद प्राप्त करून तेथून ते आपल्या घरी आले. त्यांचा संपूर्ण संसार सुखमय मंगलमय झाला. ज्यांच्या हृदयात सद्गुरुंचे स्मरण आहे, ज्यांचे तनमनधन सद्गुरु चरणी आहे, जो सद्गुरुंचा अनुरागी आहे, सद्गुरु त्याला कधीच विसंबत नाही. जो संतसेवेत तत्पर आहे तोच जीवात्मा ही भवाटवी सुखरूपतेने उल्लंघून जातो. मातापिता व तिघे पुत्र सद्गुरुंचे अनुग्रही असल्याने त्यांच्या वचनाप्रमाणे वागून सर्व संसार सुखमय करून परोपकार दक्ष राहून, दुःखित पीडीतांची सेवा करीत करीत सुखासमाधानाने राहू लागली. संत नायाजी म्हणतात सद्भक्तांनो तुम्हीपण सद्गुरुंचे यशोगान करा आणि या मानव जन्माचे कल्याण करा.

**नायाजी कहे सद्गुरु यश गावो, नरतन पायके बीजो उमावो ॥४१॥**



# ४३. आपल्याच हृदयात भगवंताचे भजन कर.

> अेक दिन आये फकीरा ज्ञानी, जुम्माशाह नाम बखानी।।
> झुक झुक पीराना संग बिठैया, उलट बाते अंतरकी कहैया।।१।।
> सायाजी हम खोजन हारे, दिखे नही कभी पीव पीयारे।।
> कैसे दिदारा साईको होवे, कहो पीराना साई बीगोवे।।२।।

एके दिवशी एक फकीर आला, त्याचे नाव जुम्माशाह. तो ज्ञानी फकीर सद्‌गुरुजींच्या चरणाशी झुकून विनयाने खाली बसला आणि हळूच अंतरातील गोष्ट सांगू लागला - ' हे साई, इतके वर्षे गेली आम्ही शोधून शोधून थकलो परंतु केव्हाही भगवंताचे दर्शन झाले नाही. कृपा करून सांगा की ईश्वराचे दर्शन कोणत्या उपायाने होऊ शकेल? माझ्या तर आयुष्याचा पैलपार आला. पण भगवंताने अजूनही या गरीब दीन दासावर दर्शन देण्याची कृपा केली नाही. या दुनियेचा त्याग केला पण दिलदार मिळाला नाही. साईने नाहक वेश बनविला आहे?

> जिक्र बिना नही पावे साई, बंदगी ताहिकी लीजो बनाई।।
> पल अेक साईसे लग रहे नैना, आय मिले सच कहू बेना।।३।।
> सायांजीकी हक्क हे बानी, जिक्र राह भूल गये नादानी।।
> ताथे जहा बहुरी भटकाये, आज पीराना से गम पाये।।४।।

' हे साई, त्या भगवंताची भक्ति केल्याशिवाय केव्हाही शांति लाभणार नाही, तुम्ही एकाग्रतेने त्याची जीकीर करा म्हणजे तो परमात्मा एक दिवस जरूर येऊन मिळेल. अेक घडी खऱ्या हृदयाने भगवंताच्या संगतीत लागून राहा. एकवेळ त्या भगवंताशी एक दृष्टी झाली तर जरूर तो येवून मिळेल. असा तर माझा स्वामी तुमच्या पासून काही दूर नाही. परंतु तुम्ही खऱ्या हृदयाने त्या भगवंताशी प्रीत करून घ्या.'

सद्‌गुरू इमामशाहांनी फकिराला सत्य घटना सांगितली. ते ऐकताच फकीराने आपली भूल कबूल केली आणि म्हणाला, - ' हे साई, आपण जे सांगतात ते अगदी सत्य आहे. आतापर्यंत मी भक्तीचा मार्ग विसरून गेलो होतो आणि म्हणूनच या दुनियेत खूप रखडलो. कोठेही सुख व शांति मिळाली नाही. फकीर झालो पण दुनियेच्या हद्दीतून पार जाऊ शकलो नाही आणि सत्याचा मार्ग भुलून जे करायला पाहिजे ते करू शकलो नाही. याच गफलत मध्ये सर्व आयुष्य वाया गेले, तो

समज आला पण खूप उशीर होऊन गेला. आता आपल्या पवित्र चरणाजवळ आलो. आपण कृपा करून मला सत्य मार्गावर आणले. मार्ग चुकलेल्या फकीराला आपण समज देऊन ताळ्यावर आणले.

मोपे रहम करो पीराई, ताथे जिक्र बनी रहे साई।।
जिक्र तुमीसे अैसी बनैया, सच मुख जलवा तुम्हे पैया।।५।।
चले साई डर जिक्र बखाने, जल्वा ताहिको मिले दिल जाने।।
गंगा सद्‌गुरु संग दिखैया, भाग्य ताहिको दर्शन पैया।।६।।

'हे साई, माझ्यावर दया करा त्या योगे भगवंताची भक्ति घडू शकेल आणि दुवा करा.' सद्‌गुरुंनी फकीरास शुभाशिर्वाद देतांना म्हटले, 'हे साई, तुमच्याकडून भगवंत प्राप्तीची अशी जिकीर बनून येईल की तुम्हाला खरोखर तो परमपावन परमात्मा दर्शन देईल. तुम्ही ज्याचे दर्शन घेण्यास आतूर झालात त्या साईचा जागृत चमत्कार पाहण्याचा योग लवकरच आपणास प्राप्त होईल.

फकीर जुम्माशाह सद्‌गुरुंच्या आशिर्वाद घेऊन परत गेला. आणि तन, मन प्राणाने भगवंताच्या सेवेत लागला. त्याची अभिलाषा परिपूर्ण झाली आणि भगवंताची असीम कृपा त्याच्यावर होऊन त्याला साक्षात स्वरूप दर्शन झाले. जुम्माशाह खरोखर धन्य झाला.

हे गंगाजी, सद्‌गुरुंच्या संगतीत बसून प्रभू मिलनाचा हा मंगलप्रसंग न्याहाळण्याचा योग घडून आला. हे तर ज्याचे नशिब जागते त्यासच दर्शन करण्याचा योग प्राप्त होतो. बाकी तर या दुनियेत भुलून पडलेले अन्यत्र भटकत असतात यात संदेह नाही.

★ ★ ★

# ४४. योगी निरंजननाथ.

पीरजी संग बैठ सुखसाजा, मध्यान्ह आय खडे योगीराजा।।
नाम निरंजननाथ बखान, देख पीराना हरख उर ठाने।।१।।
बडे आदर सदगुरु किन्हा, प्रेम प्रसाद योगीसंग लीन्हा।।
योगी अभेद दिखे गुरु ज्ञानी, जात पात लिखे अज्ञानी।।२।।

एकदा सद्‌गुरु इमामशाह महाराज पीराण्यास कांही लोकासमवेत सत्संग करीत होते. दुपारचा समय होता. बरोबर त्याच वेळी एका योगीपुरुषाचे आगमन झाले. त्याचे नाव निरंजननाथ योगी खरोखर महाप्रभावशाली होता. सद्‌गुरुंनी अतिशय प्रेमाने त्यांचा आदरभाव केला. आतिथ्यधामात त्यांना सोबत घेऊन जाऊन उभयतांनी प्रेमाने सहभोजन केले. योग्याची अभेदवृत्ति होती. जाती वर्णाचा ज्या ठिकाणी किंचीतही भेदभाव नाही असा तो ज्ञानी पुरूष होता. सद्‌गुरुंनी त्यांच्या सोबत बसून बराच वेळ पर्यंत सत्संग केला. अमृतरसपान करीत उभयता बराच वेळपर्यंत ईश्वरी लिलेचे व त्याच्या प्राप्तीच्या साधनांचा विचार चर्चा करीत बसले. शेवटी सद्‌गुरुंनी विनयाने योग्याला प्रश्न केला -

योगीराज कैसे दिन्ह दिदारा, महाशिवरात्री निमित्त गिरीनारा।।
दत्त प्रभुके दर्शन पै हो, योगीजन उर आनंद पै हो।।३।।
सायाजी दीदार यहा पाये, योगी फिर गिरनार क्यों जावे।
हस मुश्कराई साईया बोले, अमर पुरूष आधिन अमोले।।४।।

'योगीराज, इथे आपले आगमन झाले, ही तर अतिशय आनंदाची गोष्ट आहे. पण आपण अचानक कसे येऊन ठेपलात कोठे जाण्याची तयारी आहे काय? कृपा करून आपल्या आगमनाचे कारण समजेल कां?'

'पीरजी, योग्याचे आगमनाचे कारण असे की गिरीनारला जायचे आहे. मार्गात आपले स्थान लाभले म्हणून दर्शन करण्याच्या इच्छेने आपल्या चरणाजवळ आलो. आपल्या दर्शनाने खरोखर हृदयात अपार आनंद झाला. आता तर योग्याला गिरनारला जायचे आहे. तेथे महाशिवरात्रीला संत आणि सिध्दांचा महामेळा लागतो. त्यात भगवान दत्तात्रेयांच्या दर्शनाचा लाभ घडून आला तर फारच उत्तम म्हणून गिरनारला जायचे आहे. जर आपण येथेच त्या महागुरुंचे दर्शन करवित असाल तर गिरनारला जाण्याचे श्रम वाचतील.'

योग्याचे हे शब्द ऐकताच सद्गुरु मंद मंद हास्य करीत म्हणाले, 'योगीराज, आपण ज्या सिध्द पुरुषाविषयी गोष्ट करीत आहांत तो अमर पुरुष कोणाच्याही आधिन नाही की त्याला बोलावून घर बसल्या दर्शन घेऊ शकू. त्या अविगताच्या गतीचा कोणीही पार पावू शकणार नाही. तर मग त्याला या ठिकाणी कसे काय बोलाविता येईल. ज्याचे दर्शन प्राप्त होण्यासाठी योगीलोक गिरीकंदरात एकाग्रतेने ध्यानमग्न बसून वर्षानुवर्षे पर्यंत साधना करतात तरीही त्याचे दर्शन होत नाही. असा त्या अविगताला येथे बोलावण्याचे काम माझ्या आवाक्यात नाही. योगीराज ते महागुरु येथे कशा रीतीने येऊ शकतील?'

महागुरु यहा कैसे आवे, साई पीराना कैसे दिखावे॥
बडे आनंद गिरनार जै हो, महागुरुका दर्शन पै हो॥५॥
झुक झुक योगी खडे हो गैया, तीन कदम अरूप हो गैया॥
गंगा सुनो यह गैबकी बाते, ता दिन योगी दिखे साक्षाते॥६॥

'पीराना जवळ ही गती नाही की त्या महा योग्याला येथे बोलावून तुम्हाला त्यांचे साक्षात दर्शन करवू शकेल! योगीराज आपण ह्या महागुरुंच्या दर्शनाकरितां अति आनंदाने व प्रेमाने गिरनारलाच गेले पाहिजे. अनन्य प्रेमभावाने त्यांचे दर्शन घेऊन सत्संगाचा लाभ घ्यावा.' सद्गुरुंनी योगीराजाला असे सांगून आपल्या गतीची मर्यादा त्यांना दाखवून दिली व त्यांना गिरनारला जाण्याचा सल्ला दिला. योगीराज नम्रतेने उभे राहिले व इमामशाहांचा प्रेमाने निरोप घेवून तीन पावले जाऊन अंतर्धान होऊन गेले.

सद्गुरु नायाजी आपल्या परम शिष्यास गंगासिंहास म्हणाले, 'हे गंगासिंह, ही तर अगम्य गूढ वार्ता आहे. योगी पुरुषाला प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी निरखणे व त्यांचा संग घडून ज्ञानचर्चा-वार्तालाप करणे फारच दुर्लभ योगाच्या गोष्टी आहेत. जे योगी असतात तेच ह्या गोष्टी जाणतात.'



# ४९. संत हारितनाथ.

## "नाम स्मरणाचा अनन्य अनुरागी ध्यानी संताची कथा."

चंपकवनात संत भाभारामच्या स्थानावर एकदा अनेक संत मंडळी संत समागमाच्या गतीचे मुक्त कंठाने यशोगीत गात होते. भाभारामने त्या संतांचा अपार भक्तिभावाने सत्कार करून उतारा दिला. आणि प्रेमाने प्रसाद देऊन संतुष्ट केले. रात्रीच्या वेळी संत सत्संगात बसले. त्या समयी वंदनीय संत हारितनाथांचे विमलचरित्र ऐकण्याची भाभारामने उत्कंठा व्यक्त केली. तेव्हा मोठ्याने खडखडाट हास्यं करीत 'बाबा! या हारितला तुम्ही संत रूपाने ओळखता, तो हारितसेन एके समयीचा क्रूर लुटारू होता. त्याच्या त्रासाने संपूर्ण चंबळची धरती थरथर कापत होती.' असे म्हणून संत हारितनाथांनी आपली जीवन कथा सांगण्यास सुरुवात केली.

लुटमार आणि चोरीच्या धंद्यात जीवनाचे बहुमुल्य वर्षे व्यतीत झाले. पण कधी एकदाहि मागे वळून पाहिले नाही. पण योगायोगाने एकेदिवशी या जुलूमाचा अंत आणणारा क्षण उगवला. त्या भयानक धरतीवर बाबा प्रेमनाथ नावाचा सिध्द पुरुष येऊन थडकला. भुकेल्या व्याघ्राप्रमाणे लुटारू संतावर धावून गेला व त्यांना लुटण्यास तयार झाला. त्या समयी हास्य करून संत म्हणाले, -

'हारित! तू कोठपर्यंत तीर तलवार धारण करून लुटमार करशिल. अरे, ज्ञानी असून तू अशा रितीने अधम दशेत जीवन जगतोस. तुला शुध्द किंवा समज नाही! भल्या गृहस्था तू भगवंताचे स्मरण केव्हा करशिल. या पापगर्तेतून तू कधी बाहेर निघून हरिस्मरणात एकाग्र होशिल?' त्यांच्या या शब्दांनी हारित खरोखरच विचारमग्न झाला. तीर्थवासी आणि एक अनजान साधु पुरुष मला नाव घेऊन बोलत आहे. आणि हरिस्मरण करण्याचा आदेश देत आहे हे कसे शक्य आहे?

'महाराज! एका अधम लुटाऱ्यास आपण हरिस्मरण करावयास लावीत आहांत. खरोखर हे हास्यास्पद नाही काय? कारण माझ्याकडून हे ईश्वरस्मरण कसे शक्य आहे. ईश्वर भजनाचा व्यवसाय तर साधुंचा असतो आमचे लुटाऱ्याचे जीवन लुटफाट करण्यातच जाते.' हारितचे हे शब्द जे अगदी सत्य होते पण परभवाच्या संस्कारी आत्म्यास सजाग करण्यासाठीच सिध्द पुरुष या चंबळच्या भयानक घाटीत उतरला होता. तो म्हणाला,

'हारित तू म्हणतोस ते कदाचित् खरे असेल पण दुसऱ्या कोणाप्रमाणे अशा अधम दशेत जीवन व्यतीत करण्याकरिता काही तुझी निर्मिती झालेली नाही. समय

निघून जात आहे तरी सुध्दा तू या गाफीलपणाचा त्याग करीत नाहीस! हे खरोखर अभाग्य होय. मागच्या जन्मातही तू व्यर्थ भटकलास. साधुने तुला समजाविले पण तू समजला नाहीस आणि मृगजलाप्रमाणे मायेत लोभ पावून विषय किटात खिचपत पडलास. आता हा तुझा दुसरा जन्म आहे. आतापर्यंत तुला चांगला अवसर मिळून सुध्दा जागृत झाला नाहीस आणि त्याच माया ममत्वात गढलास. ही तुझी केवढी कमनशिबी आहे हारीत' संताने त्यास सभान बनविण्यासाठी खूप सांगून टाकले. महापुरुषाचे हे बाण त्याच्या हृदयात आरपार घुसले. तो हळूच म्हणाला, -

'महाराज, आपण म्हणत आहात त्यावरून मला आश्चर्य वाटते. या वेळेस मी लुटारू बनलो हे सत्य आहे, पण मागच्या जन्मात मी कोण होतो याची तर मला किंचीतही स्मृति नाही. तेव्हा आपण माझ्या गतजन्माविषयी सांगतात हे कसे!'

हारित, संत कधीच असत्य बोलत नसतात. मायेच्या आवरणाने तू गत जन्माचे भान विसरलास पण ही हकिकत सत्य आहे.' असे म्हणून संताने त्याच्या डोळ्यावरून आपला वरदहस्त फिरविला आणि म्हटले, 'बघ! आता तुझ्या गतजन्माचे दर्शन करून घे!' हारितला भाव समाधी लागली त्याला गत जन्माचा जीवनपट दृष्टीसमोर आला. त्या जन्मात तो सुबल नावाचा किरात होता. तारूण्याच्या भरात एका वामांगीच्या नादी लागून विषयानन्दात भान भुलला. पहाडी घाटीत जाऊन दिवसभर शिकार करून पोट भरायचे व रात्री विषय किटात बूडून जायचा. त्या समयी सुध्दा दैवयोगाने एका संत पुरुषाचा समागम झाला. त्यांनी त्यास अमृतवाणीने उपदेशाचे घोट पाजले व मनोहारी मायेतून सुटण्याकरितां आग्रह केला. पण विषयाच्या खोड्यात्त अडकलेले त्याचे मन विषयापासून थोडे सुध्दां डगमगले नाही. मोहिनी मायेने त्यास पूर्णपणे ग्रासले होते. म्हणून साधुंच्या शब्दाने त्याला जाग आली नाही. उलट नाहक रोष करून साधुस अपमानीत करून आपल्या निवास स्थानी निघून गेला. साधु तर आल्या वाटेने निघून गेला. पण हारितास आपल्या गत जन्माचा जीवनपट पाहून भान आले. जणू झोपेतून जागा व्हावा तसा तो स्वस्थ झाला. आता सुध्दा तोच साधु बाबा प्रेमनाथ त्याच्यासमोर उभा होता. हे पाहून त्यास आश्चर्य वाटले. पण या समयी तो संताच्या चरणी पडून म्हणाला, 'बाबा, आपले शब्द अगदी सत्य आहे. माझा गतजन्म मी माझ्याच डोळ्यांनी पाहिला. दयानिधी, त्या समयी पण आपण या दासास तारण्यास आला होता, पण मी अज्ञानी समजलो नाही. एक जन्म व्यर्थ वाया गेला. आता या दुसऱ्या जन्मातही माझा उध्दार करण्याकरितां माझा बाहु धरून या भवसागरात उध्दरून नेण्याकरीता आलात. मला या भवसिंधूतून

वर काढा.' असे म्हणून हारित संताच्या चरणी ढळून पडला आणि अश्रुजळाने संताचे चरण भिजवून टाकले. सद्गुरुंनी त्यास हात धरून उठविले व म्हटले, 'हारित, आता तरी तू सत्य मार्गाने चाल आणि नितीनियमाने जीवन जग.'

'महाराज, आपण मला येथे सोडून जात आहात.' हारित आता आपल्या शिवाय एक दिवसही वेगळा राहू शकणार नाही. आपण मला आपल्या सोबत घेऊन चला. आता मला कोणालाही काहीही विचारायचे नाही.' हारित तयार झाला आणि त्यास बरोबर घेऊन संताने तेथून प्रयाण केले.

पावन पर्यटन करीत करीत दोघे जण उत्तराखंडात हिमालयाच्या घाटीत गंधमादन गिरीकंदरात जाऊन ध्यानस्थ झाले. एके समयीचा अधम लुटारू हारित श्री हरीच्या ध्यान-चिंतनात मग्न होऊन गेला. तरूण बलवान हारित तीरकामठा तलवारीचा त्याग करून योग्याच्या संगतीने उत्तराखंडात आला आणि अलखच्या आराधनेत तल्लीन होऊन गेला.

वर्षानुवर्षे लोटली, शिरावर जटांचा भार वाढला. एके समयीची तारूण्याने मुसमुसलेली काया कोमेजून केवल अस्थिपंजर झाली. जणू वृध्दापकाळ धावत यावा त्याप्रमाणे काळेभोर केस बगळ्याच्या पंखाप्रमाणे पांढरे शुभ्र झाले. भगवंताच्या अमृतरसाचे पान करीत योगी अखंडानंदात मग्न झाला. अठरा वर्षे पूर्ण झाली. हरिमिलनाची शुभ घडी आली आणि योग्यास त्याच्या प्रिय स्वामीचा साक्षात्कार झाला. परमानंद माधवास प्राप्त करून योग्याचे स्वप्न साकार झाले.

एकदा सहज भावाने गंधमादन गिरीकन्दरातून आसन उठवून योगी वस्तीत आला. त्या समयी संत महामंडळी उत्तरेहून दक्षिण यात्रेस निघाली होती. त्यांच्या संगतीत फिरत फिरत आपल्या धामास येऊन पोहोचलो आहोत. भाभाराम महाराज, आपण ज्यास संत म्हणून ओळखता तो हा हारितनाथ एके काळचा अधम लुटारू होता. परंतु पारस स्पर्शाने लोखंडाचे सोने होते तद्वत सद्गुरु प्रेमनाथांच्या समागमाने हारितनाथ बनून आपल्या समागमात आलेलो आहे.'

प्रेमाब्धि उसळावा त्या प्रमाणे ते उभय संत एकमेकास भेटले आणि समागमे बसून हृदयातील भाव उचंबळून आल्याने भाभारामने योगी नायाजींची कथा त्यांना सांगितली. ते ऐकून योगी नायाजींच्या दर्शनाची अभिलाषा जागृत झाली. म्हणून सर्व संतमहामंडळी भाभाराम महाराजाबरोबर कुकसला नायाजींच्या दर्शनास येऊन पोहोचले. त्या समयी कुकसच्या संतधामावार महापुरुषांचा जणू मेळावाच भरला. भाविक भक्त गण दर्शनाकरिता आले. योगी लोकांनी लोक कल्याणाकरिता सर्वांचे दुःख हरण व्हावे व सुखशांति लाभावी अशी प्रार्थना केली.

संत भाभाराम, संतनायाजी आणि योगी हारितनाथ या तीन जणांची त्रिपुटी मात्र सत्संगात मग्न झाली. सत्संगाच्या अनुरोधात नायाजींनी आपली पूर्व कथा सांगतांना आपण पण अधम लुटारू होतो, पण पीर इमामशाहांच्या अनुग्रहाने पावन झालो असे सांगितले. गुरुंचे यशोगीत ऐकून योगीराजांनी दर्शनाची इच्छा व्यक्त केली म्हणून ते सर्व पीराण्यास गुरु इमामशाहांच्या धामावर त्यांच्या दर्शनास गेले. सत्संगाची रेल झाली. या समयी गुरु महाराजांनी पण दिल खोलून अंतरंगातील गोष्टी सांगून सर्वांना तृप्त केले.

'योगीजनांनो, तुम्ही तर पक्षापक्षाच्या द्वैतातून पार जाऊन जगतात केवळ एक अलखची आराधना करून जगत कल्याणाकरितां विचरण करतात तुम्ही धन्य आहांत.' सद्‌गुरु इमामशाहांनी आणखी बऱ्याच आंतरिक गोष्टी सांगितल्या. रात्रीच्या समयी योगीयांचा आणखी खूप मोठा मेळावा जमला. इमामशाहांच्या हृदयात अपार आनंद झाला. सर्व महापुरुष एकमेकांना भेटून क्षेमकुशल विचारले व सत्संगाचा आनंद लुटला. प्रात:काळ होताच बाकीचे सर्व संत हळू हळू अंतर्धान पावले.

हारितनाथ तर तीर्थाटनास निघाले होते. ते दक्षिणेकडे आपल्या महामंडळीबरोबर निघून गेले. या पर्यटनास बारा वर्षे पूर्ण झाली. अनेक जीवांचे कल्याण करीत संत परत फिरले. आणि उत्तरेकडे जाण्यास निघाले. कित्येक वर्षांनी ते आपले मूळस्थान गंधमादन पर्वताच्या गिरीकंदरात जाऊन पोहोचले. आसन स्थिर करून आपल्या अलख पदाच्या स्वरूपात मग्न होऊन गेले.

योगी बैठे ध्यानमे, हरि सुमिरण सुखकंद॥
गंगा आन चहे कहां, पाया परमानंद॥

योगी पुरुष ईश्वर ध्यानात एकाग्र होऊन गेला. त्याच्याकरिता दुसरी कोणतीच आवड नव्हती. परमानंद माधवास प्राप्त केल्यानंतर दुसरी कोणतीच आशा आकांक्षा अपूर्ण राहात नाही. हरिहर ज्यास प्राप्त झाला त्याला सर्वस्व मिळाले. धन्य ते महापुरुष या अवनीतलावर अशा महापुरुषांचे दर्शन फार दुर्लभ असते.



# ४६. संत इमामशाह आणि संत निर्वाण साहेबांचा समागम.

संत निर्वाणसाहेब मारवाडच्या जायल गुरुद्वाराहून वि. स. १५३७ मध्ये सुरतला आले. सुरतच्या नखरेबाज नबाबीच्या मदाचे मर्दन करून नबाबी महालयासमोरील पटांगणात आपले विशाल स्थान बनविले. या महापुरुषाने अनेक प्रकारच्या जुलूमांशी सामना करून अंत केला आणि जनतेत खऱ्या शांतीची स्थापना केली.

पीर फकीर दिदारसे, लगी निरबानको प्रीत॥
बडे समदर्शी साध जो, रखे संतनकी रीत॥

- निर्वाण चरित्र प्रकाश.

संत, योगी, पीर, फकिर वलींच्या दर्शनाचे निर्वाणसाहेब अनुरागी होते. म्हणून त्यांच्या दर्शनाकरिता ते दूर दूरपर्यंत पर्यटन करून त्या महा पुरुषांचा समागम प्राप्त करीत. निर्वाणसाहेब बऱ्याच वेळा तीर्थाटनाला गेले होते. त्यासमयी पीर आणि वलींच्या मंगल मीलनाची नोंद प्राप्त होते. येथे त्या पावन प्रसंगामधून सद्‌गुरु इमामशाहांशी त्यांचा समागम घडला त्या प्रसंगाचे वर्णन केले आहे.

सुफी संत इमामशाहांचे मुलतान कडून आगमन झाले. गुजराथ मध्ये आल्यानंतर अहमदाबादच्या सुलतान महेमूद बेगडयाने त्यांची कसोटी केली. खऱ्या सोन्याप्रमाणे या महापुरुषास जनतेने ओळखले आणि त्या प्रभावाचा सुगंध चहुबाजूस पसरला.

मूलतानसे आइया, हजरत इमामशाह॥
सोही सुफीयनके ढंगसे, लोगनको बडो चाह॥१॥
अैसे वली दीदार के, बडे आशिक निर्बान॥
अमदाबादमे शाहसे, मिलन हुवे दिलजान॥२॥

संत निर्वाण साहेब अहमदाबादला आले तेव्हां प्रथम हजरत शाहआलमच्या दर्शनास गेले. त्यांच्या समागमानंतर सद्‌गुरु इमामशाहांच्या दर्शनाची उत्कंठा लागली. इमामशाहांचे विचार व आचार शुध्द पवित्र जाणून व त्यांची ज्ञानदानाची अगाध शैली जाणून लोक त्यांना वली या महापुरुष रूपानेच ओळखत असत त्यांच्या या गुणामुळेच निर्वाण साहेब त्यांच्या दर्शनास पीराणा येथे गेले. उभय महापुरुषांचे मंगल मीलन झाले.

सोबते बैठे साधकी, उरमें बडी उमंग॥
हजरतशाह इमामको, रखे जीक्रको रंग॥३॥

परहित पेखे साइया, आये भोम गुजरात॥
साहिबको मत भुलीयो, बंदगी करो दिनरात॥४॥
सुफी अपने ढंगमे, साधु रहो मस्तान॥
दोनो जीक्र बखानते, साहिबको दिलजान॥५॥

ज्याने एकाग्रतेने भगवंताची भक्ती केली, जीकीरीने अत्यंत कळकळीने भगवंताशी रंग लावला होता. अशा सद्गुरु इमामशाहांना मिळण्यासाठी अत्यंत उल्हसित अंत:करणाने संत निर्वाण साहेब आले होते. आगंतुक प्रभावी संत पुरुषाच्या आगमनाने सद्गुरु सुध्दा अत्यंत उल्हसित झाले होते. दोघेही महापुरुष अत्यंत प्रेमाने व आनंदाने एकत्र बसले. सद्गुरु महाराज स्वत: परहितकारी परोपकाराकरिताच केवळ पर्यटन करीत करीत गुजराथ मध्ये आले आणि लोकांना उपदेश देत होते की तुम्ही ईश्वराला कधीही विसरू नका. रात्रंदिवस त्याचे नामस्मरण व भक्ति करा अशा रीतीने सद्गुरु आपल्या परीने व साधु निर्वाण साहेब मस्त दशेत येऊन हाच उपदेश करीत होते. अशा रीतीने उभय महापुरुष एकाच भगवंताच्या भक्तीत तल्लीन होऊन एकाच भक्तीमार्गाचा उपदेश करीत असता आता एकत्र मिळाले होते.

शाहको बानी कही, सुनो साई निर्बान॥
तुम्ही हो प्यारे रामके, हम प्यारे रहनाम॥६॥
अे दुनिया हे साईकी, सिजनहार हे अेक॥
न्यारे नामसे भुल गये, हम तुम दोनो विवेक॥७॥
सबका साहिब अेक हे, दो साहिब मत मान॥
दोनोमें दुनिया डुबी, शिर कुटे अजान॥
फकिरीसे यारी लगी, फक्कड लगे निर्बान॥
दिख साधु जौहरी, दिल लगे दिलजान॥९॥

सद्गुरु इमामशाह म्हणाले, 'संत निर्वाणजी आपण रामाचे चाहते म्हणून रामावर प्रेम करतात, कोणी कृष्णाचे चाहते असतात ते कृष्णावर प्रेम करतात, कोणी रहमानचे चाहक असतात ते रहमानवर प्रेम करतात. परंतु दुनियेला उत्पन्न करणारा एकच सांई, ईश्वर, खुदा आहे. लोक त्यासच वेगवेगळ्या नांवाने हाक मारतात आणि असे समजतात मी ज्या नांवाने हाक मारली तोच खरा ईश्वर आहे. अशा रीतीने माझा तुमचा आणि या अलम दुनियेचा झगडा चाललेला आहे. या जगताची विवेक बुध्दीच द्वैती बनलेली आहे. दोघांचा मालक एक, दोन कधीही नव्हते, नाही व असणारही नाही, तरीपण प्रत्येक व्यक्ति आपापल्या समजाप्रमाणे भगवंताला अलग अलग समजून अज्ञानपणाने माथाकूट करतात, अशा मार्ग चुकलेल्यांना आपण सत्य

मार्गदर्शन करून मार्गावर आणतात, आणि हे कार्य करीत असता एका फकिराशी आपला एवढा अनुराग जागला ही खूपच आनंदाची गोष्ट आहे. निर्वाणजी! आपण फक्कड दरवेशाप्रमाणे फिरून साधुच्या स्वांगाने एक जौहरी-जव्हेरी रूप आणि महान संत पुरुष आहांत, खरोखर मला आपण माझे दिलजान-सुहृदय लागतात. आपणाला पाहताच माझ्या हृदयात अपार प्रेम सग़ार दाटून येतो. पूर्वजन्माचे संबंध जागृत होतात.

करामतीके ढंगकी, जाको बडी पहेचान ॥
सोही करामती आ गये, नैन दिखे निर्बान ॥१०॥
हमको फकीरा साईके, जहा चेतावन आय ॥
सोये वाको क्या करे, जागे ताको सगाय ॥११॥
सोही साहिबके लाल है, नाम बुझे निर्बान ॥
बैया पकडके जीवकी, आये उबारन जान ॥१२॥
बडी खुशाली मिलनकी, निर्बान इमामशाह ॥
हम तुम दोनो अेक है, दोनोकी अेक राह ॥१३॥
हम मजहबकी आनमें, फिरते रहे बखान ॥
नि:पक्ष न्यारे दिखे, बडे साहिब निर्बान ॥१४॥

करामती प्रभावी महापुरुषा प्रमाणे जे परिक्षक आहेत अशा करामती पुरुषाचे अचानक आगमन झाले. या डोळ्यांनी निर्वाण साहेबांना न्याहाळले. मी तर फकीर-ईश्वराचादास. दुनियेला जागविण्याकरितां आलेला त्याचा एक सेवक आहे. जे जागत बसले आहेत त्यांच्याशी आमची प्रेम सगाई आहे, पण ज्यांना वारंवार जागवून सुध्दा घोर निंद्रेत घोरत पडले आहेत त्या अज्ञानी जीवांना काय करावे? आपण सुध्दा त्याच भगवंताचे लाल आहांत. भगवंताच्या नावाची ओळख करवून, भवसागरात बुडणाऱ्या जीवात्म्यांचा हात धरून वर काढून त्याचा उध्दार करणारे 'तारणहार' होऊन आलेला आहांत. आपल्या मीलनाने हृदय कसे पुलकित होते. अपार हर्ष होतो. निर्वाण आणि इमामशाह तुम्ही आणि मी एकच आहोत. दोघांचा रस्तापण एकच आहे. मी धर्माच्या पावन प्रचाराचा महत्वाचा भाग बजावित आहे तर आपण अत्यंत नि:पक्ष निरपेक्ष रीतीने जगताची सेवा करीत आहांत. तुमच्या जवळ धर्म विषयक कोणताच आग्रहाचा भाग नाही. भगवंताच्या कोणत्याही नामाचा जाप करा. आपण अशा कोणत्याही विशिष्ट आशयाच्या धर्माच्या अवरणापासून दुर-मुक्त राहून सेवा करतात म्हणून आपणास 'निर्वाण' साहेब म्हणतात. हे योग्य आहे. आपण खूप महान कार्य करीत आहांत.' असे म्हणत इमामशाहांनी निर्वाण साहेबांना

आपल्या हृदयाशी लावून गाढ आलिंगन दिले व प्रेमाने त्यांच्या पाठीवरून, शिरावरून हात फिरवून धन्यवाद दिले. नंतर दोघांचा बराच वेळ वार्तालाप सत्संग झाला. सद्गुरु इमामशाहांच्या चरणावर लोंटागण घालून संत निर्वाण साहेब जाण्याकरितां उठले व त्यांनी जड अंत:करणाने सद्गुरु महाराजाचा निरोप घेतला.

हा पावन प्रसंग आलेखन करणारा ब्राह्मण 'कवि दुलाराम' ने 'निर्वाण चरित्र प्रकाश' नामक ग्रंथात लिहिलेले अंतिम शब्द हृदयात ठसतात. ते म्हणतात की तो दिवस केव्हा उगवेल की असे पीर फकीर आणि महान संत पुरुष वली, योगी, संत महात्म्यांचे दर्शन घडण्याचा योग प्राप्त होईल.

शाहको शीर झुकाइके, सद्गुरु हुवे विदाय॥
'दुला' ऐसा दिन कहाँ, पीर दीदारा पाय॥

अशा प्रकारचे अनेक पावक प्रसंग सद्गुरु इमामशाहांच्या जीवनात घडून आले. तसेच त्यांच्या पश्चात त्यांच्या संत धामावर वेळोवेळी अनेक दैवी चमत्कारिक प्रसंग घडून आले. पण हे प्रसंग म्हणजे कांहीं त्यांचे जीवन सर्वस्व नव्हते. त्यांनी त्या प्रसंगातून वेळो वेळी सद्भक्तांना जो ज्ञानोपदेश केलेला आहे तोच खरोखर परम पावनकारी, प्रेरणादायी आणि मानवास जीवनाची दिशा दाखविणारा अमृत तुल्य ठेवा आहे. प्रत्येक सत्पंथीयाने आपल्या परम पूजनीय व वंदनीय अशा सद्गुरुंच्या जीवनाचा गाभा जाणून त्यांच्या मार्गदर्शनानुसार आपले जीवन घडविण्याचा प्रयत्न करावा.



# ४७. सद्गुरु इमामशाहांचा दरबार.

नैन दिखे सद्गुरु दरबारा, गंगा मै जाऊ बलिहारा।।
हिंदु मुसलमाँ दोनो आवे, सुनी उपदेश विमल हो जाये।।
बडे योगी मुनि गुणवाना, आय खडे गुरुधाम निधाना।।
साहिब सबका करे सन्माना, योगी जन लगे दिलजाना।।

सद्गुरु इमामशाहांचा दरबार या डोळ्यांनी पाहून मी धन्य झालो. हे गंगाजी, मी स्वत: त्याच्यावरून ओवाळून घेईन अशा प्रकारचा तो दरबार खरोखर अवर्णनीय होता. त्यात हिंदु मुसलमान सर्वच जातीचे धर्माचे वर्णाचे लोक येऊन सद्गुरु सन्मुख बसून अमृततुल्य उपदेश ऐकून विशुध्द अंत:करणरूप बनून जात. मोठमोठे योगीजन मुनिवर येत, सद्गुरुंच्या धामावर येऊन शांतीने बसत असत. सद्गुरु महाराज अतिथी अभ्यागतांची सेवा स्वागत सत्कार सन्मान करीत असत आणि ते महापुरुष योगीजन सद्गुरुंना प्रिय लागत असत, कारण त्यांच्यात त्यांचा खरा अनुराग होता. अंत:करणापासून ते त्यांच्यावर प्रेम करीत.

कितने योगी आयके गैया, याद रही ओर बाते भुलैया।।
सुनो योगी कुछ नाम बखानी, अडबंगनाथ योगी गुणखानी।।
सदानंद अरू रसिकनाथा, जान्हवीदास अरू मकरनाथा।।
हारितनाथ दिगंबर दासा, बहुरी योगी जन आये अवाशा।।

असे तर कित्येक योगी-मुनिगण आले आणि गेले. त्यांच्या नावांची आठवण तर आता विस्मृत होत आली तरीं पण जी नावे आठवणीत राहिली. त्यांच्या पैकी योगी अडबंगनाथ महान होते. तसेच योगी सतानंदजी, योगी रसिकनाथ, योगी जान्हवीदास, योगी मकरनाथ, योगी हारितनाथ, योगी दिगंबरदास, महान संत निर्वाण साहेब, असे कित्येक सत्पुरुष महान योगीश्वर संत धामावर येऊन गेले. आणि त्यांच्या समागमाची वेगळीच झलक दिसून आली. त्यांची परमपावक चरित्रे श्रवण करताच सद्गुरु इमामशाहांच्या ह्रदयात अपरिमित आनन्द होऊन अनुराग दाटून आला.

ज्ञानी जन बैठे उमंगा, लगे मोज पावे सत्संगा।।
जात वरन कछु भेदा नही, साहिब जात अजात लिखहि।।
सबसे लिखावे अेक निमाई, नाम जपो मुखसे मेरे भाई।।
जीक्र बखानो, जीक्र बखानो, जीक्र बिना तुम सबही अजानो।।

ज्ञानी पुरुष अति उत्साहाने येऊन बसत आणि संत समागमाची मौज अनुभवून प्रेमाने मग्न होऊन जात. तेथे जात परजातीचे काही बंधनच नव्हते ईश्वर अजात आहे. त्याच्या घरी कोणी उच्च निच नाही, कोणी लहान मोठा नाही. केवळ एकच गोष्ट महान आहे आणि ती म्हणजे 'एकमेव ईश्वराचे स्मरण' ह्या शिवाय दुसरी कोणतीही गोष्ट महान नाही. सर्व उपाधींचा त्याग करून तुम्ही ईश्वराची निर्मल विशुध्द अंत:करणाने भक्ति करा. त्या शिवाय कधीहि तुमचा उध्दार होण्यासारखा नाही. त्या ईश्वराच्या प्रेमभक्तिशिवाय खरोखर तुम्ही जीवनाची बाजी हरून जाल. म्हणून वादविवाद, तर्ककुतर्क सोडून भक्ति करा. भगवंताची जीकीर करा. खरी गोष्ट ही आहे की भगवंताशी अजाण बनून राहू नका. त्याला नित्य ओळखा.

मेरे साईको जीक्र पियारी, जीक्रसे तुमी रखलो यारी।।
आतुर चेत सजाग बनाया, गाफिल नर खस्ता खूब खाया।।
भवाटवीमें भटकत भुंडे, जीवन जीवे लबाड अरू लुंडे।।
सतकी राह जाहिको पाई, ताकी मानो सुफल कमाई।।

माझ्या स्वामीला भक्तीच प्रीय आहे. म्हणून तुम्हाला वारंवार सांगतो की तुम्ही या जीकीरीने भक्तीशी स्नेह करा. त्याच्यावर अपरंपार प्रिती करा. चतुर-समजदार मनुष्य एवढ्याशा गोष्टीवरून जागृत बनतो. पण जे गाफिल असतात ते तर अनेक खस्ते खात खात भटकत राहतात. या भवाटवीत असे लोक किट, पतंग, डुकर, गाढवा प्रमाणे भटकतात. ज्यांनी हा सत्याचा मार्ग स्विकारलेला असतो व त्यानुसार जो क्रियामाण करतो त्यांचे जन्मकर्म सफळ होत असते. ते लोक खरोखर दुनियेत येऊन सफळ झाले.

मानुषतन दुर्लभ पावा, बेर जन्म नहि आवा।।
ज्ञानी जन यही गति बखाने, अज्ञानी शिर कटे अभिमाने।।
बडे फकिरा मौलवी आये, काजी उलेमा पीरको पिछनाये।।
जाके उरमे जगे बडाई, ताथे दूर रहे पाक पीराई।।

हा मानव देह फार दुर्लभ आहे, तो वारंवार मिळू शकत नाही. ज्ञानी पुरुष ही गोष्ट मान्य करतात पण जे अज्ञानी असतात ते मात्र कोठेहि डोके लावून स्वत:च्या अभिमानाच्या गोष्टी पुढे करतात. अशा अभिमानाच्या गोष्टी करणारे बरेचसे येऊन गेले मोठे मोठे फकीर मौलवी साहेब आणि काजी उलमा वगैरे अनेक जण आले आणि सद्गुरु इमामशाहांच्या सान्निध्यात बसून त्यांच्या अगम्य गतीचे अवलोकन करून निरभिमानी होऊन वंदन करून परत फिरले.

लालुशाह अरू रहमानशाही, तुगलक शाहीकी दिखे पीराई।।
जादु मंत्रका जोर कहा है, प्रगट पीराना बैठे जहा हे।।
नथ्थन जोगी अरू हुबलसेना, ताको इलम दिखे नीज नैना।।
आखिर साइके आगे झुकैया, जुठे इलम ता दिन तजैया।।

कित्त्येक तर असेही लोक आले की, त्यांचा स्वत:च्या इलमवर पूर्ण विश्वास होता व त्या बळावर आपण इमामशाहांची कसोटी पाहू या उद्देशाने ते सद्गुरुंच्या समोर आले. त्यांनी आपल्या मंत्रबलाचा उपयोगही केला पण जेथे पावित्र्य निर्मलता आहे तेथे या चरपट चेटूक मंत्राचे काय बळ चालणार आहे. तरी सुध्दा स्वत:च्या विद्याबलाभिमाने ते पुढे झाले. त्यात नथ्थन जोगी, हुबलसेन वगैरे मुख्य होते. ते फारच जोरावर येऊन सद्गुरु महाराजावर आपल्या इलमचा प्रयोग करू लागले. पण सद्गुरुवर त्यांच्या विद्येचा काहीच परिणाम होत नव्हता. बरीच खटपट करून सुध्दा काही उपयोग होत नाही हे पाहून ते सर्वजण खजिल झाले. दीनतेने ते सर्व सद्गुरु चरणावर लीन झाले आणि जीवनात फिरून असे काही मलीन काम करणार नाही अशी शपथ घेऊन शुध्दमतिचे बनून त्यांचे सेवक झाले.

परचा बहुत गुरुदेव पीराके, कौन लिखे अरू कौन कहा के।।
जिसको गम गुरुकी आवे, लीलामृत सोही जन पावे।।
पीर फकीरका यही दरबारा, ताको कैसे लह हू पारा।।
नायाजी विमल यश गावे, गांगा गुरुचरण सुख पावे।।

सद्गुरु इमामशाहांच्या चरित्राचा पार लागूच शकत नाही, तसेच कोणीही त्याची यथार्थ नोंद करू शकणार नाही. कोण कोठून आला आणि त्याचे उलट काम झाले असे त्यांच्या दरबारात एकही उदाहरण नाही. ज्यांच्या जवळ गुरूगम आहे, त्या त्या सर्वांचे कार्य अपार असिम गुरुकृपेने पार पडलेले आहे. हा तर पीर फकिरांचा दरबार होता. त्याचा कोणीही पार पाऊ शकेल असे नाही. नायाजी विशुध्द अंत:करणाने सद्गुरुंचे यशोगान गात आहेत. अशाच रीतीने गंगाजी सद्गुरु चरणी लीन होऊन खरी शांति अनुभवीत आहे. सद्गुरु चरणासमान अखंड सुखाचा आस्वाद कोठेही प्राप्त होत नाही.

★ ★ ★

## अमर आत्मा

सद्‌गुरु इमामशाह, आतमज्ञानी संत॥
गीता ज्ञान समुझाइया, ज्ञानी सार ग्रहंत॥

सद्‌गुरु इमामशाह महाराज आत्मज्ञानी संत होते. एवढेच नव्हे तर गीतेचे पण प्रखर अभ्यासू होते. म्हणूनच त्यांनी संतभाभारामला गीता तत्त्वज्ञानाचा गहन विचार उपदेशून आत्म्याची अमरता समजावून सांगितली आहे.

सांख्ययोगमे साईया, कथेरी आत्मज्ञान॥
अमर आत्माको पेखजो, भाभाराम सुजान॥

सांख्य योगात श्रीकृष्ण भगवंतांनी आत्मज्ञानाची गहन तत्ववार्ता करतांना आत्म्याची अमरता समजाविलेली आहे. या आत्म्याच्या अमरत्वास जाणून भाभाराम तू हे ज्ञान समजावून घे. हे भाभाराम या आत्म्यास यथार्थ रूपाने कोणी ओळखू शकत नाही. अगदी निकट असून सुध्दा त्याला न जाणता आपण दूरच राहतो. त्यास जाणण्याची कोणी कोशिष सुध्दा करीत नाही हे आपले अज्ञान आहे.

नाऽसतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः॥
उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः॥२/१६

जे असत् म्हणजे मुळीच नाही, ते आहेसे होत नाही आणि जे सत् म्हणजे आहे, ते नाहीसे होत नाही. असा हो दोहोंचा निर्णय तत्त्वज्ञात्यांनी जाणिला आहे.

अविनाशि तु तद्विध्दि येन सर्वमिदं ततम्॥
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हतिं॥२/१७

ज्याच्या सामर्थ्याने हे विश्व चालले आहे ते नाश पावणारे नव्हे असे जाण. ते अव्यय म्हणजे सर्वदा अविकृत राहणारे त्याचा नाश करण्याला कोणीही समर्थ नाही.

अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ता शरीरिणः॥
अनाशिनोऽ प्रमेयस्य तस्मायुध्यस्व भारत॥२/१८

हे देह अंतवंत म्हटले आहेस तरी त्यातला जो देही तो नित्य अविनाशी आणि अप्रमेय म्हणजे पूर्णपणे समजायाचा नाही असा आहे. यास्तव हे भारता तू युध्द कर-कर्म कर.

य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम्॥
उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते॥२/१९

जो मानितो की हा देही कोण्या एकाला मारू शकतो, आणि जो मानितो की याला कोणी मारू शकतो. त्या दोघानाही खरे समजत नाही. हा कोणाला

ही मारीत नाही आणि यालाही कोणी मारीत नाही. हा जन्मत नाही आणि कधी मरतही नाही. हा मागे जन्मला होता किंवा पुन: पुढे जन्मेल असे नाही. हा अजन्मा नित्य शाश्वत पुराणपुरुष आहे. शरीराचा वध झाला तरी याचा वध होत नाही. हा अविनाशी, नित्य, अनादि, अव्यय म्हणजे विकार न पावणारा असे जो पुरुष जाणतो तो कसा कोणाला मारविल? आणि कसा कोणाला मारील? जसा कोणी मनुष्य जुनी झालेली वस्त्रे टाकून दुसरी नवी घेतो, तसा हा देही जुने देह टाकून नवे देह घेतो.

## ★ पद ★

असत वस्तू अमर नथी, अने सत्नो नाश न होई।।
सत् असतना सिध्दान्तने, मुनिवर ज्ञान विचारी जोय।।टेक।।
आत्माने तमे ओळखो, आतम पारस खाण।।
आत्म्याने जाण्याविना, तमे डुबो चौर्याशी खाण।।१।।
अविनाशी अेक आत्मा, रह्यो सकळ भरपूर।।
नाश कदी थाये नही, अेनु वधे घटे नही नूर।।२।।
नाशरहित वखाणीये अेने, सर्व व्यापक जाण।।
अविकारीने ओळखो, अमाप सोही वखाण।।३।।
मारो मारो सहु कोई कहे, अेने मारी शके नही कोई।।
हणायलो जेही कहे, अेने साची समझ नही होई।।४।।
जन्मे मरे नही आतमा, हतो न हतो नहि भाख।।
अजन्माने पुरातन, शाश्वत अेने दाख।।५।।
अविनाशी सोही आतमा, अविकारी अेने जाण।।
पेखे कोई मुनिवरा, सोही संतपुरुष निरवाण।।६।।
जामा जुना थई गया, अेनो फिक्को पडी गये रंग।।
नवा जामा पेहेरीये, हैये धरीने उमंग।।७।।
जुनी काया परहरी, नवी धरे छे काय।।
देहनो नेह तमे शीद करो, अे तो छीनमा छुटी जाय।।८।।
आतम आतम सहु कहे, आतम बुझे नही कोई।।
पीर इमामशाह अेम बोलीया, बुझे सो ज्ञानी होई।।९।।

आत्मा अविनाशी अजर अमर आहे. शरीरावरील कपडे मळल्यानंतर मनुष्य शरीराचा त्याग करीत नाही केवळ मलीन वस्त्रांचा त्याग करतो, नविन वस्त्र धारण करतो. तद्वत आत्म्याचे आहे. जून्याचा त्याग करून नविन देह आत्मा धारण करतो. तो

शाश्वत आहे. अविकारी आहे, हे जाणूनच संत पुरुष निर्विकार पदाला पोहोचले. ते जीर्ण अशा देहाच्या मलीन वासनांचा त्याग करून हर्ष, शोक, संतापापासून अलिप्त असतात. ते महापुरुष संसारात फार दुर्लभ असतात. अशा महापुरुषांच्या संगतीत राहून मानव जन्माचे सार्थक करता येते.

★ ★ ★ ★ ★ ★ ★

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि, नैनं दहति पावकः॥
न चैनं क्लेदयन्त्यापो, न शोषयति मारूतः॥२/२३

आत्म्याला शस्त्रे कापीत नाहीत, याला अग्नि जाळीत नाही, याला उदक भिजवीत नाही आणि याला वायु सुकवीत नाही.

अच्छेद्योऽयमदाह्योऽ यमक्लेद्योऽशोष्य एवच॥
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः॥२/२४

हा कापता येण्याजोगा नाही, हा जाळता येण्याजोगा नाही, हा भिजविता येण्याजोगा नाही, आणि सुकविता येण्याजोगा नाही. हा नित्य सर्वत्र भरलेला स्थिर स्वभावाचा, अचल आणि सनातन म्हणजे अनादि काळापासून सर्वदा असणारा असा आहे.

## ★ पद ★

स्वांग सजीने आवीयो, जरकश जामा अंग॥
निरखता नैना ठरे, चडे सवायो रंग॥टेक॥
मरता घणाने निरखीया, अेना मरी गयो छे शरीर॥
आत्मा कदी मरतो नथी, तमे सुणील्यो धरीने धीर॥१॥
अमर छे ते केम मरी शके, अेनो नाश कदी नही होई॥
अमर छे अेक आतमा, तम ज्ञान विचारी जोई॥२॥
ताती तेग चाले नही, चाले नही बरछी कटच्यार॥
जखम लागे शरीरने, आतम न्यारो निरधार॥३॥
दावानल चाहे बळे, परलेकार देखाय॥
बळी शके नही आतमा, अे अचरज सम लेखाय॥४॥
नदी नाला भरपूर छे, वह छे समुंदर सात॥
अलिप्त छे अे आतमा, ते भिजे नही दिन रात॥५॥
पवन फुकावे जोरथी, आंधी चडे चोपास॥
सुकाय नहि ये आतमा, तमे मानो खासोखास॥६॥

आत्मा कदी छेदाई नही, अनल बाळ्यो नहि जाय।।
पवन सुकवी शके नही, जळमा ते नहि भिंजाय।।७।।
सदा काळने सर्वदा, रहेनारो अेने जाण।।
स्थिर अचळ अनादि छे, अेनी करी लेजो ओळखाण।।८।।
देहविना नही आत्मा, आत्मा विना नही देह।।
पीर इमामशाह अेम बोलीया, तमे आतमशु करो नेह।।९।।

स्वांग परिपूर्ण सजून हा जिवात्मा जन्माला येतो. कर्मानुसार गति प्राप्त करतो. सुखदु:खाचे भोग उपभोगतो व शेवटी मरण पावतो पण आत्मा कधीच मरत नाही. तो अमर आहे. शरीराला शस्त्राने टोचले, कापले, मारले तर ते नाश पावते पण त्यात वसलेला चैतन्य स्वरूप आत्मा नाश पावत नाही. आत्मा देहाशिवाय स्वतंत्र वेगळा राहू शकत नाही. देहात राहूनच तो सुखदु:खाचे भोग उपभोगूनही तापविलेल्या लोखंडात भरलेल्या अग्नीप्रमाणे अलिप्त राहतो.

★ ★ ★ ★ ★ ★ ★

अव्यक्तोऽयमचिन्त्योऽ यमविकार्योऽयमुच्यते।।
तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि।।२/२५।।

हा अव्यक्त म्हणजे अमुक एक प्रकारचा असा निवडून दाखवितां न येणारा हा अचिन्त्य म्हणजे मनानेहि जाणता न येणारा, हा अविकार्य म्हणजे याच्या ठायी कोणी काही विकार उत्पन्न करू शकणार नाही असा हा म्हटला आहे. तस्मात् या प्रमाणे याला जाणून या विषयी शोक न करणे हे तुला योग्य होय.

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्य:।।
आश्चर्यवच्चैनमन्य: श्रृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्।।२/२९

प्राण्याकडे पाहून कोणी आश्चर्याने चकित होऊन जातो. दुसरा कोणी म्हणतो केवढा हो चमत्कारिक पदार्थ हा. तिसरा कोणी याच्या स्वरूपाचे वर्णन ऐकूनच थक्क होऊन जातो आणि याचे वर्णन ऐकून अजूनही याला मुळीच ओळखीत नाही, असाही कोणी असतो.

## ★ पद ★

आत्मा मुखथी ओचरे, केवो ते नही कहेवाय।।
शुध्दबुध्द पहोचे नही, अे आतम केम ओळखाय।।टेक।।
इंद्रियोथी जणाय नही, अव्यक्त अेनुं नाम।।
कई पेरे अेने ओळखीये, कहो ज्ञानीजन भूप।।१।।

अचिन्त्य अेने कहे, कहो चिंतवी केम शकाय॥
चाहे तमे चिंतन करो, अे पूर्ण चिंतव्या नही जाय॥२॥
अविकारी अेने कह्यो, भरे विकारी अंग॥
आत्मा सोऊ न्यारो रहे, विकारी खेले रंग॥३॥
साधन संपन्न कोई महात्मा, अेने आत्मानी थई ओळखाण॥
अचरज जेवो छे आतमा, अेने निरखी शके निरवाण॥४॥
दर्शनलाभ जेणे पामीया, थयो छे साक्षात्कार॥
सोही योगी वरणी शके, अचरज अेनो सार॥५॥
साचा साधक कोई सुरमा, आतम ज्ञान भांडार॥
आश्चर्य जेवो समजी शके, आत्माने तत्सार॥६॥
शुध्दात्माने सांभळ्यो छता, अबुज रह्या छे अनेक॥
भणे इमामशाह सुनो मुनिवरो, तमे आतम पेखजो विवेक॥७॥

आत्म्याचे वर्णन मुखाने करता येत नाही. ते शुध्दबुध्दीच्याही पलिकडे आहे. केवळ इंद्रियांना सुध्दा जो अगोचर आहे, अचिन्त्य आहे. मन बुध्दिच्याहि पलिकडे ज्याचे अव्यक्त स्वरूप आहे. विकारांनी भरलेल्या या देहात राहूनहि निर्विकारी असा तो आहे. साधनसंपन्न असा कोणी एखादाच महापुरुष त्याचे स्वरूप समजू शकतो. त्याचा स्वरूप संपन्न साक्षात्कार ज्याला होतो तोच महायोगी त्यास ओळखू शकतो. विवेकज्ञान संपन्न महापुरुषच केवळ शुध्द आत्म्यास जाणतो. बाकी तर त्या आनंदघन आत्म्याचे स्वरूप वर्णन ऐकूनच थक्क होऊन जातात. त्याला ते ओळखूही शकत नाही.

## ★ पद ( वेणीवच्छराज ) ★

हाजरबेग कहे नाथजी, वेणीवच्छराजनो संग॥
क्या कारणे तम साथे, अेने लागी गयो रंग॥टेक॥
स्वर्गलोकमा जई करी, जाल्यो अेमना ढंग॥
साथे बे हळी मळी, अमे सहज किधो सत्संग॥१॥
वच्छराज मुख बोलीया, सुणो गुरुजी गति मोर॥
पुण्यदान झाझा करी, अमे आवी रह्या आने ठार॥२॥
स्वर्गलोकनी साह्यबी, तुच्छ लागे तन माय॥
वचन दिधा ते पाळवा, अमे गया छे अवनी माय॥३॥
मातापितानी सेवा करी, दीनने दिधा दान॥
भक्तिनुं भातु बांधीने, फरी आव्या छे आने स्थान॥४॥

वच्छराज अेवा मुनिवरा, अेना दर्शनथी दुःख जाय॥
भावे करीने भेटीया, तनडाना ताप विलाय॥५॥
हाजरबेग भली करी, वच्छराजनु बुझो वखाण॥
पीर इमामशाह उचर्या, वेणीवच्छराजनु आख्यान॥६॥

## ★ पद (परिवर्तन) ★

पूजाविधी भली भातनी, अमे भाखी छे साच उवाच॥
शब्द साचा सद्गुरु वाचा, फळो मंत्र ईश्वरी उवाच॥टेक॥
चार जुगथी चालती, आवी छे कलियुग माहे॥
शुध्द विधी राखी रह्या, अेमा फेर कर्यु नही क्याय॥१॥
सत्य युग सीज्या प्रल्हादजी, पाच करोड वह्या अेमनी वार॥
त्रेतामा हरिश्चन्द्र रायजी, सात करोड उतार्या भवपार॥२॥
द्वापरमा राजा युधिष्ठिर, नव करोड ओधार्या निखाण॥
पूजा विधी घट पाटनी, पेख्या चतुर सुजाण॥३॥
सिध्द बालीनाथजी, मेघ धारवा संत सुजाण॥
तुंवरा पीर रामदेवजी, जेशल जाडेजो करे वखाण॥४॥
साई निरखता भ्रम थयो, हमे कलमो लीधोनथी क्याय॥
विधी आद अनादनी, अेनो अखंड राख्यो छे महिमाय॥५॥
वशमी वेळा आवी रही, अेमा अधर्मी थाशे लोक॥
पूजाविधी अभडावीने, अेनो महात्म्य करशे फोक॥६॥
मानवीना मन मोळा थशे, नही धर्ममां रहे अनुराग॥
खोटा संगाथे खोटा थई, मांडी देशे खट राग॥७॥
सत बुझा ने सत चालजो, राखजो सतनीरे टेक॥
पीर इमामशाह आगम भाकीया, सत्य रही जाशे अेक॥८॥

## ★ पद (पूजाविधी) ★

हाजरबेग कहे नाथजी, करो धर्म गतिनो विचार॥
दिन आथमता फरी जशे, अेनो अवळो करशे प्रचार॥टेक॥
मुनि व्यासने शुकदेवजी, कथी गीता कृष्ण भगवान॥
पेगामी महंमदे आवीने, कथीया पाक कुरान॥१॥
सत्व गुण गीता ज्ञानने, बुझे योगी मुनिराज॥
भक्त जना भेदी शके, जेओ सत्यना शिरताज॥२॥

अपनो धर्म महान छे, अन्य धर्मथी रहो दूर॥
तामस अेवा ज्ञानथी, अवनी थई चकचूर॥३॥
सर्वधर्मश्रेष्ठ छे, तम काफीर कोने कहो भाई॥
आपसमां पडे आंतरो, अेनी साथे केवी सगाई॥४॥
सत्यधर्म बतावीये, अेना अेंधाणो आद उनाद॥
पूजाविधी घटपाटनी, तमे मुनिवर राखजो याद॥५॥
अधर्मीये आदर्यो, भ्रष्ट किधो सत्य धर्म॥
शुध्द विचारी मुनिवरो, अेनो समजी लेजो मर्म॥६॥
बगडेली बाजी सुधारवा, अमे आवी वस्या आ ठार॥
भणे इमामशाह सुणो मुनिवरो, तमे चेती लेजो आ वार॥७॥

## ★ पद ( स्वर्गलोकना दर्शन ) ★

स्वर्गलोक सोहामणा, अेवुं कहे सहु लोक॥
गुरु गति कहो स्वर्गनी, तमे नजरे जोया सोही लोक॥टेक॥
लोकोकहे छे पीरजी, स्वर्ग गया तेणी वार॥
ईंट सोनानी लावीया, राखी छे आने ठार॥१॥
सोनु जोई लोभाई गया, अेमा शी छे झाझी नवाई॥
बीजु काई दिठु नही, मुख उचरता नथी केम साई॥२॥
पीरजी अेवी सुणी, नेक कमाई सार॥
हुरा अेवाने सत्कारवा, उभी रही छे त्यांय॥३॥
साचाने शरपाव छे, साहेबने दरबार।
भोग भूमीशु करो, तमे आवी रहो आ ठार॥४॥
कर्मभूमीमां आवीने, तमे करणी कमावो मारा भाई॥
स्वर्गना सुखने भूली रहो, आ छे स्वर्ग बीजो नही क्यांय॥५॥
हिरा रतन नही लावीया, सोना लाव्या संगाथ॥
खाली हाथ जशो नही, ईंट दिधी हरी हाथ॥६॥
नजरे जोयु मुनिवरो, भक्ति पदारथ महान॥
दान दया आधिनता, करो, अभ्यागतनु सन्मान॥७॥
मानव देह मोंघे मळ्यो, फरी नही आवे हाथ॥
पीर इमामशाह कहे मुनिवरो, तमे रहेजो हमारी संगाथ॥८॥



# ४८. सद्गुरुंचा सच्छिष्यांना प्रेमपूर्वक आशिर्वाद व निरोप आणि त्यांचे अद्भूतपूर्ण ब्रह्मधामात प्रयाण.

एके दिवशी सद्गुरु इमामशहा महाराज एकटेच ध्यानस्त बसले असता त्यांना जाणीव झाली की, आपले आता जगतात प्रगटपणे वावरून ईश्वराच्या अवतारांचे व ते अवतार पात्र जाणण्याचे, युगधर्म व इतर ज्ञान लोकांना विषद करून दाखविण्याचे कार्य आता संपुष्टांत आलें आहे. तेव्हा आपण आता प्रगट पणे न राहता समाधि घ्यावी. त्याप्रमाणे इ. स. १५०० च्या सुमारास म्हणजे संवत १५५७ मध्यें त्यांनी आपण बांधलेल्या मंदिरांत समाधि बांधण्याचे काम सुरु केले थोडयाच अवधीत ते कार्य पूर्ण झाले.

नंतर सद्गुरुंनी एके दिवशी आपल्या सर्व परम सेवकांस जवळ बोलाविले. सर्व जण मोठ्या प्रेमभावाने त्यांच्या चरणी लागले व सद्गुरुंनी महत्प्रेमाने सर्वांना आपल्या शेजारी बसविले. नंतर सद्गुरु महाराज सर्वांना उद्देशून म्हणाले कीं, 'तुम्ही खरोखर सर्व जणांनी परमेश्वराची व सद्गुरुची त्याच प्रमाणे सत्पंथाची तनमनाने परम विशुध्द भावाने, दृढनिश्चयाने व त्यांतल्या त्यांत निष्काम कर्मबुध्दिने सेवा चाकरी केलेली आहे. हे सद्भक्तांनो गुरुभक्ति अतएव गुरुसेवा किती फलदायक असते याचे ज्ञान मी तुम्हास अगोदरच कथन केलेले आहे. त्यांतल्या त्यांत तुम्ही निष्काम, निर्वासनिक बुध्दिने केलेल्या गुरु सेवेचे फळ म्हणून मी तुम्हास जे वरदान देत आहे ते अगदी निश्चयाने पूर्ण होईल.

असें सर्वांना सांगून सद्गुरु महाराज हाजरबेग यास म्हणाले, "हाजरबेग, मी जेव्हा समाधिस्थ होईल त्यानंतर थोडयाच दिवसांनी तुझे देहावसान होईल. तेव्हा माझे समाधीपासून वीस पावलांवर तुझी समाधी बांधण्यात येईल. सर्व लोक प्रथम तुला वंदन नमस्कार करतील व सर्व प्रथम तुला पानफूल वाहतील व त्यानंतर मग माझे समाधीस पानफूल चढवून नमस्कार करतील. तसेंच तुझी समाधि जरी उघडया पटांगणांत असली तरी कितीही उष्णतामान तापले तरी तुझी समाधि अगदी थंडच राहिल."

त्यानंतर सद्गुरु इमामशहा नायाकाकास म्हणाले कीं, "आपण कानम जिल्ह्यांत कुकस या गांवी आपले सुंदर मंदिर बांधून त्या ठिकाणी राहावे. आपल्या मंदिरांत अखंड घृत ज्योत जळत राहून तिला काजळ मुळीच येणार नाही. तसेंच आपल्या येथें सदैव सदाव्रत (अन्नसत्र) चालू राहील आणि त्याशिवाय तुझ्या ठिकाणी मानीत चालून हजारों लोक येऊन तुझा उत्सव करीत राहतील.'

नायाकाकास असें वरदान देऊन सद्गुरु इमामशहा महाराज भाभाराम व कीकीबाई यांस म्हणाले कीं, 'हे परमप्रिय सद्भक्तांनो, आपण उभयता बंधु-भगिनीने केलेल्या तपश्चर्येचे फळ व गुरु सेवेचे फळ म्हणून भाभाराम तू 'देवा' या गांवी तुझे मंदिर बांधावे व कीकीबाई तू देवा गांवाच्या अगदी शेजारीच असलेल्या 'रूण' या गांवी तुझे मंदिर बांधावे, तुमचे दोघांचे येथे सुध्दां अखंड घृतज्योत तेवत राहिल व तीला काजळ येणार नाही. तुमचे ठिकाणी नेहमी यात्रा भरून अखंड अखूट असे अन्नसत्र (सदाव्रत) चालूं राहील. तुमचे भंडारांत कधीहि कमतरता पडणार नाही.'' असे त्या दोघास वरदान दिले.

शाणाकाका यांनीसुध्दां गुरुजींची अत्यंत भक्तिभावाने शुध्द अंत:करणाने सेवा चाकरी करून आपले सारें आयुष्य त्यांत घालविले होते. त्यांच्या सेवेचें फळ म्हणून गुरुजींनीं आपल्या हयातीत स्थापन केलेल्या मंदिरांत पूजाअर्चा करण्याकरितां व ती संस्था चालविण्याकरितां त्या संस्थेच्या सर्व मिळकतीचे वहिवाटदार नेमले (गादिदार-गादीपति नेमले) व त्या प्रमाणे ती संस्था मालकी हक्काप्रमाणे भगवेकाका म्हणून बाल ब्रह्मचारी गादी शिष्य परंपरागत चालू ठेवावी असें शाणा काकास सांगून गुरुजींनी सर्वांना गाढ प्रेमालिंगन दिले व सर्वांना आशिर्वाद देऊन व आपण स्थापन केलेली संस्था पूर्णपणे हिंदूच्या बालब्रह्मचारी साधु-भगवे काकांच्या वहिवाटीत देऊन त्यांना गादीदार म्हणून अधिष्ठित करून सद्गुरु महाराज समाधी घेण्याच्या मार्गास लागले.

सद्गुरु महाराजांचे दर्शन घेण्यास आज त्यांचे अनेक शिष्य पिराण्यास सद्गुरुंनी बांधलेल्या देवालयांत येत होते. भेटण्यास येणाऱ्या प्रत्येकाबरोबर सद्गुरु महाराज भाषण करीत असत. सद्गुरु त्या सर्वांना मोठ्या प्रेमाने आशिर्वाद देऊन आत्मज्ञानाची जाणीव करवून देतअसत. सर्व तऱ्हेचे, सर्व जातीचे व धर्माचे लोक त्या मनुष्यरुपी ईश्वरास भेटण्यास येत असत. त्या सर्वांना सद्गुरुजींनी ज्ञानोपदेशामृत पाजून तृप्त केले.

संध्याकाळची वेळ झाली दाट जंगलावर आणि पर्वत शिखरावर निशादेवीची दाट छाया पडली. आजुबाजुच्या विस्तीर्ण मैदानावर पसरलेल्या उंच व भव्य वृक्षावर पडलेल्या या छायेमुळे वातावरणांत एक प्रकारची उदासीनता भासूं लागली होती परंतु सायंकाळच्या सुगंध वाहून आणणाऱ्या मंद, सुशितल व संथ वाऱ्याने वातावरणांत उदात्तता निर्माण केली होती. हा पवित्र गंभीर देखावा पाहून क्षुद्र मानवी प्राण्याच्या मनाची स्थिती बदलल्याशिवाय राहणार नाही. कांही घटकेपूर्वी चराचर विश्वाला प्रकाश देणारा सूर्य आता कोठे गेला होता? लहान मुलास ज्या प्रमाणें या विषयीं मोठे कोडे पडते या प्रश्नाने त्याचे मन गोंधळून जाते, त्याच प्रमाणे लहान मुलासारखाच

ज्याचा आत्मा आहे अशा पवित्र मनुष्याचीहि हीच स्थिती होते. पवित्र मनुष्याला जगन्नियंत्या परमेश्वराच्या देखरेखीखाली आणि नजरेखाली आपण सदैव आहो असे वाटत असते. संध्याकाळचा काय हा अपूर्व देखावा व चमत्कार! आणि तोहि विलक्षण सत्तेने-परमेश्वराने घडवून आणलेला! पक्षी परत येऊन वृक्षाच्या फांदीवर गान करीत होते. ज्या मध्ये आत्मजागृति झालेली आहे असे महात्मा पुरुष तेच करीत होते. ते ईश्वराचे नाम गात होते. त्यांचे निजात्मस्वरूप असलेले अनन्यसाधारण सच्छिष्य सानंदाश्चर्याने व सविनयतेने नम्रपणे हात जोडून त्यांच्या समोर बसलेले होते व गुरुमहाराजांच्या मुखकमलातून श्रवणारा मधूर नामगीतरूपी मकरंद आपल्या कर्णद्वयात सांठवित होते. ईश्वराचे नाम गात असतांनाच सद्‌गुरुंचे देहभान हरपले, व ते परब्रह्मस्वरूपी तल्लीन झाले.

थोड्या वेळाने सद्‌गुरु महाराज भानावर आले व त्यांनी ईश्वराचे सर्व दुःखे, संकटे, पाप, दोष, हरण करून निर्मल, निष्कलंक करणाऱ्या दैवी मायबापाचे निकलंकी नारायणाचे नाम गातांना जेव्हा शिष्यांनी ऐकले तेव्हा त्यांना आज आपण धन्य झालों असें वाटले. सद्‌गुरुंच्या मुखांतून जणू काय अमृत बिंदूंचा वर्षाव चाललेला आहे व डोके वर करून आणि कान उत्सुकतेने पुढें करून सद्‌गुरुंनी वर्षविलेले अमृतबिंदू आपल्या निर्मल हृदय पटलावर टिपून घेत असलेले त्यांचे शिष्य अहाहा कसा वर्णावा तो देखावा, तों अलौकीक देखावा शब्दाने वर्णन करता येण्यासारखा नाही.

अखेर सद्‌गुरुंनी आद्यपुरुष निरंजन नारायणाला जाणले असतां होणाऱ्या आनंदाविषयी एक पद म्हटले. निर्गुणाचे ध्यान करून, सृष्टि, स्थिती आणि संहार करणाऱ्या सगुण देवाच्या-अवताराच्या साक्षात्कारापासून मिळणारा आनंद सद्‌गुरु आपल्या दिव्य अध्यात्मिक दृष्टीने पाहू लागले व त्यांनी निजात्मस्वरूप मानलेल्या आपल्या परमप्रेमी शिष्यांना दाखवूं लागले. पूर्ण शांततेने सर्व शिष्य तीं पदें ऐकत असतांना सर्वजण सद्‌गुरु समवेत त्या अलौकीक, दैवी, अमर्याद, अप्रतिम आनंदाने धुंद होऊन परमेश्वरी साक्षात्स्वरूपाशी तल्लीन होऊन गेले. ते अलौकीक दैवी चमत्कृतीचे महात्मापुरुष तर आत्मज्योतिस्वरूपाशी एकरूपच होऊन गेले. त्यांना भावसमाधी लागली आनंदातिरेकाची स्थिती त्यांना प्राप्त झाली. ते सुख दुःख, आनंद शोक या पलिकडे गेलेले दिसले. आपल्या समोर असलेल्या सर्व वस्तू त्यांना ईश्वरस्वरूपच दिसू लागल्या. हे सर्व ईश्वराचेच दैवी आकार आहेत आणि ते आकार निरनिराळे असून पुष्कळच आहेत, किंवा ईश्वरच जणू मानवी देहाने साकार झालेला आहे असे त्यांना दिसले. 'सर्व खल्विदं ब्रह्म' चा त्यांना साक्षात्कार झाला. अव्यक्ताशी तादात्म्य पावले. अशी स्थिती त्यांना दीर्घ काळपर्यंत राहिली.

नंतर ते थोडावेळ भानावर आलेसे दिसले. तेव्हा भाभाराम, नायाकाका, शाणा काका, कीकीबाई आणि इतर सर्व शिष्यांनी पुज्य बुध्दीने व प्रेमाने सद्गुरुंच्या पायावर दंडवत प्रणाम केला. सद्गुरुंच्या पवित्र चरणांची धूळ त्यांनी आपल्या मस्तकावर व अंगावर घेतली. सर्व जणांनी मिळून सद्गुरु चरणी विनंती केली.

सर्वजण सद्गुरु महाराजांच्या चरणकमलावर मस्तक ठेऊन अत्यंत गद्गदित वाणीने म्हणू लागले की -

"हे करूणासागरा! कृपानिधान! परमानंदघन! ज्ञानध्यानस्वरूप! दीनवत्सलदातार! ब्रह्मानंदस्वरूप सद्गुरु महाराज! आम्ही आपले दीन सेवक अनन्य भावाने आपणास शरण आलेलो आहोंत. हे कृपासागर! अंतर्यामी त्रिकाळदर्शी! दयाळु गुरु महाराज आम्हां बालकांना आपला कायमचा वियोग कसा बरें सहन होऊ शकेल? आम्हांवर कृपा करा! आमचा अव्हेर करूं नका. हे सृष्टिगुरु स्वामीन्! आपल्या स्वरूपाच्या प्राप्तीतच आमची कृतार्थता आहे. आपले दर्शन हेंच आम्हांस सालोक्य, सारूप्य, सामीप्य व सायुज्यमुक्ति होय!! हे परम कृपाळू महात्मन्, आपल्या नित्यमुक्त स्वरूपाचे आमच्या हृदयांत सदैव दर्शन स्मरण राहिल अशी आमच्यावर कृपा करा!!!"

आपल्या निजात्मस्वरूप परम शिष्यांची अशी पूर्ण भक्तिभावाची प्रार्थना ऐकून सद्गुरु महाराज गद्गदित झाले. सद्गुरुंनी वर दृष्टी करून शिष्यांकडे पाहिले. त्यांच्या नेत्रांतून अवर्णनीय प्रेमाचे किरण बाहेर पडले. आपल्या जिवलग शिष्याविषयी त्यांच्या मनात अवर्णनीय असे प्रेमाचे भरते आले. अशा तऱ्हेचे प्रेम या जगात सांपडावयाचे नाही. खरोखरच ते अलौकिक अमर्याद प्रेम मानवी बुध्दीला आकलन करता येणारे नाही. सर्व शिष्यांना त्यांनी गोंजारिले. त्यांना पूर्ण प्रेमानें आलिंगन दिले. सर्वांच्या अंगावर हर्षातिरेकाचे रोमांच उभे राहिले. भेदभाव नष्ट झाला. सर्वांना परमज्योतिस्वरूपाचे दर्शन होऊन गेले. सर्वांना परस्पराचे ठायी एकच अद्वैतात्मक परमज्योतीचें दर्शन झालें. सद्गुरु महाराज, नायाकाका, भाभाराम, कीकीबाई, हाजरबेग, शाणाकाका वगैरे सर्व जणास एकाच रूपाने अपरोक्ष व परोक्ष दर्शन झाले. अखंड ऐक्य! परम दर्शन!! नंतर सर्वांनी सद्गुरु महाराजांचे अर्घ्य-पाद्यानें पूजन केले व मोठ्या प्रेम भावनेने स्वत: गुंफलेले सुगंधित पुष्पहार त्यांच्या गळ्यांत घातले.

आपल्या शिष्यांचा व आपला थोड्या वेळांत ह्या जगतांतून विरह होणार आहे. या गोष्टींच्या वेदनेने दयार्द्र झालेल्या इमामशाहा महाराजांनी गद्गदित कंठाने सर्व जणास अनेक आशिर्वाद देऊन निरोप मागितला. तेव्हां सर्वांच्या डोळ्यांत अखंड प्रेमाचे आनंदाश्रु तरारले. सर्व जणांनी सद्गुरु महाराजांच्या चरणतीर्थाचे अमृतपान केले व त्यांच्या चरणावर साष्टांग नमस्कार घातला तेव्हा सद्गुरु महाराज सर्वांना उद्देशून म्हणाले, 'ज्या ज्या सद्भक्तांना माझ्या दर्शनाची तीव्र इच्छा होईल त्या



सतगुरु इमामशाह, संत भाभाराम, संत नायाकाका यांचा निर्वाणानंतर पीराणा येथे अद्‌भूत वार्तालाप संत शाणाकाकांच्या दृष्टोत्पत्तीस आला.

त्या अवर्ण्य गुरुभक्त जनास प्रेमी जनास माझे दर्शन तर सदैव घडेलच. मी जरी आता समाधिस्त झालो तरी पण कलीयुगाच्या अंतापर्यंत मी येथेच आहे. तुम्ही आता पूर्ण आनंदाने राहून तुम्हास दिलेल्या ज्ञानोपदेशाचा यथार्थतेने विचार करून आचरण करून अन्य जनास त्याचा उपदेश करून त्यांच्या ठायी आत्मजागृति उत्पन्न करा.' असे सर्वांना सांगून व परत सर्वांना दृढालिंगन देऊन, सर्वांचा निरोप घेऊन विनंती स्विकारून व सर्वांना अनेकानेक शुभाशिर्वाद देऊन सद्गुरु इमामशहा महाराज समाधि बांधलेल्या ठिकाणी समाधिस्थ झाले.

समाधि बंद करताक्षणीच तीमध्ये चोहोकडे एक दिव्य स्वरूप प्रगट होऊ लागले. ते सर्वव्यापी स्वरूप महा-तेजोराशीचा पुंजरूप असून अलौकिक गान करीत होते व सर्वत्र पसरून गेले होते. त्या अलौकिक दिव्य स्वरूपाचे ज्यांनी प्रत्यक्ष दर्शन घेतले होते अशा त्या पांचहि जणास ते ज्या दिशेकडे बघत असत तिकडे सद्गुरु महाराजांच्या दिव्यस्वरूपाचें दर्शन होत असें. त्या समाधि मधील मधूर गानांतून एक दिव्य गंभीर वाणी सर्वांना ऐकू जाईल अशा रीतीने बाहेर पडली. तिचा साररूप हाच होता कीं, "हे माझ्या परमसुहद सद्भक्तांनो! प्रिय बालकांनो, तुम्ही बाकी राहिलेले तुमचे आयुष्य सदा सर्वकाळ अपार कृपेचा सागर त्या परब्रह्म परमात्म्याच्या नामस्मरणांत घालवून सर्वकर्मे त्यासच अर्पण करून त्याचेच सर्वतोपरी चिंतन करून दास बनून तद्रूप होऊन जा. त्या परब्रह्म परमात्म्याचा जो दहावा अवतार 'श्री निकलंकी नारायण' या कलियुगाचे अंति ज्यावेळेस प्रगट होईल त्यावेळेस आपणा सर्वांचा पुनर्मिलाप होणारच आहे. तो पर्यंत हे सद्भक्तांनो त्या परमपूर्ण प्रेमानंदाच्या अलक्ष्य, अगम्य, अगोचर अद्भुत लीलेचा अनुभव घ्या." असा संदेश देवून ती दिव्य वाणी परम विराम पावली.

सर्वत्र प्रगाढ शांतता पसरली. सर्वांच्या हृदयात सद्गुरु प्रेमाचे भरते आले. सर्व सद्गुरु विषयी दाटलेल्या प्रेमाने भारावून गेले. भावनातिरेकाच्या भरांत भाभारामच्या मुखांतून सद्गुरुंनी गाईलेले एक पद निघाले.

हेते मळोरे भाई मुनिवरो। अने मुखथी साची वाणी बोल॥
नित दरशन कीजे देवना। दिलथी सुतक पातक खोल ॥१॥
गुरु गत गगा तीरथ न्हाईये। अने कीजे निरमल मन॥
आ सतपंथ पदारथ तो मळे। जेना पुरण होवे पुन॥२॥
पुरण पुण्यविनाकेम पामीये। अने सतपंथ साचीवाट॥
ये पाचे पदारथ तो मळे। जेना दिल होवे पवित्र॥३॥

पवित्र तो प्रभुनां नाम छे। अने जपीये दिवसने रात॥
दूर ना देखोरे भाई दिलमा वसे॥ जेवीं चंपा फुलोमा वास॥४॥
रोमे रोमे स्वामी ता वसे। अने अंतर नही येकतील॥
येम जाणीने भगती कीजिये। तो परतक बैठा देव॥५॥
सत बोलजो अने सत चालजो। अने सतसम नही सार॥
सुक्ष्म वेद तो सते रंचीया। तमे सते उतरसो पार॥६॥
सतना छोडोरे मारा मुनिवरो। अने सत छोडे वीत जाये॥
इमान सरीखो दिवडो। तमे अजवालो स्वामीना पाय॥७॥
रयेणी अजवाली पुनमनी। अने दिवस अजवालु सूर॥
तेम घटमाहे अजवालु इमानसु। भाई चहुदिसा वरसे नूर॥८॥
नर नारायण ता वसे। जे घटमाहे साचू इमान॥
तेणे देव लोक प्रणाम कर। ते तो पामे वैकुंठ धाम॥९॥
सद्गुरुब्रह्मा आगम भाकीया। अने येक अचंबो सार॥
हवे छेली नाब कलजुगनी। ता इमानी उतरसो पार॥१०॥

पद म्हणणे संपले. पण त्या पदातील अमुल्य दिव्य संदेश सर्वांच्या कर्ण प्रदेशांत वारंवार घुमू लागला. भाभारामच्या मधूर मोहक कंठातून निघालेल्या त्या पदाने सर्व जण तल्लीन होऊन गेले. सर्व जणांना भावसमाधि लागली सर्व जणांच्या नेत्रांतून दिव्य प्रेमानंदाचें अश्रूबिंदू चमकले. अलौकिक अशा प्रेमानंदाच्या भरात व सद्गुरु महाराजांनी दिलेला अमुल्य दिव्य संदेश ऐकून सर्वजण भारावून गेले. आणि ते त्याच्या पवित्र मंगल नामाचा जयघोष करू लागले.

''जय सद्गुरु शरणं मम! जय सद्गुरु शरणं मम!!
जय सद्गुरु शरणं मम ऽ॥
जय निकलंकी शरणं मम! जय निकलंकी शरणं मम!!
जय निकलंकी शरणं मम ऽऽऽ !!!''

सर्व जण सद्गुरु महाराजांच्या दिव्योपदेशाने शुध्दरूप बनले असूनही गुरु महाराजांच्या विरहाने उदासीन होऊन गेले. नंतर कांही काळ पीराण्यास सद्गुरु महाराजांच्या दरबारांत राहून नंतर गुरुजींच्या आज्ञेप्रमाणे त्यांनी दिलेल्या आशिर्वादरूप आज्ञेप्रमाणे आपापल्या ठिकाणावर गेले. जे उत्तम ज्ञान सद्गुरुकडून त्यांनी संपादन केले होते, त्याचा अनेक लोकांस उपदेश करून शेवटी काळ येतांच ते परमात्म्याच्या प्रेमधामांत जाऊन अखंड प्रेमानंदाच्या लीलेचा अनुभव घेऊ लागले.

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते॥
ॐ शान्तिः! शान्तिः!! शान्तिः!!!

"किं मधुना किं विधुना किं सुधया।
किंच वसुधया ऽ खिलया।
यदि हृदयहारि चरितः पुरुषः
पुनरेति नयनयोरयनम्॥"

'ज्यांचे चरित्र हृदयहारक आहे अशा परम पुरुषांचे जर पुनः या नेत्रांस दर्शन होईल तर मधु, विधु, सुधा व सकल वसुधा म्हणजे पृथ्वी ह्यांची काय आवश्यकता आहे? त्यापुढें सर्व तुच्छ होय!'

★ ★ ★

# ४९. पीराणा संस्थानामधील चमत्कार

## ब्रिटीश अधिकाऱ्यास दाखविलेला चमत्कार.

सद्गुरु इमामशहा महाराज समाधिस्थ झाल्यानंतरहि पिराणा येथील त्यांच्या दरबारात अनेक चमत्कार जनतेच्या दृष्टोत्पत्तीस आले. त्यापैकी जेवढे आम्हांस उपलब्ध झालेले आहेत तेवढे आम्ही येथे देत आहोत.

एकदा ब्रिटिश अमदानीमध्ये एक ब्रिटीश अधिकारी गीरमथा गांवी कांही कामाकरीता आलेला होता. गीरमथा गांवच्या बाहेर एक उत्तम प्रकारच्या सुशोभित फुलबागेत त्याने आपला तंबू उभारला होता. त्याच्याबरोबर त्याचा मोठा लवाजमाहि होता. एकेदिवशी काम आटोपल्यावर तो अधिकारी सहज फिरावयास गेला असता त्यास सद्गुरु महाराजांच्या मंदिरावरील सुवर्ण कळस दिसला. तेव्हा त्याने आपल्या सोबत असलेल्या गीरमथा गावच्या पाटलास विचारले कीं, 'हा समोर दिसत असलेला सुवर्णकळस कशाचा आहे? तेथे काय आहे?' तेव्हा पाटलांनी सांगितले, साहेब, ते एक मंदिर आहे. तेथे इमामशहा नांवाच्या एका सत्पुरुषाचे समाधिस्थान आहे. ब्रिटीश अधिकाऱ्याच्या मनात ते स्थान पाहण्याची इच्छा झाल्यामुळे पाटलास बरोबर घेऊन तो पिराण्यास आला. मंदिरात जातांना पाटलांनी अधिकाऱ्यास पायातील जोडा काढण्यास सांगितले. पण अधिकाऱ्याने त्यांचे म्हणणे मुळीच ऐकले नाही.

ब्रिटीश अधिकारी जोडद्यासहित गुरुजींच्या समाधि जवळ जाऊ लागला असे पाहून सर्व काकालोकांनी व तेथें असलेल्या इतर सर्व मंडळींनी त्यांना जोडा काढून व पाय धुऊन नंतर आंत गुरुजींच्या समाधिजवळ जाण्यास सांगितले. परंतु त्या सर्वांचे म्हणणे न ऐकता तो अधिकारी आपल्या अधिकाराच्या दिमाखांत, मग्रूरीत जोडद्यासकट समाधिजवळ गेला. तेथे पाहिल्यांनतर तो गीरमथास आपल्या मुक्कामी परत आला.

रात्र झाल्यानंतर जेवण वगैरे आटोपल्यावर सर्व जण झोपून राहिले. गोरा अधिकारी तंबूमध्ये झोपला होता व बाकी त्याचा लवाजमा त्याच्या आजुबाजुस झोपला होता. मध्यरात्रीच्या सुमारास त्या अधिकाऱ्यास एकदम जाग आली. तो उठून पाहतो तो पलंगासहित आपण एकाकीच गांवसीमेच्या बाहेर येऊन पडलेलों आहोंत असें त्यास आढळून आलें. त्याने आजूबाजूस पाहिले तो त्याचा तंबूही त्याच्या दृष्टीस पडला नाही व त्याचा इतर लवाजमाहि त्यास जवळपास आढळून आला नाही. ती भाद्रपदाची रात्र होती. सर्वदूर काळोखाचे साम्राज्य पसरलेले होते. तशांत मध्यरात्र असून रातकिडद्यांच्या भयानक आवाजाने सर्व वातावरण भीतिदायक बनलेले होते. हें सर्व भयानक दृश्य बघून तो एकदम स्वप्नात असल्याप्रमाणे भांबावून उठला. तो मनांत फारच फार घाबरला व मोठमोठद्याने आरोळ्या मारूं लागला पण त्या निर्जन अरण्यांत त्याच्या प्रतिध्वनीशिवाय कोणीही साथ दिली नाही.

तो आपल्या अंगरक्षकावर खूप संताप करूं लागला. थोडद्यावेळाने त्याच्या शरिरांत भयंकर असह्य वेदना होऊ लागल्या. जसजसा तो अधिकाधिक संताप करू लागला तसतशा त्याच्या शरीरातील वेदनाही भयंकर वाढू लागल्या. असह्य वेदना सहन करीत करीत तो अधिकारी तेथेंच खिचपत राहिला. उजाडण्याच्या सुमारास त्यास एकदम आठवण झाली कीं, आपण काल त्या काकालोकांचे म्हणणे न ऐकता धीटाईने जोडद्यासहित इमामशहांच्या समाधिजवळ गेलो होतो त्याचाच हा परिणाम असावा. अशी त्यास पूर्णपणे जाणीव झाली.

सकाळच्या प्रहरी तो अधिकारी आपल्या तंबूत परत आला. स्नान वगैरे आटोपून तो पिराण्यास जाण्यास निघाला. जरी त्याच्या शरीरांत वेदना होत होत्या तरीपण तो स्वत: चालत जाऊन गुरुजींच्या मंदिरात आला. तेथे पाय धुवून तो आंत सद्गुरु महाराजांच्या समाधीजवळ गेला व समाधी समोर उभा राहून विनवू लागला कीं, - 'सद्गुरु महाराज! मी अपराधी आहे. मूर्खपणामुळे येथील लोकांचे म्हणणे मी ऐकले नाही. गुरु महाराज, या अपराध्यावर दया करून माझ्या शरिरांत होत असलेले दु:ख दूर करावें. अशी अनन्य प्रकारे विनंती करीत आहे तोच त्या अधिकाऱ्याचे सर्व शारिरीक दु:ख दूर झाले. हे बघून त्यास फार आनंद झाला. नंतर त्याने गुरुजींच्या समाधीवर चांदीचे एक मोठे छत्र आणून बांधले व परत समाधीस नमन करून आनंदाने आपल्या मुक्कामी परत गेला.

★ ★ ★

# ५०. ध्वजारोहणाच्या वेळेस घडलेला चमत्कार.

एकदा पिराण्याला सद्‌गुरु इमामशहांच्या मंदिराजवळ एक मोठी ध्वजा उभारावयाची होती, ती नविन ध्वजा ५२ गज (म्हणजे १५६ फूट) उंच होती ती ध्वजा लोखंडी असल्यामुळे फारच वजनी होती. ज्या ठिकाणी जुनी लहानशी ध्वजा पूर्वी उभारलेली होती ती काढून त्या ठिकाणी ही नवीन ध्वजा रोवायची होती. त्याकरिता तेथे पुष्कळशी मंडळी जमली व ती ध्वजा यंत्राच्या साह्याने वर उचलूं लागली. यंत्राच्या साह्याने ती ध्वजा थोडी वर उचलली गेली. नंतर पुढे ती ध्वजा थोडींसुध्दां वर उचलली जात नव्हती. सर्वजणांनी देखील वर उचलून पाहिली ती थोडीसुध्दां हलत नव्हती. सर्व जणांनी एक सारखी तीन दिवस पर्यंत मेहनत केली परंतु त्यांचा काहीएक उपयोग झाला नाही. सर्वजण हताश झाले कोणासहि कांही एक उपाय सुचेना. सर्व जण चिंतेत पडले. चिंताग्रस्त होऊन ते सद्‌गुरु इमामशहांची विनंती करू लागले की, --

'हे जगत्पावन! गुरुमहाराज, आम्ही ही ध्वजा चढविण्याचा पुष्कळच आटोकाट प्रयत्न करीत आहोंत परंतु कांही एक उपयोग होत नाही. महाराज, आपणच ती उभारण्यास सर्व समर्थ आहांत. तेव्हा ज्या योगे ही ध्वजा उभारली जाईल असा काहीतरी उपाय आम्हाला सुचवा!''

'सद्‌गुरुंच्या नांवाने उभारली जात असणारी ध्वजा उभारली जात नाही याचे कारण काय असावे?' असा सर्वजण विचार करीत आहेत. तोंच फकीरीवेषांत असलेला एक मनुष्य त्या मंडळीजवळ आला व त्यांना म्हणूं लागला कीं, 'तुम्ही इतके चिताग्रस्त कां दिसत आहांत.

सर्वजण म्हणाले, 'आम्ही सर्वजण ही ध्वजा उभारण्याकरितां पुष्कळ जीवापाड प्रयत्न केले. येवढेच नव्हे तर यंत्रहि लावून पाहिले. तरी सुध्दा ही ध्वजा थोडीसुध्दां वर उचलली जात नाही.'

तो फकिर म्हणाला, 'आतां कलियुगाचा वारा चालू आहे. तेव्हां हल्ली प्रचलित असलेली पूजा करावी म्हणजे कार्य सुरळीत पार पडेल.

फकीराने सांगितलेली गोष्ट सर्वांच्या लक्षात आली; आणि त्या प्रमाणें त्यांनी चालू युगाची घटपाट व घृतज्योतिची पूजा केली व सर्व मंडळी, ती ध्वजा उचलण्याकरितां सज्ज झाली. त्याच्या बरोबरच त्या फकीरानेसुध्दां ध्वजेस हात लावीला. सद्‌गुरु श्री इमामशहा महाराजांच्या जयघोषासहित सर्वांनी ध्वजा वर उचलली. त्याबरोबर

ती भराभर वर उचलली जाऊन ती ध्वजा एकदम स्थिर उभी राहिली. त्यामुळे सर्वांना फारच आनंद झाला व ते त्या फकीराला पाहू लागले. परंतु त्यांना तो कोठेहि आढळला नाही. तेव्हा सर्वांना परम आश्चर्य वाटून ते सर्व जण चकित झाले. त्यांना जाणीव झाली की फकीरी वेषांत आलेले सत्पुरुष दुसरे तिसरे कोणी नसून प्रत्यक्ष प्रगट ब्रह्मस्वरूप सद्गुरु इमामशहाच फकीर वेषाचे रूप घेऊन आलेले होते. सर्व जण पश्चात्ताप करून म्हणाले, 'गुरुजी तुमचे मर्म आम्ही पामर जाणूं शकलों नाही. महाराज, ह्या दीन अनाथ बालकांचा अपराध क्षमा करून त्यांना पदरांत घ्या. गुरुजी, आपली कळा आम्ही जाणू शकलो नाही. आपण अलोप होऊन गेलांत.' असा सर्व जण वारंवार पश्चात्ताप करूं लागले.

★ ★ ★

## ६१. पिराण्यास बालब्रह्मचारी महाराजांची निवड.

सद्गुरु श्री इमामशहांनी स्थापन केलेल्या सत्पंथी संस्थान पिराणा येथें प्रथम गादीपती बालब्रह्मचारी भगवेकाका श्री शाणाकाका हे सद्गुरु इमामशहांच्याच कारकीर्दीत प्रस्थापित झालेले होते. त्यांच्या नंतर ती गादी शिष्यपरंपरानुसार चालून त्या ठिकाणी अनुक्रमें श्री सामजीकाका, कृष्णाकाका, सोमजीकाका, रैयाकाका, रामजीकाका, नथुकाका, भुलाकाका, प्रागजीकाका, नथुकाका, दीपाकाका, मनजीकाका, नथुकाका, नागजीकाका, सामजीकाका, पेथाकाका व सतरावे श्री नथु काका हे संस्थेचे वहिवाटदार गादीपती झालेले आहेत.

श्री नथुकाका हे इ. स. १८७८ सालांत स्वर्गवासी झाले. त्यानंतर गादीपती म्हणजे त्या संस्थेची वहिवाट चालविण्यांकरिता सद्गुरु इमामशहांनी नेमून दिलेल्या शिष्यपरंपरेप्रमाणे निवड करावयाची होती. त्यावेळेस भगवेकाका एकापेक्षा जास्त असल्यामुळे गादीपती निवडण्यास मत-मतांतर होऊ लागले.

संवत १९३४ च्या भाद्रपद महिन्यांत सर्व काकांनी सर्व जमातीस पिराण्यास बोलावून गादीदार निवडण्याचा ठराव मांडला. परंतु तीन दिवस पर्यंत मतमतांतरामुळे निवड होऊ शकली नाही. मोठमोठ्या पुढाऱ्यांचे कांहीच चालू शकले नाही. म्हणून गुरुजींनीं जमातीचा दृढविश्वास बसावा म्हणून गिरमथा गांवातील एका शेटजींच्या स्वप्नात येऊन त्यांनी विस्तारपूर्वक गोष्ट सांगीतली कीं, 'तू पिराण्यास जाऊन जमलेल्या सर्व जमातीस सांगावे कीं, सर्व काकांना जमवून प्रत्येकाच्या पायांत बेडी घालावी

व ज्याच्या पायांतील बेडी आपोआप निघेल त्यास गादीपती नेमावे.' अशाप्रकारे दृष्टांत झाल्यावर शेठजींनी दुसरेदिवशी सकाळी पिराण्यास जाऊन सर्व मंडळीस व काकास स्वप्नांत घडलेली हकीकत निवेदन केली. ती गोष्ट सर्वांना मान्य झाली.

या प्रमाणे एकामागून एक अशा प्रकारे प्रत्येक काकाच्या पायांत बेडी घातली परंतु कोणाच्याही पायांतील बेडी आपोआप निघाली नाही. त्यामुळे सर्व मंडळी चिंतातूर झाली व आतां काय करावे? कोणास कांहीच सुचत नव्हते. सर्व जण स्तिमित होऊन बसले व आतां अतिशय कठिण वेळ येऊन ठेपली आहे तेव्हा सर्व जमातीने सद्गुरुंची विनंती करण्यास सुरुवात केली.

इतक्यात एका इसमास सुचले कीं, 'करमसी काका' फक्त बेडी घालावयाचे राहिलेले आहेत. त्यावेळेस करमसी काका हे गुरे चारण्याकरिता रानांत गेलेले होते त्यांना तेथून बोलावून आणून त्यांना स्नान वगैरे करवून गुरु इमामशहांचे नामस्मरण करून व त्यांची विनंती करून करमसी काकांच्या पायांत बेडी घातली. सर्वांनी सद्गुरुंच्या नामाचा जयघोष करून काकास चालण्यास सांगितले दोन तीन पावले चालल्यानंतर बेडी आपोआप निघून पडली. तेव्हा सर्व जमातीस अत्यानंद होऊन इमामशहांच्या नांवाचा जयजयकार करून करमसी काकास गादीपती नेमले व या प्रमाणे संस्थेची वहिवाट पूर्वापार प्रमाणें चालू राहिली.

ही बेडीची पध्दत (शकुनावली) पूर्वापारपासून चालत आलेली आहे. ज्यांना कांही प्रश्नांचे उत्तर कार्याचे अगोदरच पाहावयाचे असते म्हणजे आपण जे कार्य करीत आहोंत ते योग्य आहे. किंवा नाही? अगर आपण उभारलेले कार्य सिध्दीस जाईल किंवा नाही? सफल होईल किंवा नाही? इ. अशा प्रकारची प्रश्नांची उत्तरे पाहण्याकरितां या बेडीचा उपयोग करतात. ती बेडी प्रथम सद्गुरु महाराजांचे नामस्मरण करून ज्यास प्रश्न पाहावयाचा असेल त्याच्या पायात घालावी व त्यास हळूहळू चालण्यास सांगावे. जर ती बेडी आपोआप निघून पडली तर कार्यसिध्दि होईल असे समजावे व जर बेडी निघाली नाही तर कार्यसिध्दि होणार नाही असें समजावे. अशा प्रकारे ही बेडीची पध्दत-प्रश्नावली आजतागायत तेथे चालू आहे.

प. पू. करमसीकाकानंतर लक्ष्मणकाका, रामजीकाका व सवजीकाका गादीचे वारस म्हणून नेमले गेलें. त्यानंतर हल्ली विद्यमान आर्चक गुरु. करसनदासजी महाराज हे आचार्य पदावर आहेत. अखिल भारत संतसमितीत त्यांना विरवर आचार्य ही पदवी मिळून पश्चिमाचल प्रदेश संरक्षक म्हणून संबोधण्यात आले. नंतर त्यांना पोरबंदर येथे संतसमितीत 'देवर्षि' अवॉर्ड ही पदवी देऊन सन्मान करण्यात आला.

★ ★ ★

# ५२. संस्थानात संगमरवरी फरशीची खाण.

सद्गुरु इमामशहांच्या मंदिरात समाधी बांधलेल्या ठिकाणाच्या समोरचे बाजूस खुली जागा पडलेली होती. त्या जागेवर संगमरवरी दगडाची फरशी बसवावी असा काकांचा व सर्व जमातीचा मानस होता.

एके दिवशी काकांच्या स्वप्नांत गुरुजींनी येऊन सांगितले कीं, ' माझ्या समाधीच्या समोर खुल्या पडलेल्या जागेवर जो तुमचा संगमरवरी फरशी बसविण्याचा मानस आहे तो पूर्ण होईल. तर तुम्ही या मंदिराच्या नैऋत्येकडील एका कोपऱ्यांत खोदावे त्याठिकाणी तुम्हास संगमरवरी फरशी लागेल. त्यातून तुम्हास पाहिजे तेवढी फरशी काढून तो खड्डा पूर्वीप्रमाणे बुजून टाकावा.

काकांनी स्वप्नात घडलेली हकीकत जमातीस सांगितली. सर्वांनी मिळून सद्गुरुंनी सांगितलेल्या एका विशिष्ट ठिकाणी जाऊन त्यांनी खोदून पाहिले. तो त्यांना तेथे संगमरवरी फरशीचा भरपूर साठा आढळून आला. त्या अखंड अक्षय साठ्यांतून फरशी काढून त्यांनी समाधी समोरच्या खुल्या जागेत बसवली व तो खड्डा पूर्वीप्रमाणे मातीने भरून साफ केला.

त्यानंतर काही दिवसांनी इतर लोकांनी पुन्हा त्या ठिकाणी खोदून पाहिले. परंतु त्यांना संगमरवरी फरशीचा एक लहानसा तुकडा देखील सापडला नाही. याप्रमाणे तेथे पिराण्यास सद्गुरु महाराजांच्या मंदिरांत पुष्कळच आश्चर्यजनक गोष्टी घडून आल्या.



# ९३. पीराण्यास फैजपूर येथील सत्पंथी अनुयायांस घडलेले अद्भुतरम्य गंगादर्शन.

एके समयी इ. स. १९२४ मध्ये श्री सत्पंथी संस्थान फैजपूरच्या सर्व सत्पंथी अनुयायांनी फैजपूर येथील मंदिरात एकत्र जमून असा विचार केला की आपण पुष्कळशी मंडळी एकत्रित मिळून पिराण्यास गुरुदर्शनास जावे. तेव्हा सुमारे ३००-३५० स्त्री पुरुष व मुले मिळून जाण्याचे निश्चित झाले. एक दिवस मुक्रर करून गांवोगांवची सत्पंथी मंडळी सत्पंथी मंदिरांत गोळा होऊन सर्व आबालवृध्दांनी सद्गुरूंचे व श्री निष्कलंकी नारायण प्रभूचे स्तवन केले. नंतर कै. धर्मागुरु बारसु बुवा यांचे गळ्यांत फुलांचे हार घालून सर्व मंडळी मंदिरामधून बाहेर पडली. त्यावेळेस तीन चोपदारांच्या गळ्यांत 'श्री सत्पंथी संस्थान फैजपूर' असे पट्टे घातलेले होते. ते सर्वांच्यापुढे चालत होते. अशा लव्याजम्यानिशी व थाटामाटासह सर्व मंडळी मंदिरातून बाहेर पडली. त्यावेळेस सर्वांच्या हृदयांत क्षणोक्षणी आनंदाचे उमाळे येऊं लागले. हर्षोत्फुल्ल अंत:करणाने सर्वांनी सद्गुरु महाराजांच्या नामाचा व परमेश्वराचा जयघोष केला. गांवांतून जात असतांना रस्त्याने अति आनंदभरित उत्साहाने सद्गुरुंचे व प्रभू निकलंकी नारायणाचे स्तवन करीत करीत शहर दरवाज्याच्या बाहेर जाऊन 'गणपतीवाडी' नांवाच्या एका सुंदरशा वाटिकेत सर्व संघ एकत्रित जमला. जमलेल्या मंडळीत साळी, बारी, कोष्टी, गुरव, रंगारी, राजपूत वगैरे अनेक जातीचे लोकही होते. त्यांत फैजपूर येथील सत्पंथीयांचे पुढारी श्री तोताराम बधु महाजन हे सुध्दां होते. यात्रेस जाणाऱ्या मंडळीस पोहोचविण्याकरिता गांवोगांवची पुष्कळशी मंडळी तेथे जमली. नंतर त्यांनी यात्रेस जाणाऱ्या मंडळीस मोठ्या प्रेमाने व अति हर्षाने निरोप दिला. सर्व मंडळीचा प्रेमाचा निरोप घेऊन यात्रेकरू मंडळी तेथून सावदा स्टेशन येथें रवाना झाले. नंतर तेथून ते रेल्वेच्या साह्याने पिराण्यास जाऊन गुरूदरबारी येऊन दाखल झाले.

गुरु दरबारी येऊन दाखल झाल्यावर सर्वांनी स्नानादि विधी आटोपल्यावर गुरु दरबारासमोर भजनास सुरूवात केली. असा हा कार्यक्रम एक दोन दिवस पर्यंत चालला. नंतर त्यांना त्या ठिकाणी असे समजलें कीं, कच्छ मधील लोकांना या ठिकाणी 'गंगादर्शन' झाले. तेव्हां त्यांनीसुध्दां आपणास गंगादर्शन व्हावे म्हणून हट्ट मांडला व गंगादर्शन झाल्याशिवाय आपण येथुन जाऊं नये असा सर्वांनी मनाचा निग्रह केला. ही हकीकत त्यावेळचे गादीपती काका श्री लक्ष्मण करमसी यांचे समोर निवेदन केली. त्यांनी सांगितले, 'असा योग घडून येणे हे सद्गुरु महाराजांच्या मर्जीवर व आपल्या भक्तीच्या बळावर अवलंबून आहे.' असे सांगून श्री लक्ष्मण काका एकांतात ध्यानस्थ बसले.

ध्यान आटोपल्यावर काकांनी सर्व मंडळीस सांगितले की, 'उद्या सर्व मंडळीने स्नान वगैरे करून शुचिर्भूत होऊन शुध्द मनाने सद्गुरुंच्या समाधीस १०८ प्रदक्षिणा घालाव्या म्हणजे बहुधा गंगादर्शन होईल, असें मला वाटते.'

काका साहेबांच्या सांगितल्या प्रमाणें सर्व मंडळीनें तसे करण्याचे अगदी निश्चित केले व दुसरे दिवशी स्नान वगैरे करून सर्व आबालवृध्दांनी सद्गुरुंच्या समाधीस १०८ प्रदक्षिणा घातल्या. नंतर फराळ वगैरे करून थोडावेळ विश्रांती घेऊन तेथे बोदवड येथील श्रीकिसनसिंग राजपूत यांनी कीर्तन करण्यास सुरुवात केली. कीर्तनाचा विषय 'हरिश्चन्द्राख्यान' हा होता. हें आख्यान दोन दिवसापासूनच चालू होते. दोन दिवसांत आख्यानाचा पूर्व-रंग संपलेला होता व तिसरे दिवशीं त्याच्या उत्तर रंगास सुरुवात झाली.

'हरिश्चन्द्राने विश्वामित्राला दिलेल्या दानाचे वचन पूर्ण करण्याकरितां स्वत:स व राणी तारामतीस आणि कुमार रोहिदासास काशी येथे विकून टाकले व वचन पूर्ण केले. परंतु एवढ्यावरच विश्वामित्राचे समाधान न होता त्यांना अनन्य प्रकारे त्रास दिला. तरीहि त्यांनी धर्म पालनाकरिता आपले सत्व न सोडता ते पूर्णपणे कसोटीस उतरले. शेवटी जेव्हा हरिश्चंद्र तारामतीस मारण्याकरिता तलवार घेऊन उठला तेव्हा त्या ठिकाणी परमेश्वर प्रगट होऊन हरिश्चन्द्राचा सरसावलेला हात त्यांनी वरचेवर धरला व त्यांना दर्शन दिले आणि हरिश्चन्द्रास घेण्याकरितां स्वर्गातून दिव्य विमान खाली आले.' असे हे आख्यान चालू असतां सर्वांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. सर्वजण कीर्तन ऐकण्यांत अगदी दंग होऊन गेलेले होते.

इतक्यांत 'गंगा निघाली, गंगा निघाली,' अशी मोठमोठ्याने सूचना करीत एक जण तेथून उठून बाहेर जाऊ लागला. त्यावेळेस सर्वांची मने गंगादर्शनास फारच उत्सुक झालेली असल्यामुळे सर्वांनी एकच धावपळ करण्यास सुरुवात केली. ही सर्व मंडळी दुसऱ्या मजल्यावर बसलेली होती. वरील मजल्यावरून खाली उतरत असता खूप गर्दी झाल्यामुळे कित्येक स्त्री-पुरुष मुले-बाळे एकमेकावर पडत होती परंतु त्या ठिकाणी स्त्री-पुरुष अशा प्रकारच्या कोणत्याहि भावना शिल्लक राहिलेल्या नव्हत्या. सर्वजण वृत्तिशून्य बनलेले होते. ते सर्वजण गंगादर्शनाच्या आतुरतेने धडपड करीत धावत होते. अशात कित्येक जण वरून खालीच पडले. परंतु त्यांना यत्किंचितही दुखापत झाली नाही, सर्व जणांनी ज्या बाजूस गंगा निघाली होती त्या बाजूने धाव घेतली. तेथे जाऊन बघतात तो 'गंगाकुवा' म्हणून कंपाऊंडच्या बाहेर जी विहीर आहे त्या विहिरीच्या पायथ्याजवळ मागच्या बाजूस दोन हात अंतरावर विहिरीच्या बांधकामातून अजमासे फूट दीड फूट उंच अशी पाण्याची धार उडून वाहात असलेली त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आली.

सर्वांनी गंगेचे दर्शन घेतले. त्या वेळेस त्या पाण्याचा इतका सुगंध चालत होता की त्याचे वर्णन करणे अशक्य आहे. ते गंगेचे पाणी (तीर्थ) पिण्याकरिता जो तो इसम धडपडत होता. अशी घटना चालू असतांना त्याच्या जवळपास पंजा थोरांची (निवडुंगाची) मोठी रांग होती, त्यावर पुष्कळशी मंडळी पडत झडत होती परंतु कोणासहि त्यांचे काटे बोचले नाहीत अगर कोणत्याच प्रकारची दुखापत झाली नाही. या मंडळीपैकी एक इसम सद्‌गुरु इमामशाहांच्या समाधी जवळ जाऊन बसला तेव्हा त्यास त्या समाधी जवळ खळ खळ धड धड धों धों अशा प्रकारचा मिश्र आवाज ऐकू येत होता.

ते पाणी पुष्कळ लांबपर्यंत वाहात गेले तेव्हा त्या जमावातील एका रजस्वला स्त्रीची सावली पडली त्यामुळे ते पाणी वाहणे एकदम बंद पडले. परंतु ज्या ठिकाणाहून गंगा निघाली होती. त्या ठिकाणी एक वितभर खड्डा पडलेला दिसला व त्यांत ते पाणी साठलेले दिसत होते. त्या खाड्यातून पुष्कळच लोकांनी बाटल्यामध्ये ते तीर्थ भरले. परंतु ते पाणी न आटता जसेच्या तसेच कायम राहात होते.

दुसरे असे घडून आले की जमलेल्या मंडळी पैकी कांहीना शंकाकुशंका येऊं लागल्या. त्याचे निरसन करण्याकरिता एकास अचानक युक्ति सुचली की आपण या पाण्याची ज्योत लावून पाहू या. त्या प्रमाणे त्यांनी एक मातीचे पात्र आणून त्या खड्यातील पाणी काढून त्यांत टाकले आणि कापसाच्या तीन वाती करून त्या पात्रांत ठेऊन पेटविल्या तर त्या तडतड न करतांना तूपाच्या ज्योतिप्रमाणे एकसारख्या जळू लागल्या. जळतांना ते पाणी आटल्यावर पुन्हा त्यांत त्या खड्यातील पाणी टाकीत होते. असा तो दिप त्यांनी अव्याहत रात्रंदिवस जाळून पाहिला व आपल्या शंकेचे निरसन केले. अशा प्रकारे त्यांना गंगादर्शनाचा अलभ्य लाभ घडून आला. असा हा दैवी चमत्कार त्यांना तेथें पाहावयास मिळाला.

हा अपूर्व चमत्कार प्रत्यक्ष दृष्टोत्पत्तीस आल्यामुळे आपण कांही तरी गुरु दक्षिणा द्यावयास पाहिजे अशी सर्वांच्या मनांत भावना जागृत झाली. म्हणून सर्वांनी पैसे गोळा करून अजमासे १५०० ते १६०० रुपये एकत्रित जमविले. त्यांतून ११०० रु. गुरु इमामशहांचे दरबारी सप्रेम दक्षिणा म्हणून अर्पण केले. बाकी राहिलेली रकम भाभाराम, कीकीबाई, नायाकाका यांचे धामावर दक्षिणा म्हणून अर्पण केली.



# समारोप.

"जो गुरु आज्ञा नित्य विरक्त। जो गुरुनाम नित्य स्मरत॥
ज्यासी गुरुसेवा नित्यव्रत। तो नित्यमुक्त निजदेही॥"

हस्तामलक श्लोक ८/३०४

प्रिय वाचकहो, आतापर्यंत आपण सद्गुरु महाराजांचे चरित्र वाचलेच असेल. त्यावरून व इतर अनेक प्रमाणावरून आपणास हेच दृष्टोत्पत्ती येते कीं, गुरु कृपेशिवाय कोणत्याहि प्राण्याची सद्गती मुळीच होऊं शकत नाही. गुरुच अद्वितीय ब्रह्म, सर्वार्थ साधक, श्रेष्ठ तत्व होय. सर्व जगत् गुरुमयच आहे. 'गुरु' हा द्विअक्षरी शब्द ज्याच्या जिव्हाग्रावर राहतो त्याला कसला मोह व वेदपाठाची तरी त्याला काय आवश्यकता आहे? गुरुची मूर्तीच ध्यानाचे मूळ, गुरुचरणच पुजेचे मूळ, गुरुवाक्य मंत्राचे मूळ व गुरु कृपा ही सर्व सिध्दीचे मूळ आहे. एकनाथ महाराज म्हणतात, "ध्यानी ध्यातां सद्गुरु राया। ब्रह्मीभूत होत काया॥" म्हणजे सद्गुरुंचे जर एकाग्र चित्ताने सदैव ध्यान केले तर आपली ही काया देखील ब्रह्मीभूत होत असते.

गुरुच ब्रह्मा, गुरुच विष्णु व गुरुच महेश्वर होय. गुरुच अग्नि व सूर्य असून गुरुच समस्त तीर्थ, यज्ञ, दान व तपोरूप आहे. हे सर्व जगत् गुरुमय आहे. ज्याने श्री गुरु चरणांचे पूजन केलें त्याला सर्व जगाचे पूजन घडलें, त्याला दानाची, तपाची व अन्य तीर्थ सेवनाची काय गरज आहे? समस्त ब्रह्मांडांमध्ये जितकी म्हणून तीर्थे आहेत, ती सर्व गुरु चरणाच्या ठिकाणी वास करितात. जो शिष्य नित्य गुरु पादोदक प्राशन करतो तो धर्मार्थकाममोक्षाधिप होतो गुरु देवाचा कृपाप्रसाद सेवन करण्याने कोटिजन्मांचे पाप नाहिसे होते.

सरस्वति (विद्या) संपादन करण्याचे मुख्य साधन गुरुची कृपा हेंच होय व ती त्याची सेवा केल्याने आपोआप प्राप्त होते. प्रत्येक जीवात्म्याने निरंतर शुध्द मनाने गुरुची सेवा करणे हेंच मनुष्य जन्मांतील कल्याणाचे साधन होय. परमेश्वर परमश्रेठ होय पण ह्या परमात्म्याचे दर्शन करून देणारे गुरुदेव होत. यास्तव परमात्म्यापेक्षां आपणास आपले गुरुदेवच श्रेष्ठ होत. तीर्थाटन करण्यात देहशुध्दी हे एकच फळ आहे, परंतु सत्समागमाच्या योगानें ज्ञान प्राप्ति, सदसद्विवेक, ब्रह्मोपदेश व यमनियमादि राहणीचा अनुभव येतो आणि सद्गुरुंच्या समागमाने ब्रह्मसाक्षात्कार होतो. म्हणून निरंतर सद्गुरुंची सेवा करावी व जी दुर्लभ वस्तु असेल ती प्राप्त करून घ्यावी.

रूद्रयामलांत सांगितले आहे की गुरुभक्ति विवर्जित होऊन सर्वस्वाचे दान केले, तरी त्याला नरक प्राप्तीच व्हावयाची. कारण गुरुभक्ति द्वाराच दानफल प्राप्त होत

असते. गुरुभक्तिद्वारा इन्द्रत्व व अभक्तिद्वारा सूकरत्व (डुकराची योनि) प्राप्त होते. गुरुपूजेवाचून कोटिपुण्येहि वृथा होत असतात.

याशिवाय गुरुगीतेत सांगितलेले आहे कीं, गुरुसेवा पराङ्मुख असतां देव, गंधर्व, पितर, यक्ष, किन्नर, ऋषि सिध्दगणादि कोणीही मुक्त होऊं शकत नाही. जे श्रुति व स्मृति आदि शास्त्रे न पढता गुरु सेवेत रत असतात तेहि संन्यासी म्हटले जातात. पण संन्यासाश्रम घेऊन जे गुरुसेवा करीत नाहीत ते केवळ वेषधारीच समजावे. केवळ गुरुकृपाप्रसादानें आत्मारामपद प्राप्त होते. गुरु मार्गाच्या अवलंबनानें आत्मज्ञानाचा उदय होतो. गुरु चरण सेवेच्याद्वारे जीव सकल पापा-पासून मुक्त होतो व त्याला सर्व तीर्थस्नानाचे फळ लाभते. कोटि कोटि जन्मामध्ये जप-व्रत-तप व सत्कर्मे केल्याचे श्रेय फक्त गुरुदेवाला संतोष केल्याने प्राप्त होत असते. गुरु भक्तिच्या योगे ज्ञानावाचूनहि मोक्षपद प्राप्त होऊ शकते. गुरुच्या पलिकडे आणखी कांही नाही. गुरु हे व्यक्तिरुपाने जीवाचे तारक नसतात. तर सच्छिष्याचा आपल्या गुरुवरील परम विशुध्द भाव हा त्याचा तारक होतो. यासाठी गुरु मार्गावलंबी साधकाने निर्मल भावाने गुरुदेवाचे ध्यान करीत असावे.

शिष्यांचे कर्तव्य काय आहे? व त्याचे कल्याण कशांत आहे? गुरुच्या आज्ञेचे उल्लंघन करण्यांत किंवा गुरुपुढें खोटे बोलून त्यांची वंचना करण्यांत शिष्यांचे कल्याण होत नाही. त्याचप्रमाणे केवळ वेदांतवाक्यांचे पोपटाप्रमाणे श्रवण किंवा पठण करण्यांत देखील कल्याण नाही. कारण सद्गुरु इमामशहांनी 'सत्पंथज्ञानपद्' साहित्यांत म्हटलेले आहे कीं,.--

"गुरुबीन ग्यान हरिनाम भुल्या। व्यर्थ जनम गमाया हो॥
वेद पढी पढी थाका पंडिता। ब्रह्माका भेद नही पाया हो॥"

गुरुकृपेशिवाय ज्ञान नाही व ज्याने गुरु मंत्राचें स्मरण केले नाही त्याचा जन्म निष्फळ होय त्याचा जन्म व्यर्थ गेला असे समजा. सर्व वेद जरी पाठ असले तरी ते सर्व गुरुज्ञानाशिवाय व्यर्थ होय. कारण त्या सर्वज्ञानाचा गुरुंनी स्वानुभव घेतलेला असतो. म्हणून गुरुमुखांतून श्रवण केलेले ज्ञानच खरे ज्ञान होय. पुस्तकांच्या व ग्रंथादिकांच्या योगाने जर सर्वज्ञान प्राप्त झाले असते तर शाळा, कॉलेज, विश्व विद्यालये, आयुर्वेदशाळा वगैरे वगैरे काढण्याची कोणतीहि जरूरी नव्हती. परंतु गुरुशिवाय ज्ञान मुळीच प्राप्त होऊं शकत नाही.

गुरुंच्या वाक्याप्रमाणें यथार्थ आचरण करण्यांत त्यांच्या वचनानुकुळ वागण्यांत, गुरुसेवेत, त्याचप्रमाणे गुरुंची आज्ञा पाळण्यात तत्पर राहण्यातच शिष्याचे महत् कल्याण आहे. 'शिष्यस्तु कोयो गुरुभक्त एव।' शिष्य खरा कोणताकी जो गुरुचा भक्त असेल तो नाहीतर सद्गुरु महाराज सांगतात.

"गुरुनु कह्यु जे नही माने। ते तो जासे घोर अंधारा॥"

गुरुचे वचन ज्यांनी पाळले नाही शिवाय ज्याने गुरुची निंदा केली ते जीव अंध:कारातच लक्ष चौर्यायशींच्या फेऱ्यातच पडत असतात. त्यांना सद्गति मुळीच नसते. ते जीव जन्ममरणाच्या एका खाड्यांतून दुसऱ्या खाड्यांत, दुसऱ्या खाड्यांतून तिसऱ्यात अशा प्रकारे वारंवार भटकत असतात व अनंत क्लेश भोगीत असतात. याकरितां कोणत्याहि जीवात्म्यास गुरुशिवाय गति मुळीच नाही.

म्हणून प्रत्येक जिवात्म्याने हर प्रयत्ने करून गुरुमहाराजांच्या वचनाप्रमाणे सदैव वागण्याचा रात्रंदिवस तन, मन, धन, बळाने प्रयत्न करून त्यांच्या कृपेस पात्र बनावयास त्यांना सुप्रसन्न ठेवावयास हवे आहे व तीच एक त्यांची योग्य 'गुरुदक्षिणा' होय. त्या योगेच गुरु आपल्या सच्छिष्यावर प्रसन्न होऊन त्यांच्यावर कृपादृष्टि करून त्यांना मोक्षपदाचे-परमगतीचे अधिकारी बनवितात. याकरिता हरेक मनुष्याने गुरुंची कृपा संपादन करावी हाच सर्व वेद, श्रुति, स्मृति, शास्त्रें, पुराणे वगैरे सर्वांचा सार होय व अशा प्रकारे सकलशास्त्र शिरोरत्न असे दिनवत्सल जगत्पावन, परमकृपाळू, त्रिकाळदर्शि, सद्गुरु महाराज सर्व प्राणिमात्रांच्या हृदयमंदिरांत सत्प्रेरणा देऊन, सर्वांविषयी प्रेमादर व सद्बुध्दि देवोत हीच एक त्यांच्या परमपावन जगदुध्दारक पवित्र चरण कमलांचे ठायीं अत्यंत विनम्र भावाने प्रार्थना करून मी आपली रजा घेतो.

सर्वेऽत्र सुखिन: सन्तु सर्वे सन्तु निरामया:।<br>
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दु:ख भाग्भवेत्॥<br>
सर्वस्तरतु दुर्गाणि सर्वो भद्राणि पश्यतु।<br>
सर्व: सुखमवाप्नोतु सर्व: सर्वत्र नन्दतु॥

संकलक



# ★ कर्तव्यपञ्चक ★

वेदो नित्यमधीयतां तदुदितं कर्म स्वनुष्टीयंतां
तेनेशस्य विधीयतामपचितिः काम्ये मतिस्त्यज्यताम्॥
पापौघः परिधूयतां भवसुखे दोषऽनुसंधीयता
मात्मेच्छा व्यवसीयतां निजगृहात्तूर्णं विनिर्गम्यताम्॥१॥

वेदांचे नित्य अध्ययन करा, वेदांत सांगितलेली कर्मे चांगल्या रीतीने करा, वैदिक कर्मांनी ईश्वराचे पूजन करा काम्यकर्मांत बुध्दि ठेवू नका. पापराशीचा नाश करा. संसारसुखात दोषाचे अनुसंधान करा. आत्मज्ञान संपादन करण्याच्या इच्छेचा व्यवसाय करा व आपल्या घरातून त्वरीत बाहेर पडा.

संगः सत्सु विधीयतां भगवतो भक्तिर्दृढा धीयतां।
शांत्यादिः परिचीयतां दृढतरं कर्माशु संत्यज्यताम्॥
सद्विद्वानुपसृप्यतां प्रतिदिनं तत्पादुके सेव्यता।
ब्रह्मैकाक्षरमर्थ्यतां श्रुतिशिरोवाक्यं समाकर्ण्यताम्॥२॥

सत्पुरुषांचा संग कर, भगवंताच्या ठायी दृढभक्तिधरा, शम, दम, तितिक्षा वगैरेचा अत्यंत दृढ परिचय करा; कर्मचा ताबडतोब त्याग करा, चांगल्या विद्वानांच्या सन्निध जा; दररोज त्यांच्या पादुकांचे सेवन करा; ॐ काररूप परब्रह्माच्या स्वरूपाचे शोधन करा. उपनिषदांतील वाक्यें श्रवण करा.

वाक्यार्थश्च विचार्यतां श्रुतिशिरःपक्षः समाश्रीयतां
दुस्तर्कात्सुविरम्यतां श्रुतिमतस्तर्कोऽनुसंधीयताम्॥
ब्रह्मैवास्मि विभाव्यतामहरहो गर्वः परित्यज्यतां
देहेऽहं मतिरूज्झ्यतां बुधजनैर्वादः परित्यज्यताम्॥३॥

तत्त्वमसि वगैरे महावाक्यांचा विचार करा, उपनिषदाच्या पक्षाचा आश्रय करा, मिथ्या तर्क करण्यापासून दूर रहा, श्रुतिच्या (वेद) अनुकूल तर्काचें अनुसंधान करा, 'अहं ब्रह्मास्मि' अशा प्रकारची भावना धरा. नित्य गर्वाचा त्याग करा, शरीरावरील अहंबुध्दीचा त्याग करा, विद्वानांशी मिथ्या वादाचा परित्याग करा.

क्षुव्द्याधिश्च चिकित्स्यतां प्रतिदिनं भिक्षौषधं भुज्यतां
स्वाद्वन्नं न तु याच्यतां विधिवशात्प्राप्तेन संतुष्यताम्।।
शीतोष्णादि विषह्यतां न तु वृथावाक्यं समुच्चार्यता।
मौदासीन्य भीप्स्यतां जनकृप नैष्ठुर्यमुत्सृज्यताम्।।४।।

दररोज भिक्षान्नरूपी औषधांचे भोजन करून क्षुधारूपी व्याधीची चिकित्सा करा (उपचार करा), स्वादिष्ट अन्नाची याचना करूं नका. परंतु दैववशात् जे मिळेल तेवढ्यावरच संतुष्ट रहा, थंडी, उष्णता, वगैरे दु:खादि सहन करा,. वृथा वाक्यांचा उच्चार करूं नका, सांसारिक विषयावर उदासीनपणाची इच्छा ठेवा, मनुष्यावर अनुग्रह किंवा निग्रह (राग किंवा द्वेष) करूं नका.

एकांते सुखमास्यतां परतरे चेत: समाधीयतां।।
पूर्णात्मा सुसमीक्ष्यतां जगदिदं तद्बाधितं दृश्यताम्।।
प्राक्कर्म प्रविलाप्यतां चितिबलान्नाप्युत्तरै: श्लिष्यतां।
प्रारब्धं त्विह भुज्यतामथ परब्रह्मात्मना स्थीयताम्।।५।।

एकांतांत सुखाने बसा, मायेपासून पर अशा ब्रह्माच्या ठायी चित्ताचें समाधान करून पूर्णात्म्याचें चांगल्या रीतीने अवलोकन करा, आत्म्याशिवाय हे जग वगैरे कांही नाही अशी दृष्टि राखा, आत्म्याच्या ज्ञानबलाने पूर्वकर्मांचे प्रविलापन करा, उत्तर कर्मांशी संबंध ठेवू नका, प्रारब्ध कर्माचा उपभोग घ्या व ब्रह्मस्वरूपाच्या ठायी स्थिर होऊन राहा.

★ ★ ★

# ★ करूणा पञ्चक ★

( १ )

आकर्णयाशु कृपणस्य कृपावचांसि
लब्धौऽसि नाथ बहुभिः किल जन्मसंघैः।
अद्य प्रभो यदि दयां कुरुषे न मे त्वं।
त्वतः परं कथय कं शरणं प्रयामि।।

हे नाथ! चौऱ्यांशी लक्ष जीवयोनीच्या फेऱ्यांत आवागमनाच्या रहाट गाडग्यात भटकून भटकून नंतर अत्यंत दुर्लभ असा हा मानव जन्म उपलब्ध झालेला आहे. हीच खरोखर आपले दर्शन प्राप्त करून घेण्याची सुवर्ण संधी होय. कृपया आतां तरी या हीन दीन दासाची व्यथा भरीत कथा कानी धरा. मला आपला म्हणून जवळ करा. हे प्रभो! जर या समयी आपल्या या दासावर अनुराग न कराल तर आपणास सोडून मी कोणाच्या द्वारी जाऊं? तसे असल्यास मार्ग तरी सांगा.

( २ )

नगा दैत्याः कीशा भवीजलधिपारं हि गमिता
स्त्वया चान्ये स्वामिन् किमिति समयेऽस्मिन्शयितवान्।
न हेलां त्वं कुर्यास्त्वयि निहितसर्वे मयि विभो।
न हि त्वां हित्वाहं कमपि शरणं चान्यमगमम्।।

हे स्वामिन्! आपल्या कृपाप्रसादाच्या योगाने वृक्ष, दैत्य, वानर आदि कित्येक अन्य जीवसुध्दां भवसागरातून पार निघून गेले. परंतु जेव्हा माझा पार उतरण्याचा समय प्राप्त झाला तेव्हां आपण गाढ झोपून राहिलांत! हे प्रभो! मी तर आपले सर्वस्व आपणास समर्पण करून टाकलेले आहे. म्हणून यावेळी तरी आपण माझ्या बाबतीत उपेक्षाभाव प्रदर्शित करू नका. मी आपणास सोडून अन्य कोणासहि शरण गेलेलो नाही.

( ३ )

अनन्ताद्या विज्ञा न गुणजलधेस्तेऽन्तमगमन्
अतः पारं यायात् तव गुणगणानां कथमयम्।
गुणन् यावद्धि त्वां जनिमृतिहरां याति परमां
गतिं योगिप्राप्यामिति मनसि बुद्ध्वाहमनमम्।।

हे भुवनेश्वर! जर शेष, महेश, गणेश, शारदा त्याचप्रमाणें नारदादि देवर्षिसुध्दां आपल्या गुण सागराचा पार पाहूं शकले नाहीत-जाणू शकले नाहीत, तर माझ्या सारखा अल्पमति अज्ञान एक क्षुल्लक जीव अगणित अशा गुणाची गणना कशी बरे करूं शकेल? म्हणून मनांत हेंच समजून की आपले गुणगान करूनच मनुष्यास जन्म मरणांतून सुटका करणारी त्याच प्रमाणे योगी लोकांना प्राप्त झालेली अशी परमगति मिळेल असे समजूनच मी आपल्या चरणी शरण आलेलों आहे.

(४)

संसारपाशदृढबन्धनिपीडितस्य।
मोहान्धकारमयकूपनिपातितस्य।
कामाभिलाषविविधोरगदंशितस्य।
दीनस्य मे कुरु दयां करूणेकपात्र॥

हे दीनबन्धो! हे कृपासिन्धो मी संसार पाशांत फार महत् बंधनाने जखडलो गेलेलो आहे. मोहान्धकारपरिपूर्ण अशा महाकूपात गोते खात आहे. विविध भोग-कामनारूप महा भयंकर विषधर सर्प मला दंश करीत आहेत. अशा दयनीय समयी माझ्यासारख्या दीन हीनावर आपणच दया केली पाहिजे.

(५)

अज्ञस्तावदहं न मन्दधिषण: कर्तुं मनोहारिणी
श्चाटूक्ती: प्रभवामि यामि भवतो याभि: कृपापात्रताम्।
आर्तेनाशरणेन किंतु कृपणनाक्रन्दितं कर्णयो:
कृत्वा सत्वरमेहि देहि चरणं मूर्धन्यधन्यस्य मे॥

हे सर्वज्ञ! मी महामूर्ख, मन्दमति जीव आहे. आपल्या कृपेस पात्र बनण्याकरितां मला गोड गोड स्तुति पाठ, गोष्टी वगैरे कांहीसुध्दां बनवीता येत नाही. मी हीन दीन केव्हांपासून ओरडत आहे. कृपया आतां तरी माझ्या या करूण आक्रंदावर ध्यान देऊन माझी दु:ख भरीत हकिकत ऐकून माझ्या भाग्यहीनाच्या शिरावर आपले शरणाशरण चरण ठेवा.

★ ★ ★

# ❋ परमेश्वर स्तुति ❋

## "ॐ नमो निष्कलंकी नारायण जनार्दनाय"

"हे परब्रह्म! हे अद्वितीय परमतत्त्वरूप! शान्त निरंजन! सर्वदा पूर्ण! पूर्णाचा पूर्ण! आनन्दघन! चिद्रूपब्रह्म! हे जगत्कारण हे सत्यस्वरूप! हे सर्वलोकाश्रय! हे सच्चिद्स्वरूप! अद्वैत तत्त्व मुक्तिपद सर्वव्यापि सनातन! सच्चिदानन्दघनस्वरूप परमब्रह्म परमात्मन् मी तुला नमस्कार करतो. हे प्रभो! तू सदा सर्वदा मला वन्दनीय आहेस. मी तुझ्या पदकमलास प्रेमाने नमन करतो. तूं सर्वांस वंदनीय आहेस. सर्वविश्व तुझ्यापुढे नम्र आहे. तूं समग्र दृश्य व अदृश्य सृष्टीतील पदार्थ व प्राण्यापेक्षां श्रेष्ठ आहेस. तुझ्या पेक्षा दुसरें कोणी अधिक नाही. करिता हे अनाथ-बंधो! मी जो माझ्या प्रारब्धाच्या योगाने ह्या स्थळी केवळ अनाथ होऊन पडलो आहे, त्या माझ्या उध्दारक रूपाने तू माझा बंधू झाला आहेस, त्याची फेड करून तुला प्रसन्न करण्यासारखे मजपाशी कांही नाही. सर्व रूपानें केवळ मी तुला वन्दन करतो. हे प्रभो! तू एकटाच अनाश्रीतांचा आश्रय आहेस. तूच जगाचा पालन कर्ता आहेस व तूंच सर्वांच्या ठायी चैतन्यस्वरूपाने प्रकाशमान होत आहेस. तूच जगाचा उत्पन्नकर्ता व लय कर्ता आहेस. तूं पराहूनहि पर आहेस. तू निश्चल व निर्विकल्प आहेस. तूं सर्व भयांचाहि भयरूप व सर्व भीषणांचा भीषणरूप आहेस. प्राणीमात्रांचा गतिरूप व पावनाचाहि पावन तूच एक आहेस. शिवाय सर्वापेक्षा मोठ्यात मोठ्या व उच्चात उच्च पदाचाहि नियंता तू एकटाच आहेस. हे जीवनसाक्षी! मी तुझेच स्मरण करतो. तुलाच भजतो. तुझे ध्यान करतो व वारंवार तुलाच नमस्कार करतो. हे सत्! हे एक! हे निरालंब ईश्वर! मी सर्वदा सर्वथैव केवळ तुलाच शरण आहे. हे सच्चिदानंद! परमप्रभू परमात्मा! परब्रह्म दीन दयाळा! मी तुझ्या दासाचाहि दास आहे. मला दुसरा कोणाचा आश्रय नाही. केवळ तुझ्याच जगदुध्दारक चरणारविंदाचा आश्रीत आहे. तरी हे प्रभो! मला तुझ्या आश्रयास ठेव. मी तुझी पूजा करतो. तुलाच हृदयांत ठेवतो, तुज वाचून मला दुसरे कांहीही प्रीय नाही. तुज वाचून जगतात मी दुसरे कांही पाहात नाही. सर्वत्र तूंच व तूंच आहेस तो तूं माझ्या सर्व दुर्वासनांचा नाश करून मला तुझ्या चरण कमलांच्या आश्रयास घेव या जीवास पूर्ण प्रेमाने आस्थायुक्त भक्ति दे."

"हे जगन्नियंता! स्वामीन्, मी तुला शरण आलेलो आहे. तुझ्यापासून दूर नेणाऱ्या प्रत्येक गोष्टीपासून तुझे चरण कमल माझे रक्षण करोत. हे सच्चिदानन्दघन ईश्वरा! मला इंद्रियांची सुखें नकोत. मला कीर्तीची पर्वा नाही, किवा चमत्कार दाखविणाऱ्या सिध्दीची मला आकांक्षा नाही. हे दीनदयाळू विभो! मी जे कांही मांगतो ते तुझ्या विषयी शुध्द भक्ती, वासनांनी दूषीत न झालेले तुझ्या विषयी प्रेम-शुध्द, निर्भेळ प्रेम या जगांतील वस्तूंची इच्छा न करणारे प्रेम-अमर अशा अंतरात्म्यापासून अप्रार्थित, अयाचित उद्भवणारे तुझ्याविषयी प्रेम मला दे. जगत्कर्त्रि विश्वमोहिनी चिच्छक्ति माते! मायेच्या मोहाने भूलून मी तुला विसरून

जाऊ नये कनक कान्तारूपी मोहक संसार जालांत गुंतून जाऊन मी तुला तुझ्या विशुध्द स्वरूपास विसरून जाऊ नये असे तूं कर. हे जगत्पित्ता! तुझ्या वाचून या जगात तुझ्या मुलाला दुसरे कोणीहि नाही हे तूं पाहात नाहीस काय? अरेरे तुझे नाम कसे गावे हे सुध्दां मला माहित नाही. हे अत्यंत दयाळू नारायणा! खोल भक्ति, तुझ्याप्रत नेणारे ज्ञान, खरी भक्ति, या विरहीत मी आहे, असे प्रेम व भक्ति तू मला देऊन माझ्यावर कृपा कर."

"हे दीनवत्सल! हे दयासिंधो! हे करूणासागर! आपले अलौकिक स्वरूप ओळखण्यास मी असमर्थ आहे. तथापि आपले स्वरूप मी पाहात आहे व आपल्या प्रेमात रममाण होत आहे. हे नाथ! माझ्यात व आपल्यात मोठा भेद आहे. हे नाथ माझ्यावर दया करून मला आपल्या भक्तिचा परम अधिकारी करा व आपल्या आश्रयास घ्या. ह्या असार व महान क्लेशजनक संसारांतील अपार दुःखातून वाचवून आपल्या सेवेचा अधिकारी करा."

## ★ श्री सद्गुरुंची आरती ★

जयदेव जयदेव जय सद्गुरु स्वामी, गुरुजी जय सद्गुरु स्वामी
घट घट पूरण व्यापी स्वामी, सर्वान्तर्यामी॥ जयदेव जयदेव॥धृ॥
दया सिंधु करूणाकर सुखरूप, अनहद उपकारी॥ गुरुजी---॥
उपमा कैसी अर्पू तुजला, जय मन मतिहारी॥जयदेव जयदेव॥१॥
जन्ममरण भयहारक समदृष्टी, निजसुख दातारा॥गुरुजी---॥
ऐसा भवसागर तारक तू, जय सद्गुरु राया॥जयदेव जयदेव॥२॥
तव प्रसादे झालो कृतकृत्य, निमग्न आत्मपदी॥गुरुजी---॥
स्वप्नतुल्य हे जग भासतसे, ब्रह्मानंद पदी॥जयदेव जयदेव॥३॥
वेदगुरु परमेश्वर जाणूनि, नित्य नमन करू॥गुरुजी---॥
सेवक होऊनी आजीवन तव, चरणयुग्म विरमू॥जयदेव जयदेव॥४॥
तव प्रसादे कळला मजशी, आत्मज्ञान विवेक॥गुरुजी----॥
उपकार बहु परि केले, कैसा उतराई होऊ॥जयदेव जयदेव॥५॥
बालक अपुलें जाणुनि मजवरी, कृपा बहु केली॥गुरुजी----॥
नाही गणली पापे कोटी मम, अगणित झाली॥जयदेव जयदेव॥६॥
तव कृपेने 'मी माझे' हे मन, विलया गेले॥गुरुजी---॥
निर्मानमोह ममचित्त हे, ब्रह्मानंदी ठेले॥जयदेव जयदेव॥७॥
ब्रह्मदर्शि हे सद्गुरुराया, कळा बहु केली॥गुरुजी---॥
देहधारी असुन मजशी, विदेह मुक्त केले॥जयदेव जयदेव॥८॥
गुरुदक्षिणा म्हणूनी काय, अर्पू अपुल्या प्रति॥गुरुजी---॥
हृदयकमल हे अर्पण अपुल्या, पावन युग्मपदी॥जयदेव जयदेव॥९॥

# ★ सद्‌गुरु इमामशहांची आरती ★

आरती इमामशाहा तुज, धन्य असे मुनिवर।।
धन्य या कलयुगी, क्षेत्र केले इमामपूर।।धृ।।
इमामपुरीचा राजा, नाव असे तुज जाण।।
भक्ति मुक्ति तुजपाशी, राहिली येऊन।।१।।
धरमी लोक तुज ध्याती, मुखी ज्ञान बोलती।।
करूनी देव पूजा, आपुल्या गृहाप्रति जाती।।२।।
असा हा सतपंथ आहे, खड्‌गाची धार।।
अजंपा जाप विना न कोणी, पावे हो पार।।३।।
असा हा ब्रह्म बोध, सद्‌गुरुंचा झाला।।
म्हणूनि नायाकाका पायी, शरणांगत आला।।४।।

# ★ पुष्पाञ्जलि ★

हे परमेशा-सद्‌गुरु राया, सद्भावे नमीतो।।गुरुजी --
पुष्पाञ्जलि ही दीनबंधू आम्ही तुजला अर्पितो।।धृ।।
तन मन धन हे अर्पण करूनी, कृपाबळे आता।।गुरुजी --
एकत्वाच्या सुधासमुद्री राहीन बलवंता।।१।।
स्वयं भास्करा जगत् शंकरा, मायामलहरणा।।गुरुजी --
तव तेजाचे पूजन करीती ही बांधवसेना।।२।।
तूं अस्नात स्नान घालू मग, कवण्या उपचारे।गुरुजी --
शुध्द भावना चन्दनलेपा करीन अलेपारे।।३।।
विज्ञानाचा दीप प्रभाकर, हृदयनभीं आला।।गुरुजी --
वैराग्याच्या अग्नीवरीं मग चूर्णधूप केला।।४।।
सकलगुणाकृति ज्ञानदृष्टींचा, लावी दीप हरी।।गुरुजी--
विशुध्द ज्या वासना तयांना तुज नैवेद्य करी।।५।।
बंधु भगिनी नाना परीने, सेविती भवभंगा।।गुरुजी--
संकट समयी धैर्य दे करी समर्थ गतगंगा।।६।।
सर्वस्वाची ठेवी दक्षिणा, सर्व साक्षी माऊली।।गुरुजी--
चैतन्याची विद्युत् ज्योती नंतर पाजळली।।७।।
चैतन्याची प्रभा मनोहर, हीच तुझी मूर्ति।।गुरुजी--
अंतरी ओतूनी बाह्यांतरी करी प्रगट सर्वदा ती।।८।।
ऐसी स्थिती मज बंधूभगीनी, सहजावी देवा।।गुरुजी--
पुष्पाञ्जलिही करूनी मागणे प्रसाद स्वयमेवा।।९।।

# ★ प्रदक्षिणा व साष्टांग नमस्कार ★

धन्य धन्य ही प्रदक्षिणा सद्गुरु रायाची।
सर्वही तीर्थे घडली आम्हा बहु पुण्यराशी॥
प्रदक्षिणा मी करूनी वंदितो सद्गुरु तव चरणा॥
हृदय पुष्प हे तुला वाहितो वरदहस्त शिरी ठेवा॥

## ★ हात जोडून परमेश्वरास नमन ★

अन्यथा शरणं नास्ति त्वमेव शरणं मम।
तस्मात्कारूण्य भावेन क्षमस्व परमेश्वर॥
त्वमेव माता च पिता त्वमेव, त्वमेव बन्धुश्च सखा त्वमेव॥
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव, त्वमेव सर्व मम देव देव॥
कायेन वाचा मनसेन्द्रियैर्वा, बुध्दयात्मना वानुसृतस्वभावात्।
करोमि यद्यत्सकलं परस्मै, नारायणायेति समर्पयामि॥
ॐ शान्तिः! शान्तिः!! शान्तिः!!!



# फैजपूर येथील श्री सतपंथी मंदिर संस्थानाचा अल्पपरिचय.

परमपूज्य सद्‌गुरुवर्य श्री इमामशहा महाराज यांच्या जीवन वृत्तान्त ग्रंथात असा संबंध आहे कीं ते गुजराथमध्यें धर्म प्रचारार्थ फिरत असतां इ. स. १४६० च्या सुमारास खंबायतला आलेले होते. तेथील लोकांना कांही दिवस पर्यंत धर्मोपदेश करून ते पुढे बडोद्यास गेले तेथे कांही दिवस राहून नंतर चांपानेरला गेले. तेथें सुध्दां कित्येक लोकांना धर्मोपदेश करून व सत्पंथाचा अनुग्रह देत पुढे सद्‌गुरु महाराज पावागडच्या परिसरांतील जनतेस सन्मार्गाचा उपदेश करण्याकरितां गेले.

पावागड हा ऐतिहासीक डोंगरी किल्ला पंचमहाल जिल्ह्यांतील कलोल तालुक्यांत असून बडोद्याच्या पूर्वेस २८ मैलावर आहे. तेथे नवरात्र महोत्सवात भद्रकाली देवीची मोठी यात्रा भरते. जुन्या शिलालेखात या गडाला पावकगड अथवा पवनगड असें नाव आहे. प. पु. सद्‌गुरु इमामशाह महाराज तेथे गेले त्या सुमारास पताई जयसिंह रावळ हा तेथील कारभार पहात होता. सद्‌गुरु महाराज पुष्कळ दिवसपर्यंत तेथे राहिले. तेथे त्यांनी लेवे पाटीदारांतील व राजपूत वगैरे जमातीतील अनेक लोकांना धर्मोपदेश करून सत्पंथाची दीक्षा दिली. तेथून सद्‌गुरु महाराज पिटलाद तालुक्यांत देवा गांवी गेले व नंतर तेथून अमदाबादेस गेले होते असा त्यांच्या जीवनवृत्तान्तात संबंध आहे. अशाप्रकारे गुजराथेत त्यांचा प्रचार दौरा जास्त प्रमाणांत झाला व पुष्कळ समाजाचे जातीतील लोकांना त्यांनी निरीच्छ बुध्दिनें वैदिक धर्माचा तत्वोपदेश केला.

सद्‌गुरु महाराज पावागडाहून गेल्यानंतर सुमारे २४ वर्षांनी त्या परिसरांतील जनतेवर फार मोठी आपत्ति कोसळली. इ. स. १४८४ च्या सुमारास महंमद बेगड्याने पावागडावर स्वारी केली व तेथील जयसिंह पताई राजाचा वध केला सुमारे एक वर्षभर ही लढाई चालू होती. त्या युध्दाच्या वेळेस तेथील जनतेस अनंत हाल सोसावे लागले. कित्येक लोकांनी तेथून निघून अन्यत्र व्यवसाय धंद्याकरिता प्रयाण केले. पावनगडाच्या या विनाशास कारणीभूत अशी एक दंतकथा भाटलोक सांगतात की राजा जयसिंहावर कांही कारणामुळें भद्रकाली देवीचा कोप होऊन शाप झालेला होता की थोड्याच दिवसाचे आंत तुझा व तुझ्या नगराचा नाश होईल. त्यामुळे तेथील जनतेने आपल्या पुढच्या जीवन विषयक समस्येचा विचार करून ती भूमि सोडली. आपल्या मातृभूमिचा त्याग करतांना त्यांना अपरिमीत दुःख झाले. ज्यांनी तेथून आपला व्यवसाय धंदा करण्याकरितां इतरत्र प्रयाण केले त्यांच्या पैकी कांही लेवा लोकांची मोठी तुकडी

१५ व्या शतकाच्या शेवटी खानदेशांत येऊन त्यांनी नांदेड, तालुका अमळनेर येथे प्रथमवस्ती केली पुढे हे लोक जसजशी जमिन व वतने, कामधंदा, नोकरी वगैरे मिळाली तसतसे यावल, रावेर, भुसावल, जळगाव वगैरे तालुक्यांत कायमचे रहिवासी झाले. कांही लोक वऱ्हाड, निमाड, पश्चिम खानदेश वगैरे ठिकाणी जाऊन तेथेंच राहू लागले. ह्या लोकांची मुळची गुजराथी भाषा जाऊन ते मराठी बोलूं लागले.

पावागडाहून खानदेशात वस्ती करून राहिलेल्या लेवा पाटीदारांत पावागड येथे असतांना बराच मोठा भाग सतपंथ पाळणारा होता. गुजराथेत लेवापाटीदारात आज मितीससुध्दां सतपंथाचे अनुयायी पुष्कळ प्रमाणांत आहेत. ते आपल्या पूर्वजांच्या धर्मपंथाप्रमाणे वागत आहेत. खानदेशात लेवा मध्ये आज मितीस वारकरी, स्वामिनारायण, सतपंथ, नाथपंथ, महानुभाव वगैरे अनेकानेक धर्मपंथ पाळले जातात व त्या सर्वांचा आपापसांत रोटीबेटी व्यवहार चालूं आहे. खानदेशात आलेल्या लेवा पाटीदारामध्ये शें सव्वाशें कुटुंबे सतपंथी अनुयायांची होती. ते सर्व फैजपूरास व आजुबाजुचे खेडेगांवी राहात असत सतपंथ धर्मतत्वानुसार पूजा अर्चा, भजन पूजन, कथा किर्तन श्रवण वगैरे करण्यास कांही तरी एक निश्चित ठिकाण असावे व त्या ठिकाणी आपल्या रीतीरिवाजानुसार परंपरेने चालत आलेले सर्व धार्मिक विधी करता यावेत या उद्देशाने त्यांनी फैजपूर येथे एक मंदिर बांधले, तेच सतपंथी मंदिर अथवा धर्मशाळा या नावानें ओळखून येते. सतपंथी मंदिरांत लोक पूजा, अर्चा, आरती, प्रार्थना, भजन वगैरे करण्याकरितां एकत्र येत असत. त्या ठिकाणी घटपाट कलशपूजा व घृतज्योतीचे ध्यान व प्रणव ब्रह्म ॐ चे स्मरण वंदन प्रार्थना वगैरे करित असत. पुढें फैजपूरहून कांही लोक कामधंद्याच्या निमित्ताने आजुबाजुचे खेडेगांवी म्हणजे आमोदा, बामणोद, राजोरा, चिनावल, उटखेडे, विवरे, मस्कावद, रोझोदा, खडके, कंडारी, पिंपळगांव (ता. भुसावळ), पिंपळगावगोलाईत (ता. जामनेर), आसोदे (ता. जळगाव), फुलाचे विरोदे, लिंगे, नशिराबाद, बोरी (मध्यप्रदेश) वगैरे अनेक गांवी गेले व तेथेच कायमचे स्थाईक झाले. स्थाईक झालेल्या ठिकाणीच त्यांनी पूजा अर्चा करण्याकरितां लहान लहान देवघरांची म्हणजे पूजा स्थानांची स्थापना केली व तेथेच ते आपले सर्व विधी करूं लागले, मात्र मुख्य ठिकाण फैजपूर म्हणून येथे उत्सवाचे वेळेस एकत्र येऊन सामुहिक पूजा, भजन वगैरे करून पंथ संघटना कायम राखीत असत.

फैजपूर येथील सतपंथी अनुयायी परमपूज्य इमामशहा महाराजांना 'सद्गुरु' म्हणजे सत् मार्गदर्शक 'युगगुरु' चे ठिकाणी मानतात. त्यांनी दर्शविलेल्या पूर्ण सनातन वैदिक मार्गाचेच अवलंबन करतात, सत्पंथाच्या मुख्य सिध्दान्तानुसार श्री आद्यनारायण, आद्यशक्ति अथवा योगमाया, ब्रह्मा, विष्णू आणि महेश्वर ह्या इष्ट व आराध्य

देवतांचे पूजन करावयाचे असते. श्रीविष्णु परमात्म्याचे दहा अवतार पूज्य मानून युगधर्मानुसार दहाव्या अवताराची श्री निकलंकी नारायणाची भक्ति करावी. त्याचप्रमाणे इतर सर्व देव देवता ह्या सर्व एकाच विराट स्वरूप भगवंताच्या अंशभूत विभूती आहेत हे जाणून त्यांना वंदन करून त्यांचा कृपाशिर्वाद मिळण्याकरितां मंत्रोपचाराने त्यांची आराधना करावीअसे सद्‌गुरु महाराजांचे प्रतिपादन आहे. कलशपाट, घृतज्योतीची पूजाविधी अथर्व वेदाच्या मंत्रानुसार करतात. मंत्र सद्‌गुरु इमामशहा महाराजांनी अथर्व वेदावरून लोक भाषेत म्हणजे गुजराथी भाषेत केलेले आहेत. पूजेच्या वेळेस अखंड घृतज्योतीचे ईश्वराच्या निर्गुण निराकार तेजस्वी स्वरूपाचे ध्यान करण्याचा नियम आहे. पूजाविधीत ध्यान धारणेस व मन एकाग्र करण्यास अतिशय महत्व आहे. त्याच प्रमाणे प्रणवब्रह्म ॐ चे नित्य स्मरण करण्याचे सद्‌गुरु महाराजांचे प्रतिपादन आहे.

कलशपूजा हे ब्रह्मपूजेचे व अमृतत्व प्राप्तीच्या मार्गाचे प्रतिक आहे. परब्रह्म परमेश्वराने जेव्हां सृष्टीच्या उत्पत्तीचा संकल्प मनांत धारण केला तेव्हा सर्व प्रथम संकल्पमात्रे ब्रह्मदेवास निर्माण केले व त्यास एक अमृत कलश देऊन सृष्टीची निर्मीति करण्यास सांगितले. ब्रह्मदेवाने त्या अनुसार कलशांतील अमृत बिंदू शिंपडून संकल्प करून सृष्टीतील एकेका पदार्थाची निर्मीती केली. प्रथम त्या अमृत बिंदूद्वारे संकल्प करून पंचमहाभूते निर्मीली. नंतर सृष्टीची उत्पत्ती व रचना केलेली आहे. त्या आद्य कळस घटपाटाचे प्रतिक म्हणून सद्‌गुरु इमामशहांनी सतपंथी अनुयायास हा कलश पूजापाठ विधी सांगितलेला आहे. आपल्या सर्व धर्म शास्त्रांनीसुध्दां कलशपूजेस अग्रस्थान दिलेले आहे याचे कारण हेच. पूजेच्या वेळेस घृतज्योत लावून त्याचे ध्यान करावयाचे असते. कारण घृत म्हणजे तूप हे सात्विक अन्न आहे. त्याचा सुगंध अत्यंत सुमधूर असतो व आरोग्यदृष्ट्या उपयुक्त असतो. पुष्टीवर्धक व तुष्टीवर्धक असतो सात्विक शांतीच्या प्राप्तीकरितां ध्यान करण्यास योग्य वातावरण निर्मीती करितां साजुक तुपाच्या ज्योती लावावयाच्या असतात. आपला आत्मा व प्रत्येक प्राणीमात्रांच्या शरिरांत चैतन्यरूपाने वास करणारा आत्मा हा ज्योतीस्वरूप-तेजस्वरूप असल्याने त्याच्या प्राप्तीकरीतां त्याच स्वरूपातून त्याचे ध्यान करणे अत्यंत महत्वाचे असते. ॐ प्रणव ब्रह्म हे आद्य अक्षर तत्व आहे. सर्व सृष्टोत्पत्तीच्या मुळाशी हे अक्षर ब्रह्म आहे. ॐ हे ब्रह्मबीज आहे. त्याशिवायची सर्व बीजे उदा:- ऱ्हां, ऱ्हीं, घृं, जृं, सृं, आदि सर्व मातृकाबीजे आहेत. त्यांच्या स्मरणाने ती बीजे ज्या देवदेवतेची प्रतिकात्मक आहेत त्या देवतेची उपासना होते व आत्यंतिक उपासनेच्या बळावर तो जीव त्या देवतेच्या साक्षात्कारास पात्र होतो परंतु त्या देवता अगर त्यांची फळे नाशिवंत असल्याने त्यांची उपासना करणे गौण आहे. ॐ आद्यब्रह्म बीज मंत्र असल्याने त्याच्या स्मरण चिंतन उपासनेने आत्मपदाची प्राप्ती होते व त्याद्वारे मुक्ति पदाची प्राप्ती होते. अशा प्रकारे या सर्व

गोष्टीस सतपंथ घटपाट पूजाविधीत महत्वाचें स्थान दिले जाते व त्यांनी युक्त ती पूजा होत असते.

सत्य, प्रेम, पुरुषार्थ, समानभाव, अहिंसा, परोपकार व क्षमा ही सतपंथाची मुख्य तत्वें आहेत. हृदयशुध्दिकरीतां हिंग, तंबाखु, अफु, गांजा, मद्यमांस या सर्व निषिध्द व मादक वस्तूंचा त्याग, त्याचप्रमाणे परनिंदा, परस्त्रीगमन, चिंतन सवाई व्याज यांचाही त्याग सांगितलेला आहे. 'अहिंसा परमो धर्म:' ह्या सतपंथाच्या मुख्य ध्येया प्रमाणे वागणूक फारच कडक आहे. कोणास 'मार' असे म्हणणे सुध्दां दोषास्पद आहे. शरीरशुध्दीचे नियम फारच कडकपणे पाळले जातात. प्रसूत झालेल्या स्त्रीस ४० दिवस (सव्वा महिन्या) पर्यंत घरांतील कोणत्याहि वस्तूस स्पर्श करता येत नाही. तसेच रजस्वलेस ५ दिवस घरांत वापरता येत नाही. मंदिरांत मंत्रोपचाराने तीर्थ प्रायश्चित घेतल्याशिवाय शुध्दता होत नाही. ऋतुकालांत स्त्रीयास मंदिराच्या पायरीससुध्दां स्पर्श करता येत नाही. एवढे कडक नियम पाळावयाचें असतात. रामनवमी, गोकुळअष्टमी, एकादशी, चतुर्दशी, शुध्द द्वितीया चंद्रदर्शन, चतुर्थी, इ. ही व्रते आहेत. गुढीपाडव्यांचे दिवशी ध्वजेवर नविन निशाण चढवून ध्वजवंदन करण्याचा नियम आहे. निशाण पांढऱ्या रंगाचे व ॐ चिन्ह असलेले चढविले जाते.

फैजपूर येथील सतपंथी मंदिरांत पूजा अर्चा करण्याकरितां आणि संस्थानाची वहिवाट चालविण्यांकरितां गादिपति बालब्रह्मचारी साधु असतात. बालपणापासून सतपंथी अनुयायातील कोणत्याहि व्यक्तिस मंदिरांत बालब्रह्मचारी साधु म्हणून अर्पण करण्याची प्रथा आहे. शिष्य परंपरेनुसार ह्या संस्थानाची वहिवाट चालूं आहे. असे बालब्रह्मचारी साधुच सतपंथी अनुयायांचे गुरु होत. ज्यांनी त्यांच्याकडून सतपंथाचा अनुग्रह घेतला ते त्यांचे गुरु होत. मात्र सद्गुरु इमामशहा महाराज हे सतपंथीयांचे एकमेव परमपूज्य सद्गुरु होत. आज पर्यंत फैजपूर संस्थानांत अजमासे ११/१२ गादिपती झालेले आहेत हे मंदिर येथे सुमारे ४००-४५० वर्षापासून आहे. सतपंथी अनुयायी इकडे येण्यासही तेवढाच काळ लोटलेला आहे. पूर्वी येथे लहानसे पण उत्तम प्रकारे बांधलेले मंदिर होते. या मंदिराची स्थापना इ. स. १५७५ ते १६०० च्या सुमारास झालेली आहे. इ. स. १८३१ च्या सुमारास ते सुविद्य स्थितीत होते. त्या वेळेस येथे परमपूज्य आचार्य श्री. दगडू बुवा हे गादीपति बालब्रह्मचारी आर्चक व मंदिराचे वहिवाटदार होते. त्यांच्या नंतर प. पू. आ. श्री. जाना बुवा हे गादीपति झाले. त्यांच्याविषयी आवश्यक ती पुरेशी माहिती उपलब्ध नाही. त्यावेळेस मात्र धर्माची उर्जितावस्था उत्तरोत्तर वाढत होती. ज्ञानोपदेशाचे आणि धर्मप्रचाराचे कार्य जोमाने व धडाडीने चालू होते.

त्यांच्या नंतरचे गादीपति प. पु. आ. श्री. बारसु बुवा यांनी बालब्रह्मचारी साधूची वस्त्रे परिधान केली. त्यांचे मूळ जन्मस्थळ भुसावळ तालुक्यातील टाक्याचें पिंपळगांव हे होते. तेथील कोल्हे घराण्यांत त्यांचा जन्म झाला. बालपणापासून त्यांचे धार्मिक शिक्षण व स्मरणशक्ति तेजस्वी असल्यामुळे त्यांच्या आई वडिलांनी त्यांना बालब्रह्मचारी साधु म्हणून मंदिरांत अर्पण केले. तेथे त्यांनी अपरिमित मेहनत घेऊन शास्त्राभ्यास केला. ते संस्कृत भाषेचे पंडित होते. श्रीमद्‌भगवद्‌गीता व श्रीमत् शंकराचार्यांचे वाक्यवृत्ति, अपरोक्षानुभूति, आत्मबोध वगैरे अनेक ग्रंथ त्यांच्या मुखोद्गत होते. एकदाचे ते प्रवचन करूं लागले म्हणजे तासनतास श्रोते लोक ते ऐकण्यांत दंग होऊन जात असत. ते नेहमी शास्त्राभ्यास करून लोकांना उपदेश करीत. लोकही त्या वेळेस दररोज आपला व्यवसाय धंदा आटोपल्यानंतर नियमित मंदिरांत येऊन शास्त्रांचे अध्ययन करीत असत त्याच प्रमाणे जुन्या हस्तलिखित शास्त्रांचे उतारे करून पुनरूज्जीवन करीत. धर्म भावनांची खरी जागृति त्यावेळेस दिसून येत होती, त्यावेळेस सर्वतोपरि अनुकुल परिस्थिती होती. एकतर लोकांची मने फारच श्रध्दाळू व भाविक होती. त्यांच्यांत सतपंथाचे ज्ञान जाणून घेण्याची भावना-जिज्ञासा जागृत होती. लोक अतिशय भाविकतेने पूजा वगैरे करीत असत व भंडारा करीत असत. त्यामुळे आजुबाजूच्या खेडेगांवातील लोकसुध्दा नेहमी येत असत. उपदेशात्मक चार शब्द त्यांच्या कानावर पडत असत त्यामुळे लोकांच्या धार्मिक भावना नेहमी उज्वल व जागृत होत्या. गांवोगांव भागवत सप्ताह दशावतार सप्ताह वगैरे साजरे होत व मोठमोठे भंडारे (अन्नसत्र) होत असत. लोक उत्सुकतेने व इर्षेने प्रत्येक कार्यात बहुसंख्येने भाग घेत. त्यावेळेस प. पू. गुरु. बारसु बुवांचा दौरा आजुबाजुच्या अनेक गांवामधून होत असे. मुख्यत: पूर्व व पश्चिम खानदेश, वऱ्हाड, नेमाड, मध्यप्रदेश वगैरे विभागांत त्यांचा प्रचार दौरा प्रत्येक वर्षी होत असे. लेवा सोडून इतरही म्हणजे राजपूत, मराठे, साळी, बारी, कोष्टी, भावसार (रंगारी) वगैरे अनेक समाजाचे लोक या पंथाचे पूर्वापार पासून अनुयायी आहेत.

प. पू. गुरुवर्य बारसु बुवाच्या उत्तर काळांत म्हणजे इ. स. १८९७ च्या सुमारास फैजपूर येथील मंदिर अतिशय जीर्ण झालेले होते. ते उकलून त्याच ठिकाणी नविन भव्य मंदिर बांधावे असा सतपंथी अनुयायी लोकांचा मानस होता. त्याच सुमारांस तेथे एक चमत्कार लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आला मंदिराच्या पूर्व बाजूस हमरस्ता असून उत्तर बाजूस वाड्यात जाण्याचा रस्ता आहे. त्या दोनही रस्त्याच्या कोपऱ्यांत म्हणजे मंदिराच्या ईशान्य कोपऱ्यात एक मोठा खिरणीचा वृक्ष होता. त्या वृक्षावर प्रत्येक वर्षी गुढी पाडव्यास मंदिराचे पांढरे निशाण म्हणजे ध्वज लावीत असत. त्या वृक्षाच्या घनदाट छायेत मुलें खेळत असत. एकदा संध्याकाळच्या वेळी कांही मुलें खेळत असतांना दोनही रस्त्याच्या कोनावर १०-१२ फूट लांब अशी सुगंधीत फुलांची अचानक

पुष्पवृष्टी झाली. मुलांच्या दृष्टोत्पत्तीस ते येताच सर्व मुलें तेथे गोळा झाली व त्यांनी पुष्कळ शोध तपास करून पाहिले पण ती पुष्पवृष्टी कोठून, कशी व कां झाली हे कोणालाच समजले नाही. अखेर २-३ इसमांनी ती खाली पडलेली फुलें वेंचून घेतली. त्या फुलांचा सुगंध एवढा दरवळला कीं आजुबाजुचे सबंध वातावरण सुमधूर बनून केले. मंदिराच्या पूर्व बाजूच्या वाड्यांत कांही चौधरी लोकांची घरे आहेत ते पूर्वापार पासून सतपंथाला पूज्य मानणारे व श्रध्दाळु आहेत. त्यापैकी कै. हुना हरी चौधरी यांनी ती वेचलेली फुले मागितली व त्यांच्या घरातील देव्हाऱ्यांत ती ठेवली ते उच्च प्रकारचे भक्त होते. त्यांच्या अंगात कांही देवतांचे वारे येत असे. त्यांच्या मुलांनी त्यांना ही पुष्पवृष्टी होण्याचे कारण विचारले. त्यांनी आपल्या इष्ट देवतेचे स्मरण ध्यान करून सांगितले कीं, या मार्गाने एक तपस्वी व तेजस्वी सत्पुरुष नुकतेच अदृश्य रूपाने मंदिरांत आलेले होते. त्यांच्या सत्काराकरिता व त्यांचे हे वास्तव्य भूमिचे ठिकाण असल्यामुळे ईश्वरी अनुग्रहाच्या योगाने त्यांच्यावर ही पुष्पवृष्टी झालेली आहे. असे त्यांनी सांगितले. तेव्हा सर्वांना पुष्पवृष्टीचे कारण समजले व सर्वांनी पूर्ण प्रेम भक्तिभावाने तेथील धूळ आपल्या मस्तकी धारण केली. सर्वांनी सद्गुरु महाराजांच्या नामाचा जयघोष केला.

सर्वांनी पुष्पवृष्टी झालेल्या ठिकाणी ध्वजारोहण करण्याचे ठरविले. अनायासेच मंदिर अतिशय जीर्ण झालेले असल्यामुळे त्याचा जीर्णोध्दार करावा व त्या ठिकाणी ध्वजारोपण करावे या उद्देशाने सर्व सतपंथी अनुयायांचा एक विचार होऊन त्यानुसार इ. स. १८९८ च्या सुमारास मंदिराच्या जीर्णोध्दाराकरिता फंड वगैरे गोळा करण्याचे ठरले. परंतु त्या सुमारास लोकांची सांपत्तीक स्थिती अतिशय प्रतिकुल होती. कारण त्यावेळेस अतिशय कठिण असा संवत १९५६ चा दुष्काळ पडलेला होता. परंतु सर्व अनुयायी लोकांनी जीर्णोध्दाराचे कार्य हिरीरीने उचलले. जीर्णमंदिर उकलण्यांत आले व नविन इमारतीच्या पाया भरणीपासून कामास सुरुवात झाली. दोन वर्षात नविन इमारतीचे बांधकाम पूर्ण झाले. इमारतीस लावीलेला सर्व चुना राजोरे येथे भट्ट्यांत तयार करून व बामणोद येथे (ढेकी करून म्ह.) बारीक तयार करून अनुयायीयांनी आणून दिला. इमारतीवरील सर्व कौल धानोरे येथून आणले. गांवोगांवचे अनुयायी लोक ८-८ दिवस येऊन श्रमदानाने काम करून जात असत. फैजपूर, चिनावल, राजोरा, बाह्मणोद वगैरे गांवातील अनुयायांनी बैलगाड्या देऊन लाकुडफाटा, दगड विटा वगैरे आणण्याकरिता मदत केली. जास्त मजुरांची आवश्यकता लागल्यास अति अल्प मजुरी घेऊन अनुयायी लोकच कामास येत असत. त्यावेळेस पुरुषास दीड आणा व स्त्रीयांस पाऊण आणा अथवा एक आणा या प्रमाणे मजुरी होती. सुतारास व बांधकाम करणाऱ्या गवंड्यास ४ आणे ते ८ आण्यापर्यंत मजुरी होती.

अशा प्रकारे अत्यंत अल्प खर्चात व बहुश: श्रमदानानेच मंदिराच्या जीर्णोध्दाराचे कार्य पूर्ण झाले.

या सर्वांच्या मुळाशी सत्पंथी अनुयायांचे प्रेम, भाव, भक्ति, धर्माविषयीची कळकळ, पंथ संघटना आणि अपार उत्साह होता हे दिसून येते. त्यावेळेस सतपंथी सोडून इतर लोक सुध्दां मदत करण्यास तयार होते, परंतु सर्वांनी त्या गोष्टीची आवश्यकता नसल्याने मदत घेण्याचे नाकारले. अशा रीतीने अतिशय आत्मियतेने व उत्साहाने तन, मन, धन व श्रमाने बांधलेल्या या मंदिरांचे बांधकाम आटोपून इ. स. १९०० मध्ये त्याची शांति झाली. वास्तुशांतिच्या पूजेच्या वेळेस सर्व गांवोगांवच्या सतपंथी लोकांना व फैजपूर गांवामधील सर्व लोकांना आमंत्रण होते. ब्राह्मणांनी मोठा यज्ञ, होम वगैरे करून वास्तुशांति केली. नंतर खूपच मोठा भंडारा होऊन सर्वांनी एक निष्ठेने समभावनेने सतपंथी मंदिराच्या शांतीचे काम आटोपून मंदिरात ब्रह्मासनाची ( तक्ताची ) स्थापना करून त्यावर कलश घटपाट व घृतज्योतीची स्थापना केली व नित्य पूजापाठविधी सुरु केला. त्याचप्रमाणे ब्रह्मासनावर धर्मग्रंथांची आणि प. पू. सद्गुरु महाराजांच्या पादुकांची स्थापना केली व त्यांची पूजा अर्चा केली. मंदिराच्या ईशान्य कोपऱ्यात ५० फुट उंचीची ध्वजा बसविण्यांत आली. गुढीपाडव्याचें शुभमुहूर्तावर मोठा मंगल उत्सव होऊन नविन ध्वजेवर ॐ चिन्हांकित भगवे निशान चढविण्यांत आले. त्यावेळेस नगारा, सनई वगैरे मंगलवाद्ये वाजवून ध्वजेची आणि निशाणाची पूजा करून सुंदर पुष्पहार लावून श्रीमत् सद्गुरु इमामशहा महाराज व प्रभू श्री निकलंकी नारायणाच्या मंगल नामाचा जयघोष करून निशाण वर चढविले व ध्वजारोहण मंगलोत्सवाचा नारळ फोडून पहिला शुभमुहूर्त साजरा केला. अशाप्रकारे नविन बांधलेल्या ( जीर्णोध्दार केलेल्या ) मंदिराची इ. स. १९०० मध्ये सुविद्यस्थितीत स्थापना झाली.

त्याचसुमारास फैजपूर येथील मंदिरांत सत्पंथी धर्माचे मुख्य आचार्य पीराणा संस्थानाचे गादिपति काका परम पूज्य गुरुवर्य श्रीरामजी लक्ष्मण व श्री वालजी काका काही कार्यानिमित्त ६ महिन्यापर्यंत मुक्कामी होते. त्यांनी येथील वहिवाट, पंथीयांची समाज संघटना व सतपंथ नियमांचे कटाक्षाने आचरण बघून अनुयायांना धन्यवाद व शुभाशिर्वाद दिले.

इ. स. १९०५ पर्यंत प. पु. गुरु बारसुबुवा यांचे नेतृत्व सत्पंथी अनुयायास लाभलेले होते. या काळात पंथ संघटनेच्या दृष्टीने अनेक महत्वाची कामे व धर्मप्रचार दौरे झालेले आहेत.

या सुमारास मौजे उटखेडे तालुका रावेर येथील कै. जाना दगडू राणे यांनी सत्पंथी मंदिरात येऊन देवासमोर असे मानले की माझ्या घरी पुत्र जन्म झाल्यास तो मी मंदिरात बालब्रह्मचारी साधु म्हणून अर्पण करेन. कांही दिवसांनी त्यांना एक अतिशय सुंदर तेजस्वी मुलगा झाला. आपल्या नवसास देव पावला हे बघून त्यांना फार आनंद झाला. पण माया, मोह विकाराच्या आहारी जावून देवास दिलेले वचन मोडून त्यांनी मुलास मंदिरात अर्पण करण्याचे नाकारले. दुर्दैवाने थोड्याच दिवसात त्या मुलाचे प्राणोत्क्रमण झाले. दिलेले वचन न पाळण्याचा त्यांना फार पश्चात्ताप झाला. अखेर त्यांनी परत भक्तिभावाने ईश्वरास झालेल्या अपराधाबद्दल क्षमा मागितली व एक वार मुलगा होण्याबद्दल देवाची अनन्य भावे विनंती केली. ईश्वरी अनुग्रहाने त्यांना मुलगाच झाला. तो मुलगा मंदिरात म्हणजे धर्मास अर्पण करायचा असल्यामुळे त्याचे नांव त्यांनी धर्माच ठेवले. इ. स. १९०५ मध्ये प. पू. आचार्य बारसुबुवा निवर्तल्यावर त्यांच्या पश्चात सदरहू संस्थानाची वहिवाट करण्यास त्यांनी त्यांच्या मुलास म्हणजे प. पू. आ. धर्मा महाराजांना भगवे साधु म्हणून अर्पण केले व त्यांना मंदिरात आणले. त्यावेळेस गुरु धर्माबुवा हे अगदी बालवयाचे होते म्हणून सर्व सतपंथी लोकांनी गांवोगावच्या जमातीतील कांही प्रमुख पंचांची निवड करून धर्मा बुवाचे संगोपन व सदरहू संस्थानाची व तेथील मिळकतीची वहिवाट करण्याकरितां एक कमेटी नेमली. प. पू. धर्माबुवांचे बालवय असल्यामुळे उटखेडे येथील सन्माननीय कै. जयराज झेंडू बारी यांनी अत्यंत अल्पपगार घेऊन मंदिरात पूजा अर्चा करण्याचे काम केले व संस्थानाचा कारभार ते पाहू लागले.

संस्थानाचा खर्च पूजा अर्चा, उद्धूप दीपाकरितां तेल, तूप व अन्नधान्य प्रसाद, आर्चकाचा खावटीखर्च वगैरे सर्व व्यवहार सुरळीतपणे व अव्याहत पणे चालावा या करितां कांही उदारबुध्दी दानवंतांनी मंदिरास जमिनी अर्पण केल्या व कांही जमिनी संस्थेच्या खर्चाने विकत घेतलेल्या आहेत त्या उत्पन्नावर मंदिराचा सर्व खर्च भागू लागला. अशाप्रकारे वेळोवेळी ज्या आवश्यक बाबींची गरज पडली तेव्हा तेव्हां भाविक लोकांनी ती गरज पूरवून आपले संस्थान सदैव अव्याहतपणे सुरक्षित ठेवले.

इ. स. १९११ ची हकिकत. फैजपूर गांवातील बोहरी गल्लीकडे रात्री अचानक एका घरास आग लागली. आगीचे लोळचे लोळ उसळू लागले व त्यास अनायासेच वाऱ्याची साथ मिळाली. आग वाढता वाढता एका बोहऱ्याच्या गोदामापर्यंत जाऊन भिडली. गोदामात रॉकेलचे डबे भरलेले होते. अग्निच्या योगाने ते डबेच्या डबे उसळून वर आकाशांत उडत व जोराने त्यांचा स्फोट होऊन सर्वत्र लांबवर रॉकेल पसरले जाई व मोठा भडका होई. तो अग्नीचा लोळ कोठे पडेल याचा नेम नव्हता.

झपाट्याने आग गांवच्या दक्षिण बाजुकडे पसरू लागली व थेट सतपंथी मंदिराच्या समोरील घरापर्यंत येऊन भिडली. सर्व लोक हा अग्नीप्रलय पाहून हताश नव्हे निर्बुध्दच झालेले होते. कोणास कांहीही सुचत नव्हते. सतपंथी लोकांनी मंदिरात जाऊन परमेश्वराची अनन्य प्रकारे विनवणी केली. अखेर मंदिरापर्यंत आलेल्या आगीने आपले तोंड फिरविले हवा पालटली व आग आटोक्यात आली. ज्या आगीने ३००-३५० घरे बेचिराख केली तिला मंदिराचा स्पर्श होताच शांत झालेली पाहून सर्व लोक आश्चर्यचकित झाले.

इ. स. १९२४ मध्ये काही भाविक लोकांचा तीर्थयात्रेकरिता निघालेला एक यात्रेकरू संघ अपार श्रध्देने व प्रेम भावनेने प्रेरित होऊन पीराण्यास गुरुदर्शनास गेला होता. तेथे त्यांच्यावर गुरुकृपा होऊन ईश्वरी अनुग्रहाने त्यांना तेथे अद्‌भुतरम्य गंगादर्शन झाले. ती सविस्तर हकिकत आपण प्रस्तुत ग्रंथात ( पृष्ठ ३१८ वर ) वाचलीच असेल.

एकदा मंदिरात उत्तर कार्याची पूजा चालू असतांना एक चमत्कारिक घटना घडली. बामणोद् येथील श्री. नेमा रामजी झोपे हे त्यावेळेस अगदी लहान म्हणजे १२ वर्षाचे होते. पूजेच्या वेळी वरच्या मजल्यावरून खाली उतरत असताना अचानक त्यांचा पाय घसरला व आडावरील झरोक्यांतून ते जोराने दुसऱ्या मजल्यावरून चरकाच्या मधून ५० फुट खोल खाली आडात पडले. ईश्वराची करणी अगाध, त्यांना आडात कांहीही लागले नाही की अथांग पाण्यात ते बुडाले नाही. अगदी वरच्यावर जमिनीवरच जणू उभे असलेले लोकांना दिसले लोकांनी वरून दोर सोडून त्यांना वर काढले. वर काढल्यावर लोकांनी पाहिले तो त्यांचे अंग व कपडेही कोरडे होते. त्यांनी अत्यंत नम्रतेने इश्वरास वंदन व प्रार्थना केली व सर्व गतगंगेस नमन केले. गतगंगेच्या सत्वप्रभावाने आलेला अनर्थ तर टळलाच पण सर्व लोकांना आश्चर्यचकित करून सोडणारा असा गुरुकृपेचा अपार महिमा सर्वांच्या प्रत्ययास आला आणि आपले मंदिर जागृत देवस्थान असल्याची सर्वांची खात्री पटली.

मंदिरात एखाद्या पूजेच्या वेळी अगर मंगल उत्सवाच्या वेळेस कित्येक भाविक श्रध्दाळु भक्तांना अनेकदा सद्‌गुरु महाराजांचे एखाद्या पांढरे शुभ्र वस्त्र परिधान केलेल्या दिव्य विभूतीरूपाने अति तेजस्वी निर्मल दर्शन घडलेले आमच्या ऐकिवात आहे. त्याचप्रमाणे कित्येक सद्भक्तांना त्या निर्मल तेजस्वी विभूतींचे पांढऱ्या शुभ्र घोड्यावर बसलेल्या स्थितीत दर्शन घडलेले आहे. ज्या सद्भक्त उपासकांची जशीभावना वा श्रध्दाअसेल त्यांना त्यांच्या भावनेप्रमाणे श्रध्देप्रमाणे दिव्य विभूतीचे दर्शन घडत असते.

प. पू. गुरु. धर्मा महाराज हे एक सात्विक प्रवृत्तीचे सत्पुरुष होते. ते पूजा अर्चा करण्यात दररोज अगदी न चुकता तत्पर असत. नियमीत ईश्वराची पूजा व

एकाग्रचित्ताने त्यांचे नामस्मरण याच ईश्वर प्राप्तीच्या साधनांना त्यांनी प्राधान्य दिलेले होते. त्यांच्या आत्यंतिक उपासनेच्या योगे त्यांना सद्‌गुरु महाराजांचा दर्शन रूपाने साक्षात्कार झालेला होता. त्यांच्या वेळेस ते अगर अन्य लोक मंदिरात प्रत्येक श्रावण महिन्यात अगर केव्हाही पोथ्या पुराणे वगैरे वाचून लोकांना ज्ञानोपदेश करीत असत. सतपंथ धर्मसंस्थेचा कारभार अगदी उर्जितावस्थेस पोहचलेला असा हा काळ होता. याच काळात सतपंथ अनुयायांचे अध्वर्युपद श्री तोताराम बधु महाजन यांना लाभलेले होते. म्हणून धार्मिक क्षेत्रात व इतर सर्व व्यवहारात सुध्दां सर्व अनुयायी लोक त्यांना आपला पुढारी व नेता मानीत. ९ फेब्रुवारी १९३९ रोजी प. पु. गुरु धर्मा महाराजांनी स्वर्गधामात प्रयाण केले. त्यांच्या वेळेस कंडारी येथील श्री. कानजी बुवा हे एक कारभारी म्हणजे शेती वगैरेची देखरेख करणारे होते.

प. पु. गुरु धर्मा महाराज हयात असतांनाच फैजपूर येथील सद्भक्त श्री. खुशाल ओंकार भारंबे यांनी भाविक आर्चक म्हणून त्यांची दोनही मुले बालपणापासून बालब्रह्मचारी म्हणून अर्पण केलेले होते. त्यांच्यापैकी श्री. पुंजो उर्फ यशवंत हे तरूणपणीच वारले व दुसरे प. पू. गुरुवर्य पुरुषोत्तम गुरु धर्मा महाराज हे आर्चक बनले. त्यांच्या ऐन शैक्षणिक उमेदीच्या वेळी प. पू. धर्मा महाराज निर्वतल्यामुळे संस्थेच्या कारभाराची देखरेख व सर्व जबाबदारी त्यांच्यावरच पडली. त्यामुळे त्यांना शाळा सोडावी लागली. त्यांचे शालेय शिक्षण जरी बेताचे असले तरी धर्म शास्त्रांचा अभ्यास अगाध होता. शाळा सोडल्यानंतर लगेच म्हणजे इ. स. १९४० पासून तर त्यांना अतिशय खडतर जीवन जगावे लागले. सामाजिक परिस्थिती अतिशय बिघडली. सामाजिक प्रतिकूल काळाच्या सोसाटयाच्या वाऱ्याने आजवर तेवत असलेली धर्मज्योत मालवते कां काय अशा प्रकारची अत्यंत करुणाजनक परिस्थिती निर्माण झाली. पण प. पू. गुरु पुरुषोत्तम महाराजांनी स्वत: अपार कष्ट सहून अतोनात काळजी वाहून, मनोधैर्य कायम राखून त्या मालवू पाहणाऱ्या धर्म ज्योतिचे रक्षण केले. ती ज्योत पुन: सुस्थिर व तेजस्वी करण्याचा ते महान प्रयत्न करू लागले. त्या मध्यंतरीच्या प्रतिकूल काळात अशी एक वेळ येऊन ठेपली होती की आपल्या पश्चात् या संस्थानाचे पुढे काय होईल? काय केल्याने लोकांत पंथ संघटना कायम स्वरूपाची राहू शकेल याचे ते वारंवार एकाग्र मनाने चिंतन करीत व भावी काळ अनुकूल व्हावा याकरितां प. पू. सदगुरु इमामशहा महाराजांची व प्रभु श्री निकलंकी नारायणाची सतत आराधना करीत असत. अशाप्रकारच्या त्या अत्यंत नाजूक केविलवाण्या व एकाकी स्थितीत त्यांचे मनोधैर्य गोते खाऊ लागले, पण अत्यंत सायासाने व आत्मतेजाच्या विलक्षण सामर्थ्याने त्यांनी आपल्या मनोधैर्याचा तोल जाऊ दिला नाही.

एकदां सकाळच्या प्रहरी ब्रह्ममुहूर्ताचे वेळी म्हणजे ४ वाजण्याच्या सुमारास ध्यानस्थ बसले असतांना त्यांच्या मनांत सहजासहजी वरील विचार येताच त्यांना सद्‌गुरु महाराजांच्या परम तेजस्वी स्वरूपाचा साक्षात्कार झाला त्या परम पवित्र विभूतीने त्यांच्या शिरावर आपला वरदहस्त ठेऊन आशिर्वाद दिला कीं, तूं चिंता करू नकोस. तुझी मनोकामना थोड्याच दिवसांत पूर्ण होईल. भावीकाळ उज्वल होईल. ईश्वरी प्रेरणेने व आत्मिक सामर्थ्याने घडून आलेल्या दृष्टांतावर निर्भर होऊन त्यांनी आपले कार्य पूर्वीच्याच जोमाने पुढे चालू ठेवले.

यानंतर लगेच आठ दिवसांनी राजोरे येथील, पूर्वापारपासून सतपंथास पूज्य मानणारे धर्मप्रेमी सद्भक्त श्री. तुकाराम मंगू पाटील यांना अचानक ईश्वरी अनुग्रहाने आंतरीक सत्प्रेरणा होऊन दृष्टान्त घडला कीं, माया प्रपंच असार आहे. धर्म हा त्यांतील सारातील सार आहे. त्या धर्माचे पालन आणि रक्षण करणे हे अत्यंत महत्वाचे कार्य आहे. त्या कार्यास आपण कांहीतरी अंशाने वाहून घेतले पाहिजे. मायाप्रपंचाच्या दृढबंधनाकारणे आपल्याकडून जरी कांही होण्यासारखे नसले तरी पण आपल्या भावी पीढी कडून हे कार्य अवश्य घडलेच पाहिजे. अशा प्रकारची त्यांना आंतरिक प्रेरणा होऊन, त्या महान ध्येयाने प्रेरीत होऊन त्यांनी आपल्या एका मुलास मंदिरात बालब्रह्मचारी साधू म्हणून अर्पण करण्याचे ठरविले. या उदात्त विचाराने प्रेरीत होऊन ते मंदिरांत आले प. पू. गुरु पुरुषोम महाराजांना त्यांनी आपणास घडलेला दृष्टांत व झालेली सत्प्रेरणा निवेदन केली. मोठ्याहर्षोत्फुल्ल अंत:करणाने गुरु महाराजांनी त्यांना संमति दर्शविली. सद्‌गुरु महाराजांच्या प्रेरणादायी दृष्टांताचा व त्यांच्या कृपादृष्टीचा त्यांना पूर्णपणे ताबडतोब अनुभव आला.

गुरु महाराजांची संमति मिळताच आठ दहा दिवसांनी म्हणजे इ. स. १९५३ च्या मे महिन्यांत श्री. तुकाराम मंगू पाटील व त्यांच्या धर्म पत्नी सौ. चमेलीबाई यांनी आपला द्वितीय पुत्र श्री. जयराम यांना मंदिरात आणून गुरु महाराजांचे दरबारी बाल ब्रह्मचारी साधु म्हणून अर्पण केले. मंदिरांत आणले तेव्हा त्यांचे वय अवघ्या ११ वर्षाचे होते. त्यांनी सुध्दा धर्मास वाहून घेण्याची आपली आंतरीक प्रेरणा प्रगट करून गुरु महाराजांचे चरणी आश्रय घेतला. एवढ्या अल्प वयांत त्यांना व त्यांच्या आई वडिलांना झालेली उपरति व त्यांचे मनोधैर्य लक्षांत घेता सर्व लोकांना अनुपम प्रेमाचे भरते आले त्यांना अपार आनंद व उत्साह वाटला व त्यांच्यात पंच संघटनेचा व ऐक्याचा जोम वाढीस लागला. सतपंथी अनुयायांच्या निराश होऊ पाहणाऱ्या धर्म भावनांत अमृत ओतल्यामुळें त्या सचेतन झाल्या जागृत होऊन कार्यान्वित झाल्या.

प. पू. गुरु पुरुषोत्तम महाराजांनी बाल आर्चकांच्या शिक्षणाची स्वत: जबाबदारी व अतिशय काळजी घेतली. शालेय शिक्षण घेत असतांनाच त्यांना गुरु. पुरुषोत्तम महाराजांनी धार्मिक शिक्षण देण्यास सुरुवात केली. इ. स. १९५९ पर्यंत त्यांचे शालेय शिक्षण आटोपले. त्याच सुमारास प. पू. गुरु. पुरुषोत्तम महाराजांना वाटू लागले कीं आपल्या भावी पिढीस धर्मतत्वांचे योग्य मार्गदर्शन होण्याकरितां व त्यांची धर्म भावना जागृत राहून कार्यान्वीत होण्याकरितां कायम स्वरूपाची अशी कांही तरी योजना आपण करावयास हवी त्या भावीपिढीच्या कल्याणाच्या ध्येयाने प्रेरीत होवुन त्यानुसार त्यांनी अपरिमित कष्ट उचलून 'श्री सतपंथ भजनावली' नामक ग्रंथ सर्व लोकांच्या सहकार्याने छापून प्रसिध्द केला. अशाप्रकारे पुष्कळ दिवसांची त्यांची सदिच्छा फळास आली. परंतु एवढ्यावरच न थांबता त्यांनी आपले कार्य पुढे चालू ठेवले. सर्व लोकांनी तत्प्रित्यर्थ त्यांचे हार्दिक अभिनंदन व आर्थिक साहाय्य केले.

इ.स. १९६१ च्या २७ जुलै रोजी म्हणजे आषाढ शुध्द पौर्णिमा (गुरु-पौर्णिमा) शके १८८३ संवत २०१७ रोज गुरुवार या दिवशी मोठा उत्सव होऊन प. पू. गुरु जगन्नाथ महाराज यांना बालब्रह्मचारी साधुचे भगवेवस्त्र परिधान करण्यात आले व सतपंथी मंदिराचे भावी आर्चक व वहिवाटदार म्हणून मान्य करण्यांत आले. त्या उत्सवास अनेक गांवोगांवचे लोक बहुसंख्येने हजर होते. सर्वांनी त्या महोत्सवात सक्रिय भाग घेऊन आपापली गुरुभक्ति व्यक्त केली होती.

सतपंथ मार्गाच्या बहुतेक सर्व हस्तलिखित जीर्ण शास्त्रांचे प. पू. गुरु जगन्नाथ महाराजांनी व प. पू. गुरु पुरुषोत्तम महाराजांनी अत्यंत बारकाईने लक्षपूर्वक निरीक्षण करून त्यांचे पुनरूज्जीवन करण्याचे कार्य चालूं केलेले आहे. आपल्या प. पू. सद्गुरुवर्य इमामशहा महाराजांचा जीवन वृत्तांत व त्यांनी दर्शविलेला सन्मार्गाचा आणि ईश्वरोपासनेच्या साधनांचा बोधपट सर्व जनतेच्या दृष्टीसमोर यावा व त्यांची कायमस्वरूपाची स्मृति जनतेच्या मनांत बिंबवावी या उद्देशाने त्यांनी अपरिमित मेहनत करून सतपंथ धर्मशास्त्रातील उपलब्ध माहिती गोळा करून त्यावरून सदरचा जीवन वृत्तांत ग्रंथ लिहून काढला. तोच हा ग्रंथ सर्व जनताजनार्दनाच्या सहकार्याने छापून प्रसिध्द होत आहे. याचप्रमाणे भावीपिढीच्या उत्तरोत्तर उर्जितावस्थेकरितां व त्यांच्या आत्मिक उन्नतीकरीता मार्गदर्शकरून जे कांही ग्रंथ प. पू. सद्गुरुवर्य इमामशहा महाराजांनी केलेले आहेत त्यांच्यावर भावार्थ रूपाने मराठीत भाष्य करून ते सुध्दां प्रसिध्द करण्याचा त्यांचा मानस आहे. त्यापैकी 'शिक्षापत्री अथवा शिकवण आणि नित्यपाठ' हा सतपंथ धर्माच्या तत्व नयम आणि क्रियाचरणाची कवण देणारा लहानसा ग्रंथ थोड्याच दिवसांनी जनतेच्या हाती पडेल. त्याच्या नंतर सद्गुरुबोध, गुरीवाणी, चेतावणी वगैरे अनेकानेक ग्रंथ मराठीत भाषांतरीत करून ते छापून प्रसिध्द करण्याचा त्यांचा विचार आहे.

अशाप्रकारे सतपंथ अनुयायांच्या उन्नतिकरितां व विशेषत: भावी पीढीच्या उर्जितावस्थेकरितां महान परिश्रम करून दोघा गुरु महाराजांनी हे कार्य चालू केलेले आहे. हा त्यांचा आपणावर व भावीपीढीवर महान उपकारच ठरणार आहे. 'आत्मनो मोक्षार्थ जगद्धिताय च' म्हणजे आपल्या आत्म्याच्या मुक्तिबरोबरच जनता जनार्दनाच्या हीताकरिता जगदुध्दारा करिता झटणे हे त्यांचे परम उज्वल ध्येय आहे. त्यागमय जीवन जगून निरपेक्ष बुध्दिने करीत असलेल्या त्यांच्या या महान उपकारक कृत्यास आपण सहृदयतेने व आत्मियतेने सहकार्य करून त्यांचे हार्दिक अभिनंदन करू या. प. पू. गुरुवर्यांच्या या उत्स्फूर्त व प्रेरणादायी कार्यास ईश्वरी अनुग्रह लाभावा व त्या कार्याच्या सुमधुर फळांचा कृपाप्रसाद आपणास लाभावा म्हणजेच त्यांची कृपादृष्टि आपणावर व्हावी याकरितां आपण सर्वजण ईश्वराजवळ व प. पु. सद्गुरु महाराजांजवळ अत्यंत नम्र भावाने व दृढश्रध्देने प्रार्थना करू या.

संकलक,



## प. पू. सद्गुरु श्री इमामशाह महाराज व त्यांच्या जीवनात घडलेल्या काही महत्वाच्या घटनांचा कालखंड

| इसवी सन | महत्वाच्या घटना |
|---|---|
| १४२५ | संत नायाकाकांचा कानमजिल्ह्यात 'ठाकरडा' कुळात जन्म. |
| १४४० | संत सद्गुरु श्री इमामशाहांचा मुलताननगरीत संत श्री कबीरूद्दीन बावांच्या घरी जन्म. |
| १४४८ | सद्गुरु श्री इमामशाहांचे धर्मप्रचारार्थ पंजाब, दिल्ली, मारवाड व गुजराथ येथे प्रयाण. |
| १४४९ | संत श्री कबीरुद्दीन बावांचे मुलतान येथे महा निर्वाण |
| १४४९ | संत भाभारामचा चरोत्तर परगण्यातील खेडा जिल्ह्यातील वसो या गावी 'कांझा' कुटुंबातील केशवदास व विमलादेवी यांच्या घरी पाटीदार कुटुंबात जन्म. |
| १४५२ | सद्गुरुंचे मारवाडमधून प्रयाण, वेलर वाण्यास पुत्रप्राप्ति |
| १४५३ | संत साध्वी कीकीबाईचा जन्म. श्रावण शु. ७ शीतला सप्तमी मध्यरात्री 'अलींद्रा' गांवी हरसुखभाई व मणिबाई पाटीदार पटेल यांच्या घरी झाला. |
| १४५४ | दिल्लीचा बादशाहा बहलोल लोदीला मशिदीचे मुनारे नमवून चमत्कार दाखविला. |
| १४५८ | सद्गुरु इमामशाह व नायाकाकाचा प्रथम समागम कार्तिक व॥१ च्या दिवशी |
| १४६० | सद्गुरु इमामशाह महाराजांचे खंबायत येथे काही वर्षेपर्यंत मुक्काम. |
| १४६५ | संत नायाकाकांचा प्रेमी शिष्य गंगासिंह गोहिल यांचा जन्म. |

| | |
|---|---|
| १४६८ | खंबायत येथे इमामशाह महाराजांच्या मुलाचे 'बालेशाह' व 'बालीबेन' यांचे निर्वाण. इमामशाहांनी तेथे स्मृतिमंदीर बांधले. |
| १४६९ | इमामशाहांनी अमदाबाद जवळ पीराणा येथे रोजा बांधण्याचे काम सुरु केले. |
| १४७० | भक्त सवदासचे महानिर्वाण. |
| १४७३ | संत भाभारामच्या तपश्चर्या भूमीत संत साध्वी कीकीबाईचे मिलन. |
| १४८५ | संत नायाकाकांचे कुक्कस येथे प्रयाण व कायमचे वास्तव्य. |
| १४८६ | योगी निरंजननाथ व इमामशाहांचा संवाद. |
| १४८८ | कुकस येथे संत नायाकाकांशी संत भाभाराम व कीकीबाई यांचा अद्भूत रम्य संवाद. |
| १४८९ | सुलतान महमद बेगडयाने इमामशाहांची कसोटी घेतली. |
| १४८९ | देवा धामावर शरद्पौर्णिमेच्या रात्री योगी पुरुषांच्या मेळाव्यात गीता तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. |
| १४९० | सद्‌गुरु इमामशाहांनी पीराणा येथे सतपंथ धर्मपीठा वर संत श्री शाणाकाकांना गादीचा वारस नेमले व संस्थानची संपूर्ण वहिवाट त्यांच्या ताब्यात दिली. |
| १४९५ | सद्‌गुरु इमामशाह महाराज व संत निर्वाणसाहेब यांचे मिलन. |
| १४९६ | इमामशाहांना चेतावणी देण्याकरिता काळदूतांचे आगमन व त्यांच्याशी संवाद. |
| १५०१ | पीराण्यास सद्‌गुरु इमामशाहांनी समाधी मंदीर बांधून समाधी घेतली. |
| १५०२ | संत मुक्तिरामचा जन्म. चरोत्तर जिल्ह्यातील पेटलाद गावी निजानंद व सुनिती या ब्राह्मण दाम्पत्याच्या उदरी जन्म घेतला. |
| १५१० | च्या सुमारास सुलतान महमद बेगडयाने पावागड जिंकला. |
| १५३३ | भाद्रपद शु॥२ च्या दिवशी संत गंगासिंह गोहिल यास उत्तराधीकारी नेमून संत नायाकाका समाधिस्थ झाले. |
| १५३३ | भाद्रपद शु॥५ ऋषीपंचमीचे दिवशी संत मुक्तिरामला उत्तराधिकारी नेमून संत भाभाराम समाधिस्थ झाले. |
| १५३४ | भाभाराम मंदीराची देवा येथे स्थापना झाली. |
| १५३५ | रूण येथे कीकीबाई मंदीराची स्थापना झाली. |
| १५४५ | संत साध्वी कीकीबाईचे रूण येथे महानिर्वाण. |
| १६०० | च्या सुमारास फैजपूर येथे धर्मशाळेची स्थापना होऊन घटना तयार झाली. फैजपूर येथे गादीची स्थापना होऊन बालब्रह्मचारी आर्चकाची नेमणूक सुरु झाली व शिष्य परंपरेने वहिवाट सुरु झाली. |





कै. झिपरु जानु झोपे
बामणोद

श्रीमति शेवंताबाई झिपरु झोपे
बामणोद

स्वस्ती ग्राम श्री बामणोद येथील

कै. झिपरु जानु झोपे यांचे स्मरणार्थ श्रीमती शेवंताबाई झिपरु झोपे यांनी "संत समागम" या ग्रंथाकरिता उदारहस्ते देणगी देऊन आम्हास उपकृत केले. श्री सतपंथ ज्ञान साहित्य प्रकाशन फैजपूर ही संस्था आमरण त्यांचे उपकृत राहिल. प्रकाशन संस्था त्यांची अत्यंत आभारी आहे. धन्यवाद!

सप्रेम शुभ आशिर्वाद.



श्री. हरिभाऊ वामन नारखेडे
फैजपूर

सौ. शालिनी हरिभाऊ नारखेडे
फैजपूर

स्वस्ती ग्राम श्री फैजपूर येथील श्री. हरिभाऊ वामन नारखेडे व सौ. शालिनी हरिभाऊ नारखेडे यांनी "संत समागम" या ग्रंथाकरिता उदारहस्ते देणगी देऊन आम्हास उपकृत केले. श्री सतपंथ ज्ञान साहित्य प्रकाशन फैजपूर ही संस्था यावत्‌जिवन्‌ त्यांचे उपकृत राहिल. प्रकाशन संस्था त्यांची अत्यंत आभारी आहे. धन्यवाद!

सप्रेम शुभ आशिर्वाद



## सद्गुरु श्री इमामशाह महाराज

मनखा देही तो दुर्लभ छे, ते नही आवे वारंवार॥
पात्र पछानी परिब्रह्म पूजीये, तो कुळना होवे उध्दार॥
चार खाणमा जीव आवीयो, भुलो ते बहु अपार।
पूर्वपुण्य पोता तणो, तेणे पामो मनखा अवतार॥
मनखा देही पाम्या शुं थयु, न जाण्या मुक्तिनो भेद।
माणक-मोठू मोलनु, पड्या है अंतर छेद॥
सहस्त्र पचास भोगवीने, आवे मनखा देह।
दया क्षमा धर्म जाण्या नही, जेम उन्हाले वरसे मेह॥

मानव देहात येऊन जीवात्म्याने आपले जीवन शास्त्रशुध्द मार्गानेच जगून आत्मज्ञान संपादन करावे. यातच आपल्या जन्माचे सार्थक आहे. जगतात आत्मतत्त्व व जीवतत्त्व हे दोन पृथक् आणि स्वतंत्र सत्ता धारण करणारे चैतन्य प्रवाह आहेत. जीवतत्त्व त्रिगुणात्मक प्रकृतिच्या आविष्काराने बनलेले जडरूप तत्त्व आहे. तर आत्मतत्त्व चिन्मय ज्योतिस्वरूप चैतन्य स्वरूप आहे. या जडचेतनाच्या संयोगाने ही व्यष्टी, समष्टी जीव प्राणिमात्र निर्माण झालेले आहे. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधि या अष्टांग योग साधनांच्या दृढअभ्यासाने जीवात्मा जेव्हा आपले मलिन अविद्या स्वरूप जड तत्व जाणून त्याचा त्याग करण्याचा अभ्यास करतो, तेव्हाच चेतनस्वरूप ज्ञानावलंबनाने तो दुःखमुक्त होत जातो कारण दुःखाचे कारण असलेल्या त्रिगुणात्मक प्रकृतिला आपल्या विवेक बलाने तो दूर करतो.

- अमृतवाणी